# हिन्दी-मराठी शब्दकोश

संपादक

गो. प. नेने
श्रीपाद जोशी




तिसरी आवृत्ति ]  किंमत सहा रुपये  [ सन १९५६

महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा, पुणें

## पहिल्या आवृत्तीचें संपादक-मंडळ

श्री. **गो. प. नेने**, बी. अे. ( बनारस हिन्दु विश्वविद्यालय )

प्रा. **डॉ. तु. ना. देवरे**, अेम्. अे., अेल्अेल्. बी., पीअेच्. डी., अुर्दू व पर्शियन भाषांचे प्राध्यापक, वाडिया कॉलेज, पुणें.

श्री. **य. रा. दाते**, बी. अे., अेल्अेल्. बी., संपादक, ज्ञानकोश व शब्दकोश, पुणें.

पं. श्री. **रामानंदजी शर्मा**, ' साहित्य-भूषण ' ( सं. वि. मं. काशी )

श्री. **कृ. ज. धर्माधिकारी**, बी. अे., मंत्री, अखिल महाराष्ट्र हिन्दी प्रचार समिति; पुणें.



मुद्रकः—मा. ह. पटवर्धन, संगम प्रेस लि., ३८३ नारायण पेठ, पुणें २
प्रकाशकः—गो. प. नेने, मंत्री, महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा, राष्ट्रभाषाभवन, ३८८ नारायण पेठ, पुणें २.

# नांवांत बदल कां ?

राष्ट्रभाषा हें अेक नांव. या राष्ट्रभाषेची अेक सुटसुटीत व्याख्या आमच्या महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभेच्या घटनेंत पुढें दिल्याप्रमाणें केली असून हिंदी आणि हिंदुस्तानी या दोन्ही नांवांना यथार्थपणें संमति दर्शविली आहे. ‘ हिंदुस्तानी ’ हें नांव घेतल्यानें घोटाळा रहात नव्हता, परंतु घनघोर वादाअंतीं घटना-समितीनें हिंदी या नांवाचा स्वीकार केला आहे. मात्र स्वीकृत हिंदीचें संपृक्त स्वरूप स्पष्ट करणारें स्वतंत्र कलम घालून राष्ट्रभाषेचें स्वरूप पूर्वीं हिंदुस्तानी शब्दानें दाखविलें जात होतें, तसेंच संमत केलें आहे ही समाधानाची गोष्ट आहे. महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभेला हिंदी हें नांव स्वीकारण्यास कसलीच अडचण नाहीं. तें हिंदी नांव तिनें पूर्वीं संमत केलेल्यापैकींच आहे; सबब घटनासमितीचा निर्णय लक्षांत घेअून या कोशाचें ‘ हिंदुस्तानी मराठी कोश ’ हें नांव पुढें चालविण्यापेक्षां ‘ हिंदी मराठी कोश ’ असेंच नांव पुढें चालवणें अुचित ठरेल. म्हणून कोशाचे नांवांत तसा बदल करण्याचें सभेनें ठरवून ‘ हिन्दी–मराठी कोश ’ हें नांव स्वीकृत केलें आहे.

सभेनें मान्य केलेली व्याख्या पुढीलप्रमाणें आहे :—

> ‘भारतवर्षमें आंतर–प्रान्तीय व्यवहारके लिये जिस अेक भाषाका अुपयोग सदियोंसे आम तौरपर चलता आ रहा है, वह हमारी राष्ट्रभाषा है। अिसके लिये हिन्दी, हिन्दुस्तानी, अुर्दू ये तीनों नाम रूढ हैं।’

**दत्तो वामन पोतदार**

अध्यक्ष, महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा, पुणें.

# नाममें बदल क्यों ?

यह कोश जब प्रकाशित हुआ तब अुसका नाम ' हिंदुस्तानी–मराठी कोश ' रखा गया था । क्यों कि अुस समय राष्ट्रभाषाके लिये वह नाम ही जनताके द्वारा स्वीकृत हुआ था । महाराष्ट्र–राष्ट्रभाषा–सभाका जो विधान ता. १२ अक्तूबर १९४५ को स्वीकृत हुआ अुसमें राष्ट्रभाषाकी व्याख्या और नाम का विवरण अिन शब्दोंमें ग्रथित है :—

" ' भारतवर्षमें आंतरप्रांतीय व्यवहारके लिये जिस अेक भाषाका अुपयोग सदियोंसे आमतौरपर चलता आ रहा है वह हमारी राष्ट्रभाषा है । अिसके लिये हिन्दी, हिंदुस्तानी, अुर्दू ये तीनों नाम रूढ हैं। "

हिन्दी और हिन्दुस्तानी दोनों नाम सभाको पहलेसे ही स्वीकृत थे । अब संविधान समितिका नामके सम्बन्धमें निर्णय प्रकट हुआ है और अिस निर्णयके अनुसार राष्ट्रभाषाका नाम ' हिन्दी ' स्वीकृत हुआ है । अुचित है कि सभा अुसका ही स्वीकार करे । राष्ट्रभाषाके स्वरूपमें संविधान समितिने जो स्पष्टीकरण ( ३०१ आय में ) किया है वह साफ कर देता है कि नाम भले ही हिन्दी हो, किन्तु भाषाका स्वरूप संपृक्त संस्कृतिका पोषण करनेवाला ही रहेगा । ' हिन्दुस्तानी ' नामसे यह बात बिलकुल सरल हो जाती । अब नाम ' हिन्दी ' और स्वरूप जो ' हिंदुस्तानी ' नामसे संमत हो गया था, वही रहेगा । इसलिये ठीक यह है, कि सभा ' हिन्दुस्तानी–मराठी कोश ' का नाम बदलकर ' हिन्दी-मराठी कोश ' करे ।

ता. १८ नवंबर १९४९

**दत्तो वामन पोतदार**

अध्यक्ष, महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा, पुणें.

# पुरस्कार

## ( प्रथमावृत्ति )

## मुळाशीं असलेली दृष्टि

हा कोश अेका विशिष्ट दृष्टीनें लिहिला गेला आहे. देशामध्यें राष्ट्रभाषेचें महत्त्व लोकांना अधिकाधिक पटूं लागलें आहे. आंतर-प्रांतीय व्यवहारासाठीं अेक स्वदेशी राष्ट्रभाषा असली पाहिजे व तिचें निदान कामचलाअू ज्ञान लहानथोर सर्वांनाच असलें पाहिजे याविषयीं आतां दुमत नाहीं.

ही गोष्टसुद्धां आतां जवळ जवळ सर्वमान्य झाली आहे कीं, जर जनतेमध्यें जागृति आणावयाची आणि तिच्यांत स्वतःचा कारभार स्वतःच चालविण्याची शक्ति वाढवावयाची असेल तर लोकव्यवहार खालपासून वरपर्यंत त्या त्या प्रांतांत त्या त्या प्रांतीय भाषेंतूनच झाला पाहिजे. कित्येक प्रांतांची संस्कृति भिन्न असते म्हणून नव्हे ( धर्मभेद, जातिभेद, भाषाभेद अित्यादि भेद असूनहि स्वभाव, जीवनानुभव आणि जीवनदृष्टि या बाबतींत आपणां भारतीयांची संस्कृति स्थूल मानानें अेकच आहे आणि अेकच असणार. ) तर त्या त्या ठिकाणच्या जनतेच्या हृदयापर्यंत जाअून भिडून लोक-समुदायाच्या सर्व शक्ति जागृत करण्याचें सामर्थ्य त्या त्या प्रान्तीय भाषेंतच असतें म्हणून.

लोक-व्यवहार म्हटला म्हणजे त्यांत सार्वत्रिक आणि उच्च शिक्षण आलें, राज्यकारभार आला, न्यायदान आलें आणि समाजाला स्वर्गांत किंवा नरकांत पोहोंचवून देणारें वृत्तविवेचनहि आलें आणि या वृत्त-विवेचनाच्या हेलकाव्याप्रमाणें समर्थ किंवा दुर्बल होणारें राजकारण आणि त्यावर अवलंबून असलेला राज्यकारभारहि आला. या सर्व बाबतींत होतां होअील तों प्रान्तीय भाषांचाच उपयोग झाला पाहिजे.

पण जर या अेका अखंड राष्ट्राचीं शकलें करून त्याचा नाश करावयाचा नसेल आणि आत्मघातकी प्रान्तीय संकीर्णता वाढवावयाची नसेल तर या प्रान्तीय समाजांनीं अेकमेकांपासून दूर न जातां, अेकमेकांचा अीर्ष्या-द्वेष

सोडून देऊन जवळ आलें पाहिजे, परस्पर सहकार वाढविला पाहिजे आणि राष्ट्रैक्याचा अनुभव अुत्तरोत्तर पुष्ट केला पाहिजे.

असें करण्याचें अेक महत्त्वाचें साधन म्हणजे '**राष्ट्रभाषा**' होय.

ही राष्ट्रभाषा परदेशांतून आणून चालावयाचें नाहीं किंवा कृत्रिमपणें अेक अगदींच नवीन भाषाहि बनवितां यावयाची नाहीं. देशांतील अेखाद्या प्रतिष्ठित भाषेलाच ही पदवी देअून तिला वाढीस लावण्याचें कार्य सर्वांनीं यावच्छक्य केलें पाहिजे.

फार प्राचीन काळीं जेव्हां देशांतील निरनिराळ्या भागांत प्राकृत भाषा बोलल्या जात असत, तेव्हां सर्व प्रान्तांना अेकत्र आणणारी आणि भारतीय संस्कृतीला परिपुष्ट करणारी अशी राष्ट्रीय भाषा म्हणजे संस्कृत होती. आज देखील मराठी, गुजराती, बंगाली, कानडी, तेलगू, तामिल, हिन्दी, अुर्दू या सर्व भाषांवर संस्कृतचा कमीअधिक प्रभाव दिसून येतो. पुढें कालांतरानें प्राकृत भाषांचा अपभ्रंश होऊन त्यांतून निरानिराळ्या देशी भाषा निर्माण झाल्या आणि या देशी भाषांतून मुख्यतया धर्म, नीति, सदाचारविषयक आणि त्याबरोबर थोडेंबहुत ललित-वाङ्मय निर्माण होऊं लागलें. त्यांतल्या त्यांत साधुसंतांनीं आणि राजकारणी पुरुषांनीं उत्तरेकडील हिन्दीचा विशेष पुरस्कार केला आणि राष्ट्रभाषेचें स्थान संस्कृत आणि पालीनंतर याच भाषेला मिळालें.

पठाण आणि मोंगल काळीं राजकर्त्यांनीं आपल्याबरोबर अरबी आणि फारसी या भाषा आणून पर्शियन दरबार सुरू केला, परंतु त्यांचा तो आग्रह चालूं शकला नाहीं. जरी त्यांचें राज्य झालें आणि कांहीं लोकांनीं त्यांचा धर्म स्वीकारला, तरी लोकांना स्वभाषा सोडणें शक्य नव्हतें. यामुळें हिन्दी लोकांनीं राजकर्त्यांच्या अरबी, फारसी भाषेंतून यथेच्छ शब्द घेअून हिन्दींतून राजकर्त्यांशीं व्यवहार चालू केला. राजकर्त्यांनीं या नव्या भाषाशैलीला 'अुर्दू' म्हणजे बाजारी किंवा छावणींतील भाषा, असें तुच्छतादर्शक नांव दिलें, परंतु देशांतील हिन्दूमुसलमानांनीं याच 'अुर्दू' ला प्रेमानें कमावून तिची साहित्यशक्ति वाढविली आणि अशा रीतीनें अेकाच भाषेचे हिन्दी आणि अुर्दू असे

दोन प्रवाह चालू झाले. अेकाच राष्ट्रांत आणि अेकाच समाजांत दोन भिन्न भिन्न शैली चालविणें सोपें नसतें. लोक आपआपसांत बोलूं लागले म्हणजे शब्दांची आणि वाक्-प्रचारांची देवघेव सुरू होतेच. हिन्दीनें स्वदेशीच राहण्याचा कितीहि आग्रह धरला तरी तींत अरबी-फारसीचे शब्द येणारच आणि अुर्दूनें प्रयत्नपूर्वक देशी शब्द वगळून अरबी, फारसी शब्दांचीच रेलचेल करण्याचें ठरविलें तरी तिला आपला देशीपणा सोडून चालावयाचें नाहीं. त्या वेळच्या राजकर्त्यांना जनतेशीं देशी भाषांतून आपला संपर्क ठेवावा लागल्या मुळेंच तर अुर्दू राजमान्य झाली. असें सांगतात कीं, अुर्दूची अुत्पत्ति अुत्तर हिंदुस्थानांत झाली नसून दक्षिणेंतच तिचा प्रथम प्रादुर्भाव झाला.

कोणतीहि भाषा—मग ती लोकभाषा असो, सामान्य बोली असो, किंवा साहित्यिक भाषा असो—जनतेपासून जतजशी दूर जाते तसतसे तिचें सामर्थ्य क्षीण होत जातें. संस्कृत भाषा देववाणी बनली आणि स्वाभाविकपणें दिवंगत झाली. हिन्दी भाषा संस्कृतच्या आहारीं पडली त्या मानानें ती पंडित मंडळींच्या बाहेर दुर्बोध होअूं लागली. अुर्दूनें स्वतःचें देशीपण विसरून अरबी-फारसीचें अजीर्ण होअूं दिलें आणि मुसलमान समाजांत देखील ती भाषा समजेनाशी झाली. आजच्या सुशिक्षित समाजानें अिंग्रजीचा आश्रय केला आणि परिणामीं त्यांचा जनतेशीं संपर्क सुटला. ज्यांनीं ज्यांनीं लोक-भाषेचा, प्रान्तीय भाषांचा पुरस्कार केला त्यांची त्यांची शक्ति वाढली. अँग्लो-अिंडियन लोकांनीं अिंग्रजीलाच स्वाभाषा करण्याचा प्रयत्न केला, यामुळें देशांत त्यांचीं पाळेंमुळें रुजेनात. असा हा सार्वत्रिक नियम आहे

तेव्हां अेकमात्र राष्ट्रीय नीति हीच होअूं शकते कीं, देशांत सर्वत्र ज्या ठिकाणीं जी प्रान्तीय भाषा असेल तिलाच महत्त्व दिलें पाहिजे आणि या प्रान्तीय भाषांनीं अेकमेकींशीं फटकून राहून सवता सुभा निर्माण न करतां अेकमेकींच्या जवळ येअून स्वतःची आणि राष्ट्राची शक्ति वाढविली पाहिजे. जर अेखादी भाषा निराळेपणा वाढवूं लागली तर अस्वस्थ होण्याचें कांहींच कारण नाहीं. कारण जी भाषा आपला निराळेपणा वाढवील तिला आपण अशक्त झाल्याचा आणि आपली लोक-संपर्क-शक्ति नष्ट झाल्याचा अनुभव आपोआपच येअील. लोकशाहीच्या दिवसांत भाषा सर्वसुलभ आणि सर्व-

संग्राहक झाल्यावांचून राहतच नाहीं. तेव्हां काल-बलानेंच जी गोष्ट घडून येणार आहे तिच्यासाठीं वृथा आक्रोश करण्यांत फायदा तो काय ?

आंतर्प्रान्तीय व्यवहारासाठीं जी राष्ट्रभाषा वापरावयाची ती सर्वसुलभ, सर्वसंग्राहक आणि परस्परानुकूल असलींच पाहिजे. ज्याला म्हणून निरनिराळ्या प्रान्तांतील जनतेपर्यंत पोहोंचावयाचें असेल त्याला जनतेला सुपरिचित अशीच भाषा बोलली पाहिजे. साहित्यिक लोक आपल्या मनोविनोदनासाठीं संस्कृतनिष्ठ स्वभाषा वापरोत किंवा संस्कृतच वापरोत, अरबी-फारसीनिष्ठ अुर्दू वापरोत किंवा प्रत्यक्ष अरबी-फारसीच वापरोत, त्यांना कोणीहि मना करीत नाहीं. भाषांचीं हीं रूपें राहणारच; पण जे कोणी लोकसुलभ, सर्वसंग्रहकारी आणि परस्परानुकूल भाषा वापरतील त्यांचाच प्रभाव जनतेवर पडणार आहे.

आपण सर्व बाजूंचा विचार करून अुत्तर हिंदुस्थानांतील शहरांत आणि खेडेगांवांत हिन्दु-मुसलमानादि सर्व लोक जी भाषा बोलतात किंवा समजतात त्या भाषेला 'राष्ट्रभाषा' म्हणून स्वीकारलें आहे. आतां हिला पूर्णपणें राष्ट्रीय करण्यासाठीं तिचा प्रचार सर्व देशभर करावयाचा आहे. या भाषेला जर खरोखर राष्ट्रसुलभ आणि राष्ट्रप्रिय करावयाचें असेल तर हिच्या प्रचाराचें काम अुत्तर हिंदुस्थानांतील साहित्यिक लोकांच्या हातींच न ठेवतां भिन्न भिन्न प्रांन्तांतील राष्ट्रभाषाप्रेमी राष्ट्रसेवकांच्या सहकारानेंच हें काम झालें पाहिजे आणि राष्ट्रभाषेचें स्वरूप ठरवितांना प्रान्तीय भाषा बोलणाऱ्या लोकांना तें सोपें जाअील याचीहि काळजी घेतली पाहिजे. सर्व प्रान्तीय भाषांतून जे देशी शब्द समान आहेत ( यांत अरबी, फारसी शब्दांचाहि समावेश होतो ) त्यांना स्वाभाविकपणें राष्ट्रीय रूप येणारच. अशा सर्व समान शब्दांच्या जोरावरच राष्ट्रीय भाषा राष्ट्रप्रिय आणि राष्ट्रसुलभ होअूं शकेल. राष्ट्रभाषा जरी शिक्षणाच्या द्वारा सार्वत्रिक करतां आली तरी तिचें स्वरूप जितकें लोकसुलभ असेल त्या मानानेंच जनतेमध्यें तिचा प्रचार होणार. जनतेंतील स्थितिस्थापकता (Inertia) व परिश्रमविमुखता ही देखील अेक शक्ति आहे. तिला विसरून चालावयाचें नाहीं. लोकसत्तेच्या दिवसांत हा अनुभव प्रत्येक सुधारकाला येतोच.

प्रस्तुत कोश अेवढी व्यापक दृष्टि बाळगून तयार केलेला नाहीं. राष्ट्र-भाषेचा संपूर्ण कोश बनविण्याची महत्त्वकांक्षा देखील येथें बाळगलेली नाहीं. यांत सांपडतील तेच शब्द राष्ट्रभाषेंत प्रधानपणें वापरले पाहिजेत असेंहि नाहीं. मराठी भाषा बोलणाऱ्या सर्व प्रकारच्या लोकांना राष्ट्रभाषा शिकत असतां अडणारे शब्द देण्याचें धोरण येथें मुख्य आहे. तेव्हां अर्थातच जे शब्द मराठीला आणि राष्ट्रभाषेला समान आहेत ( आणि अशांची संख्या थोडी-थोडकी नाहीं ) असे शब्द येथें देअून कोशाचा आकार वाढविला नाहीं. अरबी-फारसी शब्दांत देखील जे शब्द राष्ट्रभाषेंत रूढ झाले आहेत अथवा जे शब्द अुत्तर हिन्दुस्थानांतील कांहीं लोकांच्या बोलण्या-लिहिण्यांत विशेष येतात ते शब्दच येथें प्रामुख्यानें दिले आहेत कारण कोशाचा अुद्देशच महाराष्ट्रीयांची सोय हा आहे.

महाराष्ट्रीयांमध्यें संस्कृत भाषा न शिकलेल्या व अुच्च प्रगल्भ साहित्य न वाचणाऱ्या लोकांचाहि अंतर्भाव होतो. मराठी भाषा बोलणारे पारशी, ख्रिस्ती, यहुदी, मुसलमान हेहि महाराष्ट्रीयच होत. यांच्या सोयीसाठीं राष्ट्र-भाषेमध्यें वारंवार येणारे संस्कृत कुटुंबातील देशी शब्द मराठीला परिचित असूनहि येथें देणें आवश्यक समजून तसें केलें आहे.

संस्कृतिदृष्ट्या हिन्दीच्या अध्ययनांत अेक महत्त्वाचा हेतु लोकांच्या पुढें असतो. तुलसीदास, सूरदास, कबीर यांसारख्या कवींचें अध्ययन केवळ राष्ट्रीयदृष्ट्या नव्हे तर संस्कृतीच्या व जीवनाच्या समाधानाच्या दृष्टीनें देखील अत्यंत पोषक आणि अुन्नतिकारक आहे; म्हणून हा शब्दकोश तयार करीत असतांना या कवींच्या कवनांतून अडणारे शब्द मुद्दाम घेतले आहेत. असे जनतेच्या गाढ परिचयाचे पण सध्यांच्या भाषेंत प्रयोगांत न येणारे शब्द ओळखतां यावेत म्हणून ते तारकांकित केले आहेत.

राष्ट्रभाषेच्या प्रचारासाठीं प्रयाग, वर्धा आणि मद्रास या तिन्ही ठिकाणीं जे अभ्यासक्रम चालविले जातात आणि जीं पाठ्य–पुस्तकें नेमलीं जातात त्यांमधून येणारे बहुतेक सर्व शब्द या कोशांत आलेच पाहिजेत असा आग्रह धरूनच शब्दसंग्रह केलेला आहे.

अशा रीतीनें हा कोश मराठी बोलणारांची सर्व बाजूंनीं सोय करण्याच्या अुद्देशानें होतां होअील तों सोपा करण्याचा प्रयत्न झाला आहे.

आपल्या या विचित्र देशांत भाषेच्या नांवासंबंधानें देखील ओढाताण होते ही अेक आश्चर्याची गोष्ट आहे. राष्ट्रभाषेची व्याख्या जी महात्मा गांधींनीं अिन्दूरला हिन्दी साहित्य सम्मेलनाच्या अध्यक्षपदावरून राष्ट्रापुढें मांडली ती सर्वांनाच सारखी मान्य झाली आहे. तीविषयीं कोठें दुमत नाहीं. असें असूनहि नांवासंबंधानें बरीच ओढाताण चालली आहे. हिन्दी, हिन्दुस्तानी आणि अुर्दू हीं नांवें आपल्या भाषेला मुसलमानांनींच दिलीं. हिन्दी हें अरबी रूप आहे, हिन्दुस्तानी हें फारसी. कॉंग्रेसनें आपल्या कानपूरच्या ठरावांत राष्ट्रभाषेला हिन्दुस्तानी म्हटलें, यामुळें कॉंग्रेस सरकारला तेंच नांव सर्वत्र वापरणें आवश्यक वाटतें. आपणांला दोन्ही नांवें सारखींच प्रिय आहेत. दोहोंमध्यें ती भाषा भारतवर्षाची आहे हें अगदीं स्पष्ट होतें. नांवाच्या झगड्यामुळें कोशाची अुपयुक्तता कमी होअूं नये म्हणून याचें नांव ‘ हिन्दुस्तानी-मराठी शब्दकोश ’ असें ठेवलें असून राष्ट्रभाषेची सर्वमान्य व्याख्या नजरेपुढें ठेवूनच हा कोश तयार करण्यांत आला आहे.

महाराष्ट्रांतील सर्व शाळा कालेजांतील विद्यार्थ्यांना हा कोश अुपयोगी होअील असा विश्वास वाटतो.

या कोशांत वापरलेल्या अक्षरांसंबंधानें दोन शब्द सांगणें आवश्यक आहे. हिन्दी साहित्य संमेलनानें महाराष्ट्र साहित्य संमेलनाप्रमाणेंच लिपि सुधारणेचा विचार केलेला आहे आणि आनंदाची गोष्ट ही कीं, या बाबतींत दोन्ही संमेलनांचें जवळ जवळ अेकमत आहे. नागरी लिपि वापरणाऱ्या दोन्ही भाषांच्या साहित्यिक संस्थांचें एकमत झाल्यानंतर या सुधारणांचा अंमल शक्य तोंवर सर्वत्र झाला पाहिजे. हिन्दी आणि मराठी या दोन्ही भाषांच्या नागरी लिपींत थोडासा फरक आहे. अ, ए, भ, व अ, ण, झ मधील फरक सहज ध्यानांत येतो. श, ल, क्ष व श, ल, क्ष या अक्षरांत देखील थोडासा फरक आहेच. या बाबतींत मराठी आणि हिन्दी या दोन्ही साहित्य संस्थांच्या प्रतिनिधींनीं बसून देवाण-घेवाणीच्या नात्यानें नव्हे तर लिपि सुधारणेच्या शुद्ध ष्टीनें अुभयमान्य असे कांहीं फेरफार सुचविले आहेत. त्यांत अ, ण, झ, क्ष

वगैरे अक्षरें आणि अंक हिन्दीनें मराठीचे पसंत केले आणि मराठीनें शेवटीं काना येतो म्हणून हिन्दीचा ल पसंत केला. श पेक्षां श लिहावयास सोपा म्हणून तोहि पसंत केला.

मुख्य सुधारणा केली ती स्वरांच्या बाबतींत. व्यंजनांच्या बाराखडीला जशीं स्वरचिन्हें लागतात तशी चिन्हें 'अ' ला लावून सर्व स्वर व्यक्त केले असतां साक्षरताग्रहण बरेंच सोपें होतें. यासाठीं तीं स्वरूपें सर्रास स्वीकारलीं आहेत. या रूपांना 'अ' ची बाराखडी असें म्हणण्याचा प्रघात रूढ होऊं लागला आहे. पण ही भाषा अशास्त्रीय आहे. व्यंजनांत मागून स्वर मिसळले म्हणजेच बाराखडी होऊं शकते. 'अी' हा स्वर 'अ'ची विकृति होऊन तयार झालेला नाहीं. असो. दोनतीन गोष्टी अत्यावश्यक असूनहि त्या येथें आणतां आल्या नाहींत. पण जी अल्पशी सुधारणा केली आहे तिला वाचकांची दृष्टि सरावली म्हणजे पुढचें पाअूल टाकणें अधिक सोपें जाअील असा भरंवसा वाटतो. लिपि सुधारणेच्या मुळाशीं जनतेला–हजारों वर्षें निरक्षर असलेल्या जनतेला–साक्षर करण्याचें भगीरथ काम शक्य तितकें सोपें करावें आणि सर्वत्र ही सुधारलेली नागरीच अेकरूपानें वापरली जावी हा मुख्य अुद्देश आहे. मुद्रण जितकें सोपें होईल तितका साहित्यप्रचार स्वस्त करतां येअील हीहि दृष्टि आहेच. लिपींच्या चढाओढीत आज नागरी लिपि सुरक्षित नाहीं; तिची आवश्यक सुधारणा करूनच तिचें रक्षण करतां येअील ही गोष्ट लोकांना जितकी पटेल तितकी चांगली.

मोठमोठ्या संस्थांतून जशीं कामें केलीं जातात तशा पद्धतीनें जर हा कोश केला असता तर अितका सुटसुटीतहि झाला नसता व अितक्या थोड्या खर्चांत आणि अितक्या लवकरहि झाला नसता. या कोशाचे सर्व श्रेय श्री. नाना धर्माधिकारी यांना आहे. त्यांनींच अुत्साहानें हें काम हातीं घेतलें. श्री. गोपाळराव नेने (बी. अे., बनारस हिन्दु विश्वविद्यालय) व प्रो. देवरे, अेम्. अे., यांची मदत मिळविली. अेवढेंच नव्हे, तर श्री. यशवंतराव दात्यांसारख्या कोशकार्यांत नाणावलेल्या सेवकांचा सहकार मिळविला व हें काम संकल्पित अवधीमध्यें पुरें केलें. श्री. गोपाळराव नेने हे महाराष्ट्रीय तरुण बनारसचेच रहिवासी आहेत व हिन्दी भाषेशीं त्यांचा मातृभाषेसारखा परिचय

असल्यामुळें हिन्दी शब्दांचे यथोचित अर्थ ठरवितांना अुत्तर हिंदुस्थानांत प्रत्यक्ष राहिल्यामुळें त्यांचा अनुभव फार अुपयोगी पडला. श्री. तु. ना. देवरे हे स्थानिक कॉलेजांत अुर्दू व फारसीचे प्रोफेसर आहेत; अरबी-फारसी शब्दांची पसंती करण्यांत आणि अर्थनिर्णय करण्यांत त्यांचा विशेष अुपयोग झाला.

वर्ध्याच्या राष्ट्रभाषा प्रचार समितीला या कोशानिर्मितीच्या कार्मी प्रत्यक्ष आर्थिक मदत करणें शक्य नव्हतें. तरीहि त्या समितीनें श्री. रामानंद शर्मा यांची मदत तीन महिन्यांसाठीं देअून या कोशाच्या कार्मी हातभार लावला आहे. प्राचीन साहित्यांतील शब्दांची पसंती आणि अर्थनिश्चिति करण्यांत शर्माजींचा विशेष अुपयोग झाला.

मला वाटतें, कोश तयार करण्यासारखें चिकाटीचें काम तरुणांनीं स्वतःच्या हिमतीवर हातीं घेअून सहकार्यानें पार पाडल्याचें हें पहिलेंच उदाहरण असेल.

या कोशांत सुधारणेला पुष्कळ वाव आहे यांत शंका नाहीं. पण त्याबरोबर वाचकांनीं हीहि खात्री बाळगावी कीं, आज राष्ट्रभाषेच्या अध्ययनाला सर्व दृष्टींनीं अुपयोगी पडेल असा कोश हाच आहे व याच हेतूनें याची किंमतहि अत्यंत स्वस्त ठेवली आहे. सुटसुटीत असल्यामुळें प्रवासांत देखील बरोबर बाळगण्याला हा सोयीचा झाला आहे. सामान्यपणें वापरल्या जाणाऱ्या राष्ट्रभाषेंत येणारा शब्द या कोशांत सांपडणार नाहीं असें होणार नाहीं तरीहि अेखादा शब्द नच मिळाला तर आपल्या पुस्तकांत योग्य स्थळीं किंवा पुस्तकाच्या शेवटीं तो लिहून ठेवावा आणि अशा शब्दांची अेक यादी तयार करून ती कोशकारांचेकडे पाठवून द्यावी. कोशासारखीं कामें चौकस वाचकांच्या मदतीनेंच शेवटीं संपूर्ण होऊं शकतात.

कोणत्याहि कृतीचा अुपयोग मूळ अुद्देशाहून अधिक होत नाहीं असें थोडेंच आहे! प्रस्तुत कोश महाराष्ट्रीयांना हिन्दी शिकतांना अुपयोगी असावा अेवढाच जरी अुद्देश असला तरी हिन्दीवाल्यांना किंवा हिंदुस्तानी भाषा नव्यानें जाणणाऱ्या लोकांना पर्यायवाची मराठी शब्द हवा असल्यास हा कोश त्यांना फारच अुपयोगी होअील.

महाशिवरात्र, काका कालेलकर

ता १७–२–१९३९

# निवेदन

## ( पहिल्या आवृत्तीचें )

अखिल महाराष्ट्र हिन्दी प्रचार समितीची १९३७ च्या सप्टेंबर महिन्यांत स्थापना झाल्यापासून राष्ट्रभाषेच्या प्रचाराची महाराष्ट्रांत झपाट्यानें प्रगति होत आहे. राष्ट्रभाषेच्या परीक्षांना बसणाऱ्यांची संख्या आतां तिपटी-चौपटीनें वाढली असून, कित्येक विद्यार्थी ' हिन्दी साहित्य-संमेलन, प्रयाग 'च्या ' विशारद ', व ' साहित्यरत्न ' या पदवी-परीक्षांकरितांहि तयारी करूं लागले आहेत. मुंबई सरकारनें शाळांतून हिंदुस्तानीचें शिक्षण देण्याचें ठरविल्यामुळें जिल्ह्याप्रमाणेंच तालुक्याच्या मुख्य मुख्य गांवीं व कित्येक खेडेगांवांतहि राष्ट्रभाषेचें अध्ययन विद्यार्थ्यांनीं व शिक्षक मंडळींनीं करण्यास सुरुवात केली आहे. जेथें राष्ट्रभाषेचें शिक्षण देणारा प्रचारक पोहोंचूं शकला नाहीं, अशा ठिकाणीं राष्ट्रभाषेचा अभ्यास करणाऱ्यांना मदत व्हांवी म्हणून कित्येक साधनग्रंथांची आवश्यकता अुत्पन्न झाली आहे. अशा साधनग्रंथांच्या निर्मितींत राष्ट्रभाषा शिकण्यास अत्यंत अुपयोगी अशा राष्ट्रभाषेंतील शब्दांचा मराठींत शास्त्रीय पद्धतीनें अर्थ देणाऱ्या कोशाची पहिली गरज आहे. हें जाणून अखिल महाराष्ट्र हिन्दी प्रचार समितीनें आपल्या ता २४ ऑगस्ट १९३८ च्या बैठकींत या कामाची योजना करण्याकरितां खालील गृहस्थांची शब्दकोशसमिति नेमली :—

१ श्री. दत्तो वामन पोतदार, पुणें.

२ श्री. यशवंतराव दाते, महाराष्ट्र शब्दकोश मंडळ, पुणें.

३ श्री. पुण्डलीकजी कातगडे, संपादक—' हिन्दी—मराठी शब्दकोश ', बेळगांव.

४ प्रो. तु. ना. देवरे, अुर्दू व पर्शियन भाषांचे प्रोफेसर, वाडिया कॉलेज, पुणें.

५ श्री. कृ. ज. धर्माधिकारी—संयोजक, शब्दकोशसमिति, पुणें.

या समितीनें शब्दकोशाच्या रचनेसंबंधीं कांहीं निश्चित सिद्धान्त ठरविले व प्रत्यक्ष संपादन—कार्यास सुरुवात करतांना अेक संपादन-व्यवसायमंडळ नेमिलें, त्यांत श्री. दाते, प्रो. देवरे व श्री. धर्माधिकारी या समितीच्या सभासदांशिवाय श्री. गोपाळराव नेने व श्री. रामानंदजी शर्मा यांचाहि समावेश करून घेण्यांत येअून कामाची स्थूल मानानें विभागणी केली. महाराष्ट्र-समितीतर्फे सर्व कामाचा मुख्य भार श्री. गोपाळराव नेने यांचेवर सोंपविण्यांत आला.

आचार्य श्री. काकासाहेब कालेलकर व श्री. दत्तोपंत पोतदार हे अधून मधून कोशाचें काम पाहून अत्यंत महत्त्वाच्या सूचना देत असत. या क्षेत्रांतलि प्रथम कोशकार श्री. पुण्डलीकजी कातगडे हे रोजच्या कामांत प्रत्यक्ष हजर नसले तरी आपल्या ' हिन्दी-मराठी शब्दकोशा'च्या रूपानें हजर राहून योग्य ती सहायता करीत होते.

या कोशकार्याचें संपादन करतांना काम सुलभ व शास्त्रशुद्ध व्हावें या दृष्टीनें मराठी कोशकार श्री. दाते हे प्रत्यक्ष कामांत भाग घेअून तंत्रविषयक सूचना करीत, अितकेंच नव्हे तर अर्थनिश्चिति आणि व्युत्पत्ति ठरवितांना स्वतःचा अमूल्य वेळ खर्च करून मदत करीत. प्रो. देवरे हे अुर्दू आणि अरबी फारसीचे तज्ज्ञ आहेत; पण याशिवाय अलीकडे हिन्दीचाहि त्यांनीं जो विशेष अभ्यास केला आहे त्यामुळें व त्यांच्या अेकंदरींत चिकित्सक व शास्त्रीय दृष्टीमुळें शब्दांचे अर्थनिर्णय करण्याच्या कामीं त्यांची महत्त्वाची मदत झाली. आपलें व्यावसायिक अितर काम असतांहि कोशाच्या कामाकरितां बराच वेळ त्यांनीं अत्यंत हौसेनें दिला याबद्दल वरील सर्व मंडळीबरोबरच समिति त्यांचीहि विशेष रूपानें ॠणी आहे.

श्री. गोपाळराव नेने, श्री. रामानंदजी शर्मा व श्री. कृ. ज. धर्माधिकारी समितीचे घटक असल्यानें त्यांच्या कामाबद्दल प्रत्यक्ष कामच त्यांची योग्यता ठरवील म्हणून न लिहिलेलेंच बरें.

या कार्यांत ज्या व्यक्तींकडून आणि संस्थांकडून मदत झाली त्यांचाहि मी आभारी आहें. प्रामुख्यानें म्हणावयाचें म्हणजे अमळनेरचे श्रीमंत प्रताप-

शेटजी यांनीं आपल्या नेहमींच्या औदार्यास अनुसरून समितीला दिलेल्या रु.६००० च्या देणगींतून या कामाकरितां लागणारा खर्च करण्यास परवानगी दिली, याबद्दल समितीला कृतज्ञता वाटते. पुष्कळ चांगल्या चांगल्या योजना मनामध्यें असूनहि योग्य वेळीं आवश्यक द्रव्याची सहायता न झाल्यानें कितीतरी कामें पडून राहतात. श्री. प्रतापशेटजींच्या पैशाचा आम्हीं अपेक्षिल्यापेक्षांहि अधिक मूल्यवान् असा अुपयोग होत आहे याचें आमचे-प्रमाणेंच त्यांनाहि समाधान वाटेल.

धुळ्याचे श्री. रामेश्वरजी पोद्दार यांनीं आम्हीं विनंती करतांच शंभर रुपये कार्यास देणगी म्हणून पाठवून दिले. याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

प्रत्यक्ष काम चालू असतां ज्या कित्येक राष्ट्रभाषा–भक्तांची मदत झाली त्यामध्यें आयुर्वेद–महाविद्यालयाचे प्राध्यापक वैद्य श्री. भास्कर विश्वनाथ अूर्फ मामा गोखले, ‘आयुर्विद्या–पारंगत’, ‘राष्ट्रभाषा–कोविद’. आणि ‘सकाळ’ पत्राच्या संपादकीय विभागांत काम करणारे श्री. भा. मो. भट यांची मदत अुल्लेखनीय आहे. श्री. वि. बा. चंद्रात्रे, ‘राष्ट्र-भाषा–कोविद’, व श्री. द. ग. धारेश्वर, बी. अे., यांनींहि सोंपविलेलें काम जिव्हाळ्यानें व कसोशीनें केलें.

वर्ध्याच्या राष्ट्रभाषा प्रचार समितीनें व महाराष्ट्र शब्दकोशमंडळानें आणि दुसऱ्या कांहीं व्यक्तींनीं कांहीं संदर्भग्रंथ वापरण्यास दिले त्याबद्दल मी त्यांचा आभारी आहें.

याच कोशाच्या धर्तीवर गुजराती, बंगाली, असमिया, अुडिया आदि भाषांत कोश तयार केले गेले तर राष्ट्रभाषेबरोबर प्रांतीय भाषांतहि सहकार वाढेल अशी अुमेद आहे. गुजरातीमध्यें अशा प्रकारचा अेक कोश तयार केला जात आहे. त्यास आमच्या या कोशाची सहायता होत आहे हें नमूद करण्यास आनंद वाटतो.

आचार्य श्री. काकासाहेब कालेलकरांनीं जी विद्वत्तापूर्ण प्रस्तावना लिहून राष्ट्रभाषेच्या स्वरूपाचें अधिकृत दिग्दर्शन केलें आहे त्याकडे वाचकांनीं विशेष लक्ष पुरवावें. महाराष्ट्रांतील जनता या शब्दकोशाचा मोठ्या

प्रमाणावर अुपयोग करून राष्ट्रभाषा शिकण्याच्या राष्ट्रसंघटनेच्या कामांत अग्रेसर होअील आणि अशाच अितर आवश्यक ग्रंथांची निर्मिति करण्यास प्रोत्साहन देअील अशी आशा आहे.

पुणें,
ता. १२।४।१९३९

शं. द. देव,
अध्यक्ष, अखिल महाराष्ट्र हिन्दी-प्रचार समिति, पुणें.



## दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

पहिल्या आवृत्तींत विशेषसा फेरबदल न करतां त्यांत अंदाजां अेक हजार नवीन शब्दांची भर घालून हिंदुस्तानी मराठी कोशाची ही दुसरी आवृत्ति राष्ट्रभाषा–प्रेमी वाचकांना सादर करतांना आम्हांस अत्यंत आनंद होत आहे. कागद व छपाअीच्या अडचणीमुळें प्रथमावृत्ति संपून दोन वर्षें लोटून गेलीं असतांना व कोशाची वाढती मागणी असून देखील आम्हांस पुनर्मुद्रण लांबणीवर टाकावें लागलें, याबद्दल वाचकांनीं क्षमा करावी.

ता. २९।१२।१९४८

सम्पादक

# तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

हिन्दी-मराठी शब्दकोशाची ही तिसरी आवृत्ति प्रसिद्ध होत आहे. या वेळीं कोश वापरणारांचा अनुभव आणि हिन्दी शिकणाऱ्यांची गरज लक्षांत घेऊन कांहीं सुधारणा केल्या आहेत. हा कोश तयार करतांना अगदीं आरंभीं जें धोरण ठरविण्यांत आलें त्यांत याचें स्वरूप संपूर्णपणें व्यावहारिक आणि संक्षिप्त असावें अशी दृष्टि होती. हिन्दींत आणि मराठींत जे शब्द रूप आणि अर्थ या दोन्ही बाबतींत समानपणें रूढ आहेत त्यांना या कोशांतून वगळण्याचा प्रयत्न करण्यांत आला होता. अुदाहरणार्थ पुस्तक, जमादार, लोक, संपर्क, जमीन, वगैरे शब्द गाळण्यांत आले होते. परंतु या बाबतींत असा अनुभव आला कीं असे शब्द हिन्दी पुस्तकांत वाचल्यानंतर अर्थ बघण्याच्या दृष्टीनें या कोशांत पहावेत तर वाचकाला ते तेथें दिसत नसत. आणि त्यामुळें ते शब्द हिन्दी भाषेंत मुळांतच नाहींत कीं काय अशी शंका कोश चाळणाऱ्यांच्या मनांत अुत्पन्न होत असे. ही गोष्ट लक्षांत घेऊन दोन्ही भाषांत समान असलेल्या शब्दांचा या आवृत्तींत समावेश करण्यांत आला आहे. 'ड़' या अक्षराच्या खालील नुकता (टिंब) काढून टाकण्यांत आलेला आहे. याचें कारण त्याच्या अुच्चारांत त्यामुळें फारसा फरक पडत नाहीं. 'ड़' हें अक्षर शब्दाच्या मध्यें येतें. तेथें त्याचा अुच्चार नेहमींच सौम्य होतो. म्हणून तें टिंब अनावश्यक समजण्यांत आलें.

हिन्दी ही आतां भारताची राष्ट्रभाषा मान्य झाल्यामुळें तिची वाढ अितकी झपाट्यानें होत आहे कीं दर वर्षीं सहस्रशः शब्दांची भर तिच्यांत पडत असून ही परिस्थिति यापुढेंहि कायम राहणार हें निश्चित. या कोशाचें स्वरूप लक्षांत घेतां सर्व शब्दांचा समावेश करून घेणें अशक्य आणि अनावश्यक असलें तरी व्यावहारिक दृष्ट्या अुपयोगी पडतील त्या शब्दांचा समावेश करण्याचा यांत प्रयत्न केला आहे.

संक्षिप्त स्वरूपाच्या दृष्टीनेंहि कांहीं बदल केला असून मुख्यतः पूर्वीं-प्रमाणें प्रत्येक शब्दाच्या व्युत्पत्तीचा निर्देश केलेला नाहीं. हिन्दीतील बहु-

संख्य शब्द संस्कृतोत्पन्न असल्यामुळें संस्कृत व्युत्पत्तीचा निर्देश न करतां अितर भाषांचाच फक्त निर्देश केला आहे. ज्या शब्दांची व्युत्पत्ति दिलेली नाहीं ते तद्भव तत्सम समजावेत. याबाबत संकेत सूचीच्या अखेरीस अुलेख केलेला आहेच.

याप्रमाणें कोशाचें व्यावहारिक आणि संक्षिप्त स्वरूप ठेवलें तरी या आवृत्तींत ६००० नव्या शब्दांची भर पडली आहे. अर्थात् व्युत्पत्तिनिर्देशाच्या बाबतींत वरीलप्रमाणें धोरण स्वीकारल्यामुळें कोशाचा आकार फारसा न वाढवितां हे नवे शब्द सामावण्याचीहि सोय झाली.

कोशाच्या या आवृत्तीचें अशा प्रकारें व्यावहारिक व संक्षिप्त स्वरूप ठेवून शब्दसंख्या वाढविण्यांत आली आहे.

कोशाच्या संपादन कार्यांत या वेळीं श्री. श्रीपाद जोशी यांचें सक्रिय सहकार्य लाभलें आहे. ते बहुभाषी लेखक असून कोशाच्या कामाचा त्यांना चांगला अनुभव आहे. सभेशीं त्यांचा संबंध आत्मीयतेचा आहे म्हणूनच त्यांनीं संपादन कार्यांतील जबाबदारी प्रमुखपणें पार पाडली. आम्हीं त्यांचे आभारी आहोंत.

संगम प्रेसचे मालक पटवर्धन बंधु यांचाहि सभेशीं आपलेपणाचा निकट संबंध आहे. त्यांनीं कोशाच्या छपाअीचें किचकट काम व्यावसायिक दृष्टी-पेक्षां आपुलकीच्या भावनेनेंच पार पाडलें याबद्दल त्यांचे आम्हीं अत्यंत अृणी आहोंत.

पुणें
ता. १ जानेवारी १९५६

गो. प. नेने
मंत्री
महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभा, पुणें

# रचना–परिचय

राष्ट्रभाषेचा वाढता प्रचार व लोकांची तात्कालिक गरज या दोन गोष्टी प्रामुख्यानें लक्षांत घेअून प्रस्तुत कोशाचे स्वरूप निश्चित करण्यांत आलें. कोश आटोपशीर व स्वस्त तर असावा, शिवाय राष्ट्रभाषेच्या अभ्यासकांस कोणत्याहि प्रकारची अडचण भासूं नये म्हणून कोशरचनेच्या बाबतींत कांहीं सिद्धांत ठरवून नंतर शब्दांची निवड करण्यांत आली आहे, ही गोष्ट नमूद करणें अवश्य आहे.

या कोशांत संस्कृत तत्सम शब्द, त्याचप्रमाणें राष्ट्रभाषा व मराठी या दोन्हींत समान व अेकाच अर्थानें रूढ असलेले बरेचसे शब्द वगळले आहेत. परंतु हिंदींत व मराठीत सामान्य असलेल्या ज्या शब्दांच्या अर्थात व लिंगांत भेद आहे अशा शब्दांचा येथें मुद्दाम अंतर्भाव केला आहे. अुदाहरणार्थ, ‘ चेष्टा ’, ‘ अुपाधि ’ या हिंदी शब्दांचे अर्थ मराठीपेक्षा निराळे म्हणजे ‘ प्रयत्न ’ व ‘ पदवी ’ असे आहेत; तसेंच ‘ आत्मा ’ व ‘ देह ’ यांचें लिंग मराठीपेक्षां निराळें म्हणजे स्त्रीलिंग आहे. म्हणून हे शब्द घेतले आहेत. शिवाय कांहीं तत्सम शब्द राष्ट्रभाषेंत अत्यंत रूढ झाले असल्यानें नित्याच्या व्यवहारांत अुपयोजिले जातात. त्यांनाहि कोशांत स्थान देणें अपरिहार्य होतें.

हिंदुस्थानांत हिन्दी भाषीयांचा प्रदेश विस्तृत असल्यानें त्यांच्या भाषेंत अितर प्रादेशिक भाषांतून व स्थानिक बोलींतून आलेले अनेक शब्द राष्ट्रभाषेचें सर्वमान्य शब्द आहेत अशी पुष्कळांची समजूत झाल्यासारखी दिसते. श्री. प्रेमचंदादि लेखकांच्या लिखाणांतून अेखाद्या स्थानाचें किंवा परिस्थितीचें चित्र वाचकांच्या नजरेसमोर अुभें राहावें म्हणून वर्ण्य स्थानाच्या बोलींतील शब्दांचाहि अुपयोग केलेला आपण पाहतों. अशा रीतीनें अुपयोगिल्या जाणाऱ्या स्थानीय बोलींतील शब्दांपैकीं कांहीं शब्द कालान्तरानें भाषेंतील सर्वमान्य शब्द म्हणून रूढ होतात व अशाच सर्वमान्य रूढ शब्दांचा दक्षतेनें निवाडा करून राष्ट्रभाषेच्या या कोशांत त्यांना स्थान देण्यांत आलें आहे. प्रेमचंदादिकांनीं असे बोलींतील पुष्कळ शब्द वापरले म्हणून ते सर्वच्या सर्व

प्रचलित व सर्वमान्य आहेत व त्यांचा राष्ट्रभाषेंत अुपयोग करण्यास हरकत नाहीं असें समजणें चुकीचें आहे.

हिंदींतील तुलसीदास, सूरदास व कबीर या प्राचीन कवींच्या काव्यांत, अर्वाचीन हिंदीचे प्रातिनिधिक लेखक श्री. प्रेमचंद यांचे ग्रंथांत, वर्तमानपत्रें व मासिकें अित्यादींत सामान्यतः अुपयोजिल्या जाणाऱ्या, तसेंच राजकारण, प्रवास, व्यापार, बाजार, सभा अित्यादि जीवनांतील विविध क्षेत्रांत प्रचलित असलेल्या शब्दांचा संग्रह या कोशांत केला आहे. याशिवाय राष्ट्र-भाषा प्रचार परीक्षांच्या क्रमिक पुस्तकांतील बहुतेक सर्व कठीण शब्दांचा संग्रह या कोशांत केलेला असून राष्ट्रभाषेंत अगदीं रुळून गेलेले असे आवश्यक अरबी, फारसी किंवा तद्भव शब्द येथें संग्रहीत केले आहेत.

प्रस्तुत कोश आटोपशीर असला तरी तो शास्त्रीय असावा असा निर्णय कोशाच्या सुरुवातीपासूनच केला होता, त्याला अनुसरून शब्द ज्या मूळ भाषेंतून राष्ट्रभाषेंत आला किंवा आपलें मूळ रूप टाकून देअून व्युत्पत्ति लावणें देखील कठीण होअील अितक्या विकृत स्वरूपांत भाषेंत रुळला त्याची व्युत्पत्ति निर्दिष्ट करण्यांत आली आहे. शब्दांची व्युत्पत्ति देतांना मूळ भाषेंतील शब्द व त्या शब्दास जोडलेला तद्भाषीय अथवा अन्य-भाषीय प्रत्यय अित्यादि गोष्टी सविस्तरपणें देणें जरूर असलें तरी या संक्षिप्त कोशांत तसें करणें शक्य नव्हतें. तसें केलें असतें तर थोडक्या किंमतींत जास्तींत जास्त अुपयुक्त असा शास्त्रीय कोश लोकांच्या हातीं देणें न परवडल्यानें राष्ट्रभाषेच्या प्रचारकार्याचा मूळ हेतु मागें पडला असता. कोणतें ही कार्य करतांना त्याचा पाया शास्त्रशुद्ध असावा व परिमित साधनांतच घडेल तितकी अधिकाधिक लोकसेवा करावी या दोन गोष्टी डोळ्यांपुढें ठेवून कोशांत शब्दांची व्युत्पत्ति दिग्दर्शित केली आहे. दुसरी अेक ध्यानांत ठेवण्याजोगी गोष्ट अशी आहे कीं हिंदींतील अनेक शब्द संस्कृत व फारसी यांच्या मिश्रणानें बनले आहेत. संस्कृत व फारसी या दोन्ही भाषा अेकाच मातेच्या अुदरांतुन जन्मलेल्या दोन सख्ख्या बहिणी आहेत ही गोष्ट भाषाशास्त्रानें सिद्ध केली आहे फारशींतील अनेक प्रचलित शब्दांचें मूळ पाहातां तें संस्कृतोत्पन्न आहे ही गोष्ट देखील अलीकडे सिद्ध

होत चालली आहे. या मुद्याच्या स्पष्टीकरणाकरितां खालीं कांहीं शब्द दिले आहेत :—

| संस्कृत | फारसी | संस्कृत | फारसी |
|---|---|---|---|
| ग्रीष्म | गरमी | पंच | पंज |
| मास | माह | आप | आब |
| श्वेत | सफ़ेद | सप्त | हफ्त |
| गो | गाव | शर्करा | शक्कर |
| चतुः | चहार, चार | अश्रु | अश्क |
| जामाता | दामाद | अश्व | अस्प |

हिंदी भाषेंत रूढ झालेले अनेक फारसी शब्द संस्कृतोत्पन्न असले तरी वास्तविक पाहतां असे कित्येक शब्द प्रत्यक्ष संस्कृतमधून हिन्दींत आलेले नसून फारसी भाषेचे द्वारा हिंदींत रूढ झालेले आहेत. कित्येक शब्द बाह्यतः सारखे किंबहुना अेकच असले तरी भाषाभेदामुळें त्यांच्या अर्थांत दोन ध्रुवांअितकें महदन्तर आहे. संस्कृतांतील ‘ देव ’ शब्दाचा अर्थ ‘ सुर’ असा आहे, तर अगदीं त्या अुलट फारशींतील ‘ देव ’ चे अर्थ ‘ दैत्य ’ व ‘ धष्टपुष्ट माणूस ’ असे आहेत. फारशींतील ‘ पलंग ’ या शब्दाचा अर्थ ‘ हिंस्र पशु व वाघ ’ असा आहे. मराठीप्रमाणें हिंदींत देखील फारशींतील ‘ खाना ’, ‘ पोश ’ आदि शब्द दुसऱ्या शब्दांना जोडल्यामुळें यौगिक शब्द निर्माण होअून ते रूढ झाले आहेत. अुदा. ‘ पलंगपोश ’ हा यौगिक शब्द ‘ पर्यंक ’ पासून झालेल्या संस्कृतोत्पन्न ‘ पलंग ’ व ‘ पोश ’ या फारसी शब्दांपासून बनलेला आहे. तसेंच ‘ हाथीखाना ’ हा शब्द संस्कृत व फारशी शब्दांचें मिश्रण होय.

शब्दांची व्युत्पत्ति कसोशीनें व शास्त्रशुद्ध रीतीनें देअून रूपभेद व अर्थभेद यांमुळें शब्दांच्या अर्थांच्या बाबतींत कोणत्याहि प्रकारचा गोंधळ होण्यास वाचकांच्या मनांत जागा राहू नये असा प्रयत्न करण्यांत आला आहे.

शब्दांचे अर्थ देतांना शब्दास केवळ प्रतिशब्द ठेवून दिलेले नाहींत. अेका भाषेच्या प्रत्येक शब्दा करितां दुसऱ्या भाषेंत तसाच तंतोतंत अर्थ-

वाहक शब्द नेहमीं मिळतोच असें नाहीं, तथापि शब्दांचा अर्थ देतांना रूपसाम्य व अर्थसाम्य दर्शविण्याच्या दृष्टीनें अगदीं तत्सदृश असा पर्याय-वाची मराठी शब्द देण्याची खबरदारी घेण्यांत आली आहे. शिवाय शब्दांचे लाक्षणिक, व्यंग व रूढ असे निरनिराळ्या अर्थांनें प्रयोग होतात त्या दृष्टीनें त्याचे निरनिराळे अर्थ आंकडे घालून अलग दिले आहेत.

अर्थांच्या अधिक स्पष्टीकरणाकरितां प्रत्येक प्रमुख अर्थवाहक शब्दाला जोडून पूरक शब्द दिलेले आहेत. शब्दांचे कित्येक अर्थ नेहमींच्या व्यवहारांत रूढ नसून विशिष्ट ठिकाणीं विशिष्ट मतलबानें वापरले जातात. या बाबतींत व्यवहारांत होणाऱ्या चलनानुसार शब्दार्थांचा क्रम ठेवण्यांत आला आहे. अेकाच शब्दापासून किंवा धातूपासून अुत्पन्न झालेले पण व्याकरण वा स्वरूपभेदामुळें निराळे झालेले शब्द व त्यांचे अर्थ त्या त्या मुख्य शब्दाच्या पोटांत दिले आहेत. तसेच यौगिक शब्द व ' वाक्-प्रचार ' ( मुहावरे ) त्या त्या शब्दांच्या पोटांत भिन्न टाअिपांत घातले आहेत. हिंदींतील प्रयोजक क्रिया-पदांच्या बाबतींत घोटाळा अुत्पन्न होअू नये म्हणून तीं क्रियापदें स्वतंत्र घेण्यांत आलीं आहेत. हिंदींतील प्रयोजक क्रियापदांचीं रूपें दोन प्रकारचीं असतात. ' लिखना, पासून ' लिखाना, लिखवाना ', ' पढना ' पासून ' पढाना, पढवाना ' अित्यादि त्यांच्या अर्थांतहि सूक्ष्म फरक असतोच. या गोष्टीचा विचार करूनच प्रयोजक क्रियापदें स्वतंत्र दिलीं आहेत.

केवळ पद्यांत येणारे शब्द स्पष्टपणें ओळखूं यावेत आणि त्यांचा अुपयोग व्यावहारिक भाषेंत कोणीं चुकून करूं नये म्हणून ते शब्द तारकांकित केले आहेत.

कोशांतील शब्दांचा क्रम हिंदींतील अकारविल्ह्याच्या पद्धतीनें ठेवण्यांत आला आहे. हा क्रम मराठी वर्णानुक्रमापेक्षां पुढील बाबतींत भिन्न आहे :— अनुस्वार-युक्त वर्णानें आरंभ होणारे शब्द प्रत्येक वर्णाच्या आरंभीं घेतले आहेत. क्ष व ज्ञ हीं जोडाक्षरें असल्यामुळें त्यांस स्वतंत्र स्थान न देतां क व ज या वर्णांत घेतलें आहे.

कोशांत समसमान असलेल्या शब्दांची पुनरुक्ति होअून व्यर्थ विस्तार वाढूं नये म्हणून ते अेकाच ठिकाणीं दिले आहेत. अुदा. सौदामनी–मिनी, हरिआली–याली–अि.

प्रस्तुत शब्दकोश तयार करतांना 'हिन्दी शब्दसागर', प्रकाशक, ' नागरी-प्रचारणा सभा, काशी, ' या बृहत्कोशाची प्रामुख्यानें मदत घेण्यांत आली आहे. या कोशांत शब्दांची व्युत्पत्ति, अर्थ, अित्यादि गोष्टी सविस्तर व अत्यंत शास्त्रीय पद्धतीनें दिल्या असून हिन्दी भाषेच्या महान् पंडितांनीं व साहित्यिकांनीं सदर कोशाचें संपादन केलें आहे. हा अेवढाच कोश हिन्दी भाषेंतील प्रमाणित, प्रातिनिधिक, सर्वशब्दसंग्राहक व शास्त्रीय असा आहे. यांत अेकंदर शब्दांची संख्या अेक लाखावर असून याची किंमत ५० रु आहे.

अरबी, फारसी शब्दांकरितां श्री. रामचंद्र वर्मा यांच्या अुर्दू-हिंदी शब्दकोशाची व डंकन फोर्बसच्या हिन्दुस्तानी-अिंग्रजी शब्दकोशाची मदत घेतली आहे. श्री. वर्मांच्या कोशांत शब्दांच्या व्युत्पत्तीसंबंधीं विशेष विचार केला असून हिन्दी भाषेंत सामान्यतः रूढ असलेल्या अरबी-फारसी शब्दांचा संग्रह केला आहे. याशिवाय अन्य कोशांचें सहाय्यदेखील या कामाकरितां घेतलें आहे. त्यांची व कांहीं हिन्दी भाषेंतील अुपयुक्त शब्दसंग्रहांची सूची पुढें दिली आहे :—

१. संक्षिप्त हिन्दी शब्दसागर—संपादक : श्री. रामचंद्र वर्मा.
प्रकाशक : अिंडियन प्रेस, प्रयाग.

२. भाषा-शब्द-कोश— संपादक : श्री. रामशंकर शुक्ल.
प्रकाशक : रामनारायणलाल, प्रयाग.

३. हिन्दी शब्दसंग्रह— संपादक : श्री. मुकुंदीलाल, श्री राजवल्लभ सहाय.
प्रकाशक, काशी विद्यापीठ, बनारस.

४. हिंदुस्तानी कोश— श्री. रामनरेश त्रिपाठी, हिन्दीमन्दिर; प्रयाग.

५. राजनीति शब्दावली— श्री. गदाधरदास अंबष्ठ व श्री. भगवानदास केला.
प्रकाशक, भारतीय ग्रन्थमाला, वृन्दावन.

संपादक.

# अनुक्रम



# संकेत–सूची

अ.—अरबी.
अनु.—अनुकरण शब्द.
अव्य.—अव्यय.
अिं.—अिंग्रजी.
अि.—अित्यादि.
अुदा.—अुदाहरण.
क्रि. अ.—क्रियापद अकर्मक.
क्रि. वि.— क्रियाविशेषण.
क्रि. स. क्रियायद सकर्मक.
ग्री.—ग्रीक.
ची.—चिनी.
तु.—तुर्की.
दे.—देशज.
प.—पश्तो.
पु.—पुल्लिंग.
पोर्तु.—पोर्तुगीज.
प्रत्य.—प्रत्यय.
फा.—फारसी.
बहु.—बहुवचन (अनेकवचन).
मु.—मुहावरा (वाक्प्रचार).
यौ.—यौगिक शब्द (जोडशब्द).
लॅ.—लॅटिन.
वि.—विशेषण.
सं.—संस्कृत.
सर्व.—सर्वनाम.
स्त्री.—स्त्रीलिंग.
स्पॅ.—स्पॅनिश.

ज्या शब्दांच्या पुढें व्युत्पत्तीचा निर्देश केलेला नाहीं ते संस्कृत अथवा संस्कृतोद्भव समजावेत.

# हिंदी-मराठी शब्दकोष

## अ



**अंक**—पु. १ अंक; आंकडा. २ मांडी.
**अँकटा**—पु. खडा; लहान दगड. **अँकटी**—स्त्री.
**अँकडी**—स्त्री. १ आंकडी; हूक. २ बाणाचें बांकदार टोंक.
**अंकपाली**—स्त्री. दाअी, आया.
**अंकमाल***—पु. आलिंगन; भेट. **अंकमालिका**—स्त्री.
**अँकरा**—पु. गव्हावरोबर अुगवणारें अेक कडधान्य. **अँकरी**—स्त्री.
**अंकरोरी-रौरी**-*स्त्री. चिमखडा.
**अंकवार**—स्त्री. कूस; मांडी. (मु.) **अंकवार भरना**—१ मिठी मारणें; आलिंगन देणें; २ पुत्रवती असणें.
**अँकवारना***—क्रि. स. आलिंगन देणें; भेटणें; अुराशीं धरणें.
**अँकाअी**—स्त्री. १ अदमास; अटकळ. २ मालक व खंडकरी यांच्यांत पिकाच्या वांटणीबद्दल होणारा करार.
**अँकाना**—क्रि. स. १ चिह्न करणें; खूण करणें. २ किंमत ठरवून घेणें. ३ अंदाज करविणें. ४ पारख करविणें.
**अँकुडा**—पु. वांकडी सळअी; आंकडा; हूक **अँकुडी**—स्त्री.
**अँकुसी**—स्त्री. आंकडी; हूक
**अँकोर***—पु. १ कूस; मांडी. २ आलिंगन; भेट. ३ लांच. ४ शिदोरी; फराळाचें सामान.
**अँखडी**—स्त्री. [दे.] डोळा; नेत्र.
**अँखमीचनी**—स्त्री. लपंडावाचा खेळ.
**अँखिया**—स्त्री. छाप; ठसा. २ डोळा; नयन.
**अँखुआ**—पु. अंकुर; मोड.
**अँखुआना**—क्रि. अ. अंकुर येणें; फुटणें.
**अंग**—पु. अंग शरीर. (मु.) **अंग अुभरना**—वयांत येणें; तारुण्याचीं लक्षणें दिसणें. **अंग टूटना**—आळसणें; आळोखे-पिळोखे देणें.
**अंगड़-खंगड़**—वि. १ अुरलें-सुरलेलें. २ मोडकें-तोडकें.
**अँगडाअी**—स्त्री. आळस; आळोपिळे

(मु.) **अंगडाअी लेना**—आळेपिळे देणें; आळस झाडणें.
**अँगडाना**—*क्रि. अ.* आळेपिळे देणें.
**अंगद्**—*पु.* बाजूबंद.
**अँगना**—*पु.* आंगण. [ अंगरखा.
**अँगरखा**—*पु.* बंद असलेला लांब
**अँगरखी**—*स्त्री.* लहान बंडी.
**अँगरा**—*पु.* निखारा; अंगार; विस्तव. [ चंदनाचा लेप.
**अंगराग**—*पु.* अुटी; अुटणें;
**अंगरी***—*स्त्री.* कवच.
**अँगरेज़**—*पु.* [ पोर्तु. ] अिंग्रज. **अंगरेज़ी** वि. अिंग्रजी. **अँगरेज़ियत** *स्त्री.* पाश्चात्यपणा; पाश्चात्य पद्धति ( व्यवहार, पोषाख वगैरे बाबतींतील )
**अंगलेट**—*पु.* अंगाची ठेवण; शरीराचा बांधा.
**अँगवना***—*क्रि. स.* १ अंगावर घेणें; जबाबदारी पत्करणें. २ सहन करणें. [ अपस्मार.
**अंगविकृति**—*स्त्री.* फेफरें; मिरगी;
**अंगविद्या**—*स्त्री.* सामुद्रिक विद्या.
**अंगसिहरी**—*स्त्री.* हुडहुडी; कांटा; कंप.
**अंगार**—*पु.* निखारा; विस्तव. (मु.) **अंगार अुगलना**—आग पाखडणें; रागाच्या भरांत फाड-फाड बोलणें.
**अंगारा**—*पु.* निखारा.
**अँगारी**—*स्त्री.* १ करवा; गंडेरी. २ अुसाचीं लांब पानें.
**अँगिया**—*स्त्री.* चोळी.
**अँगीठा**—*पु.* शेगडी; आगटी. **अँगीठी**—*स्त्री.*
**अंगीकार**—*पु.* अंगीकार; मान्यता; स्वीकार.
**अंगुर***—*पु.* बोट; अंगुलि.
**अँगुरी***—*स्त्री.* बोट. अंगुलि.
**अंगुली**—*स्त्री.* बोट; अंगुलि.
**अंगुल्यानिर्देश**—*पु.* १ बोट दाखविणें; अंगुलीनिर्देश. २ बद-नामी; कलंक; लांछन.
**अंगुश्तनुमाई**—*स्त्री.* [फा.] लांछन; दूषण; कलंक. [ मुद्रिका.
**अंगुश्तरी**—*स्त्री.* [ फा. ] अंगठी;
**अंगुश्ताना**—*पु.* [फा.] अंगुस्तान.
**अँगुसी**—*स्त्री.* १ नांगराचा फाळ. २ सोनाराची फुंकणी.
**अँगूठा**—*पु.* आंगठा. (मु.) **अंगूठा चूमना**—खुशामत करणें.
**अँगूठी**—*स्त्री.* अंगठी; वेढें.
**अंगूर**—*पु.* १ किरळ. २ अंकुर; मोड. (मु.) **अंगूर तडकना-फटना**—जखम अुलणें.

**अंगूर**—पु· [फा.] द्राक्ष.
**अंगूरी**–वि· फिकट हिरव्या रंगाचा
**अँगेठी**—स्त्री· शेकोटी; शेगडी.
**अँगोछा**—पु· पंचा; टावेल; अुपवस्त्र. **अँगोछी**–स्त्री·
**अँगौरिया**—पु· कूळ; भागेली; वाहुदार, खंडकरी.
**अँघडा**—पु· काशाची जोडवीं.
**अँघिया**—स्त्री· [दे.] बारीक चाळणी.
**अंघ्रि***—पु· पाय; चरण.
**अँचुरा***—पु· पदर.
**अंचल**—पु· १ अंचल; लुगड्याचा पदर. २ सरहद्दीजवळील भाग किंवा प्रांत. ३ किनारा. (यौ) **अंचल-धन**—पु· लाडका मुलगा.
**अँचवना, अचवना**—क्रि· स· १ आचमन करणें. २ पिणें. ३ हात धुणें; आंचवणें.
**अंछर**—पु· १ तोंड येणें. २ जादुटोणा. ३ अक्षर.
**अंजन**—पु· १ अंजन; काजळ. २ शाअी. ३ लेप.
**अंजनहारी**—स्त्री· १ रांजणवाडी. २ कुंभारीण (किडा).
**अंजना***—स्त्री· अंजनी; हनुमानाची माता.
**अंजरपंजर**—पु· हाडांचा सांपळा; बरगडी. (मु.) **अंजरपंजर ढीला होना**—हाडें खिळखिळीं होणें.
**अंजलि**—स्त्री· ओंजळ; पसा.
**अँजवाना, अँजाना**—क्रि· स· काजळ घालून घेणें.
**अंजही**—स्त्री· धान्याचा बाजार; दाणेबाजार.
**अंजाम**—पु·. [फा.] १ शेवट; समाप्ति. २ परिणाम; फळ. (मु.) **अंजाम करना–देना**—पूर्ण करणें; संपविणें; तडीस नेणें.
**अंजीर**—पु· [फा·] अंजीर फळ व त्याचें झाड.
**अंजुमन**—स्त्री· [फा.] १ संस्था; समिति. २ परिषद; सभा.
**अँजुरी–ली***—स्त्री· ओंजळ.
**अँजोरना***—क्रि· स· [सं.] १ गोळा करून घेणें. २ छिनावणें; हिसकावून घेणें.
**अँजोरी***—स्त्री· १ प्रकाश. २ चांदणें.
**अंझा**—पु· सुट्टी; खाडा; अनध्याय.
**अँटना**—क्रि· अ· १ मावणें. २ व्यवस्थित बसणें (झांकण अि.). ३ पुरेसें होणें.
**अंटसंट**—स्त्री· पाहा ‘ अंडबंड ’
**अंटा**—पु· सुताचा किंवा रेशमाचा गुंडाळा; बिंडा. २ गोटी (मोठी).

३ बिलीयर्ड. ४ मोठी कौडी.

**अंटाघर**—*पु.* बिलीयर्ड खेळण्याची जागा.

**अंटा गुडगुड**—*वि.* [सं. + अनु.] कैफ किंवा नशा चढलेला; गुंग.

**अंटाचित**—*क्रि. वि.* चारी मुंडे चीत; उताणा. (मु.) **अंटाचित होना**—विस्मित होणें; थक्क होणें; दिङ्मूढ होणें.

**अँटिया**—*स्त्री.* पेंढी; भारा; मोळी.

**अंटी**—*स्त्री.* बेचकें; दोन बोटांतील जागा किंवा अंतर (मु.) **अंटी मारना**—लांबविणें; पळविणें; न कळत काढून घेणें.

**अँटौतल**—*पु.* ढापणी; अंधारी (घाण्याच्या बैलाची). [बाटी.

**अंठी**—*स्त्री.* अठळी; आठी; कोय;

**अंडकटाह***—*पु.* ब्रह्मांड; विश्व.

**अंडज**—*पु.* अंड्यांतून जन्म घेणारे प्राणी. (पक्षी, सांप वगैरे).

**अंडबंड**—*स्त्री.* [अनु.] प्रलाप; विसंगत भाषण; बडबड. **वि.** असंबद्ध; विसंगत.

**अँडरना**—*क्रि. अ.* कणसाला दाणे येणें.

**अंडा**—*पु.* १ अंडें. २ वृषण (मु.) **अंडा ढीला होना**—१ खूप दमणें; शिथिल होणें. २ दिवाळखोर बनणें.

**अंडी**—*स्त्री.* १ अेरंडी. २ रेशमी वस्त्र.

**अँडुआना**—*क्रि. स.* खच्ची करणें.

**अँडुआ बैल**—*पु.* सांड; पोळ.

**अंडैल**—*वि.* अंडीं घालणारी.

**अंत**—*पु.* शेवट; अखेर, समाप्ति.

**अँतडी**—*स्त्री.* आंतडें. (मु.) **अँतडी जलना**—पोटांत कावळे कोकावूं लागणें. [ अीश्वर.

**अंतरजामी***—*पु.* अंतर्यामी;

**अँतरा**—*पु.* १ खाडा; सुट्टी. २ अेक दिवसा आड येणारा ताप ३ कोपरा.

**अंतराय**—*पु.* विघ्न; बाधा.

**अंतरीप**—*पु.* भूशिर.

**अँतरौटा**—*पु.* लुगड्याच्या आंतून नेसण्याचें वस्त्र.

**अंतर्दशाह**—*पु.* मृताबद्दल दहा दिवसांचे आंत होणारें क्रियाकर्म.

**अंतर्वेगी ज्वर**—*पु.* विषमज्वर; दोषी ताप.

**अंतर्वेद**—*पु.* १ गंगा व यमुना या दोन नद्यांच्या मधील प्रदेश. २ अंतर्वेदी; दोआब. **अंतर्वेदी**—*वि.* गंगा व यमुना यांचेमधील प्रदेशांत राहणारा. [ २ स्मशान.

**अंतर्शय्या**—*स्त्री.* १ मृत्युशय्या.

**अंतस्तल**—*पु.* अंतःकरण; अंतरात्मा; हृदय.

**अंतस्सलिला**—स्त्री. जमिनीखालून वाहणारी व वरून न दिसणारी नदी.
**अंतावरी***—स्त्री. आंतडीं.
**अंतेवासी**—पु. (गुरू)जवळ राहाणारा; विद्यार्थी.
**अंत्यज**—पु. अंत्यज; शूद्र; हरिजन; अस्पृश्य.
**अंत्याक्षरी**—स्त्री. भंड्या; भेंड्या.
**अंदर**—क्रि. वि. [फा.] १ आंत; आंतल्या बाजूस. २ ठराविक मुदतीच्या पूर्वी. [२ गुप्त.
**अंदरूनी**—वि. [फा.] १ आंतील.
**अंदाज़**—पु. [फा.] १ अंदाज; अदमास: अटकळ; अनुमान. **अंदाज़न**—क्रि. वि. अदमासें; सुमारें.
**अंदाज़ा**—पु. [फा.] अटकळ; अनुमान.
**अंदुआ**—पु. हत्तीच्या मागील पायांत घालावयाचा लांकडी खोडा.
**अंदु, अंदुक**—पु. १ स्त्रियांचा पायांत घालावयाचा दागिना; पैंजण. २ हत्ती बांधण्याचा सांखळदंड किंवा दोरखंड.
**अंदेशा**—पु. [फा.] १ चिंता; काळजी. २ संशय; शंका; अंदेशा.
**अंदोह**—पु. [फा.] १ खेद; दुःख; शोक. २ अंदेशा; खटका; फिकीर.
**अंध**—वि. १ आंधळा. २ मूर्ख.
**अंधकूप**—पु. १ खोल, अंधारी व कोरडी विहीर. २ नरक.
**अंधखोपड़ी**—पु. (यौ.) अज्ञानी; मूर्ख; ठोंब्या; मठ्ठ.
**अंधड़**—पु. १ वावटळ; झंझावात. २ वादळ; तुफान.
**अंधर***—पु. १ वावटळ; झंझावात २ अंधेर. ३ वादळ; तुफान.
**अँधरा***—पु. आंधळा माणूस. वि. आंधळा. [२ आंधळी स्त्री.
**अँधरी**—स्त्री. १ चाकाचा आरा.
**अंधा**—पु. आंधळा मनुष्य. वि. आंधळा. (मु.) **अंधे की लकड़ी**—एकमात्र आधार; एकुलता एक मुलगा.
**अंधाधुंध**—स्त्री. १ काळोख. २ गोंधळ; अंदाधुंदी; अन्याय. वि. १ अंदाधुंद. २ अतिशय; पुष्कळ.
**अंधियारा**—पु. अंधार; काळोख.
**अँधियारी**—स्त्री. १ डोळे बांधण्याची पट्टी (विशेषतः उपद्रवी पशुपक्ष्यांच्या करितां).
**अंधेर**—पु. १ अन्याय; अत्याचार. २ अव्यवस्था; अंदाधुंदी.
**अंधेर खाता**—पु. [सं.+अ.] अनागोंदी जमाखर्च.

**अँधेरा**—पु. अंधकार; काळोख. वि. अंधार.

**अँधेरा अुजाला**—पु. १ मुलांचा अेक खेळ. २ अून-सावलीचा खेळ.

**अँधेरिया**—स्त्री. १ काळोख; अंधकार. २ काळोखी रात्र. ३ कृष्ण पक्ष.

**अंधेरी**—स्त्री. १ अंधार; काळोख. २ अंधेरी रात्र. ३ सोसाट्याचा वारा. ४ झांपड (घोड्याची अथवा बैलाची).

**अँधोटी-धौटी**—स्त्री. डोळ्यांची झांपड, ढापणी (जनावरांची).

**अंबर**—पु. १ वस्त्र. २ आकाश. ३ अेक प्रकारचें अत्तर. ४ अेक सुगंधी पदार्थ. ५ प्राचीन ग्रंथानुसार अुत्तर भारतांतील अेक प्रदेश ६ मेघ. [ वेळची लालिमा.

**अंबरडंबर**— पु. सूर्यास्ताच्या

**अंबरबारी**—पु. दारुहळद; आंबे हळद.

**अँबराअी**-स्त्री. आमराअी; आंब्यांची बाग. [ ३ पार्वती.

**अंबा**—स्त्री. १ देवी. २ जननी.

**अंबापोली**—स्त्री. आंबेपोळी.

**अंबार**—पु. [ फा. ] रास; ढीग.

**अँबिया**—स्त्री. कैरी.

**अँबिरथा***— वि. व्यर्थ; फुकट.

**अंबु**—पु. १ पाणी. २ चाराची संख्या. [ वज्र. ४ वेत.

**अंबुज**—पु. १ कमळ. २ शंख. ३

**अंबुजा**—स्त्री. लक्ष्मी; कमलिनी.

**अंबुद**—पु. मेघ

**अंबुधि**—पु. समुद्र

**अंबुवा**—पु. आंबा; आम्र [ दाटी.

**अंबोह**—पु. [ फा. ] लोकांची गर्दी;

**अंशुक**—पु. १ तलम वस्त्र. २ रेशमी कापड.

**अंशुमाली**—पु. सूर्य.

**अंस-सु***—पु. १ खांदा. २ अंश; भाग.

**अँसुआ-वा***—पु. अश्रु; आंसू.

**अँसुवन***—पु. आंसू; अश्रु. ('अँासू'चें बहु.)

**अअुर***— अव्य. आणि; व.

**अअूत***—वि. निपुत्रिक. **अअूती**-वि. स्त्री. [ घमेंड. २ तणाव; ताण.

**अकड़**—स्त्री. १ ताठरपणा; ताठा;

**अकड़ना**—क्रि. अ. १ आकसणें; संकोच पावणें. २ अैट दाखविणें; घमेंड करणें. ३ हट्ट करणें. ४ टणक होणें. ५ गारठणें; बधिर होणें.

अकडाव पु.

**अकड़बाअी**—स्त्री. खेंच; ताण; ओढ (शरीरांतील नसा).

**अकडबाज**—*वि.* [सं. + फा.] घमेंडखोर. **अकड़बाज़ी**–*स्त्री.* अैट; घमेंड.

**अकडैत**—*वि.* घमेंडखोर. [ नीय.

**अकथ***—*वि.* अकथनीय;, अवर्ण-

**अकनना***—*क्रि. स.* कान देणें; अैकणें; कानोसा घेणें. **अकनि**—*क्रि. वि.* अैकून. [ विटणें.

**अकना**—*क्रि. अ.* त्रासणें; कंटाळणें;

**अकबक**—*स्त्री.* [ अनु. ] असंबद्ध भाषण; वटवट; बडबड. **अकबकाना**—*क्रि. अ.* असंबद्ध प्रलाप काढ़णें; बडबडणें.

**अकबकाना** - *क्रि. अ.* चकित होणें; थक्क होणें. [ थोर.

**अकबर**–*वि.* [ फा. ] श्रेष्ठ; महान्;

**अकबरी**—*स्त्री.* [ फा. ] १ अेक पक्वान्न. २ लांकडावरील नक्षीकाम.

**अकरकरा**—*पु.* अक्कलकरा–काढा.

**अकरा**—*वि.* १ महाग. २ चोख; अुत्तम.

**अकरी**—•*स्त्री.* पाभर.

**अकल**—*वि.* १ अवयवरहित. २ अखंड. ३ अगम्य; निराकार ( परमेश्वराचें विशेषण ).

**अकल**—*स्त्री.* अस्वस्थ; बेचैन.

**अकल**—*स्त्री.* [अ.] अक्कल; बुद्धि.

**अकलखुरा**—*वि.* [ सं. + फा. ] १ आपलपोट्या; २ स्वार्थी; अुदासीन; अेकलकोंडा. ३ मत्सर करणारा; द्वेष करणारा.

**अकवन***—*पु.* रुअी; मंदार.

**अक़वाम**—*स्त्री.* [*अ.*] जाती('क़ौम'चें बहु. ); राष्ट्रें.

**अकवार**—*पु.* १ कांख. २ मांडी

**अकस**—*पु.* आकस; द्वेष; वैर.

**अकसना**—*क्रि. स.* द्वेष करणें; वैर करणें.

**अकसर, अक्सर**—*क्रि.वि.* [*अ.*] प्रायः; बहुधा; नेहमीं. *वि.* पुष्कळ; अधिक.

**अक़साम**—*स्त्री.* [*अ.*] १ प्रकार; भाग. हिस्से ( 'क़िस्म'चें बहु.). २ शपथा ( 'क़सम'चें बहु. ).

**अकसीर, अक्सीर**—*स्त्री.* [*अ.*] रसायन; किमया. *वि.* रामबाण, अचूक गुण देणारें. [कथनीय.

**अकह-हुवा**—*वि.* अवर्णनीय; अ-

**अकाज**—*पु.* १ बिघाड; कार्यनाश; हानि. २ कुकर्म; दुष्कर्म.[मजबूत.

**अकाट्य**—*वि.* अखंडनीय; दृढ;

**अकारज***—*पु.* हानि; अपकार.

**अकारथ**—*वि.*, *क्रि. वि.* व्यर्थ; निरर्थक.

**अकाल**—*पु.* १ दुष्काळ. २ अयोग्य काळ; अवेळ.

**अकाली**—पु. नानकपंथी साधु; शीख.
**अकास**—पु. आकाश.
**अकासदिया**—पु. यौ. आकाशदिवा.
**अकासबानी**—स्त्री. यौ. आकाशवाणी.
**अकिल**—स्त्री. [अ.] अक्कल; बुद्धि.
**अकिलदाढ**—पु. अक्कलदाढ.
**अक़ीक़**—पु. [अ.] १ मोहर खोदण्याचा लाल दगड. २ अेक प्रकारचें तांबूस रत्न. [२ धर्म; पंथ.
**अक़ीदा**—पु. [अ.] १ दृढ श्रद्धा.
**अक़ील**—पु. [अ.] बुद्धिमान्; शाहाणा.
**अकुलाना**—क्रि. अ. १ अुतावीळ होणें. २ घाबरणें; व्याकुळ होणें.
**अकूत**—वि. अपरिमित; अमर्याद.
**अकेला**—वि. अेकाकी; अेकटा. (यौ.) **अकेला दम**—अेकटा; अेकाकी.
**अकेले**—क्रि. वि. १ केवळ; फक्त; २ अेकट्यानें. (मु.) **अकेले में कहना**—अेकांतांत सांगणें.
**अकौआ-वा**—पु. रुअी.
**अक्खड**—वि. अक्कडबाज; अुच्छृंखल. **अक्खडपन**—पु. असभ्यता; अुद्धटपणा; अुच्छृंखलता.
**अक्खर***—पु. अक्षर; वर्ण.
**अक्खा**—पु. गोणी; अखें; पोतें.
**अक्खो मक्खो**—पु. मुलाची दृष्ट काढतांना अुच्चारिले जाणारे शब्द.
**अक़्द**—पु. [अ.] १ विवाह. २ विक्री. ३ करार.
**अक्टूबर-अक्तूबर**—पु. [ अिं. ] ऑक्टोबर; अिंग्रजी वर्षाचा दहावा महिना. [ फुकटचा.
**अक्रीत**—वि. विकत न घेतलेला;
**अक़्ल**—स्त्री. [अ.] अक्कल; बुद्धि; समज. (मु.) **अक़्लका दुश्मन**—मूर्ख; मंदबुद्धि. **अक़्लके पीछे लठ्ठ लिये फिरना**—मूर्खपणा करणें. **अक़्लपर पत्थर पड जाना**—बुद्धि नष्ट होणें. **अक़्ल मारा जाना-सठियाना**—बुद्धि भ्रष्ट होणें; साठी बुद्धि नाठी होणें.
**अक़्लमंद**—वि. [अ+फा.] बुद्धिमान्; चतुर; समजूतदार.
**अक़्लमंदी**—स्त्री. हुशारी, बुद्धिमत्ता.
**अक्षत**—पु. १ अक्षता. २ जव.
**अक्षुण्ण**—वि. अभंग; संपूर्ण; अविकृत. [ २ चित्र; तसबीर.
**अक्स**—पु. [अ.] १ प्रतिबिंब; छाया.
**अक्सर**—क्रि. वि. [अ.] पाहा. ' अकसर ' [ २ खराब; वाअीट.
**अखज**—वि. १ खाण्यास अयोग्य.
**अख़ज**—पु. [अ.] १ घेणें; ग्रहण करणें. २ काढून घेणें. ३ अुतारा घेणें; अुद्धृत करणें.

**अखडैत**—पु. मल्ल, तालमिबाज मनुष्य.
**अखती-तीज**—स्त्री. अक्षय तृतीया.
**अख़बार**—पु. [ अ. ] वर्तमानपत्र.
**अख़बार-नवीस**—पु. [अ.+फा. ] संपादक; पत्रलेखक.
**अखय**—वि. अक्षय.
**अखर***—पु. अक्षर; वर्ण.
**अखरना**—क्रि.स. मनास लागणें; वाआीट वाटणें.
**अखरोट** – पु. अक्रोड.
**अख़लाक़**—पु. [अ.] १ शील; नीतिमत्ता. २ शिष्टाचार. ३ संवय (' खुलक 'चें बहु.)
**अख़ीर**—पु.[अ.] शेवट; अंत.
**अखूट**—वि. कमी न होणारा; अखंड; अक्षय.
**अखैवट**—पु. अक्षयवट.
**अखोर*** – वि.१ सालस; सज्जन. २ सुंदर. ३ निर्दोष.
**अखोह**—पु. खडबडीत किंवा अुंच-सखल जमीन.
**अखौट-टा**— पु १ जात्याच्या खालच्या तळीची मधली खुंटी. २ हुंडा. ३ खराडीचा लोखंडी किंवा लांकडी दांडा.
**अख़्खाह**—अव्य. [ अनु. ] अुद्वेग किंवा आश्चर्यसूचक शब्द.
**अख़्तर**—पु. [अ.] तारा; नक्षत्र.
**अख़्तियार**—पु. [अ.] अधिकार; सामर्थ्य.
**अगड**—पु. अभिमान; अैट; ताठा.
**अगडधत्ता**—वि. १ अुंच; लांबटांग्या; २ श्रेष्ठ; मोठा. पु. अमरवेल.
**अगड-बगड**—पु. [अनु.] असंबद्ध प्रलाप; बडबड. २ अनावश्यक काम; नसता खटाटोप. वि. निरर्थक; निरुपयोगी. [ बगड '
**अगडम बगडम**— पाहा ' अगड-
**अगत-ति**—स्त्री. दुर्गति; वाआीट दशा.
**अगनित***—वि. अगणित; असंख्य.
**अगनेअु, अगनेत***—पु. आग्नेय दिशा.
**अगम**—वि. अगम्य; दुर्बोध. पु. १ आगमन. २ भविष्यकाळ. ३ वेदशास्त्र. ४ अुत्पत्ति. ५ योगशास्त्रानुसार शब्दप्रमाण.
**अगमन***— क्रि. वि.१ अगोदर; प्रथम २ पूर्वीपासून. [सुंगधी झाड.
**अगर**—पु. अगरु; एक प्रकारचें
**अगर**—अव्य. [ फा. ] जर; जरी. (मु ) **अगर मगर करना**—हुज्जत घालणें.
**अगरचे**— अव्य.[फा.]यद्यपि; जरी.

**अगरना**—*क्रि. अ.* पुढें जाणें; पुढाकार घेणें.
**अगरबत्ती**—*स्त्री.* अुदबत्ती.
**अगरी**—*स्त्री.* अडसर.
**अगरु**—*पु.* अूद; अगराचें लांकूड.
**अगलबगल**—*क्रि. वि.* [फा.] अिकडे तिकडे; आसपास.
**अगला**—*वि.* १ पुढचा, समोरचा. २ पूर्वींचा. ३ आगामी.
**अगवना***—*क्रि. स.* १ पुढाकार घेणें. २ तत्पर असणें
**अगवासी**—*स्त्री.* नांगराचा दांडा.
**अगवाअी-नी**—*स्त्री.* सामोरें जाणें; स्वागत करणें. [भाग.
**अगवाडा**—*पु.* घराच्या पुढचा
**अगस्त**—*पु.* [अिं.] ऑगस्ट महिना.
**अगह***—*वि.* १ हातीं न लागणारा; चंचल. २ अवर्णनीय. ३ अगम्य. ४ कठिण.
**अगहन**—*पु.* मार्गशीर्ष महिना.
**अगाड़ी**—*क्रि. वि.* १ पुढें; समोर. २ भविष्यकाळीं. ३ प्रत्यक्ष. *पु.* १ घोड्याच्या गळ्याला पुढच्या बाजूला बांधण्याच्या दोऱ्या. २ वस्तूचा पुढचा किंवा समोरचा भाग.
**अगाही**—*स्त्री.* [फा.] पूर्वसूचना.
**अगिन***—*स्त्री.* अग्नि, विस्तव.
**आगयी**—*स्त्री.* १ अेक प्रकारचें गवत. २ घोडे व बैल यांचा रोग.
**अगियाना**—*क्रि. अ.* दाह होणें; अंग तापणें.
**अगियाबैताल**—*पु.* आग्या वेताळ.
**अगुआ-वा**—*पु.* १ नेता; पुढारी. २ मार्गदर्शक, वाटाड्या. ३ लग्न जुळविणारा मध्यस्थ. **अगुआअी**—*स्त्री.* पुढाकार; अग्रेसरत्व. **अगुआना**—*क्रि. स.* पुढारी बनविणें. क्रि. अ. पुढें होणें. [जाणें.
**अगुआनी-वानी**—*स्त्री.* सामोरें
**अगोरदार**—*पु.* [सं. + फा.] संरक्षक; देखरेख ठेवणारा; राखण करणारा.
**अगोरना**—*क्रि. स.* १ वाट पाहाणें; प्रतीक्षा करणें. २ राखण करणें.
**अगोरिया**—*पु.* रखवालदार.
**अगौरा**—*पु.* अुसाचें वाढें, वरील नीरस भाग. [अग्निसंस्कार.
**अग्निदाह**—*पु.* प्रेताचा दाह-संस्कार;
**अग्निपुत्र**—*पु.* १ सूर्यवंशी लोक. २ राजपूत जाति.
**अग्य**—*वि.* अज्ञ.
**अग्याँ-ग्या**—*स्त्री.* आज्ञा.
**अग्रज**—*वि.* १ आधीं जन्मलेला; थोरला. २ श्रेष्ठ. *पु.* १ थोरला भाअू. २ पुढारी; नेता.
**अग्रशोची**—*पु.* दूरदर्शी.

**अग्रसर**—*पु.* १ अग्रेसर; पुढारी. २ आरंभ करणारा.
**अग्रिम**—*वि.* अगाअू;आधीं दिलेला.
**अघ**—*पु.* १ पाप. २ दुःख. ३ व्यसन. ४ अघासुर नांवाचा राक्षस.
**अघट**—*वि.* कधीं कमी न होणारा; अक्षय.
**अघवाना**—*क्रि. स.* १ पोटभर खाअू घालणें. २ संतुष्ट करणें.
**अघाना**—*क्रि.अ.* १ पोटभर खाणें. २ संतुष्ट होणें; तृप्त होणें. ३ प्रसन्न होणें; खुश होणें. [ सौम्य; सुंदर.
**अघोर**—*वि.* १ घोर; भयंकर. २
**अचंभा**—*पु.* अचंबा, आश्चर्य.
**अचकन**—*पु.* अुत्तर हिंदुस्थानी लांब अंगरखा. [ २ चंचल; अचपळ.
**अचपल**—*वि.* १ अचंचल; गंभीर.
**अचरज**—*पु.* आश्चर्य.
**अचवन**—*पु.* १ आचमन. २ चूळ भरणें. **अचवना**—*क्रि. स.* १ आचमन करणें. २ आंचवणें; हात धुणें. ३ गमाविणें.
**अचार**—*पु.* [ फा. ] लोणचें.
**अचिरात्**—*क्रि.वि.* शीघ्र; लवकर.
**अचेत**—*वि.* चेतनारहित;मूर्च्छित.
**अच्छ***—*वि.* स्वच्छ; निर्मळ. *पु.* डोळा.
**अच्छत**—*पु.* अक्षत.
**अच्छर**—*पु.* १ अक्षर; वर्ण. २ ब्रह्मा; अीश्वर.
**अच्छरा**—*स्त्री.* अप्सरा.
**अच्छा**—*वि.* छान; अुत्तम; ठीक. ( मू. ) **अच्छे आना**—योग्य वेळीं येणें. [ चांगली गोष्ट.
**अच्छाअी**—*स्त्री.* चांगुलपणा;
**अछत***—*क्रि. वि.* असतांना; जीवित असतांना. [ असणें.
**अछना**—*क्रि.अ.* असणें; विद्यमान
**अछवानी**—*स्त्री.* बाळंतिणीस द्यावयाची अेक औषधीयुक्त पौष्टिक मिठाअी.
**अछूत**—*पु.* १ अस्पृश्य, हरिजन. *वि.* १ अस्पृष्ट; न शिवलेला. २ नवीन. [ पूर्ण. २ अस्पृष्ट.
**अछूता**—*वि.* १ नवीन; नाविन्य-
**अछेह***—*वि.* सतत; निरंतर. लागोपाठ. [ २ निर्दयता;
**अछोह**—*पु.* १ शांति; स्थिरता.
**अज़**—*अव्य.* [फा.] कडून; पासून ( प्रत्यय ).
**अज**—*वि.* स्वयंभू.
**अजगर**—*पु.* अजगर.
**अजगरी**—*स्त्री.* अजगराप्रमाणें श्रम न करितां पोट भरणें; सुस्तपणा.
**अजगव**—*पु.* शिवधनुष्य.
**अजगुत-अजुगुत**—*पु.* आश्चर्य-

कारक गोष्ट; चमत्कार. २ अयोग्य गोष्ट.—*वि.* आश्चर्यकारक.

**अज़ग़ैब***—*पु.* [फा.+अ.] अदृष्ट स्थान. **अज़ग़ैबी**—*वि.* १ गुप्त; २ रहस्यपूर्ण. [ २ अवयव.

**अजज़ा**—*पु.* [अ.] १ अंश; भाग.

**अज़दहा**—*पु.* [ फा. ] अजगर.

**अजदाद**—*पु.* [अ.] पूर्वज.

**अजनबी**—*वि.* [अ.] १ अज्ञात. अपरिचित. २ नवखा; परदेशी.

**अजपा***—*पु.* मनांतल्या मनांत करावयाचा जप.

**अजब**–*वि.*[अ.] विलक्षण; अद्भुत.

**अज़बर**—*क्रि. वि.* [फा.] तोंडपाठ.

**अज़मत**—*स्त्री.* [अ.] १ प्रताप; महत्त्व; थोरवी. २ चमत्कार.

**अज़माना**—*क्रि. स.* [ फा. ] १ अजमावणें. २ अंदाज करणें.

**अज़रूअे**—*क्रि. वि.* [ फा. ] अनुसार.

**अजल**—*स्त्री.* [ अ. ] मृत्यु.

**अज़ल**—*स्त्री.* [ अ. ] १ आराम. विश्रांति. २ मूळ; अुद्गम. ३ अनादि काळापासून चालत आलेला. [ यौ. ] **रोज़े अज़ल**–सृष्टीचा अुत्पत्ति-दिन. **अज़ली**–*वि.* शाश्वत.

**अजवाअिन–यन**—*स्त्री.* ओंवा

**अजस***—*पु.* अपयश; अपकीर्ति. **अजसी**–*वि.* अपयशी.

**अज़–सरे–नौ**—*क्रि. वि.* [ फा. ] अगदीं नव्यानें; पुनः पहिल्यापासून.

**अज़हद**—*वि.* [ फा. ] अमर्याद; पुष्कळ. [ पावेतों; अजून.

**अजहुँ–हूँ***—*क्रि. वि.* आतां

**अज़ाँ**—*स्त्री.* [ अ. ] पाहा 'अज़ान'

**अजातशत्रु**—*वि.* शत्रु-विहीन. पु. सम्राट् बिंबिसार याचा मुलगा.

**अजान**—*वि.* अबोध; अज्ञानी.

**अज़ान**—*स्त्री.* [अ.] नमाजापूर्वींचें आवाहन किंवा हांक; बांग.

**अज़ाब**—*पु.* [ अ. ] दुःख, कष्ट. २ संकट; आपत्ति. ३ पाप. [अद्भुत.

**अजायब**—*वि.* [ अ. ] विलक्षण;

**अजायबखाना–घर**–*पु.* [अ. +फा. + सं.] वस्तुसंग्रहालय; अजबघर.

**अजिन**—*पु.* १ कातडें. २ मृगाजिन.

**अजिर**—*पु.* १ अंगण. २ वारा. ३ शरीर. [ सूचक शब्द. )

**अजी**—*अव्य.* अहो; अरे (संबोधन-

**अज़ीज़**—*वि.* [ अ. ] १ प्रिय. २ प्रतिष्ठित. *पु.* मित्र.

**अजीब**—*वि.* [ अ. ] विलक्षण, अद्भुत; विचित्र. (यौ.) **अजीब व गरीब**–अत्यंत अद्भुत; विचित्र.

**अज़ीम**—*पु.* [*अ.*] वृद्ध. *वि.* विशाल; महान्. [भपकेदार.
**अज़ीमुश्शान**—*वि.* भव्य; महान्;
**अज़ीयत**—*स्त्री.* [*अ.*] अत्याचार; पीडा. [विलक्षण.
**अजूबा**—*वि.* [*अ.*] अद्भुत;
**अजे-जै-अजेय**—*वि.* अजिंक्य.
**अजोग**—*वि.* अयोग्य.
**अजोता**—*पु.* चैत्री पौर्णिमा ( या दिवशीं बैल जोडीत नाहींत ); अेक सण.
**अजौं***—*क्रि. वि.* अद्यापि; अजून-सुद्धां; आतांपर्यंत. [अनुकरण.
**अज़्म**—*पु.* [*अ.*] १ निश्चय. २
**अज़्मत**—*स्त्री.* [*अ.*] श्रेष्ठत्व; महानता.
**अज्ञान**—*पु.* अज्ञान; मूर्खता. *वि.* मूर्ख; अज्ञ.
**अटक**—*स्त्री.* अडवणूक; प्रतिबंध; अडचण.
**अटकना**—*क्रि. अ.* १ थांबणें; अडणें. २ प्रेमांत सांपडणें.
**अटकनी**—*स्त्री.* अडकणी (चरखा).
**अटकल**—*स्त्री.* अटकळ; अनुमान; अंदाज. (मु.) **अटकल पच्चू**—*पु.* आडाखा; अंदाज. *वि.* अंदाजी; काल्पनिक. *क्रि. वि.* अंदाजें.
**अटका**—*पु.* पुरीच्या जगन्नाथाच्या नैवेद्याचा भात किंवा अितर अर्पण केलेल्या वस्तु.
**अटकाना**—*क्रि. स.* थोपविणें; अडवणें; हरकत करणें.
**अटकाव**—*पु.* अडथळा; प्रतिबंध.
**अटखेली**—*स्त्री.* खेळ; गंमत.
**अटना**—*क्रि. अ.* १ सामावणें २ पुरें होणें ३ कमी होणें ४ फिरणें.
**अटपट***—*वि.* १ असंबद्ध. २ कठिण; बिकट.
**अटपटाना**—*क्रि. अ.* घोंटाळणें; गोंधळणें; गडबडून जाणें [अुचापत.
**अटपटी***—*स्त्री.* खोडी; अुपद्व्याप;
**अटमबम**—*पु.* [अिं] अणुबॉंब; ॲटम बॉंब. [२ सटरफटर
**अटरसटर**—*क्रि. वि.* १ असंबद्ध
**अटल**—*वि.* स्थिर; दृढ; नित्य.
**अटवी**—*स्त्री.* जंगल; वन; भयंकर अरण्य.
**अटारिया**—*स्त्री.* पाहा 'अटारी'.
**अटारी**—*स्त्री.* १ गच्ची. २ माडी. ३ माळा. [सामान.
**अटाला**—*पु.* १ रास; ढीग. २
**अटूट**—*वि.* अखंड; सतत.
**अटेरन**—*पु.* सूत गुंडाळण्याचा फाळका. [गुंडाळणें.
**अटेरना**—*क्रि. स.* फाळक्यावर सूत
**अट्टहास**—*पु.* खो खो हंसणें.

**अट्टालिका**--*स्त्री.* गच्ची.

**अट्टी**—*स्त्री.* फळक्याभोंवतीं गुंडाळलेलें सूत; लड; लट.

**अट्टा**—*पु.* अड्डया ( पत्त्यांतील ).

**अट्टाअिस–अीस**--*वि.* अठ्ठावीस.

**अट्टानबे**—*वि.* अठ्ठयाण्णव.

**अट्टावन**—*वि.* अठ्ठावन.

**अट्टासी–अठासी**–*वि.* अठ्ठयांयशी.

**अठअी**—*स्त्री.* अष्टमी तिथि.

**अठअें**—*वि.* आठवा.

**अठखेली**—*स्त्री.* विनोद; क्रीडा. वि. खेळकर.

**अठत्तर–हत्तर** *वि.* अठ्ठयाहत्तर.

**अठन्नी**—*स्त्री.* अधेली ( नाणें ).

**अठलाना**--*क्रि. अ.* पाहा ' अिठलाना ' [ महिन्यांत झालेला.

**अठवाँसा**—*वि.* आठोळा; आठव्या

**अठवारा**--*पु.* आठवडा.

**अठहत्तर**—*वि.* अठ्ठयाहत्तर.

**अठारह**—*वि.* अठरा.

**अठासी**--*वि.* अठयाअैंशी. [अिकडे.

**अठे**—अव्य. [ पं ] १ येथें २

**अठोतरसौ**--*पु.* अेकशें आठ.

**अठोतरी**-- *स्त्री.* अेकशें आठ मण्यांची माळ.

**अडंगा**--*पु.* १ पायांत पाय घालणें. २ अडथळा; अडवणूक.

**अडगोडा**--*पु.* लोढणें.

**अडचन**--*स्त्री.* अडचण; अडथळा.

**अडतालीस**—*वि.* अठ्ठेचाळीस.

**अडदार**--*वि.* [ सं. + फा. ] अडेलतट्टू [ करणें.

**अडना**—*क्रि. अ.* १ अडणें. २ हट्ट

**अडर**—*वि.* निर्भय.

**अडसठ**--*वि.* अडुसष्ट.

**अडहुल**--*पु.* जास्वंदीचें फूल.

**अडान**—*स्त्री.* १ आधार; टेंकण. २ मुक्काम.

**अडाना**--*क्रि. स.* अडविणें.

**अडारा**—*पु.* लांकडाची वखार.

**अडिग**—*वि.* दृढ; स्थिर; न डगमगणारा. [ २ मट्ठ.

**अडियल**—*वि.* १ अडेलतट्टू.

**अडी**—*स्त्री.* १ हट्ट; आग्रह. २ गरजेची वेळ; गरज. ३ आडकाठी, अडथळा.

**अडूसा**—*पु.* अडूळसा. [२ स्तब्ध.

**अडोल**—*वि.* १ स्थिर; अचल;

**अडोस पडोस**—*पु.* शेजार; आसपास. **अडोसी पडोसी**—*पु.* शेजारी-पाजारी.

**अड्डा**—*पु.* अड्डा; जमण्याची जागा.

**अढतिया**—*पु.* १ वखारवाला. २ दलाल; अडत्या.

**अढवना, अढौना**— *क्रि. स.*

कामाला लावणें. पु. सोंपविलेलें काम. [ क्रि. अ. ठोकर खाणें.
**अट्टुक**— पु. ठोकर; ठेंच. **अट्टुकना**—
**अढाओी**— वि. अडीच.
**अढैया**— पु. अडीच शेरी. २ अडीचकीचा पाढा. [ २ छिद्रान्वेषण.
**अणुवीक्षण**— पु. १ सूक्ष्मदर्शक यंत्र.
**अतः**— क्रि. वि. म्हणून; यासाठीं.
**अतअेव**— क्रि. वि. म्हणून; म्हणूनच.
**अतर**— पु. [ अ. ] अत्तर. [ दाणी
**अतरदान**— [ अ.+फा. ] अत्तर-
**अतरसों**— क्रि. वि. तेरवां; दोन दिवसांआडचा दिवस. ( व्यतीत किंवा येणारा ). [ रेशमी वस्त्र.
**अतलस**— स्त्री. [अ.] अेक प्रकारचें
**अतलस्पर्शी**— वि. १ तळाला स्पर्श करणारा; सखोल; अथांग.
**अतवार**— पु. [ अ. ] १ वर्तन; वागणूक. २ चाल; रीत; पद्धत ३ राहणी ( 'तौर'चें बहु. )
**अतवार**— पु. रविवार.
**अता**— स्त्री. [अ.] दान; देणगी.
**अताओी**— वि. [ अ. ] १ कुशल; दक्ष. २ धूर्त; चलाख.
**अतिथि**— पु. १ पाहुणा. २ अनपेक्षितपणें आलेली अपरिचित व्यक्ति
**अतिब्बा**— पु. [अ.] वैद्य; हकीम. 'तबीब'चें बहु.
**अतिया**— पु. [अ.] दिलेली वस्तु; भेट.
**अतिरिक्त**— क्रि. वि. शिवाय; खेरीज. वि. १ अुरलेलें. २ वेगळें; निराळें. ३ जादा; खास; विशेष.
**अतीत**— वि. गेलेला; व्यतीत. २ मृत. ३ अलग; पृथक्.
**अतीत**— पु. संन्यासी; गोसावी
**अतुकान्त**— वि. निर्यमक.
**अतुल**— वि. १ अद्वितीय; अनुपम. २ पुष्कळ. [सुगंधी.
**अत्तार**— पु. [अ.] अत्तर विकणारा;
**अत्युक्ति**— स्त्री. अतिशयोक्ति.
**अथक**— वि. कधींहि न थकणारा; अविरत.
**अथच**— अ. आणि; तसेंच. [होणें.
**अथना-अथमना***— क्रि. अ. अस्त
**अथरा**— पु. मोठा परळ.
**अथवना***— क्रि. अ. अस्त होणें.
**अथाओी**— स्त्री. १ बैठकीची जागा. २ पंचायतीची जागा. ३ घरापुढील चबुतरा. ४ मंडळ; सभा; जमाव.
**अथाह**— वि. १ अथांग. २ अपरिमित. पु. १ खोली. २ जलाशय ३ समुद्र.
**अथोर***— वि. पुष्कळ; खूप.
**अदगन**— पु. आधणाचें पाणी.

**अद्द**—*स्त्री.* [*अ.*] १ संख्या. २ डाग; नग. [ २ सामान्य.
**अद्ना**—*वि.* [*अ.*] १ क्षुद्र; तुच्छ.
**अद्ब**—*पु.* [*अ.*] शिष्टाचार; आदर; सन्मान; नम्रता. २ साहित्य; वाङ्मय.
**अद्बदाकर**—*क्रि. वि.* टेकीनें; पैज लावून. [ २ परलोक.
**अद्म**—*पु.* [*अ.*] १ अभाव.
**अद्रक**—*पु.* आलें ( औषधी वनस्पति ). **अद्रकी**—*स्त्री.* आलेपाक.
**अद्रा**—*पु.* आर्द्रा नक्षत्र.
**अद्राना**—*क्रि. अ.* गौरवामुळें चढून जाणें; घमेंडखोर बनणें. *क्रि. स.* गौरवानें चढविणें.
**अद्रावन**—**पु.* आदर; मान.
**अदल**—*पु.* [*अ.*] न्याय.
**अदलबदल**—*पु.* [*अ.*] अदला बदल; परिवर्तन. [ दोरी.
**अद्वान**—*स्त्री.* बाजेच्या पायागतची
**अदा**—*स्त्री.* [*अ.*] १ नखरा; हावभाव. २ चाल; पद्धत.
**अदा**—*वि.* [*अ.*] बेबाक.
**अदा करना**—चुकतें करणें; फेडणें.
**अदाबंदी**—*स्त्री.* [*अ.* + फा] वायदा.
**अदायगी**—*स्त्री.* [*अ.*] (कर्ज वगैरे) देऊन टाकणें; फेडणें.
**अदालत** *स्त्री.* [*अ.*] कचेरी; कोर्ट.
**अदालती**—*वि.* कचेरीसंबंधीं.
**अदावत** *स्त्री.* [*अ.*] वैर; शत्रुता.
**अदावती**-*वि.* वैरी; विरोधी.
**अदीब** –*पु.* [*वि.*] साहित्यिक.
**अदू**—*पु.* [*अ.*] शत्रु; वैरी.
**अदृष्टपूर्व**—*वि.* १ पूर्वी न पाहिलेला. २ अद्भुत.
**अदेखी**—*वि.* द्वेष्टा; हेवा करणारा.
**अदेय**—*वि.* न देण्यासारखें.
**अदौरी**-*स्त्री.* उडदाच्या पिठाची वडी.
**अद्यतन**—*वि.* अद्ययावत्; अपटुडेट.
**अद्धा**—*पु.* अर्धा. **अद्धी**—*स्त्री.*
**अद्रक**—*पु.* पाहा ' अदरक '.
**अध***—*वि.* अर्धा.
**अधकचरा**—*वि.* १ अर्धाकच्चा; अपरिपक्व. २ अपूर्ण; अर्धवट.
**अधकपारी**—*स्त्री.* अर्धशिशी.
**अधकरी**—*स्त्री.* खंड किंवा साऱ्याचा हप्ता. [ अर्धविकासित.
**अधखिला**—*वि.* अर्धवट फुललेलें;
**अधजला**—*वि.* १ अर्धवट जळलेला, भाजलेला. २ जखमी.
**अधनिया**—*वि.* अर्धा आण्याच्या किंमतीचा.
**अधन्ना**—*पु.* अर्धा आण्याचें नाणें; ढबू पैसा. [ मेलेला; मृतप्राय
**अधमरा-मुआ**— *वि.* अर्धवट
**अधर**—*पु.* ओंठ.
**अधार**—*पु.* आधार.

**अधारी**—*स्त्री*. १ आधार; आश्रय. २ कुबडी. ३ प्रवासी पिशवी.
**अधित्यका**—*स्त्री*. पठार; टेबललँड.
**अधिनायक**—*पु*. सर्वाधिकारी; हुकूमशहा.
**अधिमास**—*पु*. आधिक महिना.
**अधिया**—*स्त्री*. १ अर्धा भाग. २ अर्धेला- ली; बटाअी.
**अधीन**—*वि*. आश्रित; हाताखालचा; ताब्यांतील.
**अधूरा**—*वि*. अर्धवट; अपूर्ण.
**अधेड़**—*वि*. मध्यम वयाचा.
**अधेला**—*पु*. अर्धा पैसा.
**अध्यवसाय**—*पु*. १ सतत अुद्योग. २ अुत्साह. ३ निश्चय.
**अध्यवसायी**—*वि*. १ अुद्योगी. २ अुत्साही.
**अध्यादेश**—*पु*. वटहुकूम.
**अध्यारोप**—*पु*. मिथ्या आरोप.
**अनंग**—*पु*.कामदेव; मदन. [ निरंतर.
**अनंतर**—*क्रि. वि*. १ नंतर. २सतत;
**अनकना***—*क्रि. स*. आडून अैकणें; कानोसा घेणें.
**अनकरीब**—*क्रि. वि*. १ सुमारें; जवळजवळ. २ अगदीं थोड्या वेळांत; लौकरच.
**अनख**—*पु*. १ राग;रुसवा. २ दुःख; *क्रि. अ*. मनांतल्या मनांत चडफडणें; रागावणें.
**अनखाहट**—*स्त्री*. रुसवा; राग.
**अनखी—खौंहा***—*वि*. चिडखोर; लवकर रागावणारा. [ २ बेडौल.
**अनगढ़**—*वि*. १ अनघड; स्वयंभू.
**अनगना—गिना**—*वि*. अगणित; असंख्य.
**अनागिनत**—*वि*. अगणित; अनंत.
**अनचाहत**—*वि*. अनासक्त; प्रेम न करणारा. [ नावडता.
**अनचाहा**—*वि. पु*. नको असलेला;
**अनचीता**—*वि. पु*. अनपेक्षित; अचिंतित. [ २ अनोळखी.
**अनजान**—*वि*. १ अज्ञानी; नादान.
**अनट**—*पु*. अन्याय; अत्याचार.
**अनत**—*वि*. ताठ; न वांकलेला.
**अंनत***—*क्रि. वि*. अन्यत्र; दुसरीकडे.
**अनदेखा**—*वि. पु*. न पाहिलेला.
**अनन्नास**—*पु*. [ पोर्तु. ] अननस.
**अनन्वित**—*वि*. असंबद्ध; अयोग्य.
**अनपच**—*पु*. अजीर्ण.
**अनपढ**—*वि*. निरक्षर; मूर्ख.
**अनपाय***—*वि*. अेकनिष्ठ; अनन्य.

**अनबिधा—वेधा**—*वि.* वेध किंवा छेद न केलेला. [ मुखस्तंभ.
**अनबोल**—*वि.* अबोल्या; घुम्या;
**अनबोलता**—*वि.* मुका; बोलतां न येणारा ( पशु ).
**अनब्याहा**—*वि.* अविवाहित.
**अनभल—ला***—वि. १ वाअीट. २ कुत्सित.
**अनभिज्ञ**—*वि.* माहिती नसलेला; अपरिचित; अज्ञ.
**अनमन—ना**—*वि.* १ अुदास; विमनस्क. २ बेचैन; अस्वस्थ.
**अनमिल**—*वि.* विजोड; विसंगत.
**अनमेल**—*वि.* १ विजोड; विसंगत. २ शुद्ध; भेसळ नसलेला.
**अनमोल**—*वि.* अमूल्य; मूल्यवान्
**अनय**—*पु.* १ दुर्भाग्य. २ अनीति.
**अनरथ**—*पु.* अनर्थ. [ विलेलें धन.
**अनरथ**—*पु.* अयोग्य मार्गानें मिळ-
**अनरस**—*पु.* रसहीनता.
**अनरसा**—*वि.* १ अुदास. २ अस्वस्थ; बेचैन.
**अनरीति**-*स्त्री.* १ कुरीति; वाअीट चाल. २ अनुचित व्यवहार.
**अनर्गल**—*वि.* अुच्छृंखल; अडकाठी नसलेला; बेजबाबदार.
**अनल**—*पु.* अग्नि; आग.
**अनलहक्**—*वि.* [ *अ.* ] सोऽहम्; अहं ब्रह्मास्मि
**अनवट**—*पु.* जोडवें.
**अनवट**—*पु.* घाण्याच्या बैलाच्या डोळ्यांवरची झांपडी.
**अनवाँसा**—*पु.* गंजी; अुडवी.
**अनवासना**—*क्रि.* स. नवें भांडें प्रथम अुपयोगांत आणणें.
**अनश्वर**—*वि.* नष्ट न होणारा; चिरकाल टिकणारा.
**अनसुना**--*वि.* न अैकलेला; अश्रुत. ( मु. ) **अनसुनी करना**—दुर्लक्ष करणें टाळाटाळ करणें.
**अनहद**—*पु.* अंतर्नादध्वनि. [२ शत्रु.
**अनहित***—*पु.* १ अहित; हानि.
**अनहोनी**—*वि.* *स्त्री.* न होणारी. *स्त्री.* न होणारी गोष्ट.
**अनाकानी**—*स्त्री.* कानाडोळा; अैकलें न अैकल्यासारखें करणें;टंगळ मंगळ.
**अनाज**—*पु.* धान्य. [२ अकुशल.
**अनाडी**—*वि.* १ अडाणी; मूर्ख.
**अनाप शनाप**—*पु.* वायफळ बडबड.
**अनार**—*पु.* [.फा. ] डाळिंब. **अनार-दाना**—*पु.* आंबट डाळिंबाचे सुकलेले दाणे.
**अनार्किस्ट**—*पु.* [अिं.] १ अराजकवादी. २ अराज्यवादी.
**अनासिर**—*पु.* [ *अ.* ] मूल तत्त्वें.
**अनियत**-*वि.* १ अनिश्चित. २ अस्थिर.

**अनियारा***- *वि.* भेदक; तीक्ष्ण.

**अनिल**–*पु.* वारा; वायु. [२ बाओीट.

**अनीठ***–*वि.* १ अप्रिय; अनिष्ट.

**अनीस**–*पु.* अनाथ.

**अनीस**–*पु.* [*अ.*] १ दोस्त; मित्र. २ प्रेम करणारा; स्नेही.

**अनुकृति**- *स्त्री.* नक्कल; प्रतिकृति.

**अनुक्रम**– *पु.* १ क्रम २ अनुक्रमणिका.

**अनुगृहीत**–*वि.* अुपकृत; कृतज्ञ.

**अनुताप**–*पु.* १ पश्चात्ताप २ दुःख.

**अनुनय**–*पु.* १ विनय; विनंती.

**अनुपस्थित**– *वि.* गैरहजर हजर नसलेला.

**अनुपात**- *पु.* १ प्रमाण. २ त्रैराशिक.

**अनुमति**–*क्रि.* १ संमति; मान्यता; स्वीकृति. २ आज्ञा.

**अनुमान**–*पु.* तर्क; कयास; अंदाज.

**अनुरंजन**–*पु.* मनोरंजन

**अनुरोध**–*पु.* १ आग्रहपूर्वक विनंती. २ प्रेरणा; अुत्तेजन.

**अनुवाद**–*पु.* भाषांतर

**अनुवादक**–*पु.* भाषांतरकार

**अनुशासन**–*पु.* १ शिस्त. २ आज्ञा; हुकूम. ३ अुपदेश.

**अनुशीलन**–*पु.* अभ्यास; मनन; चिंतन

**अनुषंग**–*पु.* १ करुणा; दया. २ संबंध

**अनुष्ठान**–*पु.* १ कार्यारंभ; २ आराधना; पुरश्चरण.

**अनुसंधान**–*पु.* १ चौकशी; शोध. २ तपास. ३ पाठलाग. ४ प्रयत्न.

**अनुसरण**–*पु.* अनुकरण; अनुगमन.

**अनुसार**- *वि.* प्रमाणें; अनुरूप; समान.

**अनुसारना**–**क्रि.स.* १ अनुसरणें; अनुकरण करणें. २ कार्य करणें.

**अनुसारी**- *वि.* अनुकरण करणारा.

**अनुहरना**–**क्रि. स.* १ बरोबरी करणें. २ अनुकरण करणें.

**अनुहार**- *वि.* १ सारखा; समान. २ अनुकूल. *स्त्री.* १ भेद; प्रकार. २ आकृति. ३ समानता; सादृश्य.

**अनुहारि***–*वि.* समान; सदृश. *स्त्री.* आकृति; रूप; वेष. [अनुयायी.

**अनुहारी***–*वि.* अनुकरण करणारा;

**अनुज**–*पु.* लहान भाअू.

**अनूठा**–*वि.* विचित्र; विलक्षण; अद्भुत; अुत्कृष्ट. [अविवाहित पुरुष.

**अनूढ**–*पु.* परस्त्रीवर प्रेम करणारा

**अनूढा**- *स्त्री.* परपुरुषावर प्रेम करणारी अविवाहित स्त्री. [दित.

**अनूदित**–*वि.* भाषांतरित; अनुवा-

**अनूप**–*पु.* जलमय प्रदेश.

**अनूप**–*वि.* १ निरुपम. २ सुंदर.

**अनेरा**–*वि.* १ व्यर्थ; निष्प्रयोजन. २ खोटा.

**अनैस–सा***–*वि.* अप्रिय; वाईट.

**अनैसना***–*क्रि. अ.* वाईट मानणें; मनाला लागणें; रुसणें.

**अनैसे***–*क्रि. वि.* दुष्ट हेतूनें.

**अनैहा***–*पु.* उत्पात; उपद्रव.

**अनोखा**–*वि.* १ विलक्षण; चमत्कारिक. २ नवीन. ३ सुंदर.

**अन्नप्राशन**–*पु.* उष्टावण.

**अन्ना**–*स्त्री.* [तु.] दाई; आया.

**अन्यमनस्क**–*वि.* विमनस्क; अस्वस्थ

**अन्वीक्षण**, **अन्वेषण**–*पु.* संशोधन; शोध.

**अन्सर**–*पु.* मूलतत्व; पंचमहाभूतांपैकीं एक.

**अन्हवाना***–*क्रि. स.* स्नान घालणें; न्हाऊं घालणें.

**अन्हाना***–*क्रि. अ.* स्नान करणें.

**अपकाजी**–*वि.* स्वार्थी; मतलबी.

**अपच***–*पु.* अपचन; अजीर्ण

**अपछरा***–*स्त्री.* अप्सरा.

**अपजस**–*पु.* अपयश, अपकीर्ति

**अपडर***–*पु.* भय; भीति.

**अपडरना***–*क्रि. अ.* भयभीत होणें; शंकित होणें.

**अपढ़**–*वि.* निरक्षर; मूर्ख.

**अपतं**–*वि.* पानें नसलेला; पर्णहीन.

**अपतई***–*स्त्री.* १ धृष्टता. २ निर्लज्जपणा. ३ चंचलता.

**अपदस्थ**–*वि.* १ स्थानभ्रष्ट. २ अपमानित.

**अपनपो–पौ***–*पु.* १ आत्मज्ञान. २ आपलेपणा.

**अपना**–सर्व. आपला-ली-लें. (मु.) **अपनासा करना**–आपली शक्ति पाहून काम करणें. **अपनासा मुँह लेकर रह जाना**–ओशाळें तोंड करून बसणें; निराश होणें; फजीत होणें. **अपनी अपनी पड़ना**–स्वतःच्याच काळजींत व्यग्र असणें. **अपने मुँह मियाँ मिठ्ठू बनना**–स्वतःच आपली प्रशंसा करणें.

**अपनाना**–*क्रि. स.* १ आपलेसें करणें; अनुकूल करणें. २ स्वीकारणें.

**अपनापन**–*पु.* आपलेपणा; आत्मीयता.

**अपयश**–*पु.* अपकीर्ति; बदनामी.

**अपर**–*वि.* १ पहिला; पूर्वीचा. २ मुख्य. ३ अन्य. ४ मागाहून आलेला.

**अपराह्न**–*पु.* दिवसाचा तिसरा प्रहर; दुपार व सायंकाळ यांमधील भाग.

**अपरोक्ष**–*क्रि. वि.* १ समोर; उपस्थितीमध्यें. २ पाठीमागें; गैरहजर असतां.

**अपर्णा**–*स्त्री.* पार्वती
**अपर्याप्त**–*वि.* अपुरा; थोडा.
**अपलक**–*क्रि. वि.* टक लावून; स्थिर दृष्टीनें (पाहाणें).
**अपवश***–*वि.* स्वाधीन.
**अपसगुन***–*पु.* अपशकुन.
**अपाहिज**–*वि.* १ अपंग. २ काम करण्यास असमर्थ. ३ आळशी.
**अपील**–*स्त्री.* [ अिं.] १ विचारार्थ निवेदन;प्रार्थना; आवाहन २ फेर-चौकशीचा अर्ज. [दर्खास्त देणारा.
**अपीलांट**–*पु.* [ अिं. ] अर्जदार;
**अपेक्षा**–*स्त्री.* १ अिच्छा; अभिलाषा. २ आवश्यकता; गरज. ३ कार्य-कारणाचा अन्योन्य संबंध. ४ तुलना. अव्य–पेक्षां.
**अप्रतिभ**–*वि.* १ आश्चर्यचकित; थक्क. २ प्रतिभाशून्य;
**अप्राप्य**–*वि.* न मिळाणारा; दुर्लभ.
**अप्रैल**–*पु.* [ अिं. ] अेप्रिल महिना.
**अफ़अी**–*पु.* [ अ. ] १ विषारी साप. २ कृष्णसर्प.
**अफ़कार**–*स्त्री.* [ अ. ] काळजी; चिंता. ( ' फिक्र ' चें बहु. )
**अफ़गन**–*वि.* [ फा. ] पाडणारा; पराभव करणारा.
**अफ़ज़ाअिश**–*स्त्री.* [ फा. ] वाढ; भर; अधिकता.
**अफ़ज़ल**–*वि.* [ अ. ] सर्वश्रेष्ठ.
**अफ़यून**–*स्त्री.* [ अ. ] अफू.
**अफ़रना**–*क्रि. अ.* पोटभर खाणें; आकंठ भोजन करणें. **अफरा**–*पु.* अजीर्णानें किंवा वातानें पोट फुगणें.
**अफ़लातून**–*पु.* [ अ. ] १ ग्रीक तत्त्ववेत्ता 'प्लेटो'. २ अभिमानी; गर्विष्ठ. [ 'वदंता; गप्प.
**अफ़वाह**–*स्त्री.* [ अ. ] अफवा;
**अफ़सर**–*पु.* [ अिं ] अधिकारी; ऑफिसर. **अफसरी**–*स्त्री.* हुकूमत; अधिकार. [ गोष्ट.
**अफ़साना**–*पु.* [ फा. ] कहाणी;
**अफ़सुर्दा**–*वि.* [ फा. ] १ कोमेज-लेला. २ खिन्न; अुदास; दुःखी.
**अफ़सूँ**–*पु.* [ फा. ] १ मंत्र २ जादू.
**अफ़सोस**–*स्त्री.* [ फा. ] १ दुःख; खेद. २ पश्चाताप.
**अफ़ीम**–*स्त्री.* [ अ. ] अफू.
**अफीमची-अफीमी**–*पु.* अफूबाज.
**अफ़ूनत**–*स्त्री.* [ अ.] दुर्गंध; घाण.
**अब**–*क्रि. वि.* आतां. ( मु ) **अबकी**–याखेपेस आतां. **अबसे**–यापुढें; यानंतर. **अब तब करना**–टाळाटाळ करणें.
**अबखरा**–*पु.* [ अ. ] वाफ.

**अमर,अम्र**– पु. [ अ. ] काम कार्य.
**अमरख*** पु. राग; क्रोध.
**अमरसी**–*वि.*आमरसासारखें पिवळें.
**अमराअी–रैया**–*स्त्री.* आमराअी.
**अमरूत–द**–*पु.* पेरू; जांब.
**अमरौती**–*स्त्री.* अमर करणारी वस्तु; अमृत; संजीवनी.
**अमर्ष**–*पु.* राग; द्वेष; मत्सर.
**अमल**–*वि.* निर्मळ; स्वच्छ; निर्दोष.
**अमल**–*पु.* [ अ. ] १ कार्य;व्यवहार. २ शासन; हुकूमत. ३ अंमल; नशा. ४ संबंध. ५ प्रभाव.
**अमलतास**–*पु.* अेक औषधी वनस्पति
**अमलोनी**–*स्त्री.* घोळ; घोळू (भाजी).
**अमसूल**–*पु.* आमसूल.
**अमला**–*पु.* [ अ. ] अधिकारी; कारभारी.**अमला-फेला**–१कचेरींतील कामगार वर्ग. २ पडलेल्या घराचे दगड, विटा, लांकूड अि.
**अमली**– *वि.* [ अ. ] कार्यसंबंधीं; व्यवहारसंबंधी. *पु.* नशा करणारा.
**अमहर**– *पु.* सोललेल्या कैऱ्यांच्या सुकविलेल्या फोडी.
**अमा**–*स्त्री.* अमावास्या. [वांझ स्त्री.
**अमाता***–*स्त्री.* १ सावत्र आअी; २
**अमानत**–*स्त्री.* [ अ. ]ठेव;अनामत. ( मु. ) **अमानतमें खयानत**– दुसऱ्याच्या ठेवीचा अपहार किंवा दुरुपयोग करणें. [ भरणें.
**अमाना**–*क्रि. अ.* सामावणें, पुरेपूर
**अमानी**–*स्त्री.* निगर्वी; निरभिमानी.
**अमामा**–*पु.*[अ.] मुसलमानी पागोटें.
**अमाल**–*पु.*[अ.] अधिकारी; शासक.
**अमालनामा**–*पु.* [ अ. ] १ नोंदणीपुस्तक; रजिस्टर; सर्व्हिस बुक. २ चित्रगुप्ताची वही.
**अमावट**–*स्त्री.* आंबेपोळी.
**अमावस**–*स्त्री.* अमावास्या; आवस.
**अमिट**–*वि.*स्थिर; न मिटणारें; पक्कें.
**अमित**–*वि.* अपरिमित; बेहद्द.
**अमिय***–*स्त्री.* संजीवनी.
**अमिय**–*पु.* अमृत; सुधा.
**अमियमूरि**–*स्त्री.* अमृताची मुळी; अमरवेल; संजीवनी.
**अमिल***–*वि.* १ अप्राप्य. २ अपूर्व. ३ स्वतंत्र; भिन्न वर्गीय; निराळा. ४ अुचसखल.
**अमी**–*पु.* अमृत.
**अमीन**–*पु.* [ अ. ] कोर्टाच्या बाहेरचें काम करणारा कोर्टाचा अधिकारी; कोर्टाचा सर्वेअर.
**अमीर**–*पु.* [ अ. ] श्रीमंत; धनाढ्य. **अमीर ज़ादा**–*पु.* [ अ. फा. ] अमीराचा मुलगा; शाहजादा; राजकुमार.**अमीराना**–*वि.*श्रीमंती; सरदारी.'**अमीरी**–*स्त्री.* श्रीमती.

**अमूनि***–*स्त्री.* संजीवनी.
**अमोल-क***–*वि.* बहुमोल; अमूल्य.
**अमोला**–*पु.* आंब्याचें गोपटें.
**अम्बार**–*पु.* [ फा. ] ढीग; रास.
**अम्बारखाना**–*पु.* [ फा. ] भांडार.
**अम्बिया**–*पु.* [ *अ.* ] पैगंबर; प्रेषित. ['नबी'चें बहु.]
**अम्बोह**–*पु.* [ फा. ] लोकांची गर्दी.
**अम्माँ**–*स्त्री.* माता; आअी.
**अम्मामा**–*पु.* [ *अ.* ] अेक प्रकारचा लांब कोशा; फेटा.
**अम्मारी**–*स्त्री.* [ *अ.* ] अंबारी.
**अम्र**–*पु.* [ *अ.* ] १ घटना. २ कार्य. ३ विषय. ४ आज्ञा.
**अम्हौरी**–*स्त्री.* घामोळें; घामानें अंगावर अुठणाऱ्या पुळ्या.
**अय**–अव्य. अरे; अगे (संबोधन)
**अयन**–*पु.* १ गति; चाल. २ सूर्य-चंद्रांची गति. ३ वंश. ४ जनावरांची कास.
**अयन**–*पु.* [ *अ.* ] पाहा 'अैन'
**अयाँ** *वि.* [ *अ.* ] स्पष्ट; प्रगट.
**अयादत**–*स्त्री.* [ *अ.* ] आजाऱ्याकडे जाअून त्याची विचारपूस करणें.
**अयान***-*पु.* १ स्वभाव. २ स्थैर्य. *वि.* अजाण; अज्ञानी.
**अयाना**–*वि.* अज्ञानी; अडाणी.
**अयानी**–*स्त्री.*

**अयाल**–*पु.* [ फा. ] आयाळ.
**अयि**–अव्य. अरे; अगे; अहो (संबोधन) [ बहु॰]
**अय्याम**–*पु.* [*अ.*] दिवस.['यौम'चें
**अय्यार**–*पु.* [ *अ.* ] धूर्त; कावेबाज.
**अरक**–*पु.* १ अर्क; आसव. २ सूर्य.
**अरकना**–*क्रि. अ.* [ अनु. ] गडबडून पडणें; आपटणें; अडकून पडणें.
**अरकनाना**–*पु.*[*अ.*] अर्क.(पुदीना व अितर पदार्थांपासून तयार केलेला.)
**अरकना–बरकना**–*क्रि.अ.* [अनु.] १ टाळाटाळ करणें.
**अरकान**–*पु.* [ *अ.* ] खांब; स्तंभ. [' रुक्न ' चें बहु;]
**अरग**–*पु.* धूप, अूद; अगरु
**अरगजा**–*पु.* कापूर, केशर, चंदन वगैरेंचें सुगंधी मिश्रण.
**अरगनी, अलगनी**–*स्त्री.* कपडे वाळत घालण्याची दांडी.
**अरगला, अर्गला**–*स्त्री.* अडसर.
**अरगाना***–*क्रि.अ.* १ वेगळें होणें; पृथक् होणें. २ चुप होणें; गप्प बसणें.
**अरगनी**–*स्त्री.* ( कपडे वाळत घालण्याची) दांडी; दोरी.[*वि.* तांबडा.
**अरग़वानी**–*पु.* [ फा. ] तांबडा रंग
**अरघ–घं***–*पु.* अर्घ्य.
**अरचना**–*क्रि.स.* पूजा करणें.

**अरज़, अर्ज़**–*स्त्री*.[*अ.*] १ विनंती; निवेदन. *पु*. १ जमीन. २ रुंदी.

**अरज़ल**–*पु*. [*अ.*] पुढल्या पायांचा खालचा भाग पांढरा असलेला घोडा. हा वाओट मानतात.

**अरज़ी**–*स्त्री*. [*अ.*] अर्ज, निवेदनपत्र.

**अरथी**–*स्त्री*. तिरडी.

**अरदली-देली**–*पु*. [अि.] पट्टेवाला; चपरासी.

**अरना**–*पु*. जंगली रेडा

**अरना**–*क्रि.अ.* पाहा ‘ अड़ना ’

**अरब**–*पु*. १ अब्ज (संख्या); शंभर कोटि. २ घोडा. ३ अिंद्र.

**अरब**–*पु*. [*अ.*] १ अरबस्तान २ अरबी माणूस [होणें.

**अरबराना**–*क्रि.अ.* घाबरणें; व्याकुळ

**अरबा**–*वि*. [*अ.*] चार.

**अरबाब**–*पु*. *अ*. १ स्वामी; मालक. २ ज्ञाता किंवा कर्ता.

**अरबाबे सुख़न**–[यौ.] कविगण.

**अरबी**–*पु*. [*अ.*] अरबी घोडा; अरबी उंट.

**अरबी**–*स्त्री*. [*अ.*] अरबी भाषा.

**अरबी**–*वि*. [*अ.*] अरबस्तानचा.

**अरब्बी**–*पु*. [ फा ] ताशा ( वाद्य )

**अरमान**–*पु*.[फा.] अिच्छा; लालसा.

**अरराना**–*क्रि. अ.* [ अनु. ] कडकडणें; करकरणें ( मोडतांना किंवा पडतांना होणारा आवाज ).

**अरवा**–*पु*. सामान ठेवावयाची फळी.

**अरवी**–*स्त्री*. अळकुडी; अळवाचा गड्डा. [ आलिंगन देणें.

**अरसना-परसना**–*क्रि. स*. भेटणें,

**अरस-परस**– *पु*. शिवाशिवीचा खेळ. [२ अुशीर; विलंब.

**अरसा**–*पु*. [*अ.*] १ समय, वेळ.

**अरसौंहाँ, अलसौंहाँ***– *वि*. १ आळशी. २ आळसलेला.

**अरस्तू**–*पु*. [*ग्री.*] ॲरिस्टॉटल.

**अरहट**–*पु*. पाणी काढण्याचा विशेष प्रकारचा रहाट.

**अरहन**–*पु*.भाजींत घालावयाचें पीठ.

**अरहर**–*स्त्री*. तुरीची डाळ. [शून्य.

**अराजक**–*वि*. राजाविरहित, राज्य-

**अराजकता**–*स्त्री*. १ राज्यसत्ता नसलेली, शासनविहीन स्थिति. २ अराजक; गोंधळ; अशांति.

**अराजकवादी**– *वि*. राज्यसत्ताविरहित समाजव्यवस्था मानणारा.

**अराज़ी**–*स्त्री*. [*अ.*] १ पृथ्वी; जमीन. २ लागवडीखालील जमीन.

**अरायज़नवीस**-*पु*. [*अ.* + फा.] अर्ज लिहिणारा. [ मस्त हत्ती.

**अराल** -*वि*. वांकडा; तिरपा. *पु*.

**अरिंद**–*पु*. शत्रु; वैरी.

**अरी**–अव्य. स्त्रीवाचक संबोधन.
**अरीज़ा**–*वि.* [*अ.*] विनंती केलेली; निवेदित (गोष्ट). *पु.* विनंतीपत्र.
**अरु**–अव्य. आणि; व. [गड्डा.
**अरुअी**–*स्त्री.* अळकुडी; अळवाचा
**अरुचि**–*स्त्री.* नावड; रुचि नसणें.
**अरुझना***–*क्रि. अ.* १ फसणें. २ अडकणें. ३ गुंतणें. ४ तंटा करणें.
**अरुझाना***–*क्रि. स.* १ फसविणें. २ थांबविणें. ३ गुंतविणें ४ वांकविणें; मोडणें. *क्रि. अ.*–मुग्ध होणें.
**अरुणचूड**–*पु.* कोंबडा.
**अरुणशिखा**–*पु.* कोंबडा.
**अरुणाई**–*स्त्री.* तांबडेपणा; रक्तिमा.
**अरुन**–*वि.* लाल; तांबडा. *पु.* १ सूर्य. २ सूर्याचा सारथी; अरुण.
**अरुनाना**–*क्रि. अ.* तांबडें होणें. *क्रि. स.* तांबडें करणें.
**अरुनसिखा**–*पु.* कोंबडा.
**अरे**–*अ.* (संबोधन) अरे; अहो.
**अरोग**–*वि.* निरोगी
**अर्करेज़ी**–*स्त्री.* [*अ. फा.*] घाम येण्याअितके परिश्रम करणें.
**अर्घ** / **अर्घ्य**–पु. ओंजळीनें देवाला अर्पण करावयाचें पाणी; जलदान.
**अर्चन**–*पु.* / **अर्चना**–*स्त्री.* पूजा; आराधना; आदर-सत्कार.
**अर्ज़**–*पु.* [*अ.*] १ पृथ्वी; जमीन २ रुंदी. [प्रार्थना.
**अर्ज़**–*स्त्री.* [*अ.*] विनंती; निवेदन;
**अर्ज़ाँ** *वि.*–[फा.] स्वस्त.
**अर्ज़ी**–*स्त्री.*[*अ.*] अर्ज; विनंतीपत्र
**अर्ज़ीदावा**–*पु.* [*अ.*] तक्रार-अर्ज.
**अर्ज़ीनवीस**–*पु.* [*अ.* + फा.] अितरांचे अर्ज लिहून देणारा. [चुंबक.
**अर्थपिशाच**–*वि.* धनलोलुप; कवडी-
**अर्थात्**–अव्य. म्हणजे.
**अर्थी**–*वि.* १ अिच्छा करणारा. २ गरजू. *पु.* १ वादी. २ सेवक. ३ मालक; धनी.
**अर्श**–*पु.* मूळव्याध.
**अर्श**–*पु.* [*अ.*] १ आकाश. २ स्वर्ग.
**अर्हत** / **अर्हत्** / **अर्हन्**–*पु.* १ जैनांचा देव; जिनदेव २ गौतम बुद्ध.
**अलंग**–*पु.* दिशा; बाजू. (मु.) **अलंग-पर आना**-घोडी माजाला येणें.
**अल**–अुपपद [*अ.*] १ अिंग्रजींतील 'दि' प्रमाणें २ षष्ठीचा प्रत्यय.
**अलक**–*पु.* केसांच्या बटा; कुरळे केस.
**अलकतरा**–*पु.* [*अ.*] डांबर.
**अलख**–*वि.* अदृश्य; अगोचर; अीश्वर (मु) **अलख जगाना**–१ मोठ्यानें

देवाचें नामस्मरण करणें. २ देवाच्या नांवानें भिक्षा मागणें. ३ लोकांना जागृत करणें.

**अलग**– वि. वेगळें; स्वतंत्र.

**अलगनी**–स्त्री. दांडी; दोरी (कपडे वाळत घालण्याची).

**अल् ग़रज़–ग़रज़ी**–वि.अ. [अ.] निष्काळजी; हलगर्जी. स्त्री. हलगर्जीपणा. [पांवा.

**अलग़ोज़ा**–पु. [अ.] अलगूज;

**अलग़ोझा**–पु. वांटणी; हिस्सेदारी.

**अलच्छि***–वि. दरिद्री; गरीब.

**अलता**–पु. बायकांनीं पायाला लावण्याचा लाल रंग.

**अलपाका**–पु. [स्पे.] अलपाक.

**अलफ़ा**–पु. [अ] बिन बाहीचा लांब सदरा. [(' लफ़्ज़ 'चें बहु.)

**अलफ़ाज़**–पु. [अ.] शब्दसमूह.

**अलबत्ता**–[अ.] अलबत्; निःसंदेह; अर्थात्.

**अलबम**–पु. [अं.] चित्रसंग्रह.

**अलबीतलबी**–स्त्री. [अ.] अरबी-फारसी किंवा कठिण उर्दू (उपेक्षा-भाव). [छोकीचा; फांकडा.

**अलबेला**–वि. छानदार, छान-

**अलम्**– अव्य. पुरे.

**अलम**–पु. [अ.] सैन्याच्या पुढें असणारा मोठा ध्वज. २ पर्वत.

**अलमस्त**–वि. [फा.] १ बेशुद्ध. २ निश्चित. ३ मस्तीचा कैफ चढलेला.

**अलमारी**–स्त्री. [पोर्तु.] कपाट.

**अलमास**–पु. [फा.] हिरा.

**अलल्ख़सूस**–क्रि. वि. विशेषतः; विशेषेंकरून.

**अलल टप्पू**–वि. [दे.] १ अनु-मानधपक्या. २ अव्यवस्थित. ३ भलतासलता. [अल्लड मनुष्य.

**अललबछेडा**–पु. १ शिंगरूं. २

**अलवाँती**–वि. स्त्री. बाळंतीण स्त्री.

**अलवाई**–वि. स्त्री. एक-दोन महिन्यांची व्यालेली (गाय, म्हैस).

**अलवान**–पु. [अ.] लोंकरीचें जाड पांघरूण.

**अलस**–वि. आळशी; सुस्त.

**अलसी**–स्त्री. आळशी; जवस.

**अलसेट***–स्त्री. आळस. २ दिरंगाई; टाळाटाळ. ३ अडचण.

**अलसेटिया**–वि. १ कामांत अळंटळं करणारा. बेमुर्वतखोर; भांडखोर.

**अल-हक़**–क्रि. वि. [अ.] वस्तुतः; खरोखर; वास्तविक. [अलाहिदा.

**अलहदा**–वि. [अ.] अलग; पृथक्;

**अलान**–पु. हत्ती बांधण्याचा साखळ-दंड किंवा खुंटा.

**अलाप**–पु. स्वर; राग; तान.

**अलाबू**–स्त्री. तुंबा; भोपळा.

**अलामत**–*स्त्री.* [*अ.*] खूण; चिह्न.
**अलायबलाय**–*स्त्री.* [ फा. ] अिडा-पिडा. [ आजार.
**अलालत**–*स्त्री.* [*अ.*] आजारीपण;
**अलाव**–*पु.* १ शेकोटी. २ कुंभाराचा आवा.
**अलावा**–*क्रि.* वि. [*अ.*] शिवाय; व्यतिरिक्त.
**अलिंजर**–*पु.* घडा; मातीचें भांडें,
**अलिंद्**–*पु.* ओटा; सज्जा.
**अलिंद्***–*पु.* भ्रमर, भुंगा.
**अलि**–*पु.*१ भुंगा; भ्रमर २ कोकिळा ३ कावळा.
**अली**–*स्त्री.* सखी; मैत्रीण.
**अलीक**–*वि.* १ खोटा. २ अमर्याद-शील; निलाजरा.
**अलीक**–*पु.* अप्रतिष्ठा; अमर्यादा.
**अलीन**–*पु.* दरवाज्याच्या चौकटांचें उभें लांकूड. *वि.* निरुपयोगी; टाकाअू.
**अलील**–*वि.*[*अ.*] आजारी; रुग्ण.
**अलीह-हा**–*वि.* असत्य; खोटें.
**अलुमीनम**–*पु.* [ अिं. ] ॲल्यूमि-नियम धातु.
**अलेखा***वि.* अपरिमित.
**अलेखा***–*वि.* १ बेहिशेबी; अव्य-वस्थित. २ व्यर्थ; निरर्थक.
**अलेखी*** – *वि.* १ अन्यायी २ बेहिशेबी.
**अलोना**–*वि.* आळणी.
**अलोल**–*वि.* स्थिर; दृढ.
**अल् किस्सा**–*क्रि. वि.*[*अ.*] सारांश. तात्पर्य असें कीं. [ असें कीं.
**अल्ग़रज़**–*क्रि. वि.* [ *अ.* ] तात्पर्य
**अल् मस्त**–*वि.*[*अ.*]झिंगलेला; मस्त.
**अल्विदा**– अव्य. [ *अ.* ] आतां निरोप द्यावा; नमस्ते.
**अल् सुबह**–अव्य. [*अ.*]भल्या पहांटे.
**अल् हक्**–*क्रि. वि.* [*अ.*] वस्तुतः; खरोखर.
**अल्ल**–*पु.* [*अ.*] आडनांव.
**अल्लम-गल्लम**–*पु.* [ अनु ] बडबड; बकवा. *वि.* असंबद्ध; विसंगत.
**अल्ला-अल्लाह**–*पु.* [ *अ.* ] अीश्वर.
**अल्ला-ताला**–*पु.* [ *अ.* ] सर्वश्रेष्ठ अीश्वर; परमेश्वर.
**अल्लामा**–*वि.*[*अ.*] अत्यंत बुद्धिमान् व विद्वान् व्यक्ति.
**अल्लामा**–*वि. स्त्री.* [ *अ.* ] कर्कशा; जहांबाज; कैदाशीण ( स्त्री )
**अल्हड**–*वि.* १ खुशालचेंडू. २ अन-नुभवी; अल्लड. ३ अुद्धट. ४ अडाणी; गांवठी.
**अवकलना***–*क्रि. अ.* आकलन होणें; समजणें.
**अवकाश**–*पु.* १ पोकळ जागा.

२ अंतर. ३ वेळ. ४ रिकामा वेळ; सुट्टी; फुरसत. ५ रजा.

**अवगत**–*वि.* माहित; परिचित.

**अवगाह***–*वि.* खूप खोल; अथांग.

**अवगाह**–*पु.* १ प्रवेश; शिरकाव. २ बुचकळी; बुडी.

**अवगाहन**–*पु.* १ स्नान. २ शोध; तपास. ३ चिंतन; मनन.

**अवगुन**–*पु.* अवगुण; दोष; अपराध.

**अवघट***–*वि.* अवघड; बिकट; कठिण.

**अवचट**–*पु.* अडाणीपणा; अज्ञान. *क्रि. वि.* अेकाअेकीं; अचानक.

**अवडेर**–*पु.* [दे.] भानगड; बखेडा. **अवडेरना**–*क्रि. स.* १ भानगडींत पाडणें. २ तुच्छतापूर्वक त्याग करणें. ३ दुःख देणें. **अवडेरा**–*वि.* १ भानगडीचा; त्रासदायक. २ बेढब. [२ अयोध्या प्रदेश.

**अवध**–*पु.* १ अयोध्या नगरी;

**अवध–अीस**-*पु.* अवधेश; श्रीराम.

**अवधान**–*पु.* १ मनाची अेकाग्रता. २ सावधगिरी.

**अवधि**–*स्त्री.* १ सीमा; मर्यादा. २ ठरविलेला काळ; मुदत. ३ अंतसमय. अव्य. पर्यंत; पावेतों.

**अवधी**–*वि.* ' अवध ' प्रांतासंबंधीं. *स्त्री.* अवधी बोली.

**अवधूत**–*पु.* अवधूत; संन्यासी; योगी

**अवनिप**–*पु.* राजा.

**अवमतिथि**–*स्त्री.* [सं.] क्षयतिथि.

**अवर***–*वि.* १ अन्य; दुसरा. २ अधम; नीच.

**अवराधन**–*पु.* आराधना; पूजा; अुपासना.

**अवरेखना***–*क्रि.* स. आकृति काढणें; रेखाटणें.

**अवरेब***-*पु.* वक्रगति; वांकडी चाल.

**अवरोध**–*पु.* अडचण; विरोध.

**अवलंब**–*पु.* आश्रय; आधार.

**अवलंबित**–*वि.* अवलंबून असलेलें; आधारलेलें.

**अवलीक**–*वि.* शुद्ध; निष्कलंक.

**अवलेप**–*पु.* अुटणें; लेप.

**अवलेह**-*पु.* चाटण.

**अवलोकन**–*पु.* निरीक्षण; देखरेख.

**अवसर**–*पु.* समय; संधि. (मु.) **अवसर चूकना**–संधि गमावणें.

**अवसाद**–*पु.* १ विषाद. २ नाश. ३ थकवा. ४ अशक्तता.

**अवसान**–*पु.* १ समाप्ति; शेवट. २ मृत्यु.

**अवसि**–*क्रि. वि.* अवश्य.

**अवसेर***-*स्त्री.* १ व्याकुळता; अस्वस्थता. २ अुशीर; विलंब.

**अवसेरना**–*क्रि. स.* त्रास देणें;

दुःख देणें.

**अवस्थित**–*वि.* १ उपस्थित; हजर. २ थांबलेला; स्थिर.

**अवस्थिति**–*स्त्री.* स्थिति.

**अवज्ञा**–*स्त्री.* आज्ञाभंग; हुकूम मोडणें.

**अवज्ञेय**–*वि.* तिरस्करणीय; तुच्छ.

**अवाँ***–*पु.* भट्टी.

**अवांतर**–*वि.* अंतर्गत; आंतील; मधला.

**अवांतर**–*पु.* मध्यभाग.

**अवाँसी**–*स्त्री.* नवान्न पौर्णिमेकरितां तोडलेली लोंबी किंवा कणीस.

**अवाई**–*स्त्री.* १ आगमन. २ खोल नांगरणें.[ २ गप्प होणें; निःशब्द.

**अवाक्**–*वि.* १ स्तंभित; विस्मित.

**अवाम**–*पु.* [ अ. ] सर्वसाधारण लोक; जनता.

**अवार** *पु.* ऐलतीर; अल्याड.

**अवारजा**–*पु.* [ फा. ] रोजखर्डा.

**अविकल**–*वि.* १ जसेंच्या तसें. २ पूर्ण. ३ निश्चल; शांत.

**अविदित**–*वि.* अज्ञात, अपरिचित.

**अविरल**–*वि.* घनदाट.

**अविराम**–*वि.* सतत; निरंतर;

**अवीचि**–*पु.* एका नरकाचें नांव.

**अवीरा**–*वि. स्त्री.* १ स्वतंत्र *स्त्री*. २ विधवा व निपुत्रिक *स्त्री.*

**अवैतनिक**–*वि.* पगार न घेतां काम करणारा; ऑनररी.

**अवैज्ञानिक**–*वि.* अशास्त्रीय.

**अव्यभिचारी**–*वि.* १ शुद्ध; २ निश्चल. [ नाहीं असा; नित्य.

**अव्यय**–*वि.* ज्यांत विकृति होत

**अव्यय**–*पु.* व्याकरणांतील अविकारी शब्द.

**अव्वल**–*वि.* [ अ. ] १ पहिला; प्रथम. २ श्रेष्ठ; उत्तम. पहिल्या प्रतीचा.

**अशआर**–*पु.* [ अ. ] कविता. ( 'शअर' किंवा 'शेर'चें बहु. )

**अशरफी**–*स्त्री.* [ फा. ] मोहोर ( नाणें ).

**अशराफ़**–*पु.* [ अ. ] भले लोक; सज्जन. ( 'शरीफ़'चें बहु. )

**अशांति**–*स्त्री.* अस्वस्थता; खळबळ; असंतोष.

**अश्क**–*पु.* [ फा. ] आसूं; अश्रु.

**अश्रुतपूर्व**–*वि.* कधींहि न ऐकलेलें; अपूर्व.

**असंका***–*स्त्री.* शंकाकुशंका.

**असंगति**–*स्त्री.* विसंगति; अनुपयुक्तता; मेळ नसलेली गोष्ट.

**असंभावना**–*स्त्री.* अशक्यता.

**असकताना**–*क्रि. अ.* आळशी

होणें; आळसावणें; कंटाळणें.

**असगंध**–*पु.* आस्कंद; अश्वगंधा.

**असगुन**–*पु.* अपशकुन.

**असती**–*वि. स्त्री.* व्यभिचारिणी.

**असन***–*पु.* भोजन; जेवण.

**असफल**-*वि.* अशयस्वी.

**असबाब**–*पु.* [अ.] सामान; चीजवस्तु. [गोंधळ. २ अडचण.

**असमंजस**–*स्त्री.* १ भ्रम; घोटाळा;

**असर**–*पु.* [अ.] प्रभाव; परिणाम.

**असरकारी**–*वि.* [अ.] प्रभावकारक; प्रभावी.

**असल-ली**–*वि.* [अ.] १ अस्सल; शुद्ध. २ सच्चा; खरा. ३ अुत्तम; पहिल्या प्रतीचा. *पु.* १ मुद्दल; मूलधन. २ मूळ; वास्तविकता.

**असलियत**-*स्त्री.*तथ्य;वास्तविकता.

**असलह**–*पु.* [अ.] हत्यार; शस्त्र.

**असवार**–*पु.* [फा.] स्वार.

**असहयोग**–*पु.* असहकारिता.

**असाँच***–*वि.* असत्य; खोटें.

**असा**–*पु.* [अ.] सोटा; दंडा.

**असाढ**–*पु.* आषाढ महिना

**असाढ़ी**–*वि.* आषाढी, आषाढ महिन्यांतील.

**असाढी**–*स्त्री.* १ आषाढी पौर्णिमा. २ आषाढ महिन्यांत पेरलेलें पीक.

**असाध***–*वि.* असाध्य; कठिण.

**असाधारण**–*वि.*. असामान्य.

**असाधु**–*वि.* दुष्ट; वाअीट.

**असामयिक**–*वि.* अकालीं, अवेळीं (झालेलें, केलेलें)

**असामी**–*पु.* [अ.] १ व्यक्ति. २ देण्याघेण्याचा संबंध असलेली व्यक्ति; असामी. ३ वाहुदार; कुळ ४ अपराधी; गुन्हेगार.

**असालत**-*स्त्री.* [अ.] १ कुलीनता. २ सचोटी;खरेपणा. ३ अस्सलपणा. (मु.)**असालतमें फ़र्क़ होना**–वर्ण-संकर होणें. [जातीनें.

**असालतन्**-*क्रि. वि.* [अ.] स्वतः;

**असावधानी**–*स्त्री.* बेसावधपणा.

**असासा**–*पु.* [अ.] धनदौलत.

**असि**–*स्त्री.* तलवार; खड्ग.

**असीम**–*वि.* १ सीमारहित. २ अपरिमित; खूप.

**असीर**–*पु.* कैदी; बंदी.

**असील**–*वि.* १ अुच्च वंशांतील; खानदानी २ सुशील.

**असीस**–*स्त्री.*आशीर्वाद. **असीसना** –*क्रि.स.* आशीर्वाद देणें.दुवा देणें.

**असुंदर**–*वि.* कुरूप. [घाणेरडा.

**असुचि**-*वि.*अशुचि;अशुद्ध;अपवित्र;

**असुरारि**–*पु.* दैत्यांचा नाश करणारा; देव. [२ अडचण.

**असुविधा**–*स्त्री.* १ गैरसोय.

**असूझ**-*वि.* १ बिकट; कठिण; न सुचणारा. २ अंधकारमय.

**असोस***-*वि.* न सुकणारा.

**अस्तबल**-*पु.* [*अ.*] अश्वशाळा; तबेला. [आड झालेला. २ नष्ट.

**अस्तमित**-*वि.* १ लपलेला; दृष्टि-

**अस्तव्यस्त**-*वि.* अस्ताव्यस्त; छिन्नविच्छिन्न.

**अस्तर**-*पु.* [फा.] अस्तर; दुहेरी कपड्याच्या आंतील कापड.

**अस्तरकारी**-*स्त्री.* [फा.] १ कपड्याच्या आंतील बाजूस अस्तर लावणें. २ भिंतीला गिलावा करणें.

**अस्तु**-अव्य. असो.

**अस्तुत***, **अंस्तुति** }-*स्त्री.* स्तुति.

**अस्तुरा**-*पु.* [फा.] वस्तरा.

**अस्तेय**-*पु.* चोरी न करणें.

**अस्थान**-*पु.* स्थान.

**अस्थायी**-*वि.* तात्पुरता; हंगामी

**अस्थि**-*स्त्री.* १ हाड. २ मृत व्यक्तीचीं हाडें.

**अस्नान***-*पु.* स्नान; आंघोळ.

**अस्पताल**-*पु.* [अिं.] दवाखाना; अिस्पितळ.

**अस्फंज**-*पु.*[फा.] स्पंज. [२पावित्र्य

**अस्मत**-*स्त्री.* [*अ.*] १. पातिव्रत्य.

**अस्सी**-*वि.* अैंशी.

**अहंता**-*स्त्री.* गर्व.

**अहअी**-क्रि. अ. आहे.

**अहथिर***-*वि.* स्थिर.

**अहद**-*पु.* [*अ.*] १ प्रतिज्ञा; निश्चय. २ करार; वायदा. ३ शासन; राज्य. ४ काळ. **अहदनामा**-*पु.* करारनामा; प्रतिज्ञापत्र.

**अहदी**-*वि.* [*अ.*] अत्यंत आळशी; सुस्त. २ अकर्मण्य; रिकामटेकडा. पु. आळशी माणूस. [रात्रंदिवस.

**अहनिसि**- *क्रि. वि.* अहर्निश;

**अहबाब**-*पु.* [*अ.*] मित्र; दोस्त (' हबीब 'चें बहु.)

**अहमक**-*वि. पु.* [*अ.*] मूर्ख.

**अहमिति***-*स्त्री.* घमेंड; गर्व.

**अहरन**-*स्त्री.* [फा.] अैरण.

**अहरा**-*पु.* १ गोवऱ्यांचा ढीग. २ मुक्कामाची जागा.

**अहलकार**-*पु.* [फा.] कारभारी.

**अहलमद**-*पु.* [फा.] शिरस्तेदार.

**अहलिया**-*स्त्री.* [*अ.*] पत्नी.

**अहवान**-*पु.* १ आवाहन; निमंत्रण २ आह्वान.

**अहवाल**-*पु.* [*अ.*] १ वृत्तांत; खबर. २ स्थिति; अवस्था. ३ विवरण (' हाल ' चें बहु.)

**अहसान**-*पु.* [*अ.*] १ अुपकार; कृपा. २ कृतज्ञता.

**अहसान फरामोश**–*वि.* [*अ.*+ फा.] कृतघ्न. [कृतज्ञ.

**अहसानमंद**–*वि.* [*अ.* + फा.]

**अहह-अहा**–अव्य–अहाहा ! ( आनंदोद्गार )

**अहाता**–*पु.* [*अ.*] आवार.

**अहिफेन**–*पु.* १ सापाचें गरळ. २ अफू.

**अहिबेल**–*स्त्री.* विड्याचें पान.

**अहिवात**–*पु.* स्त्रीचें सौभाग्य.

**अहिवाती**–*वि.स्त्री.* सौभाग्यवती.

**अहीर**–*पु.* गवळी.

**अहुठ**–*वि.* साडेतीन; औट.

**अहेर**–*पु.* शिकार; मृगया.

**अहेरी**–*पु.* शिकारी; व्याध.

**अहोर-बहोर**-अव्य. वारंवार.

**अहोरा-बहोरा**–*पु.* लग्नांतील अक विधि; गृहप्रवेशासाठीं वधूनें सासरीं जाऊन त्याच दिवशीं माहेरीं परत येणें.

## आ

**आँक**–*पु* १ चिह्न; अक्षर. २ अंक; संख्या. ३ ठराविक गोष्ट. ४ अंश; भाग. ५ प्रसिद्ध घराणें. ६ आकांक्षा.

**आँक**–*स्त्री.* कूस; मांडी.

**आँकडा**–*पु.* १ संख्या; आंकडा; २ पेंच; बिकट प्रश्न.

**आँकना**–*क्रि. स.* १ खूण करणें; चिह्न करणें. २ अनुमान करणें.

**आँख**–*स्त्री.* १ डोळा. २ दृष्टि; नजर. (मु.) **आँख अुठाना**— वांकड्या नजरेनें पाहणें. **आँखकी किरकिरी** ---डोळ्यांत सलणारी, नकोशी वाटणारी (व्यक्ति). **आँख –चुराना या छिपाना**–नजर चुकविणें. **आँख फेरना**–तोंड फिरविणें; कृपादृष्टि कमी होणें. **आँख निकालना**–डोळे वटारणें; रागानें पाहाणें. **आँख लड़ना**– नजरानजर होणें; प्रेम बसणें. **आँख लड़ाना**–डोळे भिडविणें; प्रेम करणें. **आँखें चार करना**–नजर भिडाविणें. **आँखें दिखाना**–डोळे वटारणें; दटावणें. **आँखें पथराना** –डोळे निर्जीव होणें. **आँखें बिछाना**–प्रेमपूर्वक स्वागत करणें. **आँखोंमें समाना**–डोळ्यांत भरणें; समावणें. **आँखोंका तारा**–अति-शय प्रिय व्यक्ति. **आँखोंमें रात काटना**–काळजीनें रात्रभर जाग्रण करणें.

**आँखडी**-*स्त्री.* १ डोळा. २ दृष्टि; नजर.

**आँखमिचौली – मीचली** – *स्त्री.* लपंडावाचा खेळ.

**आँग***–*पु.* शरीर; अंग.
**आँगन**–*पु.* अंगण; चौक.
**आँगी***–*स्त्री.* चोळी.
**आँगुरी***–बोट; अंगुली.
**आँघी**–*स्त्री.* कापडी चाळण.
**आँच**–*स्त्री.* १ आंच; विस्तवाची धग. २ ज्वाळा. ३ हानि
**आँचना**–*क्रि. स.* अून करणें; आंच देणें. (मु.) **आँच न आने देना**–त्रास होअूं न देणें; आंच लागूं न देणें.
**आँचर***–*पु.* पदर; अंचल.
**आँचल**–*पु.* पदर (लुगड्याचा).(मु.) **आँचल देना**–मुलाला दूध पाजणें.
**आँट**–*स्त्री.* १ टीच. २ गांठ. ३ वैर. ४ बेचकें.
**आँट–साँट**– *स्त्री.* [दे] गुप्त करार; कट; बेकायदेशीर देवाण–घेवाण.
**आँटी**–*स्त्री.* १ सुताची गुंडी; आटी. २ गवताची पेंढी.
**आँठी**–*स्त्री.* आठळी; बीं.
**आँड**–*पु.* अंडकोष.
**आँत**–*स्त्री.* आंतडें.
**आंदोलन**-*पु.* चळवळ; खळबळ.
**आँधरा***–*वि.* आंधळा.
**आँधारंभ***–*पु.* १ सावळागोंधळ; अंधेर नगरी. २ स्वैर वर्तन.
**आँधी**–*स्त्री.* झंझावात; तुफान.
**आँबाहलदी**–*स्त्री.* आंबेहळद.
**आँय-बाँय**–*स्त्री.* ( अनु. ) वटवट; बडबड.
**आँवड़ा**–*वि.* गहन; खोल.
**आँवल**–*पु.* वार; गर्भवेष्टन; जार.
**आँवला**–*पु.* आवळा.
**आँवाँ, आवाँ**–*पु.* कुंभाराची भट्टी. ( मु. ) **आँवाँ का आँवाँ बिगड़ना**–कुटुंबाची किंवा समाजाची आढी नासणें.
**आंशिक**–अंशासंबंधीं; कांहीं; थोडें.
**आँस***–*स्त्री.* १ संवेदना; जाणीव. *पु.* अश्रु; आंसूं.
**आँसी**–*स्त्री.* आनंदाप्रीत्यर्थ अिष्ट-मित्रांत वांटावयाची मिठाअी.
**आँसू**–*पु.* अश्रु; आंसूं. (मु.) **आँसू गिराना या ढालना**– अश्रू ढाळणें; रडणें. **आँसू पीकर रह जाना**–दुःख गिळणें; सहन करणें.
**आँहड़**–*पु.* भांडें.
**आअिंदा**–*वि.* [फा] भविष्य-कालीन. *क्रि. वि.* यापुढें; भविष्य काळीं *पु.* भविष्यकाळ.
**आअि***–*स्त्री.* आयुष्य; वय.
**आअिस–सु**–*पु.* आदेश; आज्ञा.
**आअी**–*स्त्री.* १ मृत्यु; मरण. २ आयुष्य
**आअीन**–*पु.* [अ.] १ नियम; कायदा. २ आरास; सजावट.

**आअीना**–*पु.* [फा.] आरसा. (मु.) **आअीना होना**–स्पष्ट होणें. **आअीनेमें मुँह देखना**–आपली योग्यता पडताळून पाहाणें.
**आअीनासाज़**–*पु.*. [फा] आरसे बनविणारा; कांचकाम करणारा.
**आअीनासाज़ी**–*स्त्री.* आरसे बनविण्याचें काम; कांचकाम.
**आअु–अू***–*स्त्री.* वय; आयुष्यकाल
**आअुबाअु***–*पु.* निरर्थक बडबड; वटवट.
**आअुस**–भाद्रपदांत तयार होणारें साळीचें पीक; हळवें भात.
**आक़बत***–*स्त्री.* [अ.] १ मृत्यूनंतरची अवस्था. २ परलोक. (यौ.) **आक़बत अंदेश**–दूरदर्शी.
**आकबाक***–*पु.* निरर्थक बडबड; वटवट.
**आकर**–*पु.* खाण; अुत्पत्तिस्थान.
**आक़रक़रहा**--*पु.* [अ.] अक्कलकरा--काढा (झाड).
**आकस्मिक**–*पु.* नैमित्तिक रजा. *वि.* आकस्मिक; अचानक.
**आक़ा**–*पु.* [अ.] १ मालक; धनी. २ अीश्वर. [२ अशक्य गोष्ट
**आकाशकुसुम**- *पु.* १ खपुष्प.
**आकाशवृत्ति**–*स्त्री.* अनिश्चित अुपजीविका.
**आकाशदिया**–*पु.* आकाशदिवा.
**आकाशी**–*स्त्री.* १ चांदणी, २ वस्त्राचें छत. [हुशार.
**आक़िल**–*वि.* [अ.] बुद्धिमान्,
**आक़िलख़ानी**–*पु.* [अ. + फा.] काळसर लाल रंग. [२ विव्हळ.
**आकुल**–*वि.* १ अुद्विग्न; व्याकुळ.
**आकुलता**–*स्त्री.* १ व्याकुळता. २ अस्वस्थता. [घायाळ. २ पराजित.
**आक्रांत**–*वि.* १ आक्रमण झालेला;
**आक्रोश**–*पु.* डागण्या; टोंचून बोलणें, मर्मभेदी भाषण. २ शिव्याशाप; जळफळाट.
**आक्षेप**--*पु.* आक्षेप; हरकत; दोष.
**आख़्ता**–*वि.* [फा.] खच्ची केलेला. (घोडा)
**आखना**–*क्रि. स.* १ सांगणें. २ पाहणें. ३ अुल्लंघन करणें; ओलांडणें.
**आखर**--*पु.* अक्षर. [संपूर्ण; अख्खा.
**आखा**--*पु.* कापडी चाळणी. *वि.*
**आखातीज**--*स्त्री.* अक्षय्यतृतीया.
**आख़िर**--*स्त्री.* [फा.] १ शेवट. २ परिणाम, फळ. *क्रि. वि.* सरतेशेवटीं; अखेर.
**आख़िर--री**–*वि.* [फा.] शेवटचा; अन्तिम. **आख़िरकार**–*क्रि. वि.* शेवटीं; अखेर.

**आख़िरत**—*स्त्री.*[*अ.*] १ प्रलय-दिन. २ परलोक. ३ मृत्युदिन.
**आखेट**—*पु.* शिकार. **आखेटक**—शिकारी; पारधी.
**आख़ोर**—*पु.* [फा.] १ जनावरांच्या खाण्यानंतरचा उरलेला चारा. २ केरकचरा. ३ तबेला.
**आख्या**—*स्त्री.* १ नांव. २ यश; कीर्ति. ३ व्याख्या. [प्रसिद्ध.
**आख्यात**—*वि.* विख्यात;
**आगंतुक**—*वि.* अतिथि; पाहुणा; अभ्यागत.
**आग**—*स्त्री.* १ विस्तव; अग्नि. २ दाह; ताप. (मु.) **आग उगलना**—आग पाखडणें; रागानें बोलणें. **आग बबूला (बगूला) होना या बनना**—रागानें लाल होणें. [उपस्थित.
**आगत**—*वि.* आलेला; हजर;
**आगम**—*पु.* १ भविष्यकाळांत घडणारी गोष्ट. २ आगमन. ३ संगम; अेकत्र मिसळणें. ४ भविष्यकाळ. ५ उत्पन्न; मिळकत.
**आगमजानी**— *वि.* दूरदर्शी; भविष्य जाणणारा. [दूरदर्शी.
**आगमसोची**—*वि.* धोरणी;
**आगर**—*पु.* १ खाण; ढीग. २ घर, खजिना.
**आगा**—*पु.* कोणत्याहि वस्तूचा पुढचा भाग.
**आग़ा**—*पु.* [तु.] १ वडील भाअू. २ सद्गृहस्थ. ३ मालक ४ काबुली; पठाण. [आरंभ.
**आग़ाज़**—*पु.* [फा.] सुरुवात;
**आगान***—*पु.* आख्यान; वृत्तान्त.
**आगा-पीछा**—*पु.* १ कांकूं करणें. २ संशयावस्था. ३ परिणाम; शेवट. ४ शरीराचा पुढचा व मागचा भाग. ५ मागला पुढला (विचार, गोष्ट अि.) [३ स्थान.
**आगार**—*पु.* १ घर. २ खजिना.
**आगाह**—*वि.* [फा.] माहितगार; जाणता. **आगाही**-*स्त्री.* १ पूर्व-सूचना; माहिती. २ जाणीव; दखलगिरी.
**आगि-गी**—*स्त्री.* अग्नि; विस्तव.
**आगिल-ला**—*वि.* भविष्यकाळांत घडणारा; आगामी; पुढील.
**आगू-गे**—*क्रि. वि.* १ पुढें. २ भविष्यकाळीं. ३ समोर; सन्मुख. ४ नंतर. ५ पूर्वी. (मु.) **आगे चलकर**—कालान्तरानें.
**आगोश**—*स्त्री.* [फा] मांडी.
**आगौन***-*पु.* आगमन.
**आघ-घु*** *पु.* किंमत; मूल्य. [पळी.
**आचमनी**—*स्त्री.* आचमन करण्याची

**आचरना**—क्रि. अ. आचरणें; व्यवहार करणें.

**आचारी**—वि. चारित्र्यवान्; सदाचारी.

**आछना**—क्रि. अ. असणें; राहणे.

**आछा-छो**—वि. चांगला.

**आछी**—वि. स्त्री. चांगली.

**आछे**—क्रि. वि. चांगल्या रीतीनें.

**आज**—क्रि. वि. आज. [ सध्यां.

**आजकल**—क्रि. वि. आजकाल;

**आज़म**—वि. [अ.] मोठा; श्रेष्ठ.

**आज़माअिश**—स्त्री. [फा.] अनुभव; परीक्षा. **आज़माना**—क्रि. स. १ अनुभव घेणें. २ पारखणें; परीक्षा करणे. [ लेलें; पारखलेलें.

**आज़मूदा**—वि. [फा.] अजमाव-

**आज़ाद्**—वि. [फा.] १ मुक्त; स्वतंत्र. २ निष्काळजी. **आज़ादी**-स्त्री. १ स्वातंत्र्य. २ सुटका.

**आजिज़**—वि.[अ.] १ हैराण; त्रासलेला. २ दीन; नम्र. **आजिज़ी** स्त्री. १नम्रता; दीनता. २ विनंती.

**आजीवन**—अव्य. जन्मभर; आजन्म.

**आज़ुर्दा**—वि. [फा.] दुःखी; चिंतित. [व्यवसाय

**आजीविका**—स्त्री. धंदा; वृत्ति;

**आज्ञाकारी**—वि. आज्ञाधारक.

**आजु***—पु. क्रि. वि. आज

**आटना**—क्रि. स. दाबणें; दडपणें.

**आटा**—पु. १ पीठ. २ कणीक. (मु.) **आटे दालका भाव मालूम होना**-खरी वस्तुस्थिति समजणें (अुपरोधिक). **आटे दालकी फ़िक्र**-पोटाची काळजी.

**आठ**—वि. आठ (मु.) **आठ आठ आँसू रोना**-खूप रडणें; विलाप करणें. [ अवडंबर.

**आडंबर**—पु. ढोंग; देखावा;

**आड़**—स्त्री. १ आश्रय; आसरा. २ आडोसा. ३ आडकाठी.

**आडगीर**—पु. [हिं. फा.] शेताच्या बांधावरील गवत.

**आड़न**—स्त्री. ढाल.

**आडना**—क्रि. स. १ रोखून धरणें; अडविणें; मनाअी करणें. २ गहाण ठेवणें.

**आडबंद**—पु. लंगोट.

**आडा**—पु.१ रेषांचें कापड. २ होडी अथवा बोट यांमध्यें आडोसा म्हणून लावलेल्या फळ्या.

**आडा**—वि. आडवें. (मु.) **आडे हाथों लेना** – फैलावर घेणें; खरडपट्टी काढणें.

**आडा-खेमटा**—पु. मृदंगाचा साडेतेरा मात्रांचा ताल.

**आडा-चौताल**--पु. मृदंगाचा पूर्ण नअू मात्रांचा ताल.

**आडा-ठेका** पु. मृदंगाचा पूर्ण सात मात्रांचा ताल.

**आडा-पंचताल**—पु. मृदंगाचा पांच आघात नअू मात्रांचा ताल.

**आडा-लोट**—पु. हेलकावे खाणें ( होडी ).

**आडू**—पु. पीच ( फळ ).

**आडी**—स्त्री. १ बाजू; दिशा २ पक्याचा; गटांतला. ३ तबला वाजविण्याची विशिष्ट तऱ्हा. ४ चांभारांची एक सुटी.

**आढक**—पु. चार शेरी माप अथवा वजन; पायली.

**आढत**—स्त्री. १ अडत. २ वखार; कोठी. **आढतिया**—पु. ३ वखारवाला. ४ दलाल; अडत्या.

**आतंक**--पु. १ भय; धाक; दहशत. २ साशंक व भीतियुक्त वातावरण.

**आततायी**—पु. १ आततायी. २ आगलाव्या. ३ अपहरण करणारा ( जमीन, स्त्री, धन अि. ). ४ अत्याचारी; जिवावर अुठलेला; हत्या करावयास अुद्युक्त झालेला.

**आतप**--पु. १ अून. २ अुष्णता; गरमी. ३ सूर्याचा प्रकाश.

**आतपी**--पु. सूर्य.

**आतम**—वि. आपला.

**आतमा**—स्त्री. पु. आत्मा.

**आतश-तिश**—स्त्री. [ फा. ] १ अग्नि; विस्तव. २ प्रकाश. ३ राग.

**आतशक**—पु. [फा.] १ सांसर्गिक रोग. २ अुपदंश, गरमी रोग.

**आतशखाना**—पु. [फा.] १ भिंतींतील शेगडी. २ पारशांचें अग्निकुंड.

**आतशदान**—पु. [फा.] शेगडी.

**आतशपरस्त**—पु. [फा.] अग्निपूजक.

**आतशबाजी**—स्त्री. [फा.] दारूकाम.

**आती-पाती**—स्त्री. लपंडावासारखा अेक खेळ.

**आत्मश्लाघा**—स्त्री. स्वतःची बढाअी; आत्मस्तुति.

**आत्मा**—स्त्री. जीभ; धुनकणीच्या अेका टोंकाला असलेला चामड्याचा तुकडा. [ **ठंडी होना**—शांत होणें.

**आत्मा**—स्त्री.पु.आत्मा.(मु.)**आत्मा**

**आत्मिक**—वि. १ आपला. २ मानसिक. ३ आत्म्यासंबंधीं.

**आत्मोत्सर्ग**—पु. स्वार्थत्याग.

**आदत**—स्त्री. [अ.] १ स्वभाव. २ संवय; अभ्यास.

**आदम**—पु. [अ.] मानवजातीचा आदिपुरुष; मनु.

**आदमी**—पु. [ अ. ] १ 'आदम'-च्या वंशांतला. २ मनुष्य; मानव. ( मु. ) **आदमी बनाना**–सभ्यतेनें वागणें; माणुसकी धरणें. [माणुसकी.

**आदमीयत**—स्त्री. [ अ. + फा. ]

**आदानप्रदान**—पु. देवाणघेवाण; देव-घेव.

**आदाब**—पु. [ अ. ] १ नियम; कायदा. २ शील; मर्यादा. ३ नमस्कार; प्रणाम. ('अदब'चें बहु.)

**आदि**—अव्य. वगैरे; अित्यादि. *वि.* १ पहिला; सुरुवातीचा; प्रथम. २ अगदीं. *पु.* मूळ; आरंभ.

**आदी**—*वि.* [अ.] संवय असलेला; अभ्यस्त.

**आदी**—स्त्री. आलें

**आदेश** —पु. १ आज्ञा. २ अुपदेश.

**आध–धा**—*वि.*अर्धा. (मु.) **आधा तीतर आधा बटेर**-अर्धवट. **आधा होना**–रोडावणें; सुकणें.

**आधासीसी**—स्त्री. अर्धशिशी.

**आन**—स्त्री. १ मर्यादा. २ शपथ; प्रतिज्ञा. ३ अैट; तोरा. ४ क्षण; पळ.*वि.* अन्य दुसरा.(मु.) **आनकी आनमें**–क्षणार्धात;पाहतां पाहतां. **आनपर मर मिटना**—प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठीं अथवा वचन-पूर्तीसाठीं सर्वस्व पणाला लावणें.

**आनक**—पु. डंका; दवंडी.

**आनना**—*क्रि. स.* आणणें.

**आनन फानन** – *क्रि. वि.* [ अ. ] झट्दिशीं; अेकाअेकीं.

**आनबान**—स्त्री. १ थाटमाट. २ अैट; मिजास; तोरा.

**आना**—*क्रि. अ.* येणें; आगमन करणें. ( मु. ) **आ धमकना**–दाखल होणें; येऊन ठेपणें. **आया गया** - अतिथि; पाहुणा.

**आना**—पु. आणेली ( नाणें ).

**आनाकानी**— स्त्री. १ दुर्लक्ष; टाळाटाळ. २ अैकलें न अैकल्या-सारखें करणें. ३ कुजबूज.

**आनि**—स्त्री. शपथ; आणभाक.

**आनुमानिक**—*वि.* काल्पनिक.

**आप**—*स.*. आपण. ( यौ. ) **आपकाजी**–स्वार्थी; मतलबी.

**आपत्ति**—स्त्री. १ दुःख. २ संकट, विपत्ति. ३ आक्षेप; विरोध; हर-कत. ४ दोषारोप.

**आपत्तिजनक**—*वि.* आक्षेपार्ह

**आपदा**—स्त्री. १ दुःख. २ संकट.

**आपन–नो***—*स.* आपला.

**आपनपो–पौ**—पु. आत्मभाव; अहंकार.

**आपस**—स्त्री. नातें; संबंध. ( मु. ) **आपसमें**–अेकमेकांत; परस्परांत.

**आपा**—पु. गर्व; घमेंड. *स्त्री.* वडील बहीण. (मु.) **आपेमें आना**–शुद्धीवर येणें. **आपेसे बाहर होना**–क्रोधामुळें मनावरील ताबा जाणें.

**आपात**—पु. १ अधःपात; पतन. २ अनपेक्षित घडलेली गोष्ट.

**आपाततः**—*क्रि. वि.* १ अचानक; अकस्मात्. २ अखेरीस; शेवटीं.

**आपाधापी**—*स्त्री.* १ आपल्याच कामासाठीं धांवपळ; तारंबळ. २ विवंचना. [ ( मेजवानी ).

**आपानक**—पु.मदिरापान

**आपुन–नो**—*स.* आपला

**आफ़त**—*स्त्री.* [अ.] आपत्ति; संकट २ दुःख; कष्ट. (मु.) **आफ़त अुठाना**–दुःख भोगणें. **आफ़त मचाना**–दंगा करणें; गडबड करणें. **आफत मोल लेना**—संकट ओढवून घेणें; दुसऱ्याचें श्राद्ध विकत घेणें. **आफत लाना**–संकट ओढवून घेणें.

**आफ़ताब**—पु.[फा.] १सूर्य.२अून.

**आफ़ताबा**—पु. [फा.] पाण्याचें तोटीदार भांडें;झारी.**आफ़ताबी**–*स्त्री.* अब्दागिरी. [ शाबास.

**आफ़रीन**—अव्य. [फा.] वाहवा;

**आफ़ात**—*स्त्री.* [अ.] संकटें; विपत्ति ( 'आफ़त'चें बहु. ).

**आफ़ियत**—*स्त्री.*[अ.] क्षेम; कुशल समाचार. [ रुबाब. २ पाणी.

**आब**—*स्त्री.* [फा.] १ तेज; कांति;

**आबकार**—पु. [फा.] कलाल; दारू गाळणारा. [ गाळण्याची भट्टी.

**आबकारी**—*स्त्री.* [ फा. ] दारू

**आबकारी**—*वि.* [फा.] दारूसंबंधीं; अबकारी; मादक पदार्थांशीं संबंधित सरकारी खातें ( अेक्साअिज डिपार्टमेंट).[ पिण्याचें भांडें; पेला.

**आबख़ोरा**—पु. [ फा. ] पाणी

**आबजोश**–पु. [फा.]१गरम पाण्यांत अुकळलेल्या मनुका. २ रस्सा.

**आबताब**—*स्त्री.* [ फा. ] भपका; शोभा, वैभव.

**आबदस्त**—पु. [ फा. ] बहिर्दिशेनंतर हातपाय धुणें; ढुंगण धुणें.

**आबदाना**—पु. [फा.] १ अन्नपाणी; दाणापाणी. २ अुपजीविका.

**आबदार**— *वि.* [फा.] चमकदार; पाणीदार. **आबदारी**- *स्त्री.* चमक; कांति; तजेला; पाणी; तकाकी.

**आबदीदा**—*वि.* [फा.] ज्याचे डोळे अश्रूंनीं डबडबले आहेत असा; अश्रुपूर्ण.

**आबनजूल**—पु. [फा.] अंडवृद्धि.

**आबनाअे**—*स्त्री.* [फा.] सामुद्रधुनी.
**आबनूस**—*पु.* [फा.] जंगलांतील काळें झाड; आबानूस. (मु.) **आबनूसका कुंदा**—काळाकुट्ट; काळाठिक्कर माणूस. **आबनूसी**—*वि.* काळाठिक्कर; काळाकुट्ट.
**आबपाशी**—*स्त्री.* [फा.] पाटबंधाऱ्याची व्यवस्था.
**आबरवाँ**—*स्त्री.* [फा.] अेक प्रकारची पातळ मलमल. [प्रतिष्ठा.
**आबरू**—*स्त्री.* [फा.] अिज्जत; अब्रू.
**आबला**—*पु.* [फा.] फोड; व्रण.
**आबशार**—*पु.* [फा.] १ झरा. २ धबधबा.
**आबहवा**—*स्त्री.* [फा.] हवापाणी.
**आबाद**—*वि.* [फा.] १ वसलेलें. २ सुखी; संपन्न. **आबादकार**—*पु.* वसाहत करणारा. **आबादी**—*स्त्री.* १ वसाहत. २ लोकसंख्या; वस्ती. ३ लागवडीस आलेली जमीन.
**आबिद**—*पु.* [अ.] अिबादत म्हणजे पूजा करणारा; भक्त.
**आबे ज़िन्दगानी**—*पु.* [फा.] अमृत.
**आबे रूद**—*पु.* [फा.] नदीचें पाणी.
**आबे हयात**—*पु.* [फा.] अमृत.
**आबोहवा**—*स्त्री.* [फा.] हवापाणी.
**आभरण-न**—*पु.* १ दागिना; भूषण; अलंकार. २ पालनपोषण.
**आभारी**—*वि.* आभारी; कृतज्ञ.
**आभीर**—*पु.* गोप; गवळी.
**आभूषण-न**—*पु.* दागिना; भूषण; अलंकार. [झाड.
**आम**—*पु.* १ आंबा. २ आंब्याचें
**आम**—*पु.* आंव.
**आम**—*वि.* कच्चा; अपरिपक्व.
**आम**—*वि.* [अ.] साधारण; मामुली. **आमखास**—खास-दिवाणखाना (राजा किंवा बादशहाची बसण्याची जागा.) [व आंबट फळ किंवा झाड.
**आमड़ा**—*पु.* आंब्यासारखें लहान
**आमद**—स्त्री. [फा.] १ आगमन; येणें. २ अुत्पन्न; मिळकत.
**आमदरफ्त**—१ येजा; रहदारी. २ अुत्पन्न; मिळकत.
**आमदनी**—*स्त्री.* [फा.] अुत्पन्न; प्राप्ति; मिळकत. [भेट.
**आमनासामना**—*पु.* समोरासमोर
**आमनेसामने** — *क्रि. वि.* समोरासमोर.
**आमफ़हम**—*वि.* [अ+फ़ा.] सर्वसामान्य लोकांना कळणारा; सोपा.
**आमलक-आमला**—*पु.* आंवळा.
**आमादगी**—*स्त्री.* [फा.] तयारी; तत्परता.
**आमादा**—*वि.* [फा.] तयार; तत्पर; सिद्ध; अुद्युक्त.

**ओयासीस**–*पु.* [अं.]वाळवंटांतील सुपीक जमीन.

**ओर**–*स्त्री.* १ बाजू; दिशा. २ पक्ष. *पु.* १ किनारा; २ तीर. (मु.) **अिस ओर अुस ओर**–अिकडे तिकडे. **ओर निबाहना या निभाना**–शेवटपर्यंत आपलें काम पुरें करणें. **ओर से छोर तक**–१ आदीपासून अंतापर्यंत–२ अेका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत; अथपासून अितीपर्यंत.

**ओरहा**–*पु.* हरभऱ्याचें रोपटें.

**ओराना**–*क्रि.अ.* संपणें. [रहिवासी.

**ओलंदेज-जी**–*पु.* [दे.] हॉलंडचा

**ओलती**–*स्त्री.* भिंतीच्या बाहेर निघालेला छप्पराचा भाग;वळचण.

**ओला**–*पु.* १ गार (पाअूस पडतांना). २ खडीसाखरेचा लाडू. *वि.* [सं.] गारेअितका थंड.

**ओला**–*पु.* १ आडपडदा. २ गौप्य; रहस्य.

**ओलियाना**–*क्रि.स.* ओटींत घालणें.

**ओलियाना**–*क्रि. स.* ठासून भरणें.

**ओली** *स्त्री.* १ कूस; मांडी. २ पदर; अंचल. ३ पिशवी. (मु.) **ओली ओडना**–पदर पसरणें.

**ओस**–*स्त्री.* दंव. (मु.) **ओस पड़ना या पड़ जाना**— १ कोमेजणें. २ मलूल होणें. ३ हताश होणें.

**ओसरी**–*स्त्री.* पाळी, क्रम. [अुपणणें.

**ओसाना**–*क्रि. स.* धान्य वारवणें;

**ओसार**-*पु.* फैलाव; विस्तार.

**ओसारा**–*पु.* ओसरी; व्हरांडा.

**ओह**–अव्य. दुःख, आश्चर्य अि. सूचक शब्द.

**ओहदा**–*पु.*[अ.] हुद्दा; अधिकारपद.

**ओहदेदार**–*पु.* [अ.+फा.] अधिकारी; हुद्देदार. [घालण्याचा कपडा.

**ओहार**–*पु.* रथावर किंवा पालखीवर

## औ

**औंगना**–*क्रि. स.* ओंगण घालणें; वंगणें.

**औंगा**–*वि.* मुका; वाचा नसलेला.

**औंगी**–*स्त्री.* १ मुकेपणा; मुग्धता.

**औंगी**–*स्त्री.* [दे.] बैल हांकण्याची काठी किंवा चाबूक.

**औंजना***–*क्रि.* अ. १ त्रासणें; कंटाळणें. २घाबरणें; व्याकुळ होणें.

**औड़ँ***–*पु.* खड्डा खणणारा मजूर.
**औँडा** *वि.* खोल.
**औँदना***–*क्रि. अ.* १ व्याकुळ होणें. २ अुन्मत्त होणें; बेहोश होणें.
**औँदाना**–* *क्रि. अ.* १ त्रासणें; कंटाळणें; विटणें. २ घाबरें होणें; जीव गुदमरणें.
**औँधना**–*क्रि. अ.* अुलटणें; अुलटें होणें. *क्रि. स.* अुलटें करणें; अुलथणें.
**औँधा**–*वि.* पालथा; अुपडा. (मु.) **औँधी खोपडी**–मूर्ख; बेअकली; अुलट्या कवटीचा. **औँधे मुँह गिरना**–तोंडघशीं पडणें; तोंडावर पडणें. [ अुलटें करणें.
**औँधाना**–*क्रि. स.* अुलटविणें;
**औँरा**–*पु.* आंवळा.
**औ**-अव्य. आणि; व.
**औक़ात**–*पु.* [अ.] वेळ ('वक्त'चें बहु.) *स्त्री.* (अेकवचन) १ वेळ. समय. २ सामर्थ्य; अवकात; प्राज्ञा.
**औगत***–*स्त्री.* अवगति; दुर्दशा; दुर्गति. [ २ हत्ती पकडण्याचा खड्डा.
**औगी**–*स्त्री.* १ चाबूक; पराणी.
**औगुन**—*पु.* अवगुण; दुर्गुण.
**औगुनी**–*वि.* अवगुणी; दुर्गुणी.
**औघट***–*वि.* अवघड; बिकट; कठिण.
**औघड़**–*पु.* १ अघोरी माणूस. २ विचार न करतां काम करणारा माणूस.
**औघर**–*वि.* १ नवीन; विलक्षण. २ अव्यवस्थित; बेपद्धतशीर.
**औचक**–*क्रि. वि.* अचानक; अेकाअकीं.
**औचट**–*स्त्री.* अडचण; संकट. *क्रि. वि.* १ अचानक, अकस्मात्. २ चुकीनें.
**औचित**–*वि.* निश्चित. [ अुंची.
**औज**–*पु.* [अ.] १ श्रेष्ठ पद. २ अुच्चता;
**औजड**–*वि.* अुद्धट; अडाणी.
**औज़ार**–*पु.* [अ.] सुतार, लोहार अि. चें काम करण्याचें हत्यार.
**औझड-र**–*क्रि. वि.* लागोपाठ; सतत; निरंतर.
**औटन**–*पु.* १ कढण. आटवल. २
**औटना**–*क्रि. अ.* आटणे. *क्रि. स.* आटविणें.
**औटनी**–*स्त्री.* पळी; डाव.
**औटाना**–*क्रि. स.* आटविणें.
**औटी**–*स्त्री.* १ गाय अथवा म्हैस व्याल्यानंतर तिला द्यावयाचें पौष्टिक अन्न. २ काकवी.
**औढर**–*वि.* स्वच्छंदी. [ दुर्दशा.
**औदसा***–*स्त्री.* अवदशा; विपत्ति;
**औध**–*पु.* अवध; कौसल; अयोध्येचा प्रांत.

**औध-धि***–स्त्री· १ अवधि; काळ. २ आयुष्य.

**औना-पौना**–वि· थोडेंफार. (मु.) **औनेपौने करना**–मिळेल तेवढ्या किंमतींत विकून टाकणें.

**औनि***–स्त्री· अवनी; पृथ्वी.

**औपनिवेशिक**–वि· १ वसाहत-संबंधीं; २ वसाहतीसारखा.

**औपन्यासिक**–वि· १ कादंबरी-संबंधीं; कादंबरीविषयक. २ कादंबरीस योग्य. ३ अद्‌भुत.

**औम***–स्त्री· क्षयतिथि.

**औरंग**–पु·[फा.] १ राजसिंहासन. २ बुद्धि. ३ कपट. ४ दीपक.

**औरंगज़ेब**–पु· [फा.] राजसिंहासनाला शोभा आणणारा.

**और**–अव्य. आणि. वि· १ दुसरा; अन्य; २ अधिक.

**औरत**–स्त्री· [अ.] १ स्त्री; बाऔी. २ पत्नी; बायको. [रुष्ट होणें.

**औरसना**–क्रि· अ· विरस होणें.

**औरेब**–पु· १ वक्रगति. २ पेंच. बुचकळा. ३ डाव; कावा; युक्ति; पेंच;

**औला**–वि· [अ.] सर्वश्रेष्ठ. [वंश.

**औलाद**–स्त्री·संतान; संतति. २ कुळ;

**औलिया**–पु· [अ.] मुसलमानी फकीर ('वली'चें बहु.).

**औवल**–वि· [अ.] १ पहिल्या प्रतीचा; अुत्तम; श्रेष्ठ. २ मुख्य; प्रधान. ३ पहिला; प्रथम.

**औशि***–क्रि· वि· अवश्य.

**औसत**–पु· [अ.] सरासरी; सामान्य. वि· सर्वसाधारण. **औसत दर्जेका** – वि· सामान्य प्रतीचा.

**औसर***–पु· १ अवसर; वेळ; अवकाश. २ संधि.

**औसान**–पु· अंत; शेवट; समाप्ति; परिणाम.

**औसाफ़**–पु· [अ.] १ गुण. २ विशेषता ('वस्फ़'चें बहु.).

**औसेर**–स्त्री· १ विवंचना; काळजी. अुशीर.

**औहाती***– वि· स्त्री· सौभाग्यवती.

## क

**कँऔधा**–पु· [सं.] विजेची चमक; चकचकाट; लखलखाट.

**कंक**–पु· १ पांढरी घार. २ विशेष प्रकारचा आंबा.

**कंकड़-र**–पु·खडा. **कंकडीला**–वि· रेताड; खडेखडे असलेला.

**कंकरीट**–स्त्री· [अिं.] कॉंक्रिट.

**कँकरीला**–वि· पाहा 'कंकडीला'.

**कंकाल**–पु· हाडांचा सांपळा.
**कँखवारी–कखौरी**–स्त्री· [सं.] कांखेंत येणारी गांठ.
**कंगन**–पु· कांकण; कंकण. **कँगना**–पु· कांकण. **कँगनी**– स्त्री· लहान कांकण.
**कँगही**–स्त्री· फणी.
**कंगाल**–वि· गरीब; निर्धन. (यौ.) **कंगाल गुंडा**–वि· गरीब परंतु चैनी, बदमाष.
**कंगाली**–स्त्री· दारिद्रय; निर्धनता; गरिबी. (मु.) **कंगालीमें आटा गीला**–दुष्काळांत तेरावा महिना.
**कँगुरिया***–स्त्री· करंगळी.
**कँगूरा**–पु· [फा.] १ शिखर. २ किल्ल्यावरील माऱ्याची जागा; बुरुज.
**कंघा**–पु· १ मोठी फणी; कंगवा. २ मागाची फणी. **कंघी**–स्त्री· लहान फणी. **कँघेरा**–पु· फणी बनविणारा.
**कंघी**–स्त्री·[दे.] फणी. (मु.) **कंघी चोटी करना**–वेणी फणी करणें.
**कंचन**– पु· १ सोनें; सुवर्ण; कांचन. २ धन; संपत्ति. (मु.) **कंचन बरसना**-संपत्ति व शोभायुक्त होणें.
**कंचनी**–स्त्री· वेश्येचा धंदा करणारी एक जात.
**कँचुकी-ली**– स्त्री· १ चोळी. २ सापाची कात.
**कँचुवा***–पु· चोळी. [कांचारी.
**कँचेरा**–पु· कांचकाम करणारा;
**कंछा**–स्त्री· १बारीक अंकुर. २ डहाळी
**कंजई**–वि· धुरकट रंगाचा; खाकी रंगाचा. [जात (मांग)
**कंजड़**–पु· [दे.] दोरखंड वळणारी
**कंजा**–वि· १ खाकी रंगाचा. २ घाऱ्या डोळ्यांचा. ३ करंजीचें फळ किंवा झाड.
**कंजाक**–पु·[तु.] लुटारू; डाकू.
**कंजूस**–वि· कृपण; कंजूष; चिक्कू.
**कंजूसी**–स्त्री· चिक्कूपणा.
**कंटकी**–वि·कांटेदार.
**कंटकी**–स्त्री·एक प्रकारची मासळी.
**कंटर**–पु· (अिं. डिकँटर) कांचेची सुरई, अत्तराची कुप्पी.
**कंटाअिन**–स्त्री· डाकीण; हडळ; बदमाष स्त्री. [काठी.
**कंटार**–पु· बांगड्या रंगविण्याची
**कँटिया**–स्त्री· १लहान खिळा. २मासे धरण्याचा गळ. ३ गळ.
**कँटीला**–वि· कांटेदार; कांटेरी.
**कंटोप**–पु· कानटोपी; माकडटोपी.
**कंठ**–पु·कंठ;गळा. (मु.)**कंठ करना**–पाठ करणें. **कंठमें होना**–जवळ जवळ आठवणें. **कंठ होना**–

ध्यानांत राहणें.

**कंठगत**–*वि.* तोंडपाठ.

**कंठमाला**–*स्त्री.* गंडमाला.

**कंठला**–*पु.* हसळी (मुलांची)

**कंठसिरी**–*स्त्री.* गळसरी, कंठी.

**कंठहार**–*पु.* चंद्रहार; गळ्यांतील हार.

**कंठस्थ**–*वि.* तोंडपाठ.

**कंठाग्र**–*वि.* तोंडपाठ.

**कंठी**–*स्त्री.* तुळशीची माळ; कंठी.(मु.) **कंठी लेना**–दीक्षा घेणें; भक्त होणें.

**कंडा**–*पु.* गोवरी. **कंडी**–*स्त्री.*

**कंडारी**–*पु.* खलाशी

**कंडाल**–*पु.* १ करनाळ; तुतारी. २ पाणी सांठविण्याचें पितळी किंवा लोखंडी पीप.

**कंडिका**–*स्त्री.* १ वैदिक ग्रंथांतील लहान वाक्य. २ पॅरिग्राफ; परिच्छेद.

**कंडील**–*क्रि.* [ अ. ] कंदील.

**कंडीलिया**–*स्त्री.* [ अ. + पोर्तु. ] समुद्रांतील द्वीपस्तंभ.

**कंडोल**–*पु.* [ दे ] करंडा (बांबूचा)

**कंडौरा**–*पु.* गोवऱ्या थापण्याची अथवा ठेवण्याची जागा.

**कंत***–*पु.* १ कांत; पति. २ ओश्वर.

**कंथा**–*स्त्री.* गोधडी, शरीर.

**कंथी**–*पु.* गोधडी पांघरणारा; साधु.

**कंद**–*पु.* [ फा. ] खडीसाखर.

**कंदरप, कंदर्प**–*पु.* मदन; कामदेव.

**कंदला**–*पु.* १ सोनें–चांदाचा चीप किंवा लगड. २ सोनें किंवा चांदीची तार. **कंदलागर**–*पु.* धातूंत खोटी भेसळ करून दागिनें करणारा सोनार.

**कंदा**–*पु.* १ रताळें. २ अरवी.

**कंदील**–*स्त्री.* [अ.] १ माती, अभ्रक अथवा कागद यांचा दिवा ( याचें तोंड वरच्या बाजूस असतें ). २ दिव्याचें झुंबर अथवा झाड.

**कँदैला**–*वि.* मलीन; घाणेरडा.

**कँदोरा**–*पु.* करगोटा.

**कंध***–*पु.* स्कंध; खांदा. २ जेथें खोडाला फांद्या फुटतात ती जागा.

**कंधनी**–*स्त्री.* करगोटा.

**कंधर**–*पु.* १ मान; गर्दन. २ मेघ ढग.

**कंधा**—*पु.* [ सं. ] खांदा.

**कँधावर**—*स्त्री.* १ जूं; बैलाच्या मानेवरचें जोखड. २ अुपरणें; अंगावरील वस्त्र.

**कंधी**—*पु.* १ समुद्र. २ मेघ.

**कंधेली**—*स्त्री.* [ दे. ] खोगीर.

**कँधेला**—*पु.* लुगड्याचा पदर ( खांद्यावरील ).

**कँपकँपी**— *स्त्री.* कांपरें; हुडहुडी.

**कँपना**—*क्रि.अ.* १ कांपणें; थरारणें. २ भयभीत होणें.

**कंपा**—*पु.* पक्षी पकडण्याचा बांबूचा केलेला फांस.

**कँपाना**—*क्रि. स.* १ भिवविणें; भेडसावणें. २ थरारविणें. [ तळ.

**कंपू**—*पु.* [अ.] छावणी; फौजेचा

**कंबर-ल**—*पु.* १ घोंगडी; कांबळें. २ राहुटी.

**कँवल**—*पु.* कमळ. **कँवलगट्टा**—*पु.* कमळाचें बीं.

**कई**—*वि.* कित्येक; अनेक.

**ककई**—*स्त्री.* फणी.

**ककडी**—*स्त्री.* काकडी.

**ककहरा**—*पु.* 'क' पासून 'ह' पर्यंतची वर्णमाला.

**ककोडा**—*पु.* [दे.] तोंडल्यासारखें एक फळ ( भाजीसाठीं उपयोगांत येणारें ); टरकाकडी.

**कक्कड**—*पु.* तंबाखूचा चुरा ( चिलमींतून ओढावयाचा ).

**कक्ष**—*पु.* १ खोली २ खांक;बगल.

**कक्षा**—*स्त्री.* १ वर्ग; क्लास २ दर्जा, श्रेणी, ३ परीघ.

**कखरी**-*स्त्री.* [दे.] कांख; कूस. (मु.) **कखरी लरिका गांव गोहार** कांखेंत कळसा, गांवाला वळसा.

**कगर**—*पु.* १ दरड; नदीचा उंच किनारा. २ कुंपण. ३ कारनीस *क्रि.वि.* १ किनाऱ्याजवळ. २ जवळ

**कगार**—*पु.* १ नदीचा उंच कांठ; दरड. २ टेकडी.

**कच**—*पु.* १ केस. २ वाळलेली जखम. ३ ढग. *वि.* कच्चा.

**कच**—*पु.* [अनु] एक प्रकारचा आवाज; कचकच.

**कचक**—*स्त्री.* ठेंच; पायाखालीं तुडविलें गेल्यामुळें झालेली जखम.

**कचकच, किचकिच**-*स्त्री.* [अनु.] कचकच; बडबड; वटवट. **कच-कचाना**—*क्रि. अ.* १ दांत खाणें. २ बडबड करणें.

**कचकोल**—*स्त्री.* [फा.] फकिराचें भिक्षापात्र; नरोटी.

**कचदिला**—*वि.* [सं + फा.] कच्च्या दिलाचा; भित्रा.

**कचनार**—*पु.* एक लहानसें झाड. यास सुंदर पिवळीं फुलें येतात.

**कचपच**—*पु.* [अनु.] गर्दी; दाटी; खेंचाखेंच.

**कचपची**—*स्त्री.* १ कृत्तिका नक्षत्र. २ चमकदार टिकली.

**कचपेंदिया**—*वि.* १ कच्च्या बुडाचा २ अस्थिर विचाराचा.

**कचर-कचर**—*पु.* [अनु.] १ खातांना होणारा आवाज; कच-कच २ वटवट; बडबड.

**कचरकूट**—*पु.* १ बेदम मार; चोप. २ यथेच्छ जेवण; अिच्छाभोजन.

**कचरपचर**—*वि.* गिचमिड.

**कचरा**—*पु.* १ केर; कचरा. २ भरड ( अुडीद किंवा हरभऱ्याची). ३ समुद्रांतील शेवाळ. ४ कच्चें खरबूज. ५ काकडी.

**कचलोन**—*पु.* [ दे. ] काळें मीठ.

**कचलौंदा**—*पु.* [दे.] कणकीचा गोळा.

**कचलोहू**—*पु.* जखमेचा स्राव.

**कचहरी**—*स्त्री.* [ फा. ] १ कचेरी; कोर्ट. २ ऑफिस. ३ दरबार.

**कचाअी**—*स्त्री.* १ कच्चेपणा; अपरिपक्वता. २ अननुभव.

**कचाना**—*क्रि.* अ. कच खाणें; हिंमत खचणें; मागें हटणें.

**कचालू**—*पु.* [ दे. ] १ अुकडलेल्या बटाट्याचे तिखटमिठ लावलेले तुकडे. २ अेक प्रकारचा कंद. ३ कोशिंबीर; खमंग काकडी.

**कचीची**—*स्त्री.* [ दे. ] जबडा; दाढ. (मु.) **कचीची बँधना**—दांतखीळ बसणें.

**कचुल्ला**—*पु.* [ दे. ] प्याला.

**कचूमर**—*पु.* [ दे ] १ अेकाद्या पदार्थाचा ठेचा. (मु.) **कचूमर निकालना**—१ हाडें नरम करणे; मारणें. २ बिघडवणें.

**कचोना**—*क्रि. स.* टोंचणें; खुपसणें;

**कचोरी**—*स्त्री.* पाहा '**कचौडी**'

**कचौडी**—**री**—*स्त्री.* कचौरी; तिखटमिठाची पुरी ( अुडदाचें पीठ भरलेली पुरी ).

**कच्चा**—*वि.* १ कच्चा; हिरवा; अपरिपक्व. २ न शिजलेला. ३ कमजोर. ४ कमी ज्ञानाचा; अपुरा. ५ पक्क्या प्रमाणापेक्षां कमी. *पु.* १ खर्डा; मसुदा. २ जबडा. ३ आराखडा. (मु.) **कच्चा करना** – १ भिवविणें. २ लज्जित करणें. ३ खोटें ठरविणें. **कच्चा-चिट्ठा**—*पु.* १ साग्र वृत्तांत. २ रहस्य; गुपित. ३ बिंग. **कच्चा पडना**—चूक ठरणें; खोटें ठरणें. **कच्चा हाथ**—अननुभवी कार्यकर्ता. **कच्ची चीनी**—*स्त्री.* गुळी साखर; शुद्ध पांढरी न केलेली साखर. **कच्ची—पक्की बात** – खरें-खोटें; शिवीगाळ. **कच्ची रसोअी** – *स्त्री.* पाण्यांत शिजविलेलें अन्न—भात, भाकरी अि. ( दुधांत किंवा तुपांत न बनवलेलें ). **कच्चे पक्के दिन**—*पु.* चार किंवा पांच महिन्यांची गरोदरावस्था. **कच्चे-बच्चे**—[यौ] *पु.*—मुलें-बाळें.

**कच्चू**—*पु.* अळवाचा गड्डा.

**कच्छ**–*पु.* पाणथळ जमीन; मळीची (नदीकांठची) जमीन; दलदल. २ कासोटा, (धोतर किंवा लुगडें यांचा). ३ कासव.
**कच्छा**–*पु.* होड्यांचा ताफा.
**कच्छु**–*पु.* कांसव.
**कछनी**–*स्त्री.* १ ढोपरापर्यंत नेसलेलें धोतर. २ लहान धोतर; पंचा.
**कछान–ना**–*पु.* गुडघ्यापर्यंत धोतर नेसणें; ढोपरावर धोतर येअील असा मारलेला काचा.
**कछार**–*पु.* समुद्र किंवा नदीकांठची जमीन; कुरण.
**कछारना**–*क्रि. स.* धुणें; आपटणें.
**कछु,कछुक***–*वि.* थोडासा; कांहीं.
**कछुआ**–*पु.* कांसव.
**कछोटा -छौटा**–*पु.* १ कासोटा घालून लुगडें नेसण्याची पद्धति. २ कासोटा.
**कज**–*पु.* [फा.] १ वक्रता. २ दोष; अुणीव.
**कज**–*वि.* वांकडा; वक्र.
**कजरा***–*पु.* काजळ. *वि.* काळा.
**कजराअी**–*स्त्री.* काळेपणा.
**कजरी**–पाहा 'कजली'
**क़ज़लबाश**–*पु.* [तु.] सैनिक; योद्धा.
**कजलाना**–*क्रि. अ.* १ काळें पडणें; काळवंडणें. २ (निखारा) कोळपणें. *क्रि. स.* काजळ लावणें–घालणें.
**कजली**–*स्त्री.* १ श्रावणांतील सण. २ काजळी डोळ्यांची गाय. ३ श्रावणांतील अेक अुत्सव व त्यावेळीं गायिलें जाणारें गाणें. [तृतीया.
**कजली तीज**–*स्त्री.* भाद्रपद वद्य
**कजलौटा**–*पु.* काजळाची डबी.
**क़ज़ा**–*स्त्री.* [अ.] १ मृत्यु; मरण. २ दैव; भाग्य.
**क़ज़ाक़–ज़्ज़ाक़**–*पु.* [तु.] डाकू; लुटारू; दरवडेखोर.
**क़ज़ाक़ी**–*स्त्री.* [फा.] लूटमार; दरोडा. २ लुटारूपणा. ३ कपट; फसवेगिरी. *वि.* डाकूसारखा.
**कजावा**–*पु.* [फा.] अुंटाच्या पाठीवरील लाकडी सांगाडा. [झगडा.
**क़ज़िया**–*पु.* [अ.] भांडणाचा विषय;
**कटक**–*पु.* १ फौज. २ शिबिर. ३ कंकण. ४ चटअी.
**कटकअी–काअी**–*स्त्री.* सेना; सैन्य.
**कटकट**–*स्त्री.* [अनु.] १ दांत वाजण्याचा आवाज. २ भांडण; तंटा.
**कटकटाना**–*क्रि. अ.* [अनु.] दांतओठ खाणें. [हातचलाखी.
**कटखना**–*वि.* चावरा. *पु.* युक्ति,
**कटघरा**–*पु.* १ लाकडाचें मोठें जाळीदार घर. २ मोठा पिंजरा.
**कटजीरा**–*पु.* काळें जिरें.
**कटडा**–*पु.* म्हशीचें पारडूं; रेडूक.

**कटती**—स्त्री· १ विक्री. २ कपात. ३ धान्याची कापणी.

**कटना**—क्रि· अ· १ कापलें जाणें; चिरलें जाणें. २ पतन पावणें (युद्धांत) ३ संपणें (वेळ, मार्ग इ.). ४ शरमणें. ५ द्वेष करणें. ६ आसक्त होणें. ७ नष्ट होणें. ८ खोडलें जाणें. ९ भाग होणें. १० फायदा होणें.

**कटनी**—स्त्री· १ कापण्याचें हत्यार. २ कापण्याचें काम; कापणी.

**कटर**—पु· [अ.] बोटीप्रमाणें पाणी कापीत जाणारी अेक प्रकारची नाव.

**कटरा**—पु· लहान बाजार.

**कटवाँ**—वि· कापलेला; कापून बनविलेला.

**कटवाना**—क्रि· स· १ दुसऱ्याकडून कपविणें २ (तिकिट) काढणें; विकत घेणें.

**कटसरैया**—स्त्री· अडुळशासारखें अेक कांटेरी झुडूप. [झाड.

**कटहर-ल**—पु· १ फणस. २ फणसाचें

**कटहरा**—पु· कटडा.

**कटहा**—वि· चावरा; चावणारा.

**कटा***—पु· १ प्रहार; आघात. २ कापाकापी.

**कटाअी**- स्त्री· १ पिकाची कापणी. २ कापण्याचें काम. ३ कापण्याची मजुरी; कापणावळ.

**कटाअू-व**—पु· [सं·] १ काटछाट. छाटाछाट. २ वेलबुट्टी.

**कटाकट**—पु· [अनु.] १ कटकट असा आवाज. २ मारकाट; कापाकापी. **कटाकटी**—स्त्री. कापाकापी; मारकाट. [२ टोमणा.

**कटाक्ष**—पु· १ नेत्रकटाक्ष,

**कटान**—स्त्री· १ कापण्याचें काम किंवा पद्धति. २ कापणी.

**कटाना**—क्रि· स· कापण्याचें काम दुसऱ्याकडून करविणें.

**कटार** / **कटारी**—स्त्री· कटयार. [कापड.

**कटारिया**—पु· रेघारेघांचें रेशमी

**कटावदार**—वि· खोदकाम केलेलें.

**कटावन**—पु· १ कापणी. २ कात्रण.

**कटाह**—पु· मोठी कढअी.

**कटिया**—स्त्री· १ कापून बारीक केलेला चारा. २ फांसा; हूक.

**कटिया**—पु· पैलू पाडण्याचें काम करणारा.

**कटीला**—वि· १ तीक्ष्ण धारेचा. २ छाप पाडणारा. ३ तडफदार.

**कटीला**—वि· १ कांटेरी. २ टोंकदार; तीक्ष्ण; अणकुचीदार. [झाड.

**कटूमर**-स्त्री· जंगलांतील औदुंबराचें

**कटेली**–*स्त्री*. [दे.] बंगाल प्रांतांत होणारा विशेष प्रकारचा कापूस.

**कटेहर**–*पु.* [दे.] नांगराचा फाळ बसण्याचें लांकूड.

**कटोरदान**–*पु.* [सं. + फा.] अन्न ठेवण्याचें झांकण असलेलें पितळेचें भांडें; अन्नाचा डबा.

**कटोरा**–*पु.* वाडगा; **कटोरी**–*स्त्री.*. १ वाटी. २ तलवारीच्या मुठीचा गोल भाग. ३ स्तन झांकणारा चोळीचा भाग.

**कटौती**–*स्त्री.* कपात; धर्मादाय किंवा अितर बाबींसाठीं रकमेंत केलेली कपात किंवा कसर.

**कट्टर**–*वि.* १ चावरा. २ अंधविश्वासू. ३ हट्टी; दुराग्रही.

**कट्टा**–*वि.* धट्टाकट्टा; सदृढ. *पु.* जबडा.

**कट्ठा**–*पु.* १ पांच हात व चार अंगुळांचें जमीन मोजण्याचें माप. २ पांचशेरी माप.

**कठपुतली**—*स्त्री.* १ कळसूत्री लाकडांची बाहुली. २ हातांतील बाहुलें (व्यक्ति). [भांडें.

**कठडा**–*पु.* १ कठडा. २ लाकडाचें

**कठफोड़वा**–*पु.* सुतार पक्षी.

**कठबाप**–*पु.* सावत्र बाप.

**कठमलिया**–*पु.* १ वैष्णव. २ ढोंगी साधु; बुवा.

**कठमस्त**–*वि.* [सं. + फा.] १ आडदांड; धटिंग. २ व्यभिचारी.

**कठमस्ती**–*स्त्री.* आंडदाडपणा.

**कठला–ठुला**–*पु.* लहान मुलांच्या गळ्यांतील माळ.

**कठवता**–*पु.* पाहा '**कठौता**'

**कठाली**—*स्त्री.* मूस (सोनें वितळविण्याची) [२ कठोर.

**कठिन**–*वि.* १ कठिण, अवघड.

**कठिनाअी**–*स्त्री.* १ अडचण. २ असाध्यता; अशक्यता.

**कठिया**–*वि.* टणक टरफल असलेला (अुदा. कठिया बदाम). [होणें.

**कठियाना**–*क्रि. अ.* सुकून टणक

**कठुआना–वाना**–*क्रि. अ.* १ लाकडाप्रमाणें टणक होणें. २ थंडीनें कांकडणें; गारटणें।

**कठौता**–*पु.* लाकडाचें मोटें व रुंद भांडें; पडगा.

**कठौती**–*स्त्री.* लहान लाकडी भांडें.

**कडकडाता**–*वि.* १ कडकड आवाज करणारा. २ प्रचंड.

**कडकडाना**–*क्रि. अ.* [अनु.] कडकडणें. *क्रि. स.* कढविणें.

**कडकना**–*क्रि. अ.* [अनु.] १ कडाडणें; कडकडणें. २ दटावणें. ३ फाटणें.

**कडकनाल**–*स्त्री*· रुंद तोंडाची तोफ.

**कडखा**–*पु*· [ अनु. ] समरगीत; रणगीत. **कड़खैत**–*पु*· समरगीत गाणारा; भाट; चारण.

**कडबडा**–*वि*· कांहीं पाढरें व कांहीं काळे अशा केसांचा.

**कडबी-वी**–*स्त्री*· [ दे. ] कडबा.

**कडा**–*पु*· कडें. *वि*· १ कठिण; टणक. २ उग्र; कठोर; कडक. ३ धीराचा; सहनशील. ४ कर्कश. ५ कटु; न रुचणारा. ६ धष्टपुष्ट. ७ अवघड; दुष्कर. **कड़ाअी**–*स्त्री*· कठोरता; कडकपणा.

**कडाका**–*पु*· [ अनु. ] १ अेखादी वस्तु मोडल्याचा आवाज; कडकड असा आवाज. २ लंघन. **कड़ाकेका**–जोराचा; कडाक्याचा.

**कडाबीन**–*स्त्री*· [ तु. ] १ लहान बंदूक २ रुंद तोंडाची मोठी बंदूक.

**कडाहा**–*पु*· मोठी कढअी.

**कडाही**–*स्त्री*· लहान कढअी.

**कडी**–*स्त्री*· १ कडी; साखळीचा दुवा. २ कडवें.

**कडी**–*स्त्री*· लहान सुरअी.

**कडीदार**–*वि*· [ सं· + फा. ] कडी किंवा सांखळीचे दुवे असलेला.

**कडुआ**–*वि*· १ कडू. २ अप्रिय. ३ तापट; रागीट. (मु.) **कडुआ मुँह**–कटु व अप्रिय बोलणारें तोंड. **कडुअे कसैले दिन**–वाअीट दिवस; हीन स्थिति. **कडुआना**–*क्रि· अ*· १ कडू लागणें. २ चिडणें; रागावणें. ३ डोळे चुरचुरणें. **कडुआहट**–*स्त्री*· कडवटपणा.

**कढना**–*क्रि·अ*· १ निघणें; बाहेर येणें. २ अुगवणें. ३ मोठें होणें. ४ आटणें.

**कढलाना***–*क्रि· स*· खेंचणें; ओढणें; बाहेर काडणें.

**कढवाना, कढ़ाना**–*क्रि· स*· बाहेर काढविणें; ओढून काढविणें.

**कढाअी**–*स्त्री*· १ कढअी. २ कशीद्याचें काम व त्याची मजुरी.

**कढाव**–*पु*· वेलबुट्टीचें काम; कशीदा.

**कढी**–*स्त्री*· कढी. (मु )**बासी कढीमें अुबाल लाना**– शिळया कढीला अूत आणणें.

**कढ़ोरना***–*क्रि·स*· खेंचणें; ओढणें.

**कत***–*वि*· किती. *अ*· कां; कशासाठीं.

**क़त**–*पु*· [ अ. ] १ बोरूच्या लेखणीचें टोक कापणें (आडवें). २ लेखणीचें टोक. ३ कागदाची मोडणी.

**क़तअी**–*वि*· [अ.] पूर्णपणें; अगदीं; बिलकुल. *वि*· नक्की; अंतिम; शेवटचा.

**कतना**–*क्रि· अ*· कातलें जाणें.

**कतरन**–*स्त्री*· कपडे किंवा कागद

कातरल्यानंतर शिल्लक राहिलेले तुकडे; कतरण; कात्रण.

**कतरना**–*क्रि. स.* कातरणें.

**कतरनी**–*स्त्री.* कात्री.

**कतरब्योंत**–*स्त्री.* १ काटछाट. २ अुलथापालथ. ३ विवंचना. ४ युक्ति; उपाय. [२ तुकडे ताकडे.

**कतरा**–*पु.* १ कात्रण

**क़तरा**–*पु.* [ अ. ] बिंदु; थेंब.

**कतराअी**–*स्त्री.* १ कातरण्याचें काम. २ कातरण्याची मजुरी.

**कतराना**–*स्त्री.* एखाद्या व्यक्तीला चुकवून हळूच एका बाजूनें सटकणें. *क्रि. स.* कतरविणें; कापविणें.

**क़तल**–*त्ल*–*पु.* [ अ. ] कत्तल; वध.

**क़तलाम**–*पु.* सरसहा कत्तल; संहार.

**क़तलबाज़**–*पु.* [ *अ.* + फा. ] कत्तल करणारा. [ वडी.

**कतली**–*स्त्री.* [ फा. ] मिठाअीची

**कतवाना**–*क्रि.स.* कांतविणें( सूत ).

**कतवार**–*पु.* केरकचरा.

**कतवारखाना**–अुकिरडा; केरकचरा टाकण्याची जागा. [ ठिकाणीं.

**कतहुँ**–*हूँ**–*अ.* कोठेंहि; कोणत्याहि

**क़ता** *स्त्री.* [ अ. ] १ आकार २ तऱ्हा; पद्धत. ३ कपडे कापण्याची पद्धति ( फॅशन ).

**कताअी**–*स्त्री.* १ कातण्याचें काम. २ कातण्याची मजुरी.

**कतान**–*पु.* [फा.] १ अेक प्रकारचें रेशमी कापड. २ अळशीचें झाड. ३ अेक प्रकारची मलमल.ही चांदण्यांत विरते अशी कल्पना आहे.

**कताना**–*क्रि. स.* कातवून घेणें.

**कतार**–*स्त्री.* [ *अ.* ] १ पंक्ति; रांग; ओळ. २ समूह; झुंड.

**कतारा**–*पु.* तांबड्या रंगाचा मोठा अूंस. **कतारी**–*स्त्री.* [२ अगणित.

**कति***–*वि.* १ किती; कित्येक. २ कोण.

**कतिक***–*वि.* १ कित्येक; किती. २ थोडा. ३ अनेक; पुष्कळ

**कतिपय**–*वि.* १ कितीतरी; अनेक. २ कांहीं; थोडें.

**क़तील**–*वि.* [ अ. ] ज्याची कत्तल करण्यांत आली आहे असा; निहत.

**कतेक***–*वि.* १ कित्येक. २ थोडा. ३ अनेक; पुष्कळ. [ त्याची मजुरी.

**कतौनी**–*स्त्री.* कातण्याचें काम किंवा

**कत्ता**–*पु.* कोयता. **कत्ती**–*स्त्री.* १ चाकू; सुरी. २ कट्यार.

**कत्थक**–*पु.*गाणें,नाचणें ा.अ.चा धंदा करणारी अेक जात.

**कत्थअी**–*वि.* खैरी रंगाचा.

**कत्था**–*पु.* १ खैराचें झाड. २ कात.

**क़त्ल**–*पु.* [ अ ] कत्तल; हत्या; वध.

**कथंचित्**–*क्रि. वि.* कदाचित्.

**कथक्कड**–*पु.* गोष्टी सांगणारा; कथक.

**कथना***–*क्रि. स.* १ सांगणें; कथन करणें. २ निंदा करणें.

**कथनी**–*स्त्री.* १ कथन; गोष्ट. १ बडबड. कहाणी.

**कथरी**–*स्त्री.* गोधडी; कंथा.

**कथानक**–*पु.* १ कथा; गोष्ट. २ लघुकथा;

**कथावस्तु**–*स्त्री.* कथानक; प्लॉट; विषय.

**कथोपकथन**–*पु.* १ संभाषण; संवाद. २ वादविवाद.

**क़द**–*पु.* [अ.] अुंची; बांधा.

**क़द–आवर**–*वि.* [अ + फा] अुंचा–पुरा; धिप्पाड.

**कद**–*स्त्री.* [अ.] १ आग्रह; हट्ट. २ द्वेष; शत्रुता. ३ परिश्रम. **कदी**–*वि.* हट्टी; दुराग्रही.

**कदम**–*पु* कदंब वृक्ष.

**क़दम**–*पु.* [अ.] १ कदम; पाअूल. २ घोड्याच्या चालीचा अेक प्रकार. (मु.) **क़दम अुठाना–बढाना**– १ जोरात चालणें. २ अुन्नाते करणें. **क़दम चूमना**–अत्यादर व्यक्त करणे. **क़दम–बोसी** *स्त्री.* १ पादचुंबन. २ वरिष्ठांची सेवा करणें.

**क़दर**–*स्त्री.* [अ.] १ मान; प्रतिष्ठा. २ किंमत; मूल्य. (यौ.) **अिस क़दर**–१ अितका. २ असा.

**क़दरदान**–*वि.* [अ. + फा.] गुणग्राही. **क़दरदानी**–*स्त्री.* गुणग्राहकता.

**कदराअी**–*स्त्री.* भीरुता; भ्याडपणा.

**कदराना**–*क्रि. अ.* १ भिणें. २ माघार घेणें; कच्च खाणें.

**क़द्रे**–*वि.* [अ.] किंचित्; थोडासा.

**कदर्य**–*वि.* कंजूष; चिक्कू.

**कदाच***–*क्रि. वि.* १ कदाचित्; २ काचित्.

**क़दामत**–*स्त्री.* [अ.] प्राचीनत्व. **क़दामत पसंद**–*वि.* पुराणमतवादी; सनातनी.

**क़दावर**–*वि.* पाहा ‘ **क़द्-आवर** ’

**क़दीम–मी**–*वि.* [अ.] जुना; प्राचीन.

**क़दूरत**–*स्त्री.* [अ.] १ घाण; गलिच्छता. २ वैमनस्य.

**कदे***–*क्रि. वि.* केव्हांहि.

**कद्दू**–*पु.* [फा.] दुध्या भोपळा.

**कद्दूकश**–*पु.* १ किसणी. २ अेक मिठाअी.

**कधी***–*क्रि. वि.* केव्हांहि; कोणत्याहि वेळेस.

**कनअुड, कनौडा**–*वि.* १ काणा. २ अपंग. ३ तिरस्कृत. पु. कृतज्ञ; अुपकृत.

**कनकना**–*वि.* [अनु.]–ठिसूळ.

**कनकना**–*वि.* १ चुणचुण लागणारा. २ चिडका.

**कनकनाना**–*क्रि. अ.* [अनु.] चुणचुणणें; खवखवणें.

**कनकनाना**–*क्रि. अ.* १ सावध होणें. २ पुलकित होणें.

**कनकी**–*स्त्री.* तांदुळाची कणी.

**कनकूत**–पु· शेतांतील पिकाचा अंदाज. [ बावडी.
**कनकौवा**–पु· पतंग (कागदी);
**कनखजूरा**–पु· गोम.
**कनखियाना**–*क्रि· स·* १ चोरून पाहणें; तिरप्या नजरेनें पाहणें; २ डोळ्यांनीं खूण करणें. **कनखी**–*स्त्री·* १ नेत्रसंकेत. २ चोरटी नजर; दृष्टि.(मु.) **कनखी मारना**–डोळा मारणें; नेत्रसंकेत करणें.
**कनखोदनी**–*स्त्री·* कानकोरणें.
**कनगुरिया**–*स्त्री·* करंगळी. [संस्कार.
**कनछेदन**–पु· कान टोंचण्याचा
**कनटोप**–पु· कानटोपी.
**कनधार-हार***–पु· १ कर्णधार; सुकाणूवाला. २ नावाडी.
**कनपटी**–*स्त्री·* कानशील. [ गांठ.
**कनपेडा**–पु· कानाच्या मागें येणारी
**कनफटा**–पु· [दे.] गोरखपंथी साधु.
**कनफुँकवा-फुँका**–*वि·* १ कान फुंकणारा; चिथावणारा. २ कानमंत्र देणारा (गुरु). ३ कानमंत्र दिलेला.
**कनफुसका**–पु· १ कानगोष्टी करणारा. २ चुगली, चहाडी करणारा.
**कनफुसकी**–*स्त्री·* कानमंत्र.
**कनबतियाँ**–*स्त्री·* कानगोष्टी.
**कनबिधा**–पु· १ कान टोंचणारा. २ टोंचलेल्या कानाचा.
**कनमनाना**–*क्रि· अ·* १ चाहूल लागून जागें होणें. २ विरुद्ध बोलणें.
**कनमैलिया**–पु· कानांतील मळ काढणारा.
**कनरसिया**–पु· गाण्याचा शौकी.
**कनवाँसा**–पु· पणतु (मुलीच्या मुलाचा मुलगा). **कनवाँसी**–*स्त्री·*
**कनसार**–पु· ताम्रपटावर लेख कोरणारा.
**कनसाल**–पु· बाजेच्या खुरांचीं भोकें.
**कनसुई**–*स्त्री·* कानोसा.
**कनस्तर**–पु· [अं.] टिनचा डबा.
**क़नाअत**–*स्त्री·* [अ.] संतोष; समाधान; अल्पसंतोषीपणा.
**कनागत**–*स्त्री·* १ श्राद्ध. २ पितृपक्ष.
**कनात**–*स्त्री·* [अ.] कनात; तंबू किंवा डेरा यांची कापडी भिंत.
**कनार**–पु· घोड्याला होणारें पडसें.
**कनिआरी**–*स्त्री·* कण्हेर; सोनचांफा.
**कनिका***–पु· अतिसूक्ष्म भाग; कण.
**कनियाँ**–*स्त्री·* मांडी; ओटी.
**कनियार**–पु· कण्हेर; सोनचांफा.
**कनी**–*स्त्री·* १ बारीक तुकडा; कणी. २ हिरकणी. ३ तांदुळाची कणी.
**कनीज़**–*स्त्री·* [फा.] दासी; सेविका.
**कनीनिका**–*स्त्री·* १ डोळ्यांतील बाहुली. २ कन्या.
**क़नूती**–*वि·* [अ.] निराशावादी.

**कनेठी**-*स्त्री*· कानपिचकी; कान पिळणें. [ टवकारणें.

**कनौती**-*स्त्री*· घोड्याचें कान

**कन्ना**-*पु*· १ पतंगाची कन्नी. २ किनारा; टोंक. (मु.) **कन्नेसे काटना** — मुळांतून कापून काढणें.

**कन्ना**-*पु*· तांदुळाची सड.

**कन्नी**-*स्त्री* पतंग नीट अुडावा म्हणून त्याला बांधावयाची चिंधी.

**कन्हाअी-न्हैया**-*पु*· श्रीकृष्ण.

**कपडछन-छान**-*पु*· बारीक कुटलेली वस्तु वस्त्रगाळ करण्याचें काम.

**कपड़ा**-*पु*· कापड; कपडा; पोषाख.

**कपाट**-*पु*· दार; किवाड.

**कपार**-*पु*· डोकें; कपाळ.

**कपालक्रिया**-*स्त्री*· सरणावर जळत असलेल्या प्रेताच्चें बांबूनें किंवा लाकडानें डोकें फोडण्याची क्रिया.

**कपास**-*स्त्री*· कपाशी; कापूस. **कपासी**-*वि*· फिकट पिवळ्या रंगाचा. *पु*· पिवळा रंग. [ फळ.

**कपित्थ**-*पु*· कवठाचें झाड किंवा

**कपिल**-*वि*· १ भुरकट. २ पांढरा. *पु*· अग्नि

**कपिला**-*वि*· *स्त्री*· १ साधी भोळी. २ पांढऱ्या रंगाची. ३ भुरकट रंगाची. ४ पांढऱ्या ठिपक्याची. *स्त्री* १ पांढऱ्या रंगाची गाय. २ गरीब गाय.

**कपूत**-*पु*· कुपुत्र; कुलांगार.

**कपूर**-*पु*· कापूर. **कपूरी**-*वि*· १ कापरापासून तयार केलेला. २ फिकट पिवळया रंगाचा.

**कपूरा**-*पु*· बकऱ्याचा अंडकोश.

**कपोत**-*पु*· कबुतर; पारवा.

**कप्पर***-*पु*· कपडा; वस्त्र.

**कफ**-*पु*· कफ रोग.

**कफ़**-*पु*· [ फा. ] १ फेस. २ कफ; श्लेष्मा. ३ हाताचा अथवा पायाचा तळवा. ४ शर्टचा कफ.

**कफ़गीर**-*पु*· [ फा. ] लांब पळी.

**कफ़न**-*पु*· [अ.] प्रेतावर घालण्याचें वस्त्र. (मु.) **कफ़नको कौड़ी न होना**-अत्यंत दारिद्र्य असणें. **कफ़न फाडकर बोलना**-फार मोठ्यानें ओरडणें. **कफ़न सरसे बाँधना**-जिवावर अुदार होणें; तळहातावर शिर घेणें.

**कफ़नखसोट**-*वि*· [ अ. + सं. ] कवडीचुंबक; कंजूष.

**कफ़नखसोटी**-*स्त्री*· [ अ. + सं. ] प्रेतावरील वस्त्राच्या रूपानें घेतला जाणारा स्मशानांतील कर. २ भल्या-बुऱ्या मार्गानें पैसे मिळविण्याची

वृत्ति. चिक्कूपणा; कंजुषी.

**कफ़नचोर**–पु. [ फा. सं. ] अट्टलचोर.

**कफ़नाना**–*क्रि.* स. [ अ + सं. ] प्रेतावर अंत्यवस्त्र घालणें.

**कफ़नी**–*स्त्री.* [ फा. ] १ साधूची कफनी. २ प्रेताच्या गळयांत घालावयाचें कापड.

**क़फ़स**–पु. [अ ] १ पिंजरा; सांपळा. २ तुरुंग. [ प्रायश्चित्त.

**कफ़ारा–क्फ़ारा**–पु. [अ.] पापांचें

**कफ़ालत**-*स्त्री.* [ अ. ] जामीन; जामीनकी. [ जामीन.

**कफ़ील**-पु. [अ.] जामीन राहाणारा;

**कब**-*क्रि. वि.* केव्हां. **कब का के-से**–केव्हांचा; किती वेळापासून.

**कबड्डी**–*स्त्री.* [ अनु. ] हुतुतूचा खेळ.

**कबरा**–*वि.* रंगीबेरंगी; चित्रविचित्र.

**क़बल**–*वि.* [ अ. ] पहिला; पूर्वीचा.

**क़बा**–*स्त्री.* [ अ. ] अेक प्रकारचा सैल अगरखा.

**कबाड़**–पु. १ अडगळ; निरुपयोगी वस्तु. २ अव्यापारेषु व्यापार; लुडबुड.

**कबाड़ा**–पु. १ अव्यापारेषु व्यापार; लुडबुड. २ तंटा.

**कबाड़िया** } पु. जुन्या वस्तू विक-
**कबाडी** } णारा.

**कबाब**–पु. [ फा. ] विस्तवांत भाजलेलें मांस. **कबाबी**–*वि.* १ मांस विकणारा. २ मांसाहारी. **कबाब चिनी**–कंकोळ.

**कबार**–पु. १ व्यापार. २ धंदा; व्यवसाय. ३ निरुपयोगी वस्तू. ४ लुडबुड; अव्यापारेषु व्यापार.

**क़बाला**–पु. [ अ. ] विक्रीखत.

**क़बाहत**–*स्त्री.* [ अ. ] १ खराबी; वाअीटपणा. २ अडचण; लचांड; भानगड.

**कबीर**- *वि.* [ अ.] श्रेष्ठ; मोटा.

**कबीरवड**–पु. कबीरवड; नर्मदा नदीच्या काठीं भडोच शहराजवळील प्रचंड वटवृक्ष. याचा परीघ चौदा हजार हात असून त्याच्या छायेंत सुमारें सात हजार लोक बसूं शकतात असें म्हणतात.

**कबीला**–*स्त्री.* [अ.] १ पत्नी; बायको. २ परिवार. पु. १ टोळी; झुंड. २ जात.

**कबुलवाना, कबुलाना**–*क्रि.* स. [ अ. ] कबूल करावयास लावणें.

**कबूतर**–पु. [ फा. ] कबुतर; कपोत.

**कबूतरख़ाना**–पु. [फा.] कबुतरांचें खुराडें.

**कबूतरबाज़**- *वि.* [फा.] कबुतरें पाळणारा षोकीन माणूस.

**कबूतरी**–*स्त्री.* १ कबूतराची मादी. २ नाचणारी बाअी.

**कबूद**–पु· वंशलोचन.
**कबूद**–वि· निळा; अस्मानी रंगाचा.
**कबूल**–पु· [ अ ] मंजूरी; स्वीकृति. **क़बूलना**–क्रि· स· कबूल करणें. **क़बूलियत**–स्त्री· कबुलायत; दस्तऐवज. **क़बूली**–स्त्री· १ स्वीकृति. २ हरमऱ्याची डाळ घालून केलेली खिचडी.
**कबे**–अव्य. काय रे; अे.
**क़ब्ज़**–पु· [ अ· ] १ पकड. २ मलावरोध. **कब्ज़ियत** – स्त्री· मलावरोध.
**क़ब्ज़ा**–स्त्री· [अ·]१ मूठ (हत्यार). २ बिजागरी; सांधेपट्टी. ३ ताबा; अधिकार; कब्जा.
**क़ब्र**-स्त्री· [ अ· ] कबर; थडगें.
**क़ब्रिस्तान** पु· [ फा. ] प्रेत पुरण्याची जागा. [·२ केव्हांच.
**कभी**–क्रि· वि· १ केव्हांहि; कधींहि.
**कमंगर**–पु· [ फा. ] १ धनुष्य. बनविणारा. २ हाडें बसविणारा. ३ चित्रकार. वि· निपुण; दक्ष.
**कमंद** पु·[फा.]दोराचा फांस;जाळें.
**कमंद-ध***–पु· कबंध; शिरावेगळें धड.
**कम**–वि· [ फा. ] अल्प; थोडा; कमी. (मु.) **कम से कम**–कमींत कमी.
**कमअसल**–वि· [ फा. + अ. ] संकरज; अनौरस; अकुलीन.
**कमखर्च**—वि· [ फा. ] काटकसरी; मितव्ययी. [ मितव्यय.
**कमख़र्ची**—स्त्री· [फा.] काटकसर,
**कमख़ाब**–स्त्री· [फा.] किनखाबाचें कापड. [ २ डहाळी.
**क़मची**–स्त्री· [ तु ] १ कामटी.
**कमच्छा**–स्त्री· कामाक्षी देवी.
**कमज़ात**— वि· [ फा. ] नीच; हलक्या जातीचा.
**कमज़ोर**—वि· [ फा. ] अशक्त; दुर्बळ; दुबळा. [ दुर्बलता.
**कमज़ोरी**-स्त्री· [ फा. ] अशक्तपणा;
**कमठी**–स्त्री· कामटी (बांबूची).
**कमतरीन** –पु· [फा] अत्यंत तुच्छ सेवक; विनीत.
**कमती**–स्त्री· [ फा. ] कमतरता; न्यूनता; उणीव. वि· कमी; थोडा.
**कमनसीब**–वि· [ फा. ] दुर्दैवी; अभागी. **कमनसीबी**–स्त्री· दुर्दैव.
**कमना***–क्रि· अ· [ फा. ] कमी होणें. [ मनोहर. २ लोभनीय.
**कमनीय**–वि· १ सुंदर;
**कमनैत**–पु· [ फा. ] धनुर्विद्येंत तरबेज; तिरंदाज. **कमनैती**–स्त्री· धनुर्विद्या; अस्त्रविद्या.
**कमन्द**—स्त्री· [फा.] जंगली पशु

पकडण्याची सरकफांसाची दोरी.
**कमबख्त**–*वि.* [ फा. ] कमनशिबी; अभागी; दुर्दैवी. **कमबख्ती**–*स्त्री.* दुर्दैव; दुर्भाग्य. [ दुर्भिळ.
**कमयाब**—*वि.* [ फा. ] दुष्प्राप्य;
**क़मर**–*पु.* [ फा. ] चंद्र; चंद्रमा.
**कमर**–*स्त्री.* [ फा. ] कंबर. ( मु. ) **कमर टूटना**–हताश होणें; कंबर खचणें.
**कमरकस**—*पु.* पळसाचा डिंक.
**कमरख**–*स्त्री.* अेक प्रकारचें आंवट फळ.
**कमरबंद**–*पु.* [ फा. ] १ कंबरपट्टा. २ नाडा. *वि.* कंबर कसून तयार.
**कमरबस्ता**—*वि.* [फा.] कटिबद्ध; तयार. [ २ फोटोचा कॅमेरा.
**कमरा**–*पु.* [ लॅ. ] १ खोली.
**कमरा**–*पु.*कांबळें. [ कांबळें;घोंगडी.
**कमरिया**—*स्त्री.* १ कंबर २
**कमलगट्टा**—*पु.* पद्मबीज; कमळाचें बीं ज्यांत असतें तो गाभा.
**कमलवाओ**–*स्त्री.* कावीळ.
**कमली**–*स्त्री.* लहान कांबळें.
**कमवकास्त**–*वि.* [फा.] कमीजास्त.
**कमसिन**-*वि.* [ फा. ] अल्पवयी. **कमसिनी**–*स्त्री.* १बालपण; बाल्यावस्था. [ धनार्जन. २ व्यवसाय.
**कमाअी**–*स्त्री.* १ मिळकत;
**कमाअू**–*वि.*मिळविता;कमाविणारा.
**कमाच**–*पु.* [ तु. ] रेशमी कापड.
**कमान**–*स्त्री.* [ अिं. ] १ आज्ञा; हुकूम. २ सैन्यांतील नोकरी. ३ सैन्यांतील हुकूम. (मु.) **कमान बोलना**–लढाअीवर जाण्याची आज्ञा देणें.
**कमान**–*स्त्री.* [ फा. ] १ धनुष्य. २ अिंद्रधनुष्य. ३ कमान;महिराप. **कमानचा**–*पु.* लहान महिराप.
**कमाना**–*क्रि. स.* १ मिळविणें; कमाविणें. २ अुपयोगी बनविणें ( वस्तु ); सुधारणें. ३ अल्पस्वल्प सेवा करणें.
**कमानिया**– *पु.* [ फा. ] तिरंदाज; धनुर्धारी. *वि.* महिरापदार.
**कमानी**– *स्त्री.* [ फा. ] १ स्प्रिंग. २ अंतर्गळाच्या आजारांत कमरेला बांधावयाचा पट्टा.
**कमाल**— *पु.* [ अ. ] १ पूर्णता. २ नैपुण्य; कौशल्य. ३ अद्भुत काम. ४ कारागिरी. ५ कबीराचा मुलगा. *वि.* १ परिपूर्ण. २ अत्युत्तम. ३ पुष्कळ. ४ अत्यंत.
**कमासुत**–*वि.* १ कमाविणारा; मिळविणारा. २ अुद्योगी.
**कमिश्नरी**– *स्त्री.* [ अिं. ] विभाग; डिव्हिजन.

**कमी**—स्त्री· [फा.] १ न्यूनता; अुणीव; कमतरता. २ हानि; तोटा.
**क़मीज़**-स्त्री· [अ.] सदरा; शर्ट; खमीस. [क्षुद्रता.
**कमीनगी**-स्त्री· [फा.] नीचता;
**कमी-वेशी**- स्त्री· [फा.] अधिक अुणें; कमी-जास्त.
**कमीना**—वि· [फा.] नीच; क्षुद्र. **कमीनापन**-पु· नीचपणा; कमीपणा; क्षुद्रता.
**कमेरा**-पु· मजूर; नोकर.
**कमेला**-पु· कत्तलखाना.
**कमोदन-दिन** * — स्त्री· चंद्रविकासी कमळ; कुमुद.
**कमोरा**—पु· रुंद तोंडाचें मडकें (दूध, दही, पाणी अि. ठेवण्याकरितां).
**कम्मल**-पु· घोंगडी; कांबळें.
**क़याम**—पु·[अ.] १ स्थैर्य; टिकाव. २ मुक्कामाची किंवा अुतरण्याची जागा. ३ मुक्काम.
**क़यामत**— स्त्री· [अ.] अीश्वरी निर्णयाचा दिवस (मुसलमानी, खिस्ती अि.धर्मांप्रमाणें). २प्रलय. ३ भयंकर खळबळ; दंगल.
**क़यास** — पु· [अ.] १ कयास; अनुमान; अंदाज. २ विचार.
**करंक**— पु· १ मस्तक; डोकें. २ कमंडलू. ३ हाडांचा सांपळा.
**करंड**—पु· धारेचा दगड.
**करंड**—पु· १ करंडी; टोपली २ मधमाश्यांचें पोळें.
**करंतीना**-पु· [अि.] क्वारंटाअिन.
**करंबित**— वि· १ मिसळलेला; अेकत्र आलेला; दाट. २ बसविलेला; गुंतविलेला. ३ कूजित; गुंजित.
**करक**—पु· १ कमंडलू. २ डाळिंब. ३ बकुळी. ४ पळस.
**करक**—स्त्री· १ ठणका; तिडीक. २ अुन्हाळी. [तयार केलेलें मीठ.
**करकच**—पु· [दे.] समुद्रापासून
**करकट**—पु· केरकचरा.
**करकना**— क्रि· अ· [अनु.] कडाडणें; फुटणें. **करकराहट**-स्त्री· कडाडण्याचा किंवा मोडण्याचा आवाज. [२ तीव्र.
**करकस***-वि· १ कर्कश; कठोर.
**करखा**—पु· [अनु.] समरगीत.
**करखा** — पु· अुत्तेजन; प्रोत्साहन.
**करखत** · वि· [फा.] कडक; कठोर.
**करगह, करघा**-पु· [फा.] १ माग. २ मागाच्या खालची पाय ठेवण्याची जागा. [वाद्य).
**करचंग**-पु· डफ (ताल धरण्याचें
**करछा**—पु· मोठी पळी; पळा.
**करछी**-स्त्री· पळी.

**करछाल**—*स्त्री.* अुडी; फलांग.
**करछुला**—*पु.* मोठा झारा.
**करडना**—*क्रि. अ.* [ ? ], अधिक होणें; वृद्धिंगत होणें.
**करतब**—*पु.* १ काम; कार्य. २ कराभत;, कौशल्य. ३ कर्तृत्व; कर्तबगारी. **करतबी**—*वि.* १ कर्तबगार. २ निपुण.
**करतरी***—*स्त्री.* कात्री; सुरी.
**करतल-ताल**—*पु.* १ तळहात. २ टाळी. **करतली**—*स्त्री.*
**करतार**—*पु.* अीश्वर.
**करताल**—*पु.* १ टाळी. २ झाज. ३ चिपळी. **करताली**—*स्त्री.*
**करतूत**—*स्त्री.* १ काम; करणी; कर्तृत्व. २ कला; गुण.
**करदा**—*वि.* [ फा. ] केलेला; कृत.
**करधनी**—*स्त्री.* करगोटा. [धरणारा.
**करनधार*** *पु.* कर्णधार; सुकाणू
**करनफूल**—*पु.* कानांतील अेक दागिना; कर्णफूल. [संस्कार.
**करनबेध**—*पु.* कान टोंचण्याचा
**करना**—*क्रि. स.* १ करणें; संपविणें; तडीस नेणें. २ तयार करणें. ३ पोहोंचविणें. ४ भाडें देअून ठरविणें.
**करनी**—*स्त्री.* १ कार्य; करणी. २ अंत्यकर्म. ३ करणी (गवंड्याचें अुपकरण).
**करनाअी**—*स्त्री.* [ *अ.* ] शिंग; तुतारी.
**करनाटकी**—*पु.* १ जादुगार. २ डोंबारी. [रोप.
**करपा**—*पु.* लोंबी आलले धान्याचें
**करपाल**—*पु.* कृपाण; खड्ग; तलवार. [कुरणें; पुटपुटणें.
**करबराना**—*क्रि. अ.* [अनु.] कुर-
**करबच**—*पु.* बैलाच्या किंवा घोड्याच्या पाठीवर लादण्याची गोण.
**करबला**—*पु.* [अ.] अरबस्थानांतील अेक ठिकाण जेथें हजरत अलीचे कनिष्ठ पुत्र हुसैन मारले गेले होते. २ मोहरममध्यें मुसलमान आपले ताबूत जेथें गाडतात ती जागा. ३ जेथें पाणी मिळत नाहीं अशी जागा.
**करबस**—*पु.* घोड्याच्या कातडीपासून तयार केलेला हंटर.
**करबूस**—*पु.* घोड्याच्या जिनांत हत्यार खोंचून ठेवण्याची जागा.
**करभ**—*पु.* हत्ती किंवा सिंहाचा छावा.
**करभीर**—*पु.* सिंह.
**करम**—*पु.* [अ.] १ कृपा. २ औदार्य.
**करम**—*पु.* १ काम. २ कर्म; दैव. ( यौ. ) **करमभोग**—कर्मभोग. **करमरेख**—*स्त्री.* १ कपाळावरची रेघा. २ नशीबांत असलेली गोष्ट (मु.) **करम फूट जाना**—नशीब फुटणें;

दुर्दैव ओढवणें.

**करमकल्ला**–पु. [ फा. + सं. ] कोबीचा कांदा; गड्डा.

**करमचंद***–पु. कर्म.

**करमठ, करमी***–वि. कर्मठ.

**करमात***–पु. भाग्य; दैव.

**कर मिट**–करा किंवा मरा (डू और डाय ). [ २ पापी; कलंकित.

**करमुँहा**–वि. १ काळतोंड्या;

**कररना-राना**–वि. अ. [ अनु. ] १ कर्कश आवाज काढणें. २ कडाडून पडणें.

**करारी**–पु. रानतुळस.

**करवा**–पु. तोटी असलेला तांब्या.

**करवाना**-क्रि. स. करविणें.

**करवार**–स्त्री. तलवार.

**करवाल**–पु. १ नख. २ तलवार.

**करवाली**-स्त्री. लहान तलवार.

**करवीर**–पु. १ कण्हेरीचें झाड. २ खड्ग; तलवार.

**करवैया***–वि. कर्ता; करणारा.

**करश्मा**–पु. [फा.] १ चमत्कार; करामत. [ वैर. ३ आवेश; त्वेष.

**करष**–पु.१ ओढ; ताण. २ आकस;

**करषक-र्षक***–पु. कृषक; शेतकरी.

**करषना-सना***–क्रि.स. १ ओढणें; ताणणें; आकर्षणें २ शोषून घेणें. ३ बोलावणें; निमंत्रण देणें.

**करसाअिल-यर-यल**–पु.काळवीट.

**करसी**–स्त्री. गोवरी.

**करह***–पु. फुलाची कळी.

**करह***–पु. अुंट.

**करँकुल**–पु. करकोचा.

**कराअित, करैत**–पु. काळा विषारी साप; कृष्णसर्प. [ टरफल.

**कराअी**–स्त्री. डाळीचें फोलकट;

**करात**–पु. [अ.] अेक वजन (साधारण अर्धा माशाअेवढें).

**कराना**–क्रि. स. करविणें.

**क़रावत**–स्त्री. [अ.] १ सामीप्य; सान्निध्य. २ नातें; संबंध.

**क़रावतदार**–पु. [अ.+फा.] संबंधी; नातेवाअीक.

**क़राबा**–पु. [अ.] वनस्पतीचे अर्क वगैरे सांठवून ठेवण्याचें कांचेचें मोठें भांडें.

**करावीन**–स्त्री. [तु.] पाहा ‘ कडाबीन ’. [ ( ‘ करामत ’चें बहु. ).

**क़रामात**–स्त्री. [अ.] चमत्कार;

**करामाती**–वि. चमत्कार करणारा; सिद्ध पुरुष.

**करार**–पु. [अ.] १ स्थैर्य. २ वायदा; करार. ३ आराम; चैन. ४ संतोष; समाधान.

**करारना**–क्रि. अ. [अनु.] कर्कश आवाज काढणें; काव काव करणें.

**करारा**–पु· दरड. *वि·* १ खडबडीत. २ दृढचित्त. ३ कुरकुरीत. ४कडक. ५खोल. ६बलवान्. ७खरा; चोख. **करारापन**–पु· १ खडबडीतपणा. २ कडकपणा.

**कराल**-*वि·* १ भयानक; भयंकर. २ मोठ्या दांतांचा.

**कराह**–पु· कण्हण्याचा आवाज. **कराहना**–*क्रि· अ·* कण्हणें.

**कराहा***– पु· मोठी कढअी. **कराही**–*स्त्री·* लहान कढअी.

**करिंद***–पु· १ अैरावत. २ अुत्तम किंवा मोठा हत्ती.

**करिखा**–पु· काजळ.

**करि-री***–पु·हत्ती. **करिणी-नी**–*स्त्री·* हत्तीण.

**करिया***–१सुकाणूं. २नावाडी. *वि·* काळा.**करियाअी**–*स्त्री·* काळेपणा.

**करिश्मा**–पु·[फा.]पाहा ‘करश्मा’

**करीना***–पु· किराणा माल.

**क़रीना**–पु· [अ.] १ तऱ्हा; पद्धति. २ क्रम. ३•कामाची योग्यता; अक्कल; बुद्धि.

**क़रीब**-*क्रि· वि·* [अ.] १ जवळ-जवळ; सुमारें. २ समीप; जवळ.

**करीम** *वि·* [अ.] कृपाळू; दयाळू. पु· अीश्वर.

**करीर**–पु· १ बांबू. २ घागर.

**करील**–पु· अेक कांटेदार झुडूप.

**करुआ**–*वि·* कडू ; कटु.

**करुआअी***–*स्त्री·* कडूपणा.

**करुना***–*स्त्री·* करुणा; दया.

**करेब**–*स्त्री·* बारीक रेशमी कापड.

**करेमू**–पु· अेक पालेभाजी.

**करेर***–*वि·* कठोर.

**करेल-करेला**–पु·व्यायाम करण्याची लहान लाकडी जोडी.

**करेला-रैला**–पु· कारलें; किरोर.

**करैत**–पु· काळा नाग.

**करैल–करैली मिट्टी**· *स्त्री·* काळी चिकण माती. [ कोंवळा कोंब.

**करैल**–पु·१ डोम-कावळा.२ बांबूचा

**करोट-करोटी**–पु· *स्त्री·* कवटी.

**करोटन** पु· [अिं.] क्रोटन; रंगी-बेरंगी आणि आकर्षक पानांची विलायती झाडें.

**करोड़-र**–*वि·* कोटि ( संख्या ).

**करोड़पती**– *वि·* क्रोडोपति; कोट्याधीश.

**करौंजी**–*स्त्री·* पाहा ‘कलौंजी’.

**करौंट***-*स्त्री·* करवट; कुशी.

**करौंदा**–पु· करवंद. **करौंदिया**–*वि·* करवंदाच्या रंगाचा.

**करौत–ता**— पु· करवत. **करौती** –*स्त्री·* करवत.

**करौता**–पु· कांचेचा परळ. **करौती**-

स्त्री. १ कांचेचें लहान भांडें. २ कांचेची भट्टी.

**करौली**—स्त्री. सरळ व लांब सुरी.

**कर्कश**—वि. १ कर्कश; कठोर. २ कांटेदार.

**कर्कश**—पु. १ तलवार. २ ऊंस.

**क़र्ज़—ज़ा**—पु. [अ.] अृण; कर्ज. (मु.) **क़र्ज़ अुतारना**—कर्ज फेडणें. **क़र्ज़ खाना**—कर्ज काढणें.

**क़र्ज़दार**—वि. [अ. + स्वा.] अृणको.

**कर्ण**—पु. १ कान. २ कुंतिपुत्र; कर्ण. ३ सुकाणूं. (मु.) **कर्णका पहर**—प्रातःसमय; दानदक्षिणेची वेळ.

**कर्णधार**—पु. १ सुकाणू धरणारा. २ संचालक; सूत्रधार; पुढारी

**कर्णिका**—स्त्री. १ कर्णफूल (अलंकार). २ करंगळीजवळचें बोट. ३ हत्तीच्या सोंडेचें टोंक. ४ लेखणी; कलम. [कण्हेर.

**कर्णिकार**—पु. सोनचांफा;

**कर्णी**—पु. बाण.

**कर्तनी**—स्त्री. कात्री. [तलवार.

**कर्तरी**—स्त्री. १ कात्री. २ लहान

**कर्ता-धर्ता** } — वि. प्रमुख; सूत्र
**कर्ता-हर्ता** } संचालक

**कर्बुर**—पु. १ सोनें. २ धोतरा -(बीं). वि. चित्रविचित्र रंगाचा.

**कर्मकांड**—पु. होम-हवन-यज्ञादिकृत्यें अथवा त्या संबंधींचे शास्त्रग्रंथ.

**कर्मकार**—पु. १ लोहार. २ सोनार. ३ बैल. ४ नोकर; सेवक. ५ बिगारी.

**कर्मचारी**—पु. १ कार्यकर्ता. २ सरकारी अधिकारी. ३ नोकर.

**कर्मण्य**—वि. अुद्योगी; प्रयत्नशील.

**कर्मण्यता**—स्त्री. कार्यकुशलता.

**कर्मनाशा**—स्त्री. अुत्तर प्रदेशांतील अेक नदी.

**कर्ममास**—पु. श्रावण मास.

**कर्मवाद**—पु. मीमांसाशास्त्र.

**कर्रा**—पु. सूत ताणण्याचें काम. वि. कठिण; टणक.

**कलंकी**—वि. दोषी; अपराधी. पु. कल्की अवतार.

**कलँगी**—स्त्री. [तु.] पाहा 'कलगी'

**क़लंदर**—पु. [अ.] मुसलमानी फकीरांचा अेक वर्ग. २ अस्वल किंवा माकड नाचविणारा. वि. अवालिया

**कलंदरा**—पु. [फा.] अेक प्रकारचें रेशमी कापड. [किंवा फळ.

**कलंब**—पु. १ बाण. २ कदंबाचें झाड

**कल**—क्रि. वि. १ आगामी दिवस (अुद्या) २ गेलेला दिवस (काल) (मु.) **कल का**—कांहीं दिवसां पूर्वींचा.

**कल**—स्त्री. १ भाग; अवयव. २

कळ;यंत्र. ३ चाप; बंदुकीचा घोडा.

**कल**—पु. १ अव्यक्त मधुरध्वनि. २ सुख. ३ संतोष; तृप्तता. स्त्री. आरोग्य; स्वास्थ्य; चैन.

**क़लअी**—स्त्री. [अ.] १ कल्हअी. २ दिखाअूपणा; पोकळ डामडौल. ३ सफेती कावणें. (मु.) **क़लअी खुलना**—बिंग फुटणें.

**क़लअीदार**—वि. [अ. + फा.] कल्हअी असलेला.

**क़लक़**—पु. [अ.] १ अस्वस्थता; घाबरें; बेचैनी. २ दुःख; खेद; अुद्विग्नता.

**कलकना***— क्रि. अ. ओरडणें; आवाज करणें; चीत्कार करणें.

**कलकल**—पु. १ पाणी पडतांना होणारा आवाज. २ गोंगाट; गोंधळ. ३ भांडण, वाद.

**कलग़ी**—[तु.] कोंबडा. शहामृग अि. पक्ष्यांच्या डोक्यावरील अुंच केसांचा झुपका. २ शहामृग, मोर अि. चें पीस.

**कलछा**—पु. मोठी पळी; पळा.

**कलछी**—स्त्री. [पळा.

**कलछुला**—पु. मोठा लोखंडी डाव;

**कलजुग**—पु. कलियुग.

**कलझँवाँ**—वि. काळा—सांवळा.

**कलटोरा**—पु. काळी चोंच असलेलें पांढरें कबुतर.

**कलत्र**—पु. पत्नी.

**कलदार**—पु. [सं.+फा.] सरकारी रुपया. वि. पेचदार. [कलप.

**कलप**—पु. केसांना लावण्याचा रंग;

**कलपना**—क्रि.स. १कापणें, छाटणें. २ शोक करणें.

**कलपाना**—क्रि. स. मन दुखविणें.

**कलफ़**—पु. [अ.] १ चेहऱ्यावरील काळा डाग. २ कपड्यांना कडक अिस्त्री करण्यासाठीं लावण्याची खळ.

**कलफा**—स्त्री. देशी दालचिनी.

**कलब**—पु. पळसाच्या फुलापासून बनविलेला रंग.

**कलबल**—पु. अुपाय; डावपेंच; युक्ति.

**कलवल**—पु. [अनु.] गडबड. वि. अस्पष्ट (स्वर). [२ ठोकळा.

**कलबूत**—पु. [फा.] १सांगाडा; सांचा.

**कलभ**—हत्तीचें किंवा अुंटाचें पिलूं.

**क़लम**—पु. स्त्री. [अ.] १ लेखणी. २ ब्रश; कुंचली. (मु.) **क़लम करना**—छाटणें; तोडणें. **क़लम तोडना**—पराकाष्ठा करणें.

**क़लमक़साअी**—पु. [अ.] लेखणीच्या द्वारें लोकांची हानि करणारा.

**क़लमकार**—पु. [अ. + फा.] चित्रकार; लेखक. **क़लमकारी**—स्त्री.

१ लेखन. २ चित्रकला.

**कलमतराश**— पु.[अ. + फा.] चाकू (लेखणी,पेन्सिल करण्याचा).

**कलमदान**–पु. [अ. + फा.] दौत; टांक; वाळू वगैरे ठेवण्याची पेटी.

**कलमना**—क्रि. स. [दे.] कापणें; दोन तुकडे करणें.

**कलमबन्द**–वि. [अ. + फा.] १ लिहिलेलें. २ योग्य; पूर्ण.

**कलम-रौ**—स्त्री. [फा.] राज्य; सल्तनत. [करणें.

**कलमलाना**— क्रि. अ. कुरबूर

**कलमा**—पु. [अ.]. १ वाक्य; अिस्लामी धर्माचा मूलमंत्र. (मु.) **कलमा पढना**–अिस्लाम धर्म स्वीकारणें. [काळसर.

**कलमास**— वि. चितकबरा; करडा;

**कलमी**–वि. [अ.] १ हस्तलिखित; लिहिलेला. २ कलम केलेला.

**कलमुहाँ**–वि. १ काळ्या तोंडाचा; २ कलंकित. [पक्ष्यांची किलबिल.

**कलरव**—पु. १ मधुर शब्द. २

**कलरिन**–स्त्री.जळवा लावणारी स्त्री.

**कलवरिया**—पु.स्त्री. दारूचा गुत्ता.

**कलवार, कलाल**—पु. दारू वगैरे मद्य पदार्थ विकणारी जाति;कलाल.

**कलश**–पु. १ कळस; देवळाचें शिखर. २ घागरी; कळशी.

**कलशी**–, **कलसी**– } स्त्री. १ कळशी. २ मंदिरावरील लहान कळस. [शिखर.

**कलसा**–पु. १ घागर. २ मंदिराचें

**कलहप्रिय**—पु. नारद.

**कलाँ**–वि. [फा.] मोठ्या आकाराचा; विशाल.

**कलाअी**–स्त्री. मनगट.

**कलाकंद**–पु. [फा.] खव्याची बर्फी.

**कलाप**–पु. १ समूह; झुंड. २ मोराचा पिसारा. ३ पेंडी; गुंडाळी. ४ बाणांचा भाता. ५ करगोटा. ६ चंद्र. ७ दागिना.

**कलापिनी**–स्त्री. १ लांडोर. २ रात्र. ३ नागरमोथा. [३ वडाचें झाड.

**कलापी**–पु. १ मोर. २ कोकिळ.

**कलाबत्तू**–पु. [तु.] कलाबूत; कलाबतु.

**कलाबाज़**–वि. [फा.] १ डोंबारी. २ ललित, तमाशा वगैरे करणारा.

**कलाबाजी**–स्त्री.[फा]कोलांटी अुडी.

**कलाम**–पु. [अ.] १ वाक्य; वचन; अवतरण. २ अुक्ति. ३ वायदा; कबुली. ४ आक्षेप; हरकत. (मु.) **कलाम करना**–बोलणें; व्याख्यान देणें.

**कलाय**–पु. वाटाणा.

**कलार**— } पु॰ दारू गाळण्याचा व
**कलाल**— } विकण्याचा धंदा करणारा; कलाल.

**कलारी**—स्त्री॰ दारू विकण्याचा धंदा.

**कलावा**—पु॰ १ सुताची लडी. २ लग्न आदि प्रसंगीं हाताला बांधण्याचा पिवळा अगर तांबड्या रंगाचा धागा.

**कलिंग**—पु॰ १ अुत्कल; ओरिसा प्रदेश. २ कलिंगड.

**कलिंगडा**—पु॰ संगीतांतील अेक राग.

**कलिंद**—पु॰ १ सूर्य. २ बेहडा. ३ जेथून यमुना नदी अुगम पावते तो पर्वत.

**कलिंदजा**—स्त्री॰ यमुना नदी.

**कलिंदी***—स्त्री॰ यमुना नदी.

**कलि**—पु॰ १ भांडण. २ पाप. ३ कलियुग.

**कलित**—वि॰ १ प्रसिद्ध. २ सुसज्जित. [सुंदर.

**कलिया**—पु॰ [अ.] भाजलेलें व शिजविलेलें मांस; मांसाचा रस्सा.

**कलियाना**—क्रि॰ अ॰ १ आनंदांत मग्न होणें २ कळी येणें. ३ पक्ष्यास पंख फुटणें.

**कलियारी**—स्त्री॰ १ अेक विषारी झुडुप. २ खड्या नाग. ३ कळलावी वेल.

**कलिल**—वि॰ भरलेलें; व्याप्त; मलिन; संशयित.

**कली**—स्त्री॰ १ फुलाची कळी. २ पक्ष्याचें नवें पीस. ३ कपड्याचा त्रिकोणी तुकडा. ४ हुक्क्याचा खालचा भाग (मु.) **दिलकी कली खिलाना**—मन प्रसन्न होणें; खुलणें.

**कलीम**—वि॰ [अ.] बोलणारा; वक्ता.

**क़लील**—स्त्री॰ [अ.] थोडा; अल्प; किंचित्.

**कलीसा**—पु॰ [फा.] खिश्चन लोकांचें प्रार्थनामंदिर; चर्च.

**कलूटा**—वि॰ [सं॰] काळा.

**कलेअु**—पु॰ न्याहारी; शिदोरी.

**कलेजा**—पु॰ हृदय, काळीज. (मु.) **कलेजा निकालकर रखना**—अत्यंत प्रिय वस्तु अर्पण करणें. **कलेजा मुँहको या मुँहतक आना**—दुःखानें व्याकूळ होणें. **कलेजा थामना**—मन घट्ट करणें. **कलेजा फूटना**—दुःखानें हृदय विदीर्ण होणें. **कलेजा बैठ जाना**—निराश होणें; गळून जाणें; भयभीत होणें. **कलेजा मसोसकर रह जाना**—१ मन घट्ट करून राहाणें. २ हात चोळीत बसणें. **कलेजेपर साँप लोटना**—१ दुःखी होणें; हळहळणें. २ हेवा वाटणें.

**कलेजी**—स्त्री॰ काळजाचें मांस; [काळीज.

**कलेवर**—पु. १ शरीर. २ सांपळा.
**कलेवा**–पु. १ न्याहारी; फराळ. २ शिदोरी.
**कलेस***–पु. क्लेश; दुःख; पीडा.
**कलोल**–पु. खेळ; क्रीडा; नाचणें; बागडणें.
**कलोलना**—*क्रि. अ.* क्रीडा करणें; विहार करणें.
**कलौंजी**–*स्त्री.* १ काळें जिरें. २ मसालेदार वांग्याची भाजी.
**कल्प**–पु. १ कृत्य. २ वेदानुसार यज्ञविधि. ३ सकाळ. ४ प्रकरण. ५ चौदा मन्वन्तर किंवा चार अब्ज बत्तीस कोटि वर्षांचा काळ.
**कल्पक**–पु. न्हावी; हजाम. *वि.* १ रचणारा; कापणारा.
**कल्पकार**–पु. गृह्य किंवा श्रौत सूत्रें रचणारा.
**कल्पवास**–पु. गंगेच्या तटावर माघ महिन्यांत व्रतवैकल्यें करून राहणें.
**क़ल्ब**–पु. [अ.] हृदय.
**कल्मष**–पु. १ पाप. २ घाण.
**कल्यान***—पु. कल्याण.
**कल्लाँच** –पु. [तु.] १ लुच्चा; लबाड; गुंड. २ दरिद्री; कंगाल.
**कल्ला** –पु. १ मोड; अंकुर. २ बर्नर (दिव्याचा) [२ गालफड.
**कल्ला**—पु. [फा.] १ जबडा;
**कल्लातोड़**–*वि.* [फा.+सं.] बरोबरीचा; समर्पक; सडेतोड (जबाब).
**कल्लादराज़**—*वि.* [फा.] वाचाळ; तोंडाळ; फटकळ.
**कल्लोल**—पु. १ तरंग; लाट. २ मौज; आनंद; प्रफुल्लता.
**कल्ह**—*क्रि.वि.* काल.
**कवच**—पु. १ चिलखत. २ कठिण आवरण; आच्छादन. ३ फळाची जाड साल; टरफल.
**कवयित्री**–*स्त्री.* कविता करणारी स्त्री.
**कवर-ल**—पु. कवळ; घांस; ग्रास.
**कवरी**–*स्त्री.* १ वेणी. २ रानतुळस.
**कवलित**—*वि.* खाल्लेला.
**क़वायद**—*स्त्री.* [अ.] १ नियम; व्यवस्था. २ कवाईत (सैन्याची). ३ व्याकरण. [रचना.
**कविताई***—*स्त्री.* सरस काव्य-
**कवित्त**—पु. कविता; काव्य.
**कविलास***पु. कैलास.
**क़वी**—*वि.* [अ.] सामर्थ्यवान् ताकदवान.
**कव्वाल** } पहा 'कौवाल',
**कव्वाली** } 'कौवाली'
**कश**—पु. चाबूक.
**कश**—पु.[फा.] १ओढ. २चिलमीचा झुरका; दम. *वि.* आकर्षक; खेचणारा.

**क़शक़ा**—*पु.* [फा.] गंध; टिळा.

**कशमकश**—*स्त्री.* [ फा. ] ओढाताण; खेंचाखेंच. २ गर्दी. ३ दुग्ध्यांत पडणें; मनाची चलबिचल.

**कशिश**—*स्त्री.* [फा.] १ आकर्षण. ओढ. २ वैमनस्य; बेबनाव.

**कशीदगी**—*स्त्री.* [फा.] वैमनस्य; बेबनाव; तेढ.

**कशीदा**—*पु.* पाहा 'कसीदा'

**कश्ती**—*स्त्री.* [ फा ] १ नाव; नौका. २ तबक.

**कश्मीर**—*पु.* काश्मीर देश.

**कश्मीरज**—*पु.* केशर.

**कश्मीरी**—*वि.* काश्मीर प्रदेशासंबंधीं.

**कश्मीरी**—*पु.* १ काश्मीरनिवासी. २ काश्मीरमधील घोडा.

**कश्मीरी**—*स्त्री.* काश्मीरी भाषा

**कस**—*पु.* कसोटी; परीक्षा.

**कस**—*पु.* १ बल; जोर. २ ताबा. अधिकार. ३ अडथळा. अवरोध.

**कस**—*पु.* १ तुरटपणा. २ अर्क; सार. ३ निष्कर्ष; तात्पर्य.

**कस***—*क्रि.वि.* १ कसें. २ कां.

**कसक**—*स्त्री.* १ ठणका; वेदना; कळ. २ अढी; आकस; द्वैष. ३ आकांक्षा; अभिलाषा. ४ सहानुभूति. (मु.) **कसक निकालना**—सूड घेणें. **कसकना**-*क्रि. अ.* ठणका मारणें; ठुसठुसणें; सलणें.

**कसकुट**—*पु.* कांसें (मिश्र धातु.)

**क़सदन्-स्दन्**—*क्रि. वि.* [ अ. ] मुद्दाम; हेतुपुरस्सर.

**कसना**—*क्रि. स.* १ कसणें; आंवळणें. २ ताणणें. ३ करकचून बांधणें. ४ पारख करणें; अजमावणें. ५ ठासून भरणें. (मु.) **कसकर**-जोरानें. *क्रि. अ.* १ आवळलें जाणें; ताणलें जाणें. २ घट्ट होणें; संकुचित होणें. ३ ठासून भरलें जाणें.

**कसना**—*क्रि. स.* १ सोन्याची निकषावर पारख करणें. २ पारख करणें. ३ दूध आटवून खवा तयार करणें.

**कसना**—*क्रि. स.* कष्ट देणें.

**कसनी**—*स्त्री.* १ बांधण्याची दोरी. २ वेष्टण. ३ चोळी. ४ कसोटी; निकष; पारख.

**कसब**— *पु.* [अ] १ मेहनत; परिश्रम. २ व्यवसाय; धंदा. ३ हुन्नर; कला. ४ वेश्यावृत्ति. ५ अुपार्जन.

**क़सबी**-*स्त्री.* [अ.] वेश्या; कसबीण.

**क़सम**—*स्त्री.* [ अ. ] आणभाक; शपथ. (मु.) **कसम अुतारना**—१ 'शपथ सुटली' असें म्हणणें. २ अेखादें काम शपथेला करणें.

**कसम खाना**–शपथ घेणें; प्रतिज्ञा करणें. **कसम खानेको**– १ नाममात्र; नांवापुरतें. २ मुळींसुद्धां.
**कसमसाना**–*क्रि. अ.* [ अनु. ] १ कसकसणें; तळमळणें. २ कंटाळून अस्वस्थतेमुळें हलणें; लोळणें. ३ अस्वस्थ होणें ( तापानें ); घाबरें होणें. [अस्वस्थता; बेचैनी; घाबरें.
**कसमसाहट**— *स्त्री.* [ अनु. ]
**कसर**—*स्त्री.* [अ.] १ न्यूनता. २ द्वेष; मनोमालिन्य. ३ तोटा. ४ दोष. (मु.) **क़सर न अुठा रखना**–कार्यसिद्धीकरितां कोणताहि अुपाय करावयाचें बाकी न ठेवणें. **कसर निकालना**–अुट्टे काढणें.
**कसरत**—*स्त्री.* [अ.] १ विपुलता; आधिक्य. २ व्यायाम.
**कसली**–*स्त्री.* लहान फावडें; कुदळ.
**कसवाना**— *क्रि. स.* आवळून बांधविणें. [भरपूर रस असलेला अूस.
**कसवार**–*पु.* अेक विशेष प्रकारचा
**कसहँड**–पु. काशाच्या भांड्याचें तुकडे. [ तपेली.
**कसहँडी**–*स्त्री.* कासंडी. २ कांशाची
**क़साअी**–*पु.*[अ.] १ कसाअी; खाटीक २ मांग. ३ निर्दय; निष्ठुर.
**कसाना**—*क्रि. अ.* १ कळकणें. २ पदार्थाची रुचि बिघडणें. ३ आंबुसणें.
**कसार**—*पु.* तुपांतून भाजलेली व साखर घातलेली कणीक; गुळपापडीचें पीठ. [श्रम; मेहनत; श्रम.
**कसाला**–*पु.* १ कष्ट; त्रास. २ परि-
**कसाव**–*पु.* तुरटपणा; अुग्रपणा.
**कसाव**–*पु.* आवळून बांधणें; घट्ट बांधणें.
**कसावट**–*स्त्री.* कसणें; घट्ट बांधणी.
**क़सीदा**–*पु.* [ अ. ] १ चारणगीत. २ अुर्दू किंवा फारशी स्तुतिकाव्य.
**कसीदा**—*पु.* [फा.] कशीदा; वेलबुट्टीचें काम.
**क़सीफ़**–*वि.* [ अ. ] १ जाडजूड; स्थूल. २ बेढब. ३ घाणेरडे.
**कसीर**–*वि.* [अ.] अत्यंत; अधिक.
**कसूँभा**— *वि.* कुसुंब्याच्या रंगाचें; लाल.
**क़सूर**—*पु.* [अ.] दोष; अपराध.
**कसूरमन्द, कसूरवार**— *वि.* [अ. + फा. ] दोषी; अपराधी.
**कसेरा**—*पु.* पितळ, तांबें, काशें अित्यादि धातूंचीं भांडीं घडविणारा; कासार. [ अेवढें गोड कंदमूळ.
**कसेरू**—*पु.* केसाळ सालीचें बोरा-
**कसैया***—*पु.* १ करकचून बांधणारा. २ पारख करणारा.
**कसैला**–*वि.* तुरट व आंबट अस-

लेला. **कसैली**–वि. स्त्री.
**कसैली**—स्त्री. सुपारी.
**कसोरा**–पु. पणतीच्या आकाराचें मातीचें मोठें भांडें; परळ.
**कसौंदी**–स्त्री. कसुंदी; कैरीच्या किसाचें लोणचें.
**कसौटी**-स्त्री. १ कसोटी; पारख. २ कस पाहण्याचा दगड; निकष;
**कस्तूरा**–पु. कस्तुरी मृग.
**कस्तूरी**-स्त्री. कस्तुरी.
**क़स्द**–पु. [ अ. ] अिरादा; विचार; बेत; हेतु. [ बुजून; हेतुपूर्वक.
**क़स्दन्**–क्रि. वि. [ अ. ] जाणून-
**क़स्बा**–पु. [ अ.] मोठें खेडें; लहान शहर. [ खाटीक.
**कस्साब**-पु. [अ.] कसाअी; कसाब;
**कहँ**–प्रत्य. 'ला', 'करितां' ( चतुर्थीचा प्रत्यय). चा, ची. चें (षष्ठीचा प्रत्यय). क्रि. वि. **कोठें**
**कहकशाँ**-स्त्री. [फा.] आकाशगंगा.
**क़हक़हा**—पु. [ फा. ] खदखदां हंसणें. [ गारा.
**कहगिल**-स्त्री. [ फा. ] गिलावा;
**क़हत**–पु. [अ.] १ दुष्काळ; दुर्भिक्ष. २ अेखाद्या वस्तूचा अभाव.
**क़हतज़दा**— वि. [ अ. + फा. ] दुष्काळपीडित.
**कहन–नि–नी**—स्त्री. १ कथन. २ म्हण. ३ गोष्ट. ४ अुक्ति. ५ कविता.
**कहना**–क्रि. स. १ बोलणें; सांगणें; म्हणणें. २ कविता करणें. ३ अघड करणें. ४ संबोधणें. ५ समजाविणें. ६ सूचना देणें. ( मु. ) **कह बद्कर**–१ दृढ संकल्प करून. २ आव्हान देअून. ३ बजावून. **कहनेको**–नाममात्र; नांवापुरतें.
**कहनाअुत–वत***—स्त्री. १ कथन. २ म्हण. [ वि. घोर; भयंकर.
**क़हर**–पु. [ अ. ] आपत्ति; संकट.
**कहरना**–क्रि. अ. कण्हणें.
**कहल***–पु. [ दे. ] १ अुष्णतेपासून होणारी तगमग. २ पीडा; त्रास. ३ अुष्मा. **कहलना**–क्रि. अ. व्याकुळ होणें; कासावीस होणें.
**कहलाना, कहाना** — क्रि. स. १ सांगविणें २ निरोप धाडणें. ३ म्हणविणें.
**कहवाँ, कहाँ**—क्रि. वि. कोठें. ( मु. ) **कहाँ का कहाँ**–कोठल्या कोठें; पुष्कळ लांब.
**क़हवा**—पु. [ अ. ] कॉफी.
**कहा***–पु. कथन; आज्ञा; अुपदेश. स. काय; कसें; कां. क्रि. वि. १ कसें. २ कां. [ २ लघुकथा.
**कहानी**—स्त्री. १ कथा; गोष्ट.

वापरलेला. २ रिकामा; विहीन; रहित. ३ मूर्ख; अशिक्षित. ४ केवळ; फक्त. (मु.) **कोरा जवाब**—स्पष्ट नकार. पु. बिनकांठाचें रेशमी धोतर.

**कोरा***—पु. अुत्संग; मांडी.

**कोरी-ली**—पु. कोष्टी; विणकर.

**कोरी**—स्त्री. वीसांचा गट.

**कोर्ट**—पु. [ अिं ]न्यायालय; कचेरी.

**कोल**—पु. १ डुक्कर. २ अुत्संग; मांडी. ३ बोराचें फळ

**कोलाहल**—पु. गोंधळ; गडबड.

**कोली**—स्त्री. अुत्संग; मांडी.

**कोली**—पु. कोष्टी; विणकर.

**कोल्हू**—पु. १अुंसाचा चरक. २घाणा. (मु.) **कोल्हू का बैल**—अत्यंत श्रम करणारा. **कोल्हूमें डालकर पेरना**—फार कष्ट देणें

**कोविद्**—वि. ज्ञाता; विद्वान्.

**कोश**—पु. १ म्यान. २ आवरण. ३ खजिना; धन. ४कोश (डिक्शनरी) ५ अंडें. ६ रेशमाचा किडा.

**कोशफल**—पु. दुध्या, भोपळा, कोहळा टरबूज वगैरे प्रकारची फळभाजी व फळें.

**कोशपाल**—पु. खजिनदार.

**कोशिश**—स्त्री. [फा.] प्रयत्न; उद्योग.

**कोष**—पु. पाहा 'कोश'

**कोष्टक**—पु. कंस [ { ( ) } ]

**कोष्ठी**—स्त्री. जन्मकुंडली.

**कोस**—पु. दोन मैलांचें अंतर; कोस.

**कोसना**—क्रि. स. दोष देणें; शिव्याशाप देणें; निर्भर्त्सना करणें. (मु.) **पानी पी पी कर कोसना**—राहून राहून शिव्याशाप देणें. [कौसल्या.

**कोसलेश्वरी**—स्त्री. रामाची आअी;

**कोसा**—पु. १ अेक प्रकारचें रेशीम. २ अेक प्रकारचा मातीचा दिवा.

**कोहँड़ौरी**—स्त्री. कोहळ्याचा सांडगा.

**कोह**—पु. [ फा. ] पर्वत. **कोही**—वि. पहाडी; डोंगराळ.

**कोह***—पु. क्रोध; राग.

**कोहकन**—पु. [ फा. ] १ पहाड खोदणारा. २ फरहादचें दुसरें नांव.

**कोहनी**—स्त्री. कोपर

**कोहनूर**—पु. [ फा. ] कोहिनूर हिरा. (कोह = पर्वत + नूर = प्रकाश—प्रकाशाचा पर्वत ). [ तें स्थान.

**कोहबर**—पु. देवप्रतिमा बसवितात

**कोहसार**—पु. [फा.] पाहा 'कोहिस्तान' [ पाठीवरील ).

**कोहान**—पु. [फा.] वशिंड (अुंटाच्या

**कोहाना***—क्रि. अ. १ रुसणें; नाराज होणें. २ रागावणें; क्रोध करणें.

**कोहिस्तान**—पु. [फा.] पहाडी प्रदेश.

**कोही***—वि. क्रोधी; रागीट.

**कौंध**—स्त्री· विजेची चमक. **कौंधना**—क्रि.अ· वीज चमकणें.

**कौंधनी***—स्त्री· करगोटा.

**कौंसिल**—पु· [अिं] कायदेमंडळ.

**कौआ—वा**—पु· कावळा.

**कौडा**—पु· मोठी कवडी.

**कौडिया**—वि· कवडी रंगाचा.

**कौड़ा**—पु· आगटी; शेकोटी.

**कौडियाला**—वि· १ कवडी रंगाचा. पु· १ विषारी साप. २ कृपण धनाढ्य; कंजुष श्रीमंत.

**कौडियाही**—स्त्री· दगड अगर विटा वाहून नेण्याच्या हिशेबानें दिली जाणारी मजुरी.

**कौडी**—स्त्री· कवडी. (मु.) **कौडी का**—कुचकामाचा; तुच्छ. **कौडी कौडी अदा करना, चुकाना** अथवा **भरना**—पै न् पै अॄण फेडणें.

**कौणप**—पु· १ राक्षस. २ अधर्मी; पापी (मनुष्य).

**कौन**—स· कोण.

**क़ौम**—स्त्री· [अ·] जाति. **क़ौमी**—वि· १ जातीय. २ राष्ट्रीय.

**क़ौमियत**—स्त्री· [अ·] राष्ट्रीयत्व.

**कौमुद**—पु· कार्तिक महिना.

**कौमुदी**—स्त्री· १ चांदणें. २ कार्तिकी पौर्णिमा. ३ या पौर्णिमेचा अुत्सव. ४ आश्विनी पौर्णिमा.

**कौर**—पु· घास; ग्रास. (मु.) **मुँह का कौर छीनना**—तोंडचा घास काढून घेणें. [ वायुगोळा.

**कौलंज**—पु· [ग्री.] पोटांत उठणारा

**क़ौल**—पु· [अ·] १ कथन; अुक्ति. २ प्रतिज्ञा; वायदा. (यौ.) **क़ौल-क़रार**—आपसांतील शपथविधि.

**कौवाली**—स्त्री· [अ·] १ अेक प्रकारचें गीत; कवाली. २ गवअीपेशा.

**कौवाल**—पु· [अ·] कवाली गाणारा.

**क़ौस**—स्त्री· [अ·] १ धनुष्य. २ धन· राशि. (यौ.) **क़ौसे कज़ह**—स्त्री· अिंद्रधनुष्य.

**क्या**—स· काय (प्रश्नार्थक). (मु.) **क्या कहना है** अथवा **क्या खूब**—प्रशंसोद्गार; वाहवा ! वि· १ किती ? २ अधिक; पुष्कळ. ३ अपूर्व; अुत्तम. क्रि·वि· काय म्हणून; का ?

**क्यारी**—स्त्री· १ अळें; वाफा. २ मीठ बनविण्याकरितां तयार केलेला वाफा; खाचर. [ कशा प्रकारें ?

**क्यों**—क्रि· वि· १ कां ? कसें ? २

**क्योंकर**—अव्य. कसें.

**क्रम**—पु· १ अनुक्रम. २ पद्धति.

**क्रमिक** – वि· पद्धतीनुसार; क्रमानुसार; पद्धतशीर.

**क्रांति**—स्त्री· क्रांति.

**क्राअुन**—पु· [अिं.] १ १५×२०

अिंच लांबी-रुंदीचा कागद. २राज-मुकुट. ३ ५ शिलिंगाचें १ नाणें.
क्रियता*–स्त्री· कार्य. [अंत्यविधि.
क्रियाकर्म—पु· मृतव्यक्तीचा
क्रिस्तान–पु· [अिं.] ख्रिश्चन.
क्रिस्तानी–वि·[अिं]ख्रिश्चनधर्माचा.
क्रीत–वि· विकत घेतलेला.
क्रीतदास– (यौ) –पु· गुलाम!
क्रोड–पु· मांडी; छाती.
क्रोड़पत्र–पु· परिशिष्ट; पुरवणी.
क्रोशिया—पु· [अिं.] अेक प्रकारचें सुताचें विणकाम ( जाळीदार ).
क्लारनेट–पु· [अिं.] अेक प्रकारचें सनअी सारखें वाद्य.
क्लीनर—पु· [ अिं. ] मोटार, अेंजिन वगैरे साफ करणारा.
क्वारपन, क्वारापन–पु· कौमार्य; अविवाहित अवस्था.
क्वाड्रेट–पु· [ अिं.] मुद्रणालयांतील कंपोझिंग किंवा खिळे जुळवणीं करतांना वापरावयाचा शिशाचा चौकोनी तुकडा. हा स्पेसपेक्षां मोठा आणि कोटेशनपेक्षां लहान असतो.
क्वार–पु· आश्विन महिना.
क्वारा–पु· वि· कुमार;अविवाहित.
क्षण–पु· क्षण.
क्षति–स्त्री· नुकसान; हानि.
क्षत्रप–पु·अिराण देशांतील प्राचीन मांडलिक राजाची पदवी.
क्षपा–स्त्री· रात्र.
क्षपाकर–पु· १ चंद्र. २ कापूर.
क्षमता—स्त्री· योग्यता; सामर्थ्य.
क्षमना*–क्रि· स· क्षमा करणें.
क्षमनीय–वि· क्षमा करण्यास योग्य; क्षम्य.
क्षमवाना–क्रि·स· क्षमा करविणें.
क्षमी–१ वि· क्षमाशील; क्षमा करणारा. २ सहनशील; शांत प्रकृतीचा. [शील.
क्षांत–वि· १ सहनशील; क्षमा-
क्षांति–स्त्री· १ क्षमा. २ सहिष्णुता.
क्षाम–वि· १ क्षीण; कृश. २ किडकिडीत. ३ अल्प; थोडा.
क्षिति—पु· १ पृथ्वी. २ निवास-स्थान. ३ क्षय.
क्षिप्रगति–वि·खूप वेगानें जाणारा.
क्षुधा–स्त्री· भूक. [३ तीर्थ.
क्षेत्र–पु· १ शेत. २ अुत्पत्तिस्थान.
क्षोणिप–पु· राजा.
क्षौम–पु· तागाचें कापड.

# ख

**खंख**—*वि.* १ रिकामा; रिक्त. २ निर्जन; ओसाड; उजाड. [म्हातारा.

**खंखड**—*वि.* १ शुष्क. २ जख्खड

**खँखार, खखार**— *पु.* [अनु.] बेडका; खांकरा.

**खँखारना**—*क्रि.अ.* पाहा 'खखारना'.

**खंग**—*पु.* १ तलवार; खड्ग २ गेंडा.

**खँगहा**—*पु.* गेंडा. *वि.* दांत पुढें असलेला.

**खंगालना**—*क्रि. स.* १ विसळणें; खळबळून धुणें. २ रिकामें करणें.

**खँगी**—*स्त्री.* न्यूनता; कमतरता; उणीव

**खँगैल**—*वि.* १ पायाला खुरी रोग झालेलें (जनावर) २ लांब दातांचा (हत्ती).

**खँचना**—*क्रि. स.* १ चिन्हांकित करणें; खूण करणें; रेखाटणें. २ खरडणें; कसें तरी लिहिणें.

**खँचिया**—*स्त्री.* टोपली.

**खँजडी**—*स्त्री.* १ डफडी. २ चिपळ्या.

**खंजर**—*पु.* [अ.] कट्यार.

**खंजरीट**—*पु.* खंजन पक्षी.

**खंड**—*पु.* १ तुकडा; भाग. २ देश; प्रदेश. ३ चोळीचा खण. ४ घराचा मजला. *वि.* १ छोटा; लहान; लघु. २ खंडित.

**खंडकाव्य**—*पु.* खंडकाव्य.

**खंडन**—*पु.* खंडन; खोडून काढणें.

**खंडना***—*क्रि. स.* तुकडे तुकडे करणें. [हता.

**खंडनी**—*स्त्री.* १ खंडणी. २ साऱ्याचा

**खंडपूरी**—*स्त्री.* १ साटोरी. २ गोड पुरी.

**खंडबरा**—*पु.* घागरा.

**खंडर**—*पु.* पाहा 'खँडहर'

**खँडरा**—*पु.* डाळीच्या पिठाचा वडा.

**खँडरिच**—*पु.* खंजन पक्षी.

**खँडवानी**—*स्त्री.* साखरपाणी.

**खंडसर**—*पु.* खांडसरी साखर; गुळी साखर.

**खँडसाल**—*स्त्री.* साखरेचा कारखाना.

**खँडहर**—*पु.* पडलेल्या अिमारतीचा अवशेष; पडका भाग. [तुटलेला,

**खंडित**—*वि.* भग्न; मोडलेला;

**खंडिया**—*पु.* अुसाचे तुकडे अगर करवे करणारा. *स्त्री.* लहान तुकडा.

**खँडौरा**—*पु.* दाणेदार साखरेचा लाडू.

**खँडौरी**—*स्त्री.* तांदळाच्या कण्या.

**खंतरा**—*पु.* १ भेग; फट; तडा. २ कोपरा. [२ मोठा खड्डा.

**खंदक**—*स्त्री.* [अ.] १ खंदक.

**खंदा**—*पु.* खोदकाम करणारा.

**खंभा**–पु. खांब; स्तंभ.

**खंभार***–पु. १ भीति; भय. २ शंका; अंदेशा. ३ शोक. ४ कासाविसी; अतिशय अस्वस्थता.

**खँसना***–क्रि. अ. हळूंच निसटणें.

**खअी***–स्त्री. १ क्षय. २ कलह; भांडण. ३ लढाअी; युद्ध.

**खक्खा**–पु. [फा.] १ मोठ्यानें हंसणें, खदखदां हंसणें २ अनुभवी माणूस. ३ मोठा व अुंच हत्ती.

**खखरा**—पु. [दि.] मोठा हारा.

**खखारना**–क्रि. अ. [अनु.] खांकरणें; घसा साफ करणें; बेडका काढणें. **खखार**–पु. बेडका; खांकरा.

**खखेटना***–क्रि. स. १ पाठलाग करणें. २ दाबणें. ३ घायाळ करणें.

**खखोरना**—क्रि. स. धुंडाळणें; शोधून काढणें.

**खग**–पु. १ पक्षी. २ गंधर्व ३ बाण. ४ ग्रह; नक्षत्र. ५ सूर्य. ६ चंद्र. ७ मेघ. ८ हवा.

**खगना***–क्रि. अ. १ . बोचणें; रुतणें. २ चिन्हांकित होणें. ३ मनावर बिंबणें; प्रभाव पडणें. ४ निश्चल राहणें; अडून राहणें.

**खगपति**—पु. १ गरुड. २ सूर्य.

**खचन**–पु. १ जडण; जडणकाम. २ कोरीव काम.

**खचना***–क्रि. अ. १ जडणें; जडणकाम होणें. २ जडविलें जाणें. ३ कोरीव किंवा नक्षीकाम होणें. क्रि. स. १ जडणें, कोरणें २ रेखाटणें; चिन्हांकित करणें.

**खचर**—पु. १ सूर्य. २ मेघ. ३ ग्रह; नक्षत्र ४ हवा; वायु. ५ पक्षी. ६ बाण. ७ राक्षस.

**खचरा**–वि. [दि.] १ वर्णसंकऱ्या; कमजात; अकुलीन. २ दुष्ट; हलकट. [भरपूर; चिक्कार.

**खचाखच**–क्रि.वि. [अनु.] ठांसून;

**खचाना**–क्रि.स. १ ताणणें; ओढणें. २ घाअीनें लिहिणें; खरडणें.

**खचित**–वि. रेखाटलेला; चित्रित.

**खचिया**–स्त्री. टोपली.

**खचेडना**–क्रि. स. पाहा 'खदेडना'

**खच्चर**–पु. [दि.] खेचर. [कोषाध्यक्ष.

**ख़ज़ानची**–पु. [फा.] खजिनदार;

**ख़ज़ाना**–पु. [अ.] खजिना.

**खजुली**–स्त्री. खरूज; खाज.

**खजूर**—पु. खजूर.

**खट**–पु. [अनु.] अेखादी वस्तु फुटल्याचा किंवा दुसऱ्यावर आपटल्याचा आवाज. (मु.) **खटसे**–चटकन्; झटदिशीं.

**खटक**–स्त्री. [अनु.] १ आशंका; अंदेशा. २ काळजी; चिंता. ३

खटखट असा आवाज.

**खटकना, खडकना**—*क्रि. अ.* [अनु.] १ खटखट आवाज होणें. २ टोंचणी लागणें; मनाला लागणें. ३ दुखणें; ठसठसणें. ४ भांडण होणें. ५ न अुमगणें. ६ साशंक होणें. ७ काळजी वाटणें. ८ विटणें; विरक्त होणें.

**खटका**—*पु.* [अनु.] १ बोलट; खिटी. २ आशंका; भीति; चिंता.

**खटकाना**—*क्रि.स.* [अनु.] १ चिंता किंवा काळजी अुत्पन्न करणें. २ ठोठावणें; खटखट आवाज करणें.

**खटखट**—*स्त्री.* [अनु.] १ ठकठक. २ कटकट. ३ तंटा-बखेडा.

**खटखटाना**—*क्रि. स.* [अनु.] ठोठावणें; ठकठक आवाज करणें.

**खटना**—*क्रि. अ.* १ मेहनत करणें; परिश्रम करणें. २ खूप श्रम करून कमी मोबदला मिळणें.

**खटना**—*क्रि. स.* पैसे मिळविणें.

**खटपट**—*स्त्री.* [अनु.] १ खटका; झकाझकी. २ बेबनाव; वैमनस्य.

**खटपद्**—*वि.* षट्पाद; सहा पायांचा. *पु.* भौंरा; भुंगा.

**खटपाटी**—*स्त्री.* बाजेचें लांकूड.

**खटबुना**—*पु.* बाज विणणारा.

**खटमल**—*पु.* ढेंकूण.

**खटमिट्ठा**—*वि.* आंबटगोड.

**खटराग**—*पु.* १ षट्राग; संगीताचे सहा राग. २ भानगड; बखेडा.

**खटाअी**—*स्त्री.* १ आंबटपणा. २ आंबट; आम्ल वस्तु ३ बेबनाव; वैमनस्य. (मु.) **खटाअीमें डालना**—१ संशयांत ठेवणें; दुग्ध्यांत ठेवणें. २ विलंब लावणें.

**खटाखट**—*क्रि.वि.* [अनु.] १ झटपट; भरभर. २ तत्काळ; लागलींच.

**खटाना**—*क्रि. अ.* १ निर्वाह होणें; निभणें. २ थांबणें; टिकणें. ३ परीक्षेंत पूर्ण अुतरणें.

**खटाना**—*क्रि.अ.* अंबणें; अंबुसणें.

**खटापटी**—*स्त्री.* [अनु.] बेबनाव; भांडण.

**खटास**—*स्त्री.* आंबटपणा.

**खटिक**—*पु.* १ भाजी विकणारा; काची. २ फळें, भाजीपाला विकणारी जात.

**खटिया**—*स्त्री.* खाटलें; बाज.

**खटोलना, खटोला**—*पु.* लहान बाज. *स्त्री.* खटोली.

**खट्टा**—*वि.* आंबट. (मु.) **जी खट्टा होना**—अप्रसन्न होणें; नाखुश होणें.

**खट्टामीठा**—*वि.* आंबटगोड.

**खट्टू**—*पु.* कमाविणारा; मिळविणारा.

**खट्वांग**—*पु.* बाजेची पाटी किंवा खूर.

**खट्वा**—स्री· बाज.
**खडखडा**—पु· [अनु.] नवशिका घोडा प्रथम जुंपतांना टांग्याला लावतात ते लांब पोल.
**खडखडाना**–क्रि·अ·[अनु.]खडखड आवाज होणें; खडखडणें. क्रि· स· खडखड करणें.
**खडखडिया** – स्री· पालखी; मेणा.
**खडचड**—स्री·[अनु.] १ फेरबदल; अदलाबदल. २ खळबळ; गडबड.
**खडबडाना**— स्री· अ· [अनु.] १ वावरणें; गोंधळून जाणें; घाबरणें. २ अस्ताव्यस्त होणें; अव्यवस्थित होणें.
**खडबडाहट, खडबडी** — स्री· [अनु.] १ खडबड. २ अुलथापालथ;खळबळ. [खळबळ; गडबड.
**खडमंडल**–पु·१·घोटाळा;गोंधळ. २
**खडा**—वि· १ अुभा. २ सिद्ध; तयार;तत्पर. ३ सरळ. ४ सुरुवान. ५ रचलेला. ६ कच्चा. (मु.) **खडेखडे** —•अुभ्याअुभ्या. **खडा जवाब**–समयसूचक अुत्तर.
**खडाअूँ**–स्री·खडावा;पादुका. [पेंच.
**खडादसरंग**–पु· कुस्तींतील अेक
**खडानन**–पु·कार्तिकस्वामी. [फक्की.
**खडिया, खडी**–स्री·खडू; चुन्याची
**खडी बोली**—स्री· दिल्लीच्या आसपास बोलली जाणारी भाषा; हिन्दी गद्याची भाषा.
**खड्ग**—पु· १ तलवार. २ शस्त्र.
**खड्डा, खड्ढा**—पु· खड्डा.
**ख़त**—पु· [अ.] १ पत्र. २ कानाजवळचे किंवा दाढीचे केस. ३रेषा.
**खत**—पु· क्षत; जखम.
**ख़तना**—पु· [अ.] सुंता.
**ख़तम**—वि· [अ.] समाप्त; पूर्ण. (मु.) **ख़तम करना**–१ संपविणें. २ मारून टाकणें. [भयानक;भीषण.
**ख़तरनाक**—वि· [अ.] भयंकर;
**ख़तरा**—पु· [अ.] १ भय; भीति. २ शंका. ३धास्ती;काळजी. ४धोका.
**ख़ता**—स्री· [अ.] १ चूक. २ अपराध; दोष. [अपराधी.
**खतावार**–वि· [अ. + फा.] दोषी;
**खति***–स्री· क्षति;नुकसान; हानि.
**खतियाना**—क्रि· स· [अ.] खतावणी करणें. २ खातें लिहिणें.
**खतियौनी**—स्री· [अ.] १ खतावणीचें काम. २ खातेवही.
**ख़तीव**—पु·[अ.] खुतबा पढणारा. २ प्रवचन देणारा.
**ख़तूत**–पु· [अ.] ('खत'चें बहु.) पत्रें. (यौ.) **ख़तो किताबत**–स्री· पत्रव्यवहार.
**खत्ता**—पु· १ खड्डा; खळगा. २

धान्याचें कोठार.

**ख़त्म**—*वि.* [अ.] पाहा ‘ खतम ’

**खद्बदाना**—*क्रि. अ.* [अनु.] खदखदणें, शिजणें.

**ख़द्शा**–*पु.* [अ.] १ धास्ती; काळजी; भय. २ अंदेशा; शंका.

**खदान**–*स्त्री.* खाण.

**खदिर**–*पु.* १ काताचें झाड. २ कात.

**खदुका***–*पु.* ऋणको; कर्ज घेणारा.

**खदेडना**–*क्रि. स.* १ दूर करणें. २ फरफटत नेणें.

**खद्दड, खद्दर**–*पु.* [ ? ] खादी.

**खन***-*पु.* क्षण.

**खनक**–*पु.* १ उंदीर. २ जमीन खणणारा. ३ भिंत फोडून चोरी करणारा. ४ सोन्याची खाण.

**खनकना**—*क्रि. अ.* [अनु.] खणखणाट होणें. [खणाट करणें.

**खनकाना**–*क्रि. स.* [अनु.] खण

**खनखनाना**–*क्रि. स.* खणखणाट करणें. *क्रि. अ.* खणखणाट होणें.

**खनना***–*क्रि. स.* खोदणें; खणणें.

**खनिज**—*वि.* खाणींतून खणून काढलेला.

**खन्नास**–*पु.* [अ.] भूत;प्रेत;सैतान.

**खपची**–*स्त्री.* [तु.] बांबूची लवचीक कामटी.

**खपड़ा**–*पु.* १ कौल.२ भिक्षापात्र. ३ खापरी. ४ कासवाची पाठ.

**खपडी**–*स्त्री.* खापरी;खापर;मातीचा मोठा परळ. [कौलार. २ कौल.

**खपडैल, खपरैल**–*स्त्री.* १ घराचें

**खपत-ती**—१ खप; विक्री. २ समावेश.

**खपना**–*क्रि. अ.* १ खर्च होणें;व्यय होणें;२ खपणें.३ उपयोगास येणें. ४ संपणें. ५ निभणें.

**खपली**–*पु.* खपली जातीचा गहूं.

**खपाट**–*पु.* भात्याचे दोन दांडे.

**खपाना**–*क्रि. स.* १ खपविणें. २ खर्च करणें. ३ निर्वाह करणें; निभावणें. ४ संपविणें. (मु.) **माथा** अथवा **सिर खपाना**–डोकें पिकविणें; फार विचार करणें.

**खप्पड, खप्पर**–*पु.* १ खापरी. २ कौल. ३ मातीचा परळ. ४ भिक्षापात्र; ५ डोक्याची कवटी.

**ख़फ़गी**–*स्त्री.* [फा.] १ रोष;राग. २ अप्रसन्नता. [नाराज; खप्पा.

**ख़फ़ा**–*वि.* [फा.] १ अप्रसन्न. २ रुष्ट;

**खफ़ीफ़**–*वि.* [अ.] १ थोडा;कमी. २ किंचित्. ३ तुच्छ; हीन. ४ ४ शरमलेला; लज्जित झालेला

**ख़फ़ीफ़ा**–*स्त्री.* [अ.] लहान व नकदी रकमेचे दावे चालविणारें दिवाणी कोर्ट.

**ख़बर**–स्त्री· [अ·]१ बातमी; वृत्तांत. २ माहिती. ३ निरोप. ४ सावधपणा; शुद्ध. ५ पत्ता; शोध. (मु) **ख़बर उड़ना**–बातमी फैलणें; बाजारगप्प उठणें. **ख़बर लेना**– १ समाचार घेणें; सहानुभूति दाखविणें. २ शिक्षा करणें.

**ख़बरगीर**–वि· [अ· + फा.] १ हेर; गुप्तचर. २ पालनपोषण करणारा; संरक्षक.

**ख़बरदार**–वि· [अ· +फा.] सावध; जागृत. **ख़बरदारी**–स्त्री· सावधगिरी.

**ख़बररसाँ**–पु· [अ· + फा. ]— बातमी पोंचविणारा; दूत.

**ख़बरी**– पु·[अ.] बातमीदार.

**खबाअी**–स्त्री· १ खादाडपणा. २ खूप खाणें; आकंठ जेवणें.

**ख़बीस**-पु· [अ·] १ खवीस; दुष्ट; खुनशी. २ राक्षस, पिशाच; सैतान

**ख़ब्त**–पु· [ अ· ] वेड; छांदिष्टपणा; नाद. **ख़ब्ती**–वि· वेडा; विक्षिप्त.

**खब्बड**
**खब्भड** } –वि· खप्पड; मरतुकडा.

**खब्बा**–वि·[दे.]१ डावा. २ डावखुरा.

**खभारना***–क्रि· स· १ मिसळणें. गोंधळ माजविणें. [ व्याकुळता.

**खभार***-पु· १ चिंता; दुःख. २भय;

**ख़म**–पु· [ अ· ] १ वांकडेपणा; झुकाव. २ दंड; बाहु. (मु.) **ख़म ठोकना**-दंड थोपटणें. **ख़म खाना**–१ पराजय कबूल करणें; २ हार खाणें. २ वांकणें; झुकणें.

**ख़मदम**–पु· [अ· + फा.] पुरुषार्थ; पराक्रम. [ कडवें ( दहा चरण ).

**ख़मसा**–पु· [ अ· ] पांच श्लोकांचें

**ख़मीर**–पु· [ अ· ] १ तिंबलेली कणीक. २ भिजविलेलें पीठ. ३ स्वभाव; प्रकृति. ४ अननस, गरे वगैरे आंबवून काढलेलें पाणी.

**ख़मीरा**–पु· [ अ· ] १ एक प्रकारची तंबाखू. २ औषधी काढा.

**ख़मोश**–वि· [ फा. ] गप्प; चूप.

**खय***–स्त्री· क्षय; विध्वंस.

**ख़यानत**–स्त्री· [ अ· ]१ दुसऱ्याच्या ठेवीची किंवा पैशाची अफरातफर. २ अप्रामाणिकपणा.

**ख़याल, ख्याल**–पु· [ अ· ] १ विचार; २स्मृति; आठवण. ३लक्ष.

**ख़यालात**–पु· [अ·] ( 'खयाल 'चें बहु. ) विचार, कल्पना.

**ख़र**–पु· [ फा. सं· ] गाढव; गर्दभ.

**खरक**–पु· १ गोठा. २ कुरण. ३ बांबूच्या कामट्यांचे दार.

**खरकना**–क्रि·अ· [ अनु. ]१ ठसठसणें; दुखणें. २ निसटणें; जाणें.

**खरका**-पु. काडी. (मु.) **खरका करना**-काडीनें दांत कोरणें.
**ख़रख़शा**-पु. [फा.] १ भांडण; बखेडा. २ आशंका; भीति.
**ख़रगोश**-पु. [फा.] ससा.
**ख़रचना**-क्रि.स. [फा.] खर्च करणें. २कामीं लावणें; अुपयोगांत आणणें.
**खरता**-वि. तीक्ष्ण धारेचा.
**खरधार**-पु. तीक्ष्ण शस्त्र. [धुणें.
**खरना**-क्रि. स. गरम पाण्यांत लोंकर
**खरब**-पु. [सं.] खर्व. (संख्या)
**ख़रबूज़ा**-पु. [फा.] खरबूज.
**खरभर***-पु. [अनु.] १ गलबला. २ खळबळ.
**खरभराना**—क्रि. अ. [अनु.] गोंधळ करणें; गडबड करणें.
**ख़रमस्ती**—स्त्री. [फा.] दुष्टपणा; पाजीपणा, द्वाडपणा.
**खरमास**—पु. पौष व चैत्र महिने. या वेळेस सूर्य अनुक्रमें धन व मीन राशींत असतो, व हे महिने मंगल-कार्यांकरितां वर्ज्य मानले आहेत.
**खरल**—पु. औषधें कुटण्याचा खल.
**खरसा**—पु. अेक पक्वान्न.
**खरसान**—स्त्री. १ हत्यारांना धार लावण्याचा दगड. २ सहाण.
**खरहरा**—पु. [अनु.] १ खराटा. २ खरारा.
**खरहा**—पु. ससा.
**खरा**—वि. १ तीक्ष्ण; तिखट; धारेचा. २ शुद्ध. ३ चांगला; अुत्तम. ४ खरपूस. ५ चिवट; कडकडीत. ६ निर्दोष. ७ रोख; नगद (दाम). ८ स्पष्टवक्ता. ९ सत्य; वास्तविक. (मु.) **खरीखोटी सुनाना**-फैलावर घेणें; वाक्ताडन करणें; खरडपट्टी काढणें.
**खराअी**—स्त्री. [दे.] सकाळीं बराच वेळपर्यंत खावयास न मिळाल्यामुळें होणारी कासाविसी.
**ख़राद**—पु. [फा.] लांकूड, धातू वगैरेंना तासण्याचें व गुळगुळीत करण्याचें चाक; लेथ.
**ख़रादना**—क्रि. स. [फा.] धातू अित्यादि तासून गुळगुळीत करणें.
**ख़रादी**—पु. [फा.] धातू तासून गुळगुळीत व सुडौल करणारा; लेथ-काम करणारा.
**खरापन**—पु. खरेपणा; सचोटी.
**ख़राब**-वि.[अ.]१ ख़राब; वाअीट. २ निकृष्ट; पतित; हलकट.
**ख़राबा**-पु. [अ.] १ खराबी; नासाडी. २ दुर्दशा. ३ दोष; अव-गुण. स्त्री. **ख़राबी**.
**खरायँध**-स्त्री. लघवीची घाण.
**खरारि-री***-पु. १ राम. २ विष्णु.

३ कृष्ण

**ख़राश**–*स्त्री*·[फा.] १ कांतून निघा-लेला भुसा; तासून निघालेला ढलपा. २ ओरखडा.

**खरिक–का***–*पु*· गायरान; गोठा.

**खरिया**–*स्त्री*· १ बारीक दोरीचें जाळें (गवत अि.बांधण्यासाठीं). २ पिशवी ३ खडू. [ घेणें. २ थैलींत भरणें.

**खरियाना**–*क्रि.स*· १ हस्तगत करणें;

**खरिहान**–*पु*· खळें.

**ख़रीता**–*पु*·[अ.] १ थैली; पैशाची पिशवी. २खलिता;लखोटा. ३खिसा.

**ख़रीद**—*स्त्री*· [फा.] खरेदी.

**खरीदना**–*क्रि.स*·[फा.] विकत घेणें.

**ख़रीद-फ़रोख़्त**–*यौ.–स्त्री*· [फा.] खरेदी-विक्री.

**ख़रीदार**–*पु*· [फा.] गिऱ्हाअीक.

**ख़रीदारी**–*स्त्री*· [फा.] खरेदी कर-ण्याची क्रिया.

**ख़रीफ़**–*स्त्री*· [अ.] खरीपाचें पीक.

**खरोंच**–*स्त्री*· ओरखडा.

**खरोंचना**–*क्रि. स*· १ ओरखडणें; बोचकारा काढणें. २ खरडणें.

**खरौंट**–*स्त्री*· ओरखडा; बोचकारा.

**खरौंहा**–*वि*· किंचित् खारट.

**ख़र्च–र्चा**–*पु*· [फा.] खर्च.

**ख़र्चीला**–*वि*· [फा.] १ खर्चिक; अुधळया. २ पुष्कळ खर्चाचें.

**खर्राटा**–*पु*· [अनु.] घोरणें. (मु.) **खर्राटा भरना; मारना,** अथवा **लेना**–डाराडूर निजणें; घोरणें.

**खर्व**—*वि*· १ अपंग. २ लहान. ३ ठेंगणा. ४ शंभर अब्ज.

**खल**–*वि*· नीच; दुर्जन; अधम; दुष्ट; चहाडखोर.

**खल**–*पु*· १ जागा; पृथ्वी. २ खल (खलबत्त्यांतील) ३ मोठा दगड. (मु.) **खल करना**–खलून बारीक करणें. **खल होना**–चूरचूर होणें.

**खलअी***–*स्त्री*·दुष्टावा; वाअीटपणा.

**ख़लक़**–*पु*· [अ.] १ निर्मित सृष्टि. २ जग; विश्व.

**ख़लक़त**-*पु*·[अ.]१जग. २जनसमूह.

**खलडी**–*स्त्री*· कातडें.

**खलता**–*पु*· मोठा थैला.

**खलता**–*स्त्री*· नीचता; दुष्टावा.

**खलना**–*क्रि. अ*· वाअीट वाटणें; मनाला लागणें.

**खलबल**–*स्त्री*· [अनु.] १ खळबळ; गडबड. २ घाबरें, व्याकुळ होणें. ३ गोंगाट; गोंधळ.

**खलबलाना**–*क्रि. अ*·[अनु.] खळ-बळणें; अुकळणें.

**खलबली**–*स्त्री*· [अनु.] खळबळ.

**ख़लल**—*पु*· [ अ. ] अडथळा; आडकाठी.

**खलाना***—*क्रि.स.*[अ.] १ रिकामें करणें. २ खळगा करणें. ३ पिचणें; आंत दावणें. (मु.) **पेट खलाना**—रिकामें पोट दाबून दाखविणें; पोटावर हात मारणें.

**खलाल**—*पु.* [अ.] दांत-कोरणें.

**ख़लास**—*वि.* [अ.] १ खलास; समाप्त. २ सुटलेला; मुक्त.

**खलासी**—*स्त्री.*[अ.]सुटका; मुक्तता. *पु.* १ खलाशी. २ तोफ डागणारा; गोलंदाज.

**खलित***—*वि.* स्खलन पावलेला; पदच्युत झालेला; स्खलित.

**खलियान**—*पु.*१ खळें.२ रास; ढीग.

**खलियाना**—*क्रि. स.* १ कातडें काढणें, सोलणें. २ रिकामें करणें; मोकळें करणें.

**खलिहान**—*पु.* पाहा 'खलियान'

**ख़लिश**—*स्त्री.* [फा.] १ बोंच; टोंचणी; २ दुःख;क्लेश. ३ चिंता; अंदेशा; भीति.

**खली**—*स्त्री.* पेंड.

**ख़लीक़**—*वि.* [अ.] १ सुस्वभावी; सुशील. २ मनमिळाऊ.

**ख़लीज**—*स्त्री.* [अ.]खाडी;अुपसागर.

**ख़लीफ़ा**—*पु.* [अ.] १ खलीफा; वारस. २ अधिकारी. ३ न्हावी. ४ वयोवृद्ध व्यक्ति.

**ख़लील**—*पु.* [अ.] खरा मित्र.

**ख़ल्क**—*पु.* पाहा 'खलक'.

**खल्वाट**—*पु.* टक्कल. *वि.* टक्कल पडलेला; टकल्या.

**खवा***—*पु.* खांदा. [वयास घालणें.

**खवाना***—*क्रि. स.* खावविणें; जेवा-

**ख़वास**—*पु.* [अ.] हुजऱ्या; शागीर्द.

**खवासी**—*स्त्री.*[अ.]शागीर्दी;चाकरी.

**खवैया**—*पु.* १ खादाड.२ खाणारा.

**ख़शख़ाश**—*स्त्री* [फा.] खसखस.

**ख़स**—*स्त्री.* [फा.] खस; वाळा.

**खसकंत***—*स्त्री.*निसटणें. [सटकणें.

**खसकना**—*क्रि.अ.* [अनु.] निसटणें;

**खसकाना**—*क्रि. स.* [अनु.] १ सरकविणें; हटविणें; बाजूला सारणें. २ हळूंच पळविणें.

**खसखस**—*स्त्री.* खसखस.

**खसख़ाना**—*पु.* [फा.] वाळयाचे पडदे लावलेली खोली. [रंगाचा.

**खसखासी**—*वि.* निळसर पांढऱ्या

**ख़सम**—*पु.* [अ.] १ पति; नवरा. २ स्वामी; मालक.

**ख़सरा**—*पु.*[अ.] १ चोपडी; बुक. २ शेताचें नोंदणी-बुक. ३ जमाखर्चाची चोपडी. [२ संवय. २ गुण.

**ख़सलत**—*स्त्री.* [अ.] १ स्वभाव;

**खसी**—*पु.* [अ.] १ खच्ची केलेला बैल. २ नपुंसक. ३ बकरा.

**खसिया**– *वि.* खच्ची केलेला; नपुंसक.
**खसियाना**–*क्रि. स.* खच्ची करणें.
**ख़सीस**–*वि.* [*अ.*] १ कृपण; कंजूष. २ दुष्ट; वाअीट. ३ अयोग्य.
**खसोट**–*स्त्री.* १ अुपटून काढणें. २ ओरखडणें. ३ ओढाताण; झोंबाझोंबी. ४ छिनावणें.
**खसोटना**–*क्रि. स.* १ अुखडणें; अुपटून टाकणें. २ हिसकावून वेणें; छिनावणें.
**खसोटा**–*पु.* कुस्तीचा अेक पेंच.
**ख़स्ता**–*वि.* [फा.] १ खुसखुशीत; खमंग. २ घायाळ. ३ दुःखी.
**ख़स्ताकचौडी**–*स्त्री.* [फा. + दे] खुसखुशीत बटाटेवडा.
**ख़स्ताहाल**–*वि.* [फा.] दुर्दशाग्रस्त.
**खाँइ***–*स्त्री.* धूळ. [सुळा, दांत.
**खाँग**–*पु.* १ न्यूनता; कमतरता. २
**खाँगड़, खाँगड़ा**–*वि.* १ अणकुचीदार; सुळेदार. २ हत्यारबंद. ३ बळकट. ४ अुद्धट; अुच्छृंखल.
**खाँगना***–*क्रि. अ.* खंगणें; कमी होणें.
**खाँगी***–*स्त्री.* कमतरता; अुणीव; तोटा. [खूण. ३ जडणकाम.
**खाँच**–*स्त्री.* १ सांधा; जोड. २ रेघोटी;
**खाँचना***–*क्रि. स.* १ रेखाटणें. २ चिह्न करणें. ३ आकर्षित करणें.
**खाँचा**—*पु.* पाटी; हारा; टोपली (मोठी). [गुळी साखर.
**खाँड**–*स्त्री.* स्वच्छ न केलेली साखर;
**खाँडना**–*क्रि. स.* खांडके पाडणें.
**खाँडा**–*पु.* दुधारी तलवार.
**खाँडा**–*पु.* १ तुकडा. २ भाग; अंश.
**खाँपना**–*क्रि. स.* १ खोवणें. २ लावणें. ३ खाटेची वीण आवळणें.
**खाँवाँ**–*पु.* रुंद व मोठा खंदक.
**खाँसना**–*क्रि. अ.* खोकणें; खांकरणें.
**खाँसी**–*स्त्री.* खोकला.
**खाअी**–*स्त्री.* खंदक.
**खाअू**–*वि.* खादाड.
**ख़ाक**–*स्त्री.* [फा.] माती; धूळ. (मु.) **ख़ाकमें मिलना**–धुळीस मिळणें. **ख़ाक छानना**–दीनवाणें फिरणें. *वि.* तुच्छ; अकिंचन.
**ख़ाकसार**—*वि.* [फा.] तुच्छ- (विशेषतः नम्रता प्रगट करण्याकरितां स्वतःस हें विशेषण लावतात.
**ख़ाका**—*पु.* [फा.] १ रूपरेषा; आराखडा; कच्चा नकाशा. २ मसुदा. ३ कच्ची यादी. ४ खर्चाचें अंदाजपत्रक. (मु.) **ख़ाका अुडाना**- रेवडी अुडविणें; टर अुडविणें.
**ख़ाकी**–*वि.* [फा.] १ पडीक (जमीन). २ खाकी रंगाचा.
**खाजा**–*पु.* १ खाद्य वस्तु. २ अेक मिठाअी.

**खाट**–स्त्री· बाज; खाट.
**खाडी**–स्त्री·आखात. [२अंत; मृत्यु.
**ख़ातमा**–पु· [अ·]१ शेवट; निकाल.
**खाता**–पु· खातें.
**ख़ातिर**–स्त्री· [अ·] आदर;सन्मान. अव्य. साठीं; करितां.
**ख़ातिरख़्वाह**—क्रि· वि· अव्य. [अ·] अनुरूप; यथेच्छ; मनाजोगा; मनपसंत.
**ख़ातिरजमा**–स्त्री· [अ·] खात्री; समाधान; खातरजमा.
**ख़ातिरदारी**–स्त्री· [अ· + फा.] आगतस्वागत; मानसन्मान; आदरातिथ्य. [२ सांत्वन; संतोष.
**ख़ातिरी**-स्त्री·[अ·] १ आदरा-तिथ्य.
**ख़ातून**–स्त्री· [तु.] १ विदुषी. २ सभ्य स्त्री.
**खाद**–स्त्री· खत; राब.
**खांदर**–पु· सपाटीची जमीन.
**ख़ादिम**—पु·· [अ·] मुसलमानी तीर्थस्थानचा पुजारी किंवा अधिकारी. २ सेवक. [विणीचें कापड.
**खादी**–स्त्री· हातसुताचें व हात-
**खादी**–वि· १ खाणारा. २ कांटेरी.
**ख़ान**–पु· [फा.] सरदार; अुमराव.
**खान**–पु· १ जेवणखाण. २ जेवण्याची पद्धत. ३ भोजनसामुग्री.
**ख़ानक़ाह**–स्त्री· [अ·] मठ; विहार (मुसलमानी).
**ख़ानगी**–वि· [फा.] खाजगी; घरगुती. स्त्री· नायकीण; वेश्या.
**ख़ानदान**–पु· [फा.] कुळ; वंश; घराणें. **खानदानी**–वि· १ अुच्चकुलीन. २ वंशपरंपरागत.
**खानपान**–पु· १ जेवणखाण. २ अन्नपाणी; दाणापाणी. ३ रोटीव्यवहार. ४ जेवण्याची पद्धति.
**ख़ानम**–स्त्री· [फा.] १ खानाची बायको. २ सभ्य स्त्री·
**ख़ानसामाँ**–पु· [फा] बबरची; अिंग्रजांचा किंवा मुसलमानांचा स्वयंपाकी.
**खाना**–क्रि· स· १ खाणें; जेवणें. २ गिळणें; गट्ट करणें. ३ फस्त करणें. ४ लांच घेणें. ५ सहन करणें; सोसणें. (मु.) **मुँहकी खाना**– १ तोंडघशीं पडणें. २ हारणें; पराजित होणें.
**ख़ाना**—पु· [फा.] १ घर; स्थान (अुदा. दवाखाना). २ कप्पा; खण. ३रकाना; कोष्टक. ४घराचा भाग.
**ख़ानाख़राब**–वि· [फा] १ ज्याचें घरदार अुध्वस्त झालें आहे असा. २ लफंगा; अुडाणटप्पू.
**ख़ानाजंगी**–स्त्री· [फा] गृहयुद्ध; यादवी; गृहकलह.

**खा़नातलाशी**–स्त्री· [फा. + तु.] घराची झडती.

**खा़नापुरी**–स्त्री·[फा. + हि.] कोष्टक भरण्याचें काम.

**खा़नाबदोश**–वि· [फा.] घरदार [नसलेला.

**खा़नाशुमारी**–स्त्री· [फा.] गांवांतील घरांची खानेसुमारी.

**खानि***स्त्री· १ खाण. २ दिशा; बाजू. ३ तऱ्हा; प्रकार.

**खानिक***–स्त्री· खाण.

**खा़म**–वि· [फा.] १ कच्चा; अपरिपक्व. २ बाओीट. [विचार.

**खा़मख़याली**–स्त्री· [फा.] निरर्थक

**खा़मखा़ह**–क्रि·वि· [फा.], जाणून बुजून; हेतुपुरस्सर. २ जबर्दस्तीनें. ३ अवश्य.

**खा़मी**–स्त्री· [फा.] अुणीव.

**खा़मुशी**-स्त्री·[फा.]पाहा'खा़मोशी'

**खा़मोश**–वि· [फा.] गप्प; चूप.

**खा़मोशी**–स्त्री· [फा.] मौन; स्तब्धता; शांतता.

**खाया**–पु· [फौ.] १ अंडकोश. २ कोंबडीचें अंडें. (यौ.) **खा़या बरदारी**–स्त्री· खुशामत. [द्वेष.

**खा़र**–पु· [फा.] १ कांटा. २असूया;

**खा़रदार**–वि· [फा]. कांटेरी

**खारा**–वि· पु· १ खारट. २ बेचव.

**खारिक***–पु· खारीक.

**खा़रिज**–वि· [अ·] १ फेटाळून लावलेला; रद्द केलेला. २ वेगळा; भिन्न; अलग.

**खा़रिश**–स्त्री· [फा.] खरूज; खाज.

**खारुआँ**–पु· १ अेक तांबडा भडक रंग. २ या रंगाचें कापड.

**खा़ल**–स्त्री· १ चामडी; कातडी. २ भाता. ३ मृत शरीर. ४ मोट. (म.) **खाल अुधेडना** अथवा **खींचना**–पाठीचें धिरडें काढणें, बेदम मारणें.

**खाल**–स्त्री· १ खोलगट, सखल जमीन. २आखात. ३रिकामी जागा.

**खा़लसा**–पु· [अ·] १ सरकारच्या मालकीची जमीन. २ शीख.

**खाला**–वि· खोलगट; सखल.

**खा़ला**–स्त्री· [अ·] मावशी. (मु.) **खा़लाजीका घर**–फुकटची खीर.

**खाला**–स्त्री· १ सखल जमीन. २ रिकामी जागा. ३ खाडी.

**खा़लिक**–पु· [अ·]सृष्टिकर्ता;अीश्वर.

**खा़लिस**–वि· [अ·] शुद्ध; पवित्र; निर्भेळ.

**खा़ली**–वि· [अ·] १ रिकामा; रिता; मोकळा. २ वृथा; वांया. ३ निरुपयोगी. ४ वापरांत नसलेली (वस्तु). ५ रहित; विहीन; वांचून.

**खा़लू**–पु· [अ·] मावसा; मावशीचा

नवरा. [ खावंद; धनी; मालक.
**खाविंद**–पु. [ फा. ] १ पति. २
**ख़ाशाक**–पु. [ फा. ] केरकचरा.
**ख़ास**–*वि.* [*अ.*] १ विशेष; प्रमुख. २ खाजगी; स्वतःचा. ३ निखालस; शुद्ध. (मु.) **ख़ासकर**–विशेषतः; मुख्यतः.
**ख़ासक़लम**–पु. [ *अ.* ] प्रायव्हेट सेक्रेटरी. [ स्वतःचें
**ख़ासगी**–*वि.* [ *अ.* ] खाजगी;
**ख़ासबरदार**–पु. [ *अ.* + फा. ] भालदार–चोपदार.
**ख़ासा**–*वि.* [ *अ.* ] १ चांगला; अुत्तम. २ निकोप; निरोगी. ३ सुंदर; सुरेख. ४ भरपूर; पुरेसें पु. १ खाशा स्वारीचें भोजन, वाहन आदि. २ अेक प्रकारची अुंची मलमल.
**ख़ासियत**–*स्त्री.* [*अ.*] १ विशेषता; वैशिष्टय. २ स्वभाव; संवय. ३ गुणधर्म. [ वापरावयाचें शस्त्र.
**ख़ासी**–*स्त्री.* [ *अ.* ] केवळ राजानें
**ख़ाहमख़ाह**–*क्रि. वि.* [ फा.] पाहा 'ख्वाहम ख्वाह' [ताणलें जाणें.
**खिंचना**–*क्रि. अ.* ओढलें जाणें;
**खिँचवा**–*वि. पु.* ओढणारा; नावेला दोर बांधून किनाऱ्यावरून ओढणारा.
**खिंचवाना, खिंचाना**—*क्रि. स.* दुसऱ्याकडून ओढविणें. अगर ताणविणें. [२ ओढण्याची मजुरी.
**खिंचाअी**—*स्त्री.* १ ओढाताण.
**खिंचाव**–पु. ताण. [पसरविणें.
**खिंडाना***––*क्रि. स.* विखुरणें;
**खिचडवार**–पु. मकरसंक्रांत.
**खिचड़ी**–*स्त्री.* खिचडी. (मु.) **खिचडी पकाना**–गुप्त सल्लामसलत करणें. *वि.* १ भेसळ;; गोंधळ; गडबड. (मु.) **ढाअी चावलकी खिचडी अलग पकाना** – आपला सवता सुभा अुभारणें.
**खिजना**–*क्रि. अ.* चिडणें; रागावणें.
**खिजलाना**—*क्रि. अ.* चिडणें; *क्रि. स.* चिडविणें. [२पडता काळ.
**ख़िज़ाँ**–*स्त्री.* [ फा. ] १ हेमंत ऋतु.
**ख़िज़ाब** पु.[*अ.*]कलप. [खजीलपणा.
**खिजालत**–*स्त्री.* [*अ.*] लज्जा; शरम;
**खिझना**–*क्रि. अ.* चिडणें; त्रागा करणें. [ खिजविणें.
**खिझाना**—*क्रि. सं.* चिडविणें;
**खिडकना**–*क्रि. अ.* पाय काढणें; निघून जाणें; बाजूला होणें.
**खिडकाना**–*क्रि. स.* १ निकालांत काढणें; विकून टाकणें; २ बाजूला सारणें.
**खिडकी**–*स्त्री.* खिडकी.

**ख़िताब**–*पु.* [*अ.*] किताब; पदवी.
**ख़ित्ता**–*पु.* [*अ.*] प्रदेश; प्रांत.
**ख़िद्मत**–*स्त्री.* [*अ.*] सेवा; चाकरी.
**ख़िद्मतगार**–*पु.* [*अ.* + फा.] चाकर; सेवक.
**ख़िद्मती**–*वि.* [फा.] १ चाकरी बद्दल मिळणारें (वेतन). २ कष्टाळू (सेवक). [बहु-वचन.
**ख़िद्मात**–*स्त्री.* [*अ.*] 'ख़िदमत'चें
**खिन***–*पु.* क्षण.
**खिन्न**–*वि.* १ अुदासीन; चिंतित. २ दीन; असहाय्य. ३ नाराज; अप्रसन्न.
**खिपना***–*क्रि. अ.* १ खपणें; खर्च होणें; व्यतीत होणें. २ तादात्म्य पावणें; तल्लीन होणें. [विश्वासघात.
**ख़ियानत**–*स्त्री.* [*अ.*] दगा;
**खियाना**–*क्रि. अ.* झिजणें.
**खिर**–*स्त्री.* (दे.) विणकराचा धोटा.
**ख़िरद**–*स्त्री.* [फा.] बुद्धि; अक्कल.
**खिरनी**–*स्त्री.* खिरणीचें झाड व फळ.
**ख़िरमन**–*पु.* [फा.] १ रास; ढीग; २ खळें.
**ख़िराज**–*पु.* [*अ.*] कर; खंडणी.
**ख़िलअत**–*स्त्री.* [*अ.*] मानाचीं वस्त्रें.
**ख़िलक़त**–*स्त्री.* [*अ.*] १ सृष्टि; जग. २ जनसमूह. ३ गर्दी.
**खिलखिलाना**–*क्रि. अ.* [अनु.] मोठमोठ्यानें हंसणें; खदांखदां हंसणें.
**खिलना**–*क्रि. अ.* १ अुमलणें; विकसणें. २ प्रफुल्लित होणें. ३ शोभणें. ४ अुलणें. [निर्जन स्थान.
**ख़िलवत**–*स्त्री.* [*अ.*] अेकान्त;
**ख़िलवतख़ाना**–*पु.* [अ. + फा.] गुप्त सल्लामसलत करण्याची जागा.
**खिलवाड़, खेलवाड़**–*पु.* खेळ; मौज.
**खिलवाना**–*क्रि. स.* दुसऱ्याकडून खाअू घालणें किंवा भरविणें.
**खिलाअी**–*स्त्री.* खाणें; जेवणखाण.
**खिलाअी**–*स्त्री.* लहान मुलांना खेळविणारी दाअी किंवा मोलकरीण.
**खिलाड़ी**–*पु.* १ खेळाडू. २ डोंबारी. ३ कसरत्या.
**खिलाना**–*क्रि. स.* १ जेववीणें. २ शपथ घेववीणें. ३ खेळविणें.
**ख़िलाफ़**–*वि.* [*अ.*] प्रतिकूल; विरुद्ध; अुलट.
**ख़िलाफ़त**–*स्त्री.* [*अ.*] १ खलीफाचें पद. २ वारसा. ३ सर्व मुसलमान बादशहांवर असणारी खलीफाची राजवट.
**ख़िलाफ़वर्ज़ी**–*स्त्री.* [अ. + फा.] १ अवज्ञा. २ विरुद्ध आचरण.
**खिलौना**–*पु.* खेळणें (बाहुली वगैरे).
**ख़िल्त**–*पु.* [*अ.*] कफ़. (यौ.)

**खिल्तमिल्त**–मिसळलेला.
**खिल्ली**–*स्त्री*· १ हंसा; विनोद. २ थट्टा; मस्करी. ३ विडा.
**खिल्लीबाज़**–*वि*· [ सं· + फा. ] थट्टेखोर. [ चुकवून जाणें.
**खिसकना**–*क्रि.अ*· निसटणें; नजर
**खिसाना***–*क्रि· अ*· १ संतापणें; रागावणें; नाखुश होणें; लज्जित होणें; शरमणें. [ नुकसान.
**खिसारा**–*पु*· [ फा. ] तोटा; हानि;
**खिसियाना**–*क्रि· अ*· १ चिडणें. २ कातावणें; रागावणें. ३ लाजणें; शरमणें. ४ रुसणें.
**खिसी***–*स्त्री*· लाज; शरम.
**खींच**–*स्त्री*· ओढ; ताण; तणाव.
**खींचतान, खींचाखींची, खींचातानी**–*स्त्री*· १ ओढाताण. २ परस्परांविरुद्ध कारवाओ.
**खींचना**—*क्रि· स*· १ ओढणें. २ ताणणें. ३ पिळणें. ४ आकर्षित करणें. ५ (दारू अित्यादि) गाळणें. ६ ( अर्क वगैरे ) काढणें.
**खीखर**–*पु*· [ दे. ] अेक प्रकारचें रानमांजर. [ चिडण्याजोगी गोष्ट.
**खीज**–*स्त्री*· १ चीड; त्रागा. २
**खीजना–खीझना**–*क्रि· अ*· चिडणें. त्रागा करणें. **खीझ**–*स्त्री*· खिजवणी; चिरड; चीड.
**खीन***–*वि*· १ क्षीण; दुर्बल. २ सूक्ष्म. **खीनता**–*स्त्री*· दौर्बल्य. क्षीणता. **खीनताओ**–*स्त्री*·
**खीर**–*स्त्री*· खीर. ( मु. ) **खीर चटाना**–अुष्टावण करणें. लहान मुलांना प्रथम अन्न खाअू घालणें.
**खीरचटाओ**–*स्त्री*· अुष्टावण.
**खीरमोहन**–*पु*· अेक प्रकारची बंगाली मिठाओ.
**खीरा**–*पु*· खीरा काकडी; काकडी.
**खीरी**–*स्त्री*· खिरणीचें फळ.
**खीरी**–*स्त्री*· दुभत्या जनावराची कास. [ लाह्या.
**खील**–*स्त्री*· १ लाही. २ साळीच्या
**खील**–*स्त्री*· १ बायकांच्या नाकांतील चमकी. २ कांटा. ३ फोड वगैरेमध्यें दाटलेला पू. ४ पुष्कळ वर्षांनंतर लागवडीस आणलेली पडीक जमीन.
**खीलना**–*क्रि· स*· द्रोण, पत्रावळी टोंचणें.
**खीली**–*स्त्री*· विडा. [ २ पिशवी; थैली.
**खीसा**-*पु*· [ फा. ] १ खिसा
**खुँटकढवा**–*पु*· कानांतील मळ काढणारा. [ धोतर नेसण्याची पद्धत.
**खुँटिहओ***-*वि*· [ ? ] गुडघ्यावर
**खुंड**–*पु*· अेक प्रकारचें जाड गवत.
**खुआर***–*वि*· [ फा. ] १ आपन्न; बापुडा; दीन. २ नष्ट; नाश

पावलेला. ३ अपमानित.

**खुक्ख**–*वि*· १ मोकळा; रिता; २ कफल्लक. [ झाड.

**खुखडा**–*पु*· आंतुत पोखरलें गेलेलें

**खुखडी**–*स्त्री*· १ चातीवरील सुताची गुंडी. २ नेपाळी सुरा.

**खुगीर**–*पु*· [ फा. ] खोगीर. ( मु. ) **खुगीरकी भरती**–खोगीर भरती.

**खुचर, खुचुर**–*स्त्री*· व्यंग काढणें. दूषण देणें.

**खुजलाना, खुजाना**–*क्रि*· *स*· खाजविणें **खुजलाहट** स्त्री. खाज; कंडू. **खुजली**–*स्त्री*· १ खाज. २ खरूज. [ भीतियुक्त संशय.

**खुटक***–*स्त्री*· [ अनु ] संदेह, शंका;

**खुटकना**–*क्रि*· *स*· खुडणें; तोडणें.

**खुटका**–*पु*· [ अनु. ] १ बोलट. २ भीति; आशंका.

**खुटचाल***–*स्त्री*· १ खोटेपणा; छद्मी वागणूक. २ हलकटपणा; पाजीपणा. ३ दुराचरण. ४ खोडसाळपणा. **खुटचाली**–*वि*· १ हलकट. २ अुपद्व्यापी. ३ दुराचारी; बदफैली.

**खुटना***–*क्रि*· *अ*· १ संपणें; पूर्ण होणें. २ अुघडणें. ३ वेगळें होणें.

**खुटपन, खुटपना**–*पु*· १ खोटेपणा. २ दोष; अवगुण.

**खुटाअी**––*स्त्री*· खोटेपणा. [ होणें.

**खुटाना***–*क्रि*· *अ*· संपणें; खलास

**खुट्टी**–*स्त्री*· [?] जखमेवरील खपली.

**खुड्डी–, खुड्ढी**–*स्त्री*· शौचकुपांतील खड्डा किंवा पाय ठेवून बसण्याची जागा.

**खुतबा**—*पु*· [ फा. ] १ प्रशंसा; तारीफ. २ राजाची स्तुति व गादीवर आल्याची घोषणा. ३ प्रवचन ( प्रार्थनेनंतरचें ).

**खुतूत**–*पु*·[*अ*·] पत्रें; ('खत'चें बहु.)

**खुद्**–अव्य. [ फा. ] स्वतः ( मु. ) **खुद्बखुद्**–आपोआप.

**खुद्काश्त**–*स्त्री*· [ फा. ] कुळास न देतां स्वतः लागवड केलेली जमीन.

**खुद्कुशी**–*स्त्री*· [ फा. ] आत्महत्या.

**खुद्ग़रज़**–*वि*· [ फा. ] आपमतलबी; स्वार्थी. **खुद्ग़रज़ी**–*स्त्री*· स्वार्थ; आपलपोटेपणा; आपमतलबीपणा. [ खोदलें जाणें.

**खुद्ना**–*क्रि*· *अ*· खणलें जाणें;

**खुद्नुमा**–*वि*· [फा.] स्वतःचा बडेजाव दाखविणारा. २ घमेंडखोर.

**खुद्परस्त**–*वि*· [ फा. ] स्वार्थी.

**खुद्फ़रामोशी**—*स्त्री*· [ फा. ] आत्मविस्मृति.

**खुद्मुख़तार**–*वि*· [फा.] १ स्वतंत्रपणें वागण्यास मोकळीक असलेला.

२ स्वैर; अनियंत्रित.

**खुदरा**–पु. किरकोळ वस्तु.

**खुदवाअी**–स्त्री. खणण्याचें काम किंवा मजुरी.

**खुदवाना**–क्रि. स. खणविणें.

**ख़ुदा**–पु. [फा.] अीश्वर; परमात्मा.

**ख़ुदाअी**–स्त्री. [फा.] अीश्वरनिर्मित सृष्टि. वि. अीश्वरी; दैवी.

**खुदाअी**–स्त्री. पाहा 'खोदाअी'.

**ख़ुदाताला**–पु. [फा.] अीश्वर; परमात्मा. [दैवी.

**खुदा–दाद**–वि. [फा.] अीश्वरदत्त;

**ख़ुदापरस्त**–वि. [फा.] अीश्वर-पूजक; आस्तिक;

**ख़ुदावंदा**–पु. [फा.] १ मालक; स्वामी. २ बड्या लोकांकरितां अुपयोजिलें जाणारें संबोधन.

**ख़ुदा–हाफ़िज़**– [फा.] अीश्वर तुमचें रक्षण करो (निरोप घेतांना वापरला जाणारा वाक्प्रचार).

**खुदी**–स्त्री. १ अहंकार. २ अभिमान. ३ आत्मभाव.

**खुद्दी**–स्त्री. तांदळाची कणी.

**खुनकी**–स्त्री. [फा.] १ शीतलता; गारवा. २ आर्द्रता.

**खुनखुना**–पु. खुळखुळा

**खुनस**–स्त्री. राग; क्रोध; रुसवा.

**खुनसाना**–क्रि. अ. रागावणें; रुसणें.

**खुनसी**–वि. रागीट; हट्टी; दुराग्रही.

**ख़ुफ़िया**–वि. [अ.] १ गुप्त. २ लपलेला; अप्रगट. [कुंटणखाना.

**ख़ुफ़ियाख़ाना**–पु. [अ. + फा.]

**ख़ुफ़िया–पुलीस**–पु. [अ.+अिं.] हेर; गुप्त पोलीस.

**खुभी**–स्त्री. [अनु.] कानांत घाला-वयाची लवंग. [२ मद्यपात्र.

**खुम**–पु. [फा.] १ मातीची घागर.

**खुमान**–वि. दीर्घायुषी; आयुष्यमान् (आशीर्वाद).

**खुमार**–स्त्री. [अ.] १ कैफ; निशा; मद. २ जागरणामुळें आलेला थकवा. ३ नशा अुतरतांना येणारा थकवा. **खुमारी**–स्त्री.

**खुर्मी**–स्त्री. [दे.] १ दांतांत भर-लेली चांदी किंवा सोनें. २ हत्तीच्या दांतांवर घालावयाचें सोन्याचें कडें.

**खुरंड**– स्त्री. जखमेवरील खपली.

**खुर**–पु. जनावरांचे खूर.

**खुरखुर**–स्त्री. खरखर असा आवाज.

**खुरखुरा**–वि. १ खडबडीत २ खरखरीत. **खुरखुराना**–खोकल्या-मुळें घशांत खरखर होणें; खरखरणें.

**खुरखुराहट**–स्त्री. [अनु] १ घशां-तील खरखर. २ घोरतांना होणारा आवाज. [वडून काढलेली वस्तु.

**खुरचन**–स्त्री. १ खरवड. २ ख-

**खुरचना**—*क्रि.स.* खरडणें;खरवडणें.
**खुरचनी**—*स्त्री.* खरवडून काढण्याचें हत्यार.
**खुरचाली**—*वि.* कुरापत काढणारा.
**खुरजी**-*स्त्री.*[फा.]१ गोणी.२पडशी.
**खुरट**—*पु.*जनावरांच्या खुरांचा रोग.
**खुरदरा**—*वि.* [ फा. ] खडबडीत.
**ख़ुरदा, खुर्दा**—१ मोड (नाण्याची). २ बारीकसारीक वस्तू.
**खुरपका**—*पु.* जनावरांच्या जिभेवर व खुरांवर व्रण निघतात तो रोग.
**खुरपा**—*पु.* खुरपें; **खुरपी**—*स्त्री.*
**खुरफ़**—*पु.* [ अ. ] घोळाची भाजी.
**खुरमा, ख़ुर्मा**—*स्त्री.* [ फा. ] १ खारीक. २ अेक प्रकारचें पक्वान्न.
**खुरशीद-खुरशैद**—*पु.* [फा.] सूर्य.
**खुरहा**—*पु.* पाहा ‘ खुरट ’
**खुराक**—*स्त्री.* [ फा. ] १ भोजन; खाणें. २खाण्याचें प्रमाण. ३ चंदी.
**खुराकी**—*स्त्री.* [ फा. ] जेवण-खाणाच्या खर्चासाठीं दिलेले पैसे.
**खुराफ़ात**—*स्त्री.* [अ.] १ वाय-फळ बडबड. २ कुरापत; कुचाळी. ३ शिवीगाळ. ४ भांडण; तंटा.
**खुरिया**—*स्त्री.* [फा.] १ लहान वाटी. २ गुडघ्याची वाटी.
**खुरी**—*स्त्री.* घोड्याच्या टापेचें चिह्न. (मु.) **खुरी करना**—खुरानें जमीन खणणें. २ घाअी करणें.
**खुर्द**-*वि.* [फा.]१ लहान. २ फुटकळ.
**खुर्दबीन**—*स्त्री.*[फा.] सूक्ष्मदर्शक यंत्र.
**खुर्दबुर्द**—*पु.* [ फा. ] १ वाअीट मार्गानें मिळविलेलें धन. २अपव्यय.
**खुर्रम**—*वि.* [ फा. ] १ नुकताच शिंपडलेला. २ प्रसन्न; खुश.
**खुर्राट**—*वि.* [दे. ] १ अनुभवी वृद्ध म्हातारा. २ कावेबाज; धूर्त.
**खुलना**—*क्रि. अ.* १ अुघडणें; खुलें होणें; मोकळें होणें. २ सुटणें ( गांठ ). ३ प्रकट होणें; अुघड-कीस येणें. ४ सुरुवात होणें. ५ अुलणें; फाटणें. (मु.) **खुले आम;खुले खज़ाने; खुले मैदान**-अुघडपणें; जाहीरपणें.
**खुलवाना**—*क्रि. स.* अुघडविणें.
**खुला**—*वि. पु.* १ खुला; अुघडा. २ बंधनरहित; मोकळा. ३स्पष्ट;प्रकट.
**खुलासा**—*पु.*[अ.] सारांश; तात्पर्य. वि. १ मोकळा. २ अुघडअुघड. ३ स्पष्ट. [सरळपणा. ३ निष्ठा.
**खुलूस**—*पु.* [ अ. ] १ पावित्र्य. २
**खुल्क**—*पु.* [ अ. ] सौजन्य.
**खुल्लमखुल्ला** — *क्रि. वि.* अुघडअुघड; जाहीरपणें.
**खुश**—*वि.* [फा.] १ खुष; प्रसन्न. २ अुत्तम; चांगला (अुदा.-खुशहाल)

**खुशक़िस्मत, खुशनसीब**–*वि.* [फा. + अ.] भाग्यवान्; सुदैवी.
**खुशख़त**–*वि.* [फा.] सुंदर हस्ताक्षर असलेला; सुलेखक.
**खुशख़बरी**–*स्त्री.* [फा.] आनंददायक बातमी. [प्रिय.
**खुशगवार**–*वि.* [फा.] मनोहर;
**खुशदिल**–*वि.* [फा.] १ आनंदी; अुत्साही; प्रसन्नचित्त. २ गमत्या; थट्टेखोर. [काढणारा; सुलेखक.
**खुशनवीस**–*वि.* [फा.] सुन्दर अक्षर
**खुशनुमा**–*वि.* [फा.] सुंदर; मनोहर; चांगला दिसणारा. [घातलेला.
**खुशपोश**–*वि.* [फा.] सुंदर कपडे
**खुशबख्ती**–*स्त्री.* [फा.] भाग्य; सुदैव. [असलेला; चमकदार रंगाचा.
**खुशरंग**–*वि.* [फा.] सुंदर रंग
**खुशबू**–*स्त्री.* [फा.] सुगंध.
**खुशबूदार**–*वि.* [फा.] सुगंधी.
**खुशहाल**–*वि.* [फा.] १ सुखी; संपन्न. २ कुशल. [समजूत.
**खुशामद**–*स्त्री.* [फा.] खुशामत;
**खुशामदी**–*वि.* [फा.] हाँजीखोर; खुशामत्या. [लाळघोट्या.
**खुशामदी टट्टू**–*वि.* [फा.+अनु.]
**खुशी**–*स्त्री.* [फा.] १ आनंद; खुषी; प्रसन्नता. २ अिच्छा. [आनंदानें.
**खुशी–खुशी**–*क्रि. वि.* [फा.]
**खुश्क**–*वि.* [फा.] १ कोरडा; शुष्क. २ कांहीं अुत्पन्न नसलेला; कफल्लक. ३ नीरस. (**यौ.**) **खुश्कसाली**–*स्त्री.* [फा.] दुष्काळाचें वर्ष. **खुश्की**–*स्त्री.* [फा.] १ कोरडेपणा. २ नीरसता.
**खुसर**–*पु.* [फा.] श्वशुर; सासरा.
**खुसरू**–*पु.* [फा.] बादशाह; सम्राट्.
**खुसाल, खुस्याल***–*वि.* [फा.] खुशाल; आनंदी. [करून; विशेषतः.
**खुसूसन्**–*क्रि. वि.* [अ.] खास
**खुसूसियत**–*स्त्री.* [अ.] वैशिष्ट्य.
**खुही**–*स्त्री.* डोकीवर घेण्याची घोंगडीची खोळ.
**खूँ**–*पु.* [फा.] पाहा 'खून'.
**खूँख़ार**–*वि.* [फा.] १ निर्दय; क्रूर; भयावह; भयंकर. २ रक्तपिपासु.
**खूँट**–*पु.* १ कोना कोपरा; टोक. २ बाजू; दिशा. ३ भाग; हिस्सा.
**खूँट**–*स्त्री.* कानांतील मळ
**खूँटा**–*पु.* १ मेख. २ खुंटा.
**खूँटी**–*स्त्री.* १ खुंटी. २ ज्वारी वगैरेंचे खुंट (कापणीनंतर). ३ विटी. ४ हद्द; सीमा. [खिदळणें.
**खूँद**–*स्त्री.* घोड्याचें अुधळणें;
**खूँदना** *क्रि. अ.* १ नाचणें; पाय आपटणें. २ तुडविणें.
**खूँरेज़**–*वि.* [फा.] रक्तपात करणारा.

**खूँरेज़ी**–*स्त्री*· [ फा. ] रक्तपात.
**खू**–*स्त्री*· [ फा. ] स्वभाव; वृत्ति.
**खूटना***–*स्त्री*· *अ*· १ व्यतीत होणें. २ खुंटणें; बंद होणें; थांबणें.
**खून**–*पु*· [ फा. ] १ रक्त. २ खून; हत्या. (मु.) **खूनका घूंट पीना**–अपमान गिळून टाकणें;सहन करणें. **खूनका प्यासा**–रक्त – पिपासु. **खूनके आँसू बहाना**–अत्यंत शोक करणें. **खून ख़राबा-बी**–रक्तपात. **खून खौल अुठना**–रक्त अुसळणें; क्रोध येणें. **खून पीना**–रक्ताचा घोट घेणें. **खून सिरपर सवार होना**–खून चढणें.
**खूनी**–*वि*· [ फा. ] १ खून करणारा.
**खूब**–*वि*· [फा.] १ चांगला; भला; अुत्तम. २ खूप; पुष्कळ. *क्रि·वि*· चांगल्या किंवा अुत्तम तर्‍हेनें.
**खूबड खाबड**–*वि*· [अनु.] ओबड-धोबड.
**खूबसूरत**–*वि*· [ फा. ] सुंदर; रूपवान. *स्त्री*· **खूबसूरती**–सौंदर्य.
**खूबाँ**–*स्त्री*· [ फा. ] सुन्दर स्त्रिया.
**खूबानी**–*स्त्री*· [ फा. ] जरदाळू.
**खूबी**–*स्त्री*· [ फा. ] १ चांगुलपणा; अुत्तमता. २ वैशिष्ट्य; गुणविशेष.
**खूराक**–*स्त्री*· [ फा. ] १ खुराक; भोजन. २ औषधाची मात्रा.
**खूसट**–*पु*· घुबड. *वि*· १ अपशकुनी २ निर्बुद्ध. ३ अरसिक.
**खेत**–*पु*· १ शेत. २ पीक. ३ युद्धक्षेत्र (मु.) **खेत आना**–अथवा **रहना**–युद्धांत कामास येणें; मारलें जाणें. **खेत रखना**–युद्धांत विजय मिळविणें.
**खेतिहर**–*पु*· शेतकरी.
**खेती**–*स्त्री*· १ शेती. २ पीक.
**खेतीबाडी**–*स्त्री*· १ शेतीवाडी २ शेतीचें काम.
**खेद**–*पु*· १ खेद; दुःख. २ शैथिल्य; थकवा.
**खेदा**–*पु*· १ रान अुठविण्याचें काम; हांका. २ शिकार.
**खेना**–*क्रि· सं*· १ वल्हविणें. २ वेळ घालविणें; कालक्षेप करणें.
**खेप** *स्त्री*· खेप; अेका खेपेंत येण्या-अितकी वस्तु.
**खेपना**–*क्रि· स*· घालविणें; व्यतीत करणें.
**खेम***–*पु*· क्षेमकुशल.
**ख़ेमा**–*पु*· तंबू; डेरा; राहुटी.
**खेरा***– *पु*· खेडें.
**खेल**–*पु*· खेळ.
**खेलुआ** *पु*· [दे ] कातडें कमवण्याचें लांकडी अवजार.
**खेलक***–*पु*· खेळाडू.
**खेलना**–*क्रि· अ*· १ खेळणें; क्रीडा-विहार करणें. *क्रि· स*· करमणूक करणें. २ अभिनय करणें. (मु.) **जान** अथवा **जी पर खेलना**–

जिवावर उदार होणें. [मौज. २ खेळ.

**खेलवाड़**—पु. १ मनोरंजन; करमणूक;

**खेलवाड़ी; खेलाड़ी**—वि. १ खेळाडू; खेळणारा. २ खेळकर. ३ विनोदी; गमती; खिलाडू. पु. १ खेळकरी. २ तमासगीर; गारुडी.

**खेलवार***—पु. खेळ; हास्यविनोद; मौज; तमाशा. वि. खेळ करणारा.

**खेलाना**—क्रि. स. खेळविणें.

**खेव**—पु. [ दे. ] घोड्यांना आवडणारें अेक प्रकारचें गवत.

**खेवक*खेवट**—पु. नावाडी; कोळी.

**खेवट**—पु. पटवाऱ्याजवळील पट्टेकऱ्यांच्या नांवांची यादी, जींत प्रत्येक पट्टेदाराचा हिस्सा लिहिलेला असतो.

**खेवनहार**—पु. नावाडी.

**खेवा**—पु. १ नावेचें भाडें. २ नावेंतून नदी ओलांडणें. ३ खेप.

**खेवाअी**—१ नांव हाकारण्याची मजुरी. २ हांकारणी ( नावेची ).

**खेसारी**—स्त्री. १ लाख. २ अेक प्रकारचें कडधान्य.

**खेह, खेहर**—स्त्री. १ धूळ. २ भस्म.

**ख़ैर**—स्त्री. [ फा. ] क्षेमकुशल. अव्य. असो; अस्तु; कांहीं हरकत नाहीं; ठीक.

**ख़ैरख़्वाह**—वि. [अ. + फा.] शुभचिंतक; हितचिंतक; हितेच्छु.

**ख़ैरबाद**—पु. [ फा. ] खुशाल रहा ( निरोप घेतांना म्हणतात ).

**ख़ैरमक़दम**—पु. [ अ. ] स्वागत ( कोणी आलें असतां 'या, बसा' म्हणण्याची पद्धत ).

**ख़ैरात**—स्त्री. [ अ. ] दान; पुण्य.

**ख़ैरियत**—स्त्री. [ फा. ] १ क्षेमकुशल; खुशाली. २ आनंदमंगल; कल्याण; हित.

**खोंचा**—पु. पहा 'खोनचा'

**खोंचेवाला**—पु. भेळवाला.

**खोंडर**—पु. झाडाची ढोली; कोटर.

**खोंडा**—वि. १ बोथरा. २ पंगु.

**खोंरा**—पु. [ दे.] घरटें.

**खोंपा**—पु. वेणी; बुचडा.

**खोंसना**— क्रि. स. खोचणें; खुपसणें; खोंवणें.

**खोखला**—वि. पोकळ

**खोज**—स्त्री. १ शोध; तपास. २ ठसा; निशाणी. [धुंडाळणें.

**खोजना**—क्रि. स. शोधणें; हुडकणें;

**खोजबीन**—स्त्री. संशोधन.

**ख़ोजा**—पु. [ फा. ] पाहा 'ख्वाजा'

**खोट**—स्त्री. १ दोष; खोड. २ भेसळ; खोट. वि. दुष्ट; अवगुणी.

**खोटा**—वि. खोटा; असत्य. (मु.) **खोटी खरी सुनाना**-दटावणें; झिडकारणें.

**खोटता***—*स्त्री.* खोटेपणा.

**खोटाअी**—*स्त्री.* १ खोटेपणा; दुष्टावा. २ कपट; द्वेष. ३ दोष; वैगुण्य.

**खोड**—*स्त्री.* भुताचा किंवा देवाचा कोप. [तलि पोकळी; डोली.

**खोड़रा**—*पु.* जुन्या वृक्षाच्या खोडां-

**खोडा**—*वि.* ज्याचे पुढील दोन-तीन दांत पडले आहेत असा.

**ख़ोद**—*पु.* [ फा. ] शिरस्त्राण.

**खोद्ना**—*क्रि.स.* १ अुकरणें;खणणें. २ कोरणें; नक्षीकाम करणें. ३ चेतावीणें;अुत्तेजन देणें.४खरवडणें.

**खोद्वाना**—*क्रि. स.* खणाविणें.

**खोदाअी**—*स्त्री.* १ खणण्याचें काम; खोदणी. २ खणण्याची मजुरी.

**खोना**—*क्रि. स.* १ गहाळ करणें; हरवणें; गमावणें. २ विसरणें; टाकून येणें. ३ नासाडी करणें.*क्रि. अ.* गमावणें; गहाळ होणें.

**खोन्चा**—*पु.* [ फा. ] भेळवाल्याचा हारा ठेवण्याचा कामट्याचा स्टँड किंवा परात.

**खोपड़ा**—*पु.* १ डोक्याची कवटी. २ डोकें.३ नारळाचा गुंड; नारळ.

**खोपड़ी**—*स्त्री.* १ कवटी. २ डोकें. (मु.) **अंधी** अथवा **औंधी खोपड़ीका**—मूर्ख; बेअकली. **खोपडी खा जाना** अथवा **चाट जाना**—डोकें पिकविणें.

**खोपा**—*पु.* १ छप्पराचा कोपरा. २ घराचा रस्त्याला लागून असलेला कोपरा. ३ तीन पेडी वेणी. ४ वेणी.

**खोम***—*पु.* [ *अ.* ] १ जाति. २ समूह; झुंड.

**खोया**—*पु.* खवा.

**खोर**—*स्त्री.* १ अरुंद गल्ली; बोळ. २ जनावरांना चारा द्यावयाची डोणी.

**खोरना***—*क्रि.अ.*स्नान करणें;न्हाणें.

**खोरा**—*पु.* १ फुलपात्र; पेला; पाणी पिण्याचें भांडें. २ वाडगा.

**खोरि***—*स्त्री.* १ अरुंद गल्ली;बोळ. २ दोष; अवगुण. ३ चंदनाचें आडवें गंध. [चादर. **खोली**—*स्त्री.*

**खोल**—*पु.* १ खोळ; अभ्रा; २ जाड

**खोलना**—*क्रि. स.* १ अुघडणें. २ सोडणें. ३ मोकळें करणें; खुलें करणें. ४ काढणें ( दार वगैरे ). ५ प्रकट करणें. ६ भोंक पाडणें.

**खोह**—*स्त्री.* गुहा; कंदरा; गुंफा.

**खौफ़**—*पु.* [ *अ.* ] भीति; भय; दहशत. [भयानक.

**ख़ौफ़नाक**—*वि.* [ फा. ] भयंकर;

**खौर**—*स्त्री.* १ त्रिपुंड्र; चंदनाचें आडवें गंध. २ स्त्रियांचा अेक दागिना. ३ चंदनाची अुटी.

**खौरना**–*क्रि. स.* गंध लावणें.

**खौरा**–*पु.* खवडा; अेक प्रकारची खरूज. [अुकळणें; सळसळणें.

**खौलना**–*क्रि. अ.* अुतास येणें;

**खौलाना**– *क्रि. स* कढविणें; अुकळाविणें.

**ख्यात**–*वि.* विख्यात; प्रसिद्ध. **ख्याति**–*स्त्री.* ख्याति; प्रसिद्धि.

**ख़्याल**–*पु.* [*अ.*] १ लक्ष; ध्यान. २ विचार. ३ कल्पना. ४ स्मरण; आठवण. ५ आदर. ६ मत. **ख़्याली**–*वि.* कल्पित. (मु.) **ख़्याली पुलाव पकाना**–मनाचे मांडे खाणें; मनोराज्य करणें. **ख़्याल रखना**–लक्ष ठेवणें; लक्ष असणें.

**ख़्वाजा**–*पु.* [फा.] १ घरधनी. २ सरदार; पुढारी. ३ प्रतिष्ठित व्यक्ति. ४ अंतःपुरांतील हिजडा नोकर; कंचुकी. [२ स्वप्न.

**ख़्वाब**–*पु.* [फा.] १ झोंप; निद्रा.

**ख़्वार**–*वि.* [फा.] १ खाणारा; भक्षण करणारा. २ दुर्दशाग्रस्त. ३ तिरस्करणीय.

**ख़्वाह**–*वि.* [फा.] अिच्छुक. *स्त्री.* अिच्छा; कामना. अव्य. अथवा; किंवा; नाहींतर.

**ख़्वाहमख़्वाह**–*क्रि. वि.* [अ.] १ जबर्दस्तीनें. २ अवश्य; जरूर.

**ख़्वाहाँ**–*वि.* [फा.] अिच्छिणारा; अभिलाषी.

**ख़्वाहिश**–*स्त्री.* [फा.] अिच्छा; अभिलाषा; आकांक्षा. **ख़्वाहिश-मंद**–*वि.* अिच्छुक.

## ग

**गंग-बरार**–*पु.* [*सं.*+फा.] मळीची जमीन; नदीचा प्रवाह बदलल्यामुळें वर आलेला जमिनीचा भाग.

**गंग-शिकस्त**–*पु.* [*सं.* + फा.] प्रवाहानें वाहून गेलेली जमीन.

**गंगाजमनी**–*वि.* १ दोन रंगांचा. २ भेसळ; सरमिसळ.

**गंगाजमनी**–*स्त्री.* अनेक डाळी मिसळून केलेलें वरण.

**गंगाजली**–*स्त्री.* गंगेचें पाणी भरून ठेवण्याची सुरअी.

**गंगाद्वार**–*पु.* हरिद्वार.

**गंगाल**–*पु.* घंगाळ.

**गंगालाभ**–*पु.* मृत्यु.

**गंगासागर**–*पु.* जेथें गंगानदी समुद्राला मिळते तें कलकत्त्याजवळील तीर्थक्षेत्र.

**गंगोझ***–*पु.* गंगोदक; गंगाजल.

**गंगोत्तरी**–*स्त्री*· गंगोत्री; गंगेच्या अुगमाचें हिमालयांतील स्थान.

**गंज**–*पु*· १ डोक्याचे केस गळून पडण्याचा रोग;टक्कल.२ डोक्यावर पुरळ होणें.

**गंज**–*पु*· [फा.] १ ढीग; रास. २ धान्याचा बाजार; मंडी. ३ खजिना. ४ वस्तूंचा संचय.

**गंजन**–*पु*· १ अवज्ञा; तिरस्कार. २ नाश. ३ दुःख; पीडा. **गंजना**–*क्रि· स·* १ नाश करणें; चक्काचूर करणें. २ अवज्ञा करणें.

**गंजा**–*पु*· १ टक्कल पडलेला माणूस; टकल्या. २ डोक्याचे केस गळून पडण्याचा रोग.

**गँजिया**–*स्त्री*· १ गवत भरून नेण्याची जाळी. २ सुताची विणलेली जाळीदार पिशवी.

**गंजी**-*स्त्री*·[अिं.]गंजीफरास;बनियन.

**गंजी**–*स्त्री*·[फा.] रास; ढीग; गंज.

**गंजीफा**–*पु*· आठ रंगांच्या ९६ पत्त्यांनीं खेळावयाचा खेळ;गंजीफा.

**गँजेड़ी** -*वि*· गांजा पिणारा.

**गँठकटा**–*पु*· खिसेकापू.

**गँठजोड़ा, गँठबंधन**–*पु*· विवाहाचे वेळीं वर व वधूच्या पदरांची गांठ बांधण्याची पद्धत; मैत्री.

**गंड**–*पु*· १ गाल. २ कानशील. ३ फोड. ४ गांठ. ५ चिह्न; खूण.

**गंडकी**–*स्त्री*· अुत्तर भारतांतील अेक नदी.

**गंडमाला**–*स्त्री*· गंडमाळा नांवाचा रोग.

**गँडरा**–*पु*· } १अेक प्रकारचें गवत.
**गँडरी**–*स्त्री*· } २अेक प्रकारचें धान्य.

**गंडा**–*पु*· १गांठ. २ मंतरलेला दोरा. ३चार वस्तूंचा समूह. ४ घोड्याच्या गळ्यांतील कवड्यांची माळ. ५ पोपटाचा कंठ. (मु.) **गंडाताबीज करना**—मंत्रतंत्र अगर गंडादोरा करून रोग बरा करणें.

**गँडासा**–*पु*· १ परशु. २ गवत कापण्याचा कोयता.

**गँड़ेरी**–*स्त्री*· अुंसाची गंडेरी; करवा.

**गंता**–*पु*· जाणारा.

**गंद्गी**–*स्त्री*· [फा.] १ अस्वच्छता; गलिच्छपणा; घाण. २ विष्ठा. ३ अपवित्रपणा; अशुद्धता.

**गंद्ना**–*पु*· अेक प्रकारचा मसाला (कांदा किंवा लसुणीच्या मसाल्यासारखा).

**गँद्ला**-*वि*·[फा.]घाणेरडा; अस्वच्छ; गलिच्छ.

**गंदा**–*वि*·[फा.]१घाणेरडा;गलिच्छ. २ मळकट; अस्वच्छ.

**गंदुम**– *पु*·[फा.] गहूं. **गंदुमी** *वि*· निमगोरा; गव्हाळी रंग.

**गंध**–*स्त्री*· १ वास; सुगंध. २ गंध;

चंदन. ३ लेशमात्र.

**गंधबिलाव**—*पु.* अेक प्रकारचें आफ्रिकेंतील मांजर. याच्या अंगांतून सुगंधी द्रव्य काढलें जातें.

**गंधर्व**—*पु.* १ पुराणानुसार देवयोनींतील अेक वर्ग; गंधर्व मुख्यतः संगीतप्रवीण असतात. २ पाटाचा नवरा. [घाण करणें.

**गंधाना**–*क्रि. स.* दुर्गंधित करणें;

**गंधाबिरोजा**–*पु.* [सं. + ?] अेका झाडाचा औषधी चीक; **गंधाबिरोझा**–*पु.* देवदारचा डिंक.

**गंधी**–*पु.* १ अत्तरें, सुगंधी तेलें अि. विकणारा. २ अेक प्रकारचें गवत. ३ अेक किडा.

**गंधीला***–*वि.* घाणेरडा. [शांत.

**गंभीर**–*वि.* गंभीर; गहन; गूढ; खोल;

**गँवँ***–*स्त्री.* १ संधि; वेळ; योग. २ अुपाय; युक्ति. ३ हेतु; मतलब. ४ पाळत.

**गँवअी**–*स्त्री.* १ लहान गांव; खेडें. २ खेड्यांतील वस्ती.

**गँवना***–*क्रि. अ.* जाणें.

**गँवरमसला**–*पु.* [सं. + अ.] १ ग्रामीण वाक्‌प्रचार किंवा म्हण. खेडवळांचा वाक्‌प्रचार.

**गँवाना**–*क्रि. स.* १ कालक्षेप करणें; वेळ घालविणें. २ हरविणें; गमविणें.

**गँवार-रू**–*वि.* १ खेडवळ; गांवठी. २ असभ्य; अशिष्ट. ३ अडाणी; मूर्ख.

**गँवारी**–*स्त्री.* १ खेडवळपणा; अडाणीपणा. २ मूर्खता. ३ अडाणी. *स्त्री. वि.* १ अडाणी; गांवढळ. २ कुरूप. [स्त्री.

**गँवेली**—*स्त्री.* खेडवळ स्त्री; अडाणी

**गँस***—*पु.* १ हाडवैर. २ वर्मी लागणारी गोष्ट.

**गँस***–*स्त्री.* बाणाचें टोंक.

**गँसना***–*क्रि. स.* १ घट्ट आंवळून बांधणें; जखडणें. २ विणतांना धागे घट्ट करणें.

**गँसीला**–*वि.* १ घट्ट; मजबूत विणीचा; दणकट. २ अणकुचीदार.

**गअींद**–१ गजेंद्र. २ मोठा हत्ती.

**गअीबहोर**–*वि.* १ हरवलेली वस्तु पुन्हां मिळविणारा. २ बिघडलेल्या कामाची घडी बसविणारा.

**गअू**—*स्त्री.* गाय.

**गगन**–*पु.* आकाश.

**गगनभेड**—*स्त्री.* सारस पक्षी.

**गगरा**—*पु.* घागर. [लहान घागर.

**गगरिया, गगरी**–*स्त्री.* कळशी;

**गच**–*पु.* [अनु.] १ फरशीची जमीन. २ गच्ची. ३ चुनेगच्ची बनवावयाचा मसाला.

**गचकारी, गचगिरी**–*स्त्री.* [अनु.

+ फा. ] चुनेगच्चीचें काम.

**गचाका**–*क्रि. वि.* भरपूर.

**गचाका**–*स्त्री.* [ दे. ] तारुण्यानें मुसमुसलेली स्त्री.

**गछना***–*क्रि. अ.* जाणें. *क्रि. स.* चालवून घेणें; निभावणें.

**गज**–*पु.* हत्ती

**गज़**–*पु.*[फा.] १ वार. २ ३६ अिंच लांबीची पट्टी. ३ अेक प्रकारचा तीर.

**ग़ज़क़**–*स्त्री.* [फा.] १ दारू प्याल्या. नंतर तोंडाची घाण जाण्यासाठीं खावयाचा पदार्थ ( मेळ, भजीं, अि. ) २ न्याहारी; फराळ. ३ तिळाची वडी.

**गजगाह**–*पु.* हत्तीची झूल.

**ग़ज़नफ़र**–*पु.*[*अ.*] १ सिंह. २ वाघ.

**ग़ज़ब**–*पु.* [*अ.*] १ गहजब; राग; संताप. २ जुलूम; अन्याय. ३ आपत्ति. ४ अनपेक्षित गोष्ट. (मु,) **ग़ज़बका**–१ विलक्षण; कमालीचा. २ अत्यंत वाओीट. **ग़ज़ब ढाना**–जुलूम करणें.

**गजर**–*पु.* गजर ( घड्याळ, घंटा, वाद्य अि. ) ( मु. ) **गजरदम**– भल्या पहाटेस. [ **गजरी**–*स्त्री.*

**गजरा**–*पु.* [ दे. ] गाजराचा पाला;

**गजरा**–*पु.* [ दे. ] १ वेणी. १ हार. ३ वेणींतील अगर हातांतील गजरा. ४ अेक प्रकारचें रेशमी कापड. **स्त्री-गजरी**– [ पाला.

**गजरौट**–*स्त्री.* [ दे. ] १ गाजराचा

**ग़ज़ल**–*स्त्री.* [ *अ.* ] फारसी किंवा अुर्दूतील अेक प्रकारची कविता; गझल. [ रवी.

**गजही**–*स्त्री.* दूध घुसळण्याची मोठी

**गज़ी**–*स्त्री.* [ फा. ] कमी पन्हयाचें जाडेंभरडें कापड; मांजरपाट.

**गजी**–*पु.* हत्तीवर बसणारा.

**गजी**–*स्त्री.* हत्तीण.

**गज्झा**–*पु.* बुडबुडा. [ दाट; जाड.

**गझिन**–*वि.* घट्ट विणींचें (कापड);

**गटकना**–*क्रि. स.*[अनु.] १ गिळणें; गट्ट करणें. २ गडप करणें; लांबविणें.

**गटगट**–*पु.* [ अनु. ] गटगट आवाज(पितांना होणारा आवाज).

**गटपट**–*स्त्री.* [अनु.] १ गाढ स्नेह; दाट परिचय. २ निकट सहवास.

**गट्टा**–*पु.* १ मनगट. २ पायाचा घोंटा.

**गट्ठर**–*पु.* मोठें गाठोडें; बोजकें.

**गट्ठा**–*पु.* १ भारा; मोळी; ओझें; कांदा किंवा लसूण अि. ची गांठ. ३ मोठें गाठोडें किंवा गठा.

**गठन**–*स्त्री.* घडण.

**गठना**–*क्रि. अ.* १ सांधलें किंवा जोडलें जाणें; जुळणें. २ लांब टाक्याची शिवण असणें. ३ वीण

घट्ट असणें. ४ गुप्त विचारांत सामील होणें. ५ वश होणें; गठला जाणें. ६ दाट मैत्री असणें; दृढ संबंध होणें. ( यौ. ) **गठा बदन**—प्रमाणबद्ध-कसलेलें शरीर.

**गठबंधन**—पु. पाहा 'गँठ जोडा'.

**गठरी**—स्त्री. १ गाठोडें; बोचकें. २ सांठविलेली संपत्ति. (मु.) **गठरी मारना**—ठकविणें; लांबविणें.

**गठवाना**—क्रि. स. १ गांठविणें; गांठून घेणें. २ जोड बसविणें; शिववून घेणें.

**गठाना**—क्रि. स. जाड वस्तूंची शिलाअी करणें; गांठविणें.

**गठिया**—स्त्री. १ ओझ्याचें पोतें; गोणी. २मोठें गाठोडें. ३ संधिवात.

**गठियाना**—क्रि. स. १ गांठ मारणें. २ वस्त्रांत बांधून घेणें.

**गठीला**—वि. गांठी गांठी असलेला.

**गठीला**—वि. १प्रमाणबद्ध; डौलदार. २ कसलेला; मजबूत; बळकट.

**गठौत-ती**—स्त्री. १ मैत्री; स्नेह. २ अेकत्र जमून नंतर झालेला निश्चय किंवा बेत. [तट. ३ खड्डा.

**गड**—पु. १ अडोसा. २ आवार;

**गडगड**—स्त्री. [अनु.] १ मेघ गरजण्याचा आवाज; गडगडाट. २ पोटांतील गुरगुर; आवाज.

**गडगडा**—पु.[अनु.] अेक प्रकारचा हुक्का; गुडगुडी.

**गुडगडाना**—क्रि.अ.कडाडणें;गडगड आवाज होणें. क्रि. स. गडगड आवाज करणें. **गडगडहाट**—स्त्री. गडगडाट; कडाडण्याचा आवाज.

**गडदार**—पु. [सं.+फा.] १ माहूत. २माजलेल्या हत्तीबरोबर चालणारा नोकर.

**गडना**—क्रि. अ. १ बोचणें; टोचणें. २ दुखणें; वेदना होणें; सलणें. ३ दबलें जाणें; गाडलें जाणें; पुरलें जाणें. ३ स्थिर होणें; जम बसणें.

**गडपना**—क्रि. स.[अनु.] १ गिळणें; गिळंकृत करणें. २ बळकावणें.

**गडप्पा**—पु. १ खळगा; खड्डा. २ ज़ाळ्यांत सांपडण्याची जागा.

**गडबडाना**—क्रि. अ. १ गोंधळणें; घोंटाळ्यांत पडणें. २ बिघडणें; अव्यवस्थित होणें. ३ अस्ताव्यस्त होणें. क्रि. स. भ्रमांत पाडणें; गोंधळांत पाडणें. ~२ बिघडवून टाकणें; बिघडविणें. [अुपद्व्यापी.

**गडबडिया**—वि.अुपद्रवी; गडबड्या;

**गडमड**—पु. गडबड; गोंधळ; घाल-मेल. [मेंढपाळ.

**गडरिया, गडेरिया**—पु. धनगर;

**गडहा**—पु. खळगा; खड्डा.

**गडही**–*स्त्री*· लहान खळगा.

**गडा**–*पु*· रास; ढीग.

**गडा**–*वि*· पुरलेला; गाडलेला. (मु.) **गडे मुर्दे अुखाडना**–अुखाळ्या पाखाळ्या काढणें.

**गडाकू**–*स्त्री*· अेक प्रकारची मासोळी.

**गडाना**–*क्रि· स*· टोंचणें; भोंसकणें; खुपसणें.

**गडाना**–*क्रि.स*· दुसऱ्याकडून पुरणें.

**गडायन***– *वि*· बोंचणारा; टोंचणारा.

**गडारी**–*स्त्री*· १ वर्तुळ; गोल रेषा. २ आडव्या धारी (वस्त्राच्या).

**गडारी**–*स्त्री*· कप्पी; चाक; गिरकी.

**गडारीदार**–*वि*.[सं+फा.] आडव्या रेषा असलेलें; धारीदार (कापड)

**गडुअी**–*स्त्री*· तोटी असलेली लोटी; झारी. [गडवा.

**गडुवा**–*पु*· तोटीदार लोटा; गडू;

**गडोना**–*क्रि· सं*· पाहा 'गडाना',

**गडोल**–*पु*· १ घांस. २ गूळ.

**गडोलना**–*पु*•[दे.] पांगुळगाडा.

**गड्डाम**–*वि*· पाजी; नीच.

**गड्डालिका**–*स्त्री*· अंधानुकरण.

**गड्डी**–*स्त्री*· चवड; चळत; रास;ढीग.

**गड्ढा**–*पु*· गड्ढा; खळगा; खड्डा.

**गढंत**–*वि*· कल्पित; बनावट (गोष्ट).

**गढ**–*पु*· १ गड; किल्ला. २ खाअी; खंदक. [डौल.

**गढन**–*स्त्री*· घडण; बनावट; घाट;

**गढना**–*क्रि· स*· १बनविणें. घडविणें. २ बनवून सांगणें; खोटेंनाटें रचणें.

**गढ़पति**–*पु*· किल्लेदार.

**गढा**–*पु*· पाहा 'गडहा'

**गढाअी**–*स्त्री*· १ घडणावळ. २ घडविण्याचें काम.

**गढाना**–*क्रि· स*· घडविणें; बनविणें;

**गढाना** *क्रि· अ*· कष्टकर वाटणें; दुःसह होणें.

**गढिया**–*पु*· घडणकाम करणारा.

**गढी**–*स्त्री*· लहान किल्ला.

**गढैया**–*वि*· घडविणारा; रचणारा.

**गण**–*पु*· १ समूह; समुदाय. २ श्रेणी. ३ छंदशास्त्रांतील तीन वर्णांचा अेक गट. ४ दूत; सेवक

**गणक**–*पु*· १मोजणारा २ज्योतिषी.

**गणतंत्र**–*पु*· लोकशाही.

**गणन**–*पु*· } गणती; हिशेब; संख्या.

**गणना**–*स्त्री*· } [संघराज्य.

**गणराज्य**–*पु*· लोकशाही पद्धतीचें

**गणित**–*पु*· गणित.

**गणितज्ञ**–*वि*· १ गणिती. २ज्योतिषी.

**गणेश**–*पु*· गणपति. (यौ.) **गणेशकुसुम**–लाल कण्हेर. **गणेशभूषण**–शेंदूर. [माननीय.

**गण्य–गण्यमान्य**–*वि*· प्रतिष्ठित;

**गत**–*वि.* १ झालेला; व्यतीत. २ मेलेला. ३ विरहित. *स्त्री.* १ गत; अवस्था. २ वाद्यांची गत; वादन (सतार, वीणा अि.). ३ दुर्दशा; दुर्गति. ४ अुपयोग. ५ नाचण्याचा ढंग; तऱ्हा. (मु.) **गत बनाना**–दुर्दशा करणें.

**गतका**–*पु.* गदगा (फरीगदगा).

**गतालखाता; गत्तालखाता**–*पु.* [*सं.* + *अ.*] बुडित खातें.

**गति**–*स्त्री.* १ वेग. २ गत. स्थिति. ३ शिरकाव. ४ दैव. ५ गम्य.

**गतिविधि**–*स्त्री.* रागरंग; हालचाल; रंगढंग; परिस्थिति.

**गत्ता**-*पु.* [दे.] पुठ्ठा; पुष्टिपत्र.

**गथ**–*पु.* १ धनसंपत्ति. २ माल. ३ झुंड; समूह.

**गथना***–*क्रि.स.* १ गुंफणें; ओवणें. २ गोष्टी बनविणें; थापा देणें.

**गद**–*पु.* १ व्याधि. २ विष.

**गदका**–*पु.* पाहा 'गतका'

**गदकारा**–*वि. पु.* [अनु.] मअू; गुबगुबीत. [२ बंड; अुठावणी.

**ग़दर**–*पु.*[*अ.*] १खळबळ; दंगाधोपा.

**गदरा**–*वि.* अर्धाकच्चा.

**गदराना**–*क्रि. अ.* [*अ.*] १ पिकणें; बहर येणें. २ यौवनावस्थेंत अंग भरणें. डोळ्यांस चिपडें येणें.

**गदला**–*वि.* [फा.] पाहा 'गँदला'.

**गदहपचीसी**–*स्त्री.* गद्धेपंचविशी.

**गदहपन**–*पु.* गाढवपणा; मूर्खपणा.

**गदहा**–*पु.*१गाढव.२मूर्ख; बेअकली.

**गदा**–*स्त्री.* गदा. [२ भिकारी.

**गदा**–*पु.* [फा.] १ भिक्षुक; फकीर.

**गदाअी**–*स्त्री.* [फा.] भिक्षावृत्ति. *वि.*१तुच्छ; नीच; क्षुद्र.२वाह्यात; रद्दी; कुचकामाचा. [रजअी.

**गदेला**–*पु.* [अनु.] जाड गादी किंवा

**गद्गद्**–*वि.* सद्गदित; आनंदाचें भरतें आलेला.

**गद्दर**–*वि.* [दे.] अर्धवट पिकलेला.

**गद्दा**–*पु.* [अनु.] १ जाड गादी. २ गठ्ठा; भारा (गवत, कापूस वगैरेचा). [बेअिमान; कृतघ्न.

**गद्दार**–*वि.* [*अ.*] १ बंडखोर. २

**गद्दी**–*स्त्री.* १ गादी. २ घामोळें (खोगीराखालीं घालावयाचें). ३ अधिकारपद. ४ तळहात किंवा तळपाय.

**गद्दीनशीन**–*वि.* [अनु. + फा.] १ गादीवर बसलेला; सिंहासनारूढ. २ वारस.

**गधा**–*पु.* गाढव. [२ झुंड; समूह.

**गन***–*पु.* १ गण; सेवक; अनुचर.

**गनगौर**–*स्त्री.* चैत्र शुद्ध तृतीया; गौरी बसण्याचा दिवस.

**ग़नी**–पु. [अ.] धनवान्; श्रीमंत.

**ग़नीम**-पु. [अ.] १ लुटारू; डाकू. २ शत्रु; वैरी; गनीम.

**ग़नीमत**–स्त्री. [अ.] १ लुटीचा माल. २ दुःखांत सुखाची गोष्ट. ३ सहजासहजीं हातीं लागलेली वस्तु.

**गन्ना**–पु. ऊंस.

**गप, गप्प**–स्त्री. १ गप्प; थाप; बनावट गोष्ट. २ अफवा. ३ बढाअी; गप्पागोष्टी. (यौ.) **गपशप**– १ अिकडच्या तिकडच्या गोष्टी. २ गप्पा.

**गप**–पु. [अनु.] १ अेकदम पदार्थ गिळल्यानें होणारा आवाज. २ भक्षण. (यौ.) **गपागप**–अेकदम; झटदिशीं.

**गपकना**–क्रि. अ. [अनु.] गिळणें; घशांत टाकणें; गिळंकृत करणें.

**गपडचौथ** स्त्री. १ भरमसाट किंवा विसंगत गप्पा. २ निरर्थक बडबड.

**गपना***–क्रि. स. गप्पा मारणें.

**गपोडा**–पु. गप्प; थाप; बनावट गोष्ट.

**गपोडिया**–पु. थापाड्या; गप्पीदास.

**गपोडेबाज़ी**–स्त्री. [हि. + फा]. थापेबाजी.

**गप्पा**–पु. फसवेगिरी; कपट.

**गप्पी**–वि. थापेबाज; गप्पीदास.

**गफ़**–वि. [फा.] घट्ट व दाट विणीचें (कापड).

**गफ़लत**–स्त्री. [अ.] १ निष्काळजीपणा; बेपर्वाअी. २ चूकभूल.

**गफ़ूर**–वि. [अ.] क्षमा करणारा (परमेश्वराचें अेक विशेषण).

**गफ्फा**–पु. [अनु.] १ मोठा घास. २ लाभ; फायदा.

**ग़फ़्फ़ार**–वि. [अ.] अत्यंत दयाळु (अीश्वर) [तफर.

**ग़बन**–पु. [अ.] ठेवीची अफरा-

**गबरू**–वि. [फा.] १ तरणाबांड; भर ज्वानींतला. २ भोळा; अननुभवी. [व मजबूत कापड.

**गबरून**–पु. [फा.] रेघारेघांचें जाड

**गब्बर**–वि. १ गबर; श्रीमंत. २ घमेंडी; गर्विष्ठ. ३ मठ्ठ; आळशी.

**गभीर**–वि. पाहा 'गंभीर'.

**गभुआर–वार**–वि. १ जावळ न काढलेला. २ जन्मल्यापासून ठेवलेलें (जावळ). ३ अज्ञ; नादान.

**गम**–स्त्री. प्रवेश; गति (अेखाद्या विषयामध्यें अगर वस्तूमध्यें).

**ग़म**––पु. [अ.] १ दुःख; शोक. २ चिंता; काळजी. (मु.) **ग़म खाना**–दुःख सहन करणें.

**गमक**–पु. १ गमन करणारा; जाणारा. २ सूचक. ३ तबल्याचा गंभीर आवाज.

**गमक**–*स्त्री*· सुगंध; घमघमाट [शील.
**ग़मख़ोर**–*वि*.–[*अ*· + फा. ]सहन-
**ग़मग़लत**–*पु*· [*अ*·] १ मनो-
रंजनाचें साधन. २ खेळ; तमाशा.
३ मद्य; दारू.
**ग़मगीं–ग़मगीन**–*वि*· [*अ*· + फा.]
१ अुदास; खिन्न. २ दुःखी.
**ग़मगुसार**–*वि*· [ अ + फा ] दुस-
ऱ्याचें दुःख दूर करणारा.
**गमछा**–*पु*· १ टॉवेल. २ पंचा.
**ग़मज़ा**–*पु*· [*अ*·] प्रेमिकेचा नखरा
किंवा हावभाव.
**गमत**–*पु*·१रस्ता; मार्ग. २ व्यवसाय.
**गमन**–*पु*· जाणें.
**गमना***–*क्रि*· *अ*·जाणें; गमत जाणें.
**गमला**–*पु*·[?] १ रोप लावण्याची
मातीची कुंडी; २ कमोड.
**गमाना***–*क्रि*· *स*· १ गमविणें;
वेळ घालविणें. २ हरविणें.
**ग़मी**–*स्त्री*· [*अ*·] १ मरणानंतरचा
शोक. २शोकाचा काल; सुतक.
३ मृत्यु; निधन.
**ग़म्माज़**–*पु*·[*अ*·]चहाडखोर; निंदक.
**गयंद***–*पु*· गजेंद्र. [४ प्राण.५पुत्र.
**गय**—*पु*·१ घर. २ धन. ३आकाश.
**गय***–- *पु*· हत्ती.
**गया**–(जाना *क्रि*· *अ*· चें भूत-
कालिक रूप) गेला. (मु.) **गया
गुज़रा–गया बीता**-अत्यंत निकृष्ट
अवस्थेस पोंचलेला; वांया गेलेला.
**गयावाल**— *पु*· गयेंतील पंड्या.
**गर**– *पु*· १ रोग. २ विष; गरळ.
**गर***— *पु*· गळा; मान.
**गरक**–*वि*· पाहा 'ग़र्क़' [ बुडलेला.
**ग़रक़ाब**– *वि*· [*अ*·] पाण्यांत
**ग़रक़ी**— *स्त्री*· [*अ*·] १ बुडी;
डुबकी. २ अतिवृष्टि. ३ अुतरती
जमीन. ४ पाण्याच्या पृष्ठभागा-
खालील जमीन; तळ.
**गरगज**–*पु*· १ किल्ल्याचा बुरुज.
२ अुंच टेकाड; टेकडी. ३ नावेचें
लाकडी छत. ४ फांशीचा तख्ता.
**गरगरा**–*पु*· मोटेचें किंवा विहिरी-
वरील पाणी ओढण्याचें चाक;कप्पी.
**गरचे**–*अ*· [ फा. ] यद्यपि; जरी.
**गरजन***–*पु*· गर्जना; मोठा आवाज.
**गरजना**—*क्रि*· *अ*· गरजणें.
**ग़रज़**—*स्त्री*·[*अ*·] १ गरज; जरूरी.
२ आशय; तात्पर्य; प्रयोजन.
३ अिच्छा. ४ अुद्देश्य. (यौ.)
**अल ग़रज़**–तात्पर्य असें कीं;
सारांश काय कीं.
**ग़रज़मंद**— *वि*· [*अ*· + फा. ]
गरजू; अिच्छुक. [ स्वार्थी.
**ग़रज़ी**– *वि*· [*अ*·] आपमतलबी;
**गरदन**–*स्त्री*· [फा.] मान; गळा.

(मु.) **गरदन अुठाना**–विरोध करणें. **गरदन मारना**–गळा कापणें; ठार मारणें. **गरदनियाँ**–*स्त्री.* गचांडी.

**गरदनी**–*स्त्री.* [फा.] १ घोड्याच्या अंगावर घालण्याचें कापड; २ कुस्तीचा अेक पेंच. ३ डोळयांत घालावयाची हंसळी. ४ सदऱ्याचा किंवा अंगरख्याचा गळा.

**गरदा**—*पु.* [फा.] धूळ; माती; केरकचरा.

**गरदी**–*स्त्री.* [फा.] भटकणें, फिरणें.

**गरदूँ**—*पु.* [फा.] १ आकाश. २ छकडा; गाडी.

**गरनाल**–*पु.* मोठ्या तोंडाची तोफ.

**गरब***—*पु.* १ गर्व; अभिमान. २ हत्तीचा मद. **गरबअी**–*स्त्री.* गर्विष्ठपणा; ताठरता. **गरबित**–*वि.* घमेंडखोर; गर्विष्ठ

**गरबना-बाना***–*क्रि.अ.* गर्व करणें.

**गरबाँही**—*स्त्री.* पाहा 'गल बाँही'

**गरभाना**–*क्रि. अ.* १ गर्भवती होणें. २ लोंब्या येणें.

**गरम**–*वि.* [फा.] गरम; कढत; अून्ह; अुष्ण. (मु.) **गरम चोट**–ताजा घाव. [पक्ष.

**गरमदल**–*पु.* [फा.+सं.] जहाल

**गरमागरम**–*वि.* [फा.] गरम; अुष्ण. **गरमागरमी**–*स्त्री.* १ आवेश; अुत्साह. २ बाचाबाची; भांडण.

**गरमाना**–*क्रि. अ.* [फा.] १ गरम होणें; अून होणें. २ मस्त होणें. ३ रागावणें. ४ आवेश चढणें. *क्रि. स.* तापविणें. **गरमाहट**–*स्त्री.* अुष्णता.

**गरमी**–*स्त्री.* [फा.] १ अुष्णता; तापमान. २ अुन्हाळा. ३ राग; क्रोध. ४ आवेश; अुत्साह. ५ अुष्णता; लाही. ६ अेक स्पर्शजन्य रोग. [मु] **गरमी निकालना**–गर्व हरण करणें; घमेंड अुतरविणें.

**गरमीदाना**–*पु.* [फा.+सं.] घामोळें.

**गरराना***–*क्रि.अ.* [अनु.] गरजणें; मोठा आवाज करणें.

**गरह***–*पु.* १ ग्रह. २ संकट; अरिष्ट.

**गराँ**–*वि.* [फा.] पाहा 'गिराँ'.

**गराँव**–*पु.* जनावराच्या गळयास बांधण्याचा दुहेरी दोर. [कप्पी.

**गराडी**–*स्त्री.* [अनु.] विहिरीचें चाक;

**गराना***–*क्रि. स.* १ गाळणें. २ पिळणें. [२ जडपणा.

**गरानी**–*स्त्री.* [फा.] १ महागाअी.

**गरारा**–*पु.* [फा.] गुळणी; चूळ.

**गरास***–*पु.* १ ग्रास; घास. २ पकड.

**गरिमा**–*स्त्री.* १ गौरव; मोठेपणा. २ गर्व; अहंकार.

**गरियार**—*वि.* सुस्त; आळशी (जनावर). [(फळांतील).
**गरी**—*स्त्री.* १ खोबरें. २ गर
**ग़रीब**—*वि.* [अ.] १ निर्धन; गरीब. १ दीन; हीन. ३ विदेशवासी. ४ विचित्र. **ग़रीबख़ाना**—*पु.* [अ.+फा.] या गरीबाचें घर; माझें घर. **ग़रीबी**—*स्त्री.* १ दारिद्य; निर्धनता. २ नम्रता.
**ग़रीबनिवाज़**—*वि.* [अ. फा.] गरीबांवर दया करणारा; दयाळु.
**गरीबपरवर**—*वि.* [अ.+फा.] गरीबांचा कैवारी; कनवाळु.
**गरुआओ-वाओ***— १ जडत्व; गुरुत्व. २ मोठेपणा.
**ग़रूर**—*पु.* [अ.] गर्व; घमेंड.
**गरेबान**—*पु.*[फा.] गळपट्टी; सदरा, कुडतें अि. चा गळ्यावरील भाग. (मु.) **गरेबान फाड़ना**—दुःखानें आक्रोश करणें. **गरेबानमें मुँह डालना**—शरमिंदा होणें.
**गरैयाँ**— *स्त्री.* दावें.
**गरोह**—*पु.*[फा.] झुंड; टोळी; समूह.
**ग़र्क़**—*वि.* [अ.] ·१ बुडालेला. २ तल्लीन.
**गर्जन**—*पु.* गर्जना; ओरडणें. (यौ.)—**गर्जन तर्जन**—१ धाकदपटशा. २ जळफळाट.
**गर्त्त**—*पु.* १ खड्डा. २ कपार. ३ घर. ४ रथ. ५ जलाशय. ६ नरक.
**गर्द**— *स्त्री.* [फा.] धूळ; माती; राख. (यौ.) **गर्दगुबार**- धूळ; केरकचरा.
**गर्दख़ोर-ख़ोरा**—*वि.* [फा.] मळखाऊ; लवकर न मिळणारें. *पु.* पायपुसणें.
**गर्दन**—*स्त्री.* [फा.] पाहा 'गरदन'. (यौ.) **गर्दनतोड बुखार**—मेनिनूजायटिस रोग.
**गर्दना**—*पु.* [फा.] गचांडी.
**गर्दभ**—*पु.* गाढव.
**गार्दिश**—*स्त्री.*[फा.] १ फेरा; चक्कर. २ चक्र (दैव). ३ विपत्ति; संकट.
**गर्म, गर्मागर्म, गर्मी**—पाहा 'गरम' 'गरमागरम', 'गरमी'.
**गर्वी—गर्वीला**—*वि.* १ अभिमानी. २ घमेंडखोर; अहंकारी.
**गर्हणीय—गर्ह्य**— *वि.* निंदनीय.
**गर्हा**—*स्त्री.* निंदा. **गर्हित**—*वि.* निंद्य; निंदा केला गेलेला.
**गलकंबल**—*पु.* पोळी (गाय, बैल अि. च्या मानेखालील लोंबता भाग).
**गलका**—*पु.* १ हाताच्या किंवा पायाच्या बोटाला होणारा फोड. २ अेक प्रकारचा चाबूक किंवा कोरडा. [·गलबला.
**गलगंज**—*पु.* गोंगाट; कोलाहल;

**गलगंड**–पु. गालगुंड.

**गलगुच्छा**–पु. पाहा 'गलमुच्छा'.

**गलगुथना**–वि. गलेलठ्ठ; फोपसा.

**गलचौर**–स्त्री. गप्पागोष्टी.

**गलजोड**–पु. दोन बैलांना अेकत्र बांधावयाची दोरी.

**गलझंप**–पु. हत्तीच्या मानेवरील झूल किंवा साखळदंड ( लोखंडी ).

**ग़लत**–वि. [अ.] १ चुकीचें; चुकलेलें. २ अशुद्ध. ३ असत्य; खोटें.

**गलतकिया**–पु. [सं.+फा.] गिरदी.

**ग़लतफ़हमी**–स्त्री. [अ.+फा.] १ गैरसमज. २ भ्रम; घोंटाळा(समजुतीचा.)

**ग़लती**— स्त्री. [अ.] चूक; भूल.

**गलथना**·पु. अजागलस्तन; अजागळ.

**गलथैली** — स्त्री. माकडाच्या गालांतील थैली.

**गलन**–पु. १ पतन; पडणें. २ गळणें.

**गलना**—क्रि. अ. १ विरघळणें. २ वितळणें; द्रवीभूत होणें. ३ शिजणें. ४ रोडावणें; सुकणें ( शरीर ). ५ हातपाय आंखडणें.

**गलफडा**-पु.गालफड. **गलफाँसी**-स्त्री. गळफांस. **गलफूट**–स्त्री. वडवड करण्याची संवय.

**गलबाँही**–स्त्री. कंठालिंगन; गळ्यांत हात घालणें. [प्रभाव. ३ आधिक्य.

**ग़लबा**-पु. [अ.] १ प्राधान्य. २

**गुलमुच्छा**–पु. कल्ला; गुलमिशा.

**गलवाना**–क्रि. स. १ विरघळविणें ( दुसऱ्याकडून ). २ झिजवून घेणें.

**गला**–पु. १ गळा. २ गळा ( कपड्याचा ). ३ कंठ (आवाज) (मु.)

**गला काटना** अथवा **रेतना**— १ गळा कापणें. २ अतिशय त्रास देणें. **गला घुटना**–श्वास थांबणें. **गला घोंटना**–१ गळा दाबणें. २ दडपून टाकणें. ३ गळा दाबून मारणें. **गला छुटना**-ब्याद टळणें. **गला छुडाना**–तावडींतून सुटणें. **गला फाडना**–जोरानें ओरडणें. **गला रेतना** — गळा कापणें. **गले अुतरना**–१ पटणें; मनांत ठसणें. २ ध्यानीं येणें. **गले पडना**–गळ्यांत पडणें; अिच्छेविरुद्ध करावें लागणें. **गले बाँधना, गले मढना** – गळ्यांत बांधणें; अिच्छेविरुद्ध घ्यावयास लावणें. **गले लगाना**–आलिंगन देणें.

**गलाना**–क्रि. स. १ विरघळविणें. २ संपविणें. ३ खर्च करणें. ४ शिजविणें.

**गलावट**–स्त्री. १ वितळण्याचा भाव. २ अेखादी वस्तु वितळविणारा पदार्थ (टांकणखार वगैरे).

**गलासडा**–वि. सडलेला; कुजलेला.

**गलानि***–*स्त्री.* १ ग्लानि; थकवा. २ दुःख; खेद. ३ पश्चात्ताप.

**गलित**–*वि.* जीर्ण.

**गली**–*स्त्री.* १ गल्ली; बोळ. २ मोहल्ला; आळी. (मु.) **गलियाँ झाँकना**–वेश्यागमन करणें. **गली गली मारे मारे फिरना**–दारोदार (पोटासाठीं) हिंडणें.

**गलीचा**–पु. [अ.] गालिचा.

**ग़लीज़**–*वि.* [अ.] १ घाणेरडा; गलिच्छ. २ अस्वच्छ; अशुद्ध. ३ दळदार; भरीव. पु. १ घाणेरडी वस्तु; केरकचरा. २ विष्ठा. [पासोडी.

**गलेफ़**–पु. [अ.] १ खोळ. २ रजअी;

**गलेबाज़**–*वि.* [सं. + फा.] गोड आवाजाचा; सुरेख गळ्याचा.

**गलौआ**–पु. माकडांच्या गालफडांतील विशिष्ट पिशवी जिच्यांत ते खाद्यपदार्थ भरून ठेवतात.

**गल्प**–*स्त्री.* १ लघुकथा. २ थाप; बनावट गोष्ट. ३ आत्मप्रौढी.

**ग़ल्ला**–पु. [अ.] १ पीक; शेताचें उत्पन्न २ धान्य; अन्नसामग्री. ३ दुकानांत दररोज जमणारी रोकड

**गल्ला**–पु. [अ.] गडबड; आरडाओरड. [(जनावरांचा).

**गल्ला**–पु. [फा.] झुंड; कळप

**ग़ल्लाफ़रोश**–पु. [अ. + फा.] धान्याचा व्यापारी.

**गल्लेबान**–पु. [फा.] धनगर.

**गवँ–गव**–*स्त्री.* १ संधि; सुयोग. २ अुपाय; युक्ति. (मु.) **गवँसे**–१ संधि साधून. २ गुपचुप; हळूच.

**गवन***–पु. गमन. [जाण्याचा संस्कार.

**गवनचार**–पु. वधूचा वराचे घरीं

**गवनना***–*क्रि.अ.* जाणें; गमन करणें.

**गवर्नर**–पु. [अिं] गव्हर्नर; राज्यपाल.

**गवर्नरी**–*स्त्री.* [अिं] १ हुकमत; शासन. २ गव्हर्नरचा अधिकार, पद.

**गवाछ***–पु. गवाक्ष; झरोका.

**गवारा**–*वि.* [फा.] १ मनपसंत; अनुकूल. २ सह्य; अंगीकार करण्याजोगा.

**गवास** पु. कसाअी; हत्या करणारा.

**गवाह**–पु. [फा.] साक्षीदार; साक्षी.

**गवाही**–*स्त्री.* साक्ष.

**गवेषणा**–*स्त्री.* शोध; संशोधन.

**गवेषी**–*वि.* शोधक.

**गवैहाँ**–*वि.* गांवकरी; खेडूत.

**गवैया**–पु. गवयी.

**ग़श**–पु. [अ.] मूर्च्छा; ग्लानि. [मु.] **ग़श खाना**–मूर्च्छा येणें; बेशुद्ध होणें. [दौरा. २ पहारा; गस्त.

**गश्त**–पु. [फा.] १ भ्रमण; फिरती;

**गश्ती**–पु. [फा.] पहारेकरी. *वि.* फिरणारा; हिंडणारा. **गश्ती चिट्ठी**–

परिपत्र.स्त्री. कुलटा; व्यभिचारिणी.
**गसना**–क्रि. स. १ ग्रासणें; डसणें २ पाहा 'गँसना'
**गसीला**-वि. १घट्ट; आंवळून बांधलेलें. २ दाट विणीचें ( कापड अि. ).
**गहगह-गहा***–वि. प्रफुल्लित; आल्हादित. क्रि. वि. जोरजोरानें ( बाजा, वाद्य अि. ).
**गहगहाना**–क्रि. अ. १ आनंदित होणें; प्रसन्न होणें. २ बहर येणें; फुलणें. चांगलें पीक येणें.
**गहगहे**–क्रि. वि. १ आनंदपूर्वक. २ थाटामाटानें. [गढूळ करणें.
**गहडोरना**–क्रि. स. [ दे. ] पाणी
**गहन**–पु. १ ग्रहण. २ कलंक. ३ दुःख; कष्ट.
**गहन**–वि. १ गंभीर; खोल. २दुर्गम; घन; निबिड. पु. १ खोली; खोलपणा. २ दुर्गम स्थान.
**गहन**-स्त्री. १ पकड. २ हट्ट;आग्रह.
**गहना**–पु. १ दागिना; अलंकार. २ गहाण; तारण.
**गहना**–क्रि. स. पकडणें; धरणें.
**गहनि***– स्त्री. हट्ट; दुराग्रह.
**गहबर**–वि. १ गहिंवरलेला; व्याकुळ. २ दुर्गम ३ प्रेमविव्हळ.
**गहबरना***–क्रि. अ. १ गहिंवरणें. २ व्याकुळ होणें; घाबरणें.
**गहर-रु**–स्त्री. [ ? ] अुशीर; विलंब.
**गहर**–वि. गहन; गूढ.
**गहरा**–वि. १ खोल; अथांग. २ पुष्कळ. ३ बळकट;मजबूत. ४ घट्ट; दाट. (मु.) **गहरी घुटना** अथवा **छनना**–दाट मैत्री असणें. **गहरी साँस**–दीर्घ अुसासा; निःश्वास. **गहरे लोग**–चतुर व पाताळयंत्री लोक. [क्रि. स. खोल करणें.
**गहराना**–क्रि. अ. खोल होणें.
**गहराअी**–स्त्री. खोली; खोलपणा.
**गहवारा**–पु. [ फा. ] १ पाळणा. २ झोंपाळा.
**गहीर**–वि. गंभीर.
**गाँछना**–क्रि. स. गुंफणें.
**गाँज**–पु. [फा.] रास; ढीग. **गाँजना**–क्रि. स. रास लावणें; ढीग रचणें.
**गाँजा**–पु. गांजा.
**गाँठ**–स्त्री. १ गांठ. २ गाठोडें. ३ अवयवांचा सांधा. ४ पेर (अूस, बांबू, बोट अि.) ५ गवताचा भारा; ओझें; गठ्ठा. (मु.) **गाँठकट**–पु. १ खिसेकापू. २ ठकविणारा. **गाँठका पूरा**–श्रीमंत. [ गड्डा.
**गाँठगोभी**–स्त्री. कोबीचा अेक प्रकार;
**गाँठदार**–वि. गांठी-गांठीचा.
**गाँठना**–क्रि. स. १ गांठ मारणें; २ टाके मारणें; ठिगळ लावणें.

३ जोडणें. ४ वळवून घेणें; वश करणें; गठवणें. ५ गांठणें; जोडणें. ( माळ अि. ). ( मु. ) **मतलब गाँठना**–स्वार्थ साधणें.

**गाँठी***– *स्त्री*. गांठ.

**गाँडा**–*पु*. १ झाड. २ फांदी किंवा देठाचा लहान भाग ( खंड ). ३ अुसाची गंडेरी.

**गाँथना**–*क्रि. स*. गुंफणें; गांठविणें.

**गाँव**–*पु*. गांव; खेडें.

**गाँस**–*स्त्री*. १ गांठ २ बंधन; अटकाव. ३ वैर; द्वेष. ४ बाणाचें पोलादी टोंक. ५ देखरेख. ६ अडचण. ७ रहस्य.

**गाँसना**–*क्रि. स*. १ गुंफणें. २ टोंचणें; भोंक पाडणें. ३ ठांसून भरणें. ४ ताणा घट्ट करणें. ५ ताब्यांत ठेवणें; मुठींत ठेवणें.

**गाँसी**–*स्त्री*. १बाणाचें टोंक;२ भाला आदि हत्यारांचा फाळ. ३ गांठ. ४ कपट. ५ किंतु.

**गाँहक**–*पु*. ग्राहक; गिऱ्हाअिक.

**गाअिगोठ***–*स्त्री*. गोशाळा.

**गागर–री***–*स्त्री*. कळशी; लहान घागर. [तलम कापड.

**गाच**–*स्त्री*. [अि.] बारीक जाळीदार

**गाछ**–*पु*. १ झुडुप; रोपटें. २ झाड; वृक्ष.

**गाज**–*स्त्री*. १ विजेचा कडकडाट. २ वीज. ३ आरडाओरड; गर्जना.

**गाजना**–*क्रि. अ*. ओरडणें; गर्जना करणें.

**ग़ाज़ा**–*पु*. [फा.] तोंडाला लावण्याचें अेक प्रकारचें सुगंधित चूर्ण; पावडर.

**ग़ाज़ी**–*पु*. [*अ*. ] १ परधर्मीयांवर जय मिळविणारा; २ वीर; योद्धा.

**गाटर**–*पु*. [ अि. ] तुळअी; गर्डर.

**गाटर**–*स्त्री*. [ दे. ] बैलाच्या मानेवरील जूं ज्यावर ठेवलेलें असतें तें गाडीचें जाड लांकूड.

**गाडना**–*क्रि. स*. १ पुरणें; गाडणें. २ रोवणें; खोवणें.

**गाडर**–*स्त्री*. मेंढी.

**गाडी**–*स्त्री*. गाडी. **गाडीवान**–*पु*. गाडी हांकणारा; गाडीवाला.

**गाढ**–*वि*. १ अधिक; पुष्कळ. २ मजबूत. ३ दाट. ४ खोल. ५ कठिण.

**गाढा**–*वि*. १ खोल. २ दाट. ३ घट्ट विणीचें ( कापड ). ४ कठिण (मु). **गाढे की कमाअी**–कष्टाची कमाअी. [ २ दृढतापूर्वक.

**गाढे**–*क्रि. वि*. १ चांगल्या प्रकारें.

**गात-गात्र**–*पु*. गात्र; शरीर. [पद्धत.

**गाती**–*स्त्री*. वस्त्र नेसण्याची अेक

**गाद**–*स्त्री*. तेल वगैरेच्या तळाशीं

बसणारा गाळ; चिकटा.
**गादड**–पु. पाहा **'गीदड'** [(पीक).
**गादा**–पु. अर्धवट पिकलेलें धान्य
**गाध**–पु. १ जागा; स्थान. २ पाण्याचा तळ भाग. ३ नदीचा प्रवाह; धारा. ४ लोभ. [किंचित्.
**गाध**–वि. १ उथळ. २ थोडा;
**गाना**–पु. गाणें; गीत.
**गाना**–क्रि. स. गाणें; स्तुति करणें.
**ग़ाफ़िल**–वि. [अ.] बेसावध; गाफील.
**गाभ**–पु. पशूचा गर्भ. [गीर.
**गाभा**–पु. कोंब; पालवी; झाडांतील
**गाभिन**–स्त्री. गर्भिणी; गाभण.
**गाम***–पु. गांव.
**गाय**–स्त्री. गाय.
**गायक**–पु. गवअी.
**गायगोठ**–स्त्री. गोठा.
**ग़ायत**–वि. [अ.] १ अत्यंत; अत्यधिक. २ बेहद्द. ३ असामान्य.
**ग़ायब**–वि. [अ.] अदृश्य; लुप्त.
**ग़ार**–पु. [अ.] १ खोल खळगा; गुंफा; गुहा.• [लुटालूट. २ नाश.
**ग़ारत**–वि. [अ.] गारद; नष्ट. पु. १
**गारद**–स्त्री. [अिं.] पहारेकरी शिपायांची टोळी; गारदी.
**गारना**–क्रि. स. १ पिळणें (पाणी). २ अुगाळणें; रस काढणें. ३ सोडणें; त्यागणें.
**गारना**–क्रि. स. नष्ट करणें.
**गारा**–पु. गिलावा.
**गारी**–स्त्री. १ शिवी. २ कलंक.
**गारुडी**–पु. सर्पमांत्रिक. २ गारुडी.
**गारो***–पु. १ गर्व; अभिमान. *२ प्रतिष्ठा; मान.
**गाल** – पु. गाल. (मु.) **गाल बजाना**–बढाअी मारणें. (कालके) **गालमें जाना**–मृत्युमुखीं पडणें.
**गालगूल***–पु. [सं.+अनु.] अद्वातद्वा गोष्टी.
**गाला**–पु. निवडलेला कापूस; पेळू. (मु.) **रूअीका गाला**–अतिशय अुज्ज्वल; पांढरा स्वच्छ.
**गाला**–पु. फाजील बोलण्याची संवय; वाचाळपणा. [३ वरचढ.
**ग़ालिब**–वि. [अ.] १ श्रेष्ठ. २ विजयी.
**ग़ालिबन्**–क्रि. वि. [अ.] बहुतेक; बहुधा; संभवतः.
**गाली**–स्त्री. शिवी (मु.) **गाली खाना**–शिव्या खाणें.
**गाली गलौज**–स्त्री. [सं.+अनु.] शिवीगाळ. [शिवीगाळ.
**गालीगुफ़्ता**–पु. [सं. + फा.]
**गालू**–वि. १ घमेंडखोर. २ बाताड्या; गप्पीदास.
**गाव**–पु. [फा] गाय; बैल.
**गाव-कुशी**–स्त्री. [फा.] गोवध.

**गाव-तकिया**-*पु.* [ फा. ] लोड; मोठा तक्क्या.
**गावदी**-*वि.* मठ्ठ; निर्बुद्ध; बेअकली.
**गावदुम**-*वि.* [ फा. ] १ निमुळता. २ अुतरता.
**गास***-*पु.* संकट; आपत्ति.
**गाह**-*पु.* १ बुडी मारणारा. २ मर्मज्ञ; विषयांत खोल जाणार.
**गाह***-*पु.* १ पकड. २ मगर.
**गाह**-*स्त्री.* [ फा ] १ स्थान; जागा. २ वेळ; समय. (यौ.) **गाहे गाहे**-कधीं कधीं; अधूनमधून.
**गाह गाह**-*क्रि.वि.*[फा.]कधीं मधीं.
**गाहक**-*पु.* ग्राहक; गिऱ्हाअीक. (मु.) **जी** अथवा **प्राण का गाहक**—प्राण घेण्यासाठीं टपून बसलेला.
**गाहकताअी***-*स्त्री.* गुणग्राहकता.
**गाहना**-*क्रि. स.* १ बुडी मारणें. २ मंथन करणें. ३ पकडणें.
**गाहा**—*स्त्री.* १ गाथा; कथा. २ वार्ता; वृत्तान्त.
**गाही**-*स्त्री.* फाडें ( पांचांचा गट ).
**गिंजना**—*क्रि. अ.* विसकटल्यामुळें खराब होणें; वाअीट होणें (विशेषतः कपडे).
**गिचपिच, गिचर-पिचर**—*वि.* [अनु.] अस्पष्ट;गिचमिड (अक्षर).
**गिजगिजा**—*वि.* [ अनु ] गिजगिजीत; गिळगिळीत; मोकळा नसलेला ( भात वगैरे ).
**ग़िज़ा**—*स्त्री.* [ अ. ] अन्न; खाद्य पदार्थ; भोजन.
**गिटकिरी**-*स्त्री.* [ अनु. ] गिरकी; तान घेतेवेळीं आवाजांत अुत्पन्न होणारा कंप.
**गिटपिट**-*स्त्री.* [ अनु. ] बडबड. ( मु. ) **गिटपिट करना**-मोडकें तोडकें अिंग्रजी बोलणें.
**गिट्टक**-*स्त्री.* चिलमींतील खडा.
**गिट्टी**—*स्त्री.* १ खडी; रस्त्यावर टाकावयाचे लहान दगड. २ मडक्याचे तुकडे. ३ चिलमींतील खडा.
**गिडगिडाना**-*क्रि. अ.* [ अनु. ] गयावया करणें. **गिडगिडाहट**-*स्त्री.* गयावया; अत्यंत आर्जवानें केलेली विनंती.
**गिद्ध**-*पु.* गिधाड.
**गिनती**—*स्त्री.* १ संख्या मोजणें; गणना. २ संख्या. ३ हजेरी. (मु.) **गिनतीके**-बोटांवर मोजण्याअितकें थोडें.
**गिनना**-*क्रि. स.* १ मोजणें. २ हिशेब करणें. ३ महत्त्वाचें समजणें.
**गिनवाना, गिनाना**-*क्रि. स.* मोजविणें.

**गिन्नी**–स्त्री· गिरकी; चक्कर.

**गियान***–पु· ज्ञान.

**गिरगिट**– पु· सरडा. (मु.) **गिरगिट की तरह रंग बदलना** – सरड्याप्रमाणें रंग बदलणें; घटकेंत मत बदलणें.

**गिरगिरी**–स्त्री· [अनु.] चक्री; भिंगरी; किरकिरें (लहान मुलांचें खेळणें).

**गिरजा, गिरजाघर**–पु· [पोर्तु.] चर्च; ख्रिस्ती प्रार्थनेची जागा.

**गिरदा**–पु· [फा.] १ गोल तक्क्या; गिरदी. २ घेरा; चक्कर. ३ गोल तबक. ४ हुक्क्याखालीं ठेवावयाचा सतरंजीचा तुकडा. ५ गोल वडी. ६ अेक पक्वान्न.

**गिरदाब**–पु·[फा]पाण्यांतील भोंवरा.

**गिरना**–क्रि· अ· १ पडणें. २ खालीं येणें; अवनति होणें. ३ मिळणें; संयोग होणें. ४ तुटून पडणें. ५ झडणें. ६ मारलें जाणें.

**गिरफ्त**–स्त्री· [फा.] पकड; ताबा.

**गिरफ्तार**–वि· गिरफदार; पकडलेला. **गिरफ्तारी**-स्त्री· अटक; धरपकड. [पाडण्याचें यंत्र.

**गिरमिट**–पु·[अिं.] लाकडाला छेद

**गिरमिट**–पु· [अिं.] कामासंबंधींचा करार; या कराराप्रमाणें मजुरांना काम करावयास लावण्याची प्रथा.

**गिरवान***–पु· देव; देवता.

**गिरवान***–पु· [फा.]१ सदरा अि. ची मानेवरील पट्टी. २ मान; गळा.

**गिरवी**–वि· [फा.] गहाण ठेवलेलें; गहाण. [आसक्त.

**गिरवीदा**–वि· [फा.] मोहित;

**गिरस्ती**–स्त्री· गृहस्थी; संसार.

**गिरह**—स्त्री· [फा.] १ गांठ. २ खिसा. ३ पेर; जोड. ४ गिरा (सव्वा दोन अिंचांचें माप) ५ कोलांटी; गिरकी. **गिरहदार**– वि· १ गांठीगांठींचा. २ खिसे असलेला. (मु.) **गिरहमें बाँध लेना** –खूणगांठ बांधणें; लक्षांत ठेवणें.

**गिरहकट**—वि· [फा. + सं·] खिसेकापू.

**गिरहबाज**—पु· [फा.] गिरकी घेणारें (अुडतांना); गिरेबाज; अेक कबूतर. [स्त्री· गृहिणी.

**गिरही***–पु· गृहस्थ. **गिरहिनी**–

**गिराँ**—वि· [फा.] १ महाग; मूल्यवान्. २ जड. ३ अप्रिय.

**गिरा**–स्त्री· १ वाणी. २ कविता.

**गिराना**—क्रि· स· १ पाडणें. २ अुतरविणें. ३ कमी करणें. ४ स्थानभ्रष्ट करणें. ५ खालीं सोडणें; टाकणें. ६ पराभूत करणें.

७ लढाओंत ठार करणें.

**गिरानी**–*स्त्री.* महागाओी.

**गिरामी**–*वि.* [फा.] पूज्य (यौ.) **नामी गिरामी**–अत्यंत प्रसिद्ध.

**गिरि**–*पु.* पर्वत; डोंगर.

**गिरियाँ**–*वि.* [फा.] रडणारा; विलाप-[करणारा.

**गिरिया**–*पु.* [फा.] रुदन; विलाप.

**गिरी**–*स्त्री.* बीच्या आंतील भाग; गर.

**गिरेबान**–*पु.* [फा.] पाहा 'गरेबान'.

**गिरो**–*वि.* [फा.] गहाण.

**गिर्द**—अव्य. [फा.] आसपास; भोंवताली. **अिर्द गिर्द**–आसपास, भोंवताली.

**गिल**—*स्त्री.* [फा.] १ माती; गिलावा. **गिलकार**–*पु.* गिलावा लावणारा गवंडी. **गिलकारी**–*स्त्री.* गिलाव्याचें काम.

**गिलट**–*पु.* [अिं.] १ गिलीट. २ सोन्याचा मुलामा देण्याचें काम.

**गिलटी**–*स्त्री.* १ सांध्यांतील गांठ. २ प्लेगची गांठ.

**गिलना**–*क्रि. स.* १ गिळणें. २ मनांतल्या मनांत ठेवणें.

**गिलबिलाना**–*क्रि. अ.* [अनु.] पुटपुटणें.

**गिलम**–*स्त्री.* [फा.] १ लोकरीची मऊ बिछाओीत; गालिचा. २ मऊ गादी. *वि.* मऊ; नरम.

**गिलहरी**–*स्त्री.* खार (प्राणी).

**गिला**–*पु.* [फा.] १ तक्रार. २ निंदा; कागाळी.

**गि़लाफ़**–*पु.* [अ.] १ खोळ; अभ्रा. २ लेप (पांघरण्याचा). ३ म्यान.

**गिलावा**–*पु.* [फा.] गिलावा; लिंपण.

**गिलास**–*पु.* [अिं.] पेला; पाणी [पिण्याचें लांब भांडें.

**गिलोला**–*पु.* [फा.] गोफणींतील दगड; गलोल-खडा (मातीची गोल गोटी).

**गिलौरी**–*स्त्री.* [दे.] विडा.

**गिलौरीदान**–*पु.* [दे.+फा.] पान ठेवण्याचा डबा; विड्याचा डबा.

**गिल्ली**–*स्त्री.* [दे.] विटी.

**गींजना**–*क्रि. स.* [दे.] चोळा-मोळा करणें.

**गीत**–*पु.* गाणें; भावगीत.

**गीदड**–*पु.* खोंकड; कोल्हा. (यौ.) **गीदड भबकी**–अुसनें अवसान; ओढून चंद्रबळ; रागाचा आव आणणें. *वि.* भित्रा; नेभळट.

**गीदी**–*वि.* [फा.] १ भित्रा. २ मूर्ख. ३ निर्लज्ज. ४ हिजडा.

**गीध**—*पु.* गिधाड.

**गीला**—*वि.* भिजलेला; आर्द्र.

**गुंग**—*पु.* मुकेपणा. **गुंग-गुंगा**—*वि. पु.* मुका; मूक.

**गुंगी**—*स्त्री.* दुतोंडी साप; बांडगूळ.

**गुंचा**—*पु.* [ *अ.* ] कळी.

**गुंज**—*स्त्री.* गुंजारव; मधुर ध्वनि.

**गुंजन**—*पु.* गुंजारव; गुणगुण.

**गुंजना**—*क्रि. स.* गुणगुणणें; गुंजन किंवा गुंजारव करणें. [भुंगा.

**गुंजनिकेतन**—*पु.* मधुकर; भ्रमर;

**गुँजा**—*स्त्री.* गुंज; गुंजेची वेल.

**गुंजाअिश**—*स्त्री.* [फा.] १ जागा (सामावण्यासाठीं किंवा भरण्यासाठीं); गुंजाअीस. २ सोय.

**गुंजान**—*वि.* [फा.] दाट; सघन.

**गुंजार**—*पु.* गुंजारव.

**गुंठा**—*पु.* [ ? ] अेक प्रकारचा खुजा घोडा; तट्टू. *वि.* खुजा; ठेंगणा.

**गुंडअी**—*स्त्री.* गुंडगिरी.

**गुँडली**—*स्त्री.* चुंबळ (कपडयाची किंवा दोरीची विणलेली).

**गुंडा**—*वि.* गुंड; बदमाश; बदफैली **गुंडापन**—*पु.* गुंडगिरी.

**गुँथना**—*क्रि. अ.* १ गुंता होणें. २ ओंवलें जाणें.

**गुँधना**—*क्रि. अ.* तिंबणें; मळणें. **गुँधाअी, गुँधावट**—*स्त्री.* तिंबणें किंवा मळणें. २ तिंबण्याची किंवा मळण्याची मजुरी.

**गुँधवाना**—*क्रि. स.* तिंबविणें; मळून घेणें.

**गुंबज, गुंबद**—*पु.* [ फा.] घुमट; घराचें वर्तुळाकार छत.

**गुंबा**—*पु.* टेंगूळ.

**गुंभी***—*स्त्री.* अंकुर.

**गुआ**—*पु.* चिकणी सुपारी.

**गुअियाँ**-*पु. स्त्री.* साथीदार; भिडू; मित्र; मैत्रीण.

**गुग्गुल**—*पु.* गुग्गुळ. [चलत.

**गुची**—*स्त्री.* विड्याच्या शंभर पानांची

**गुच्ची**-*स्त्री.*[अनु.]गल (विटीदांडूच्या किंवा गोट्यांच्या खेळांतील). **गुच्ची पारा-पाला**—*पु.*गल करून त्यांत कवडया फेंकावयाचा खेळ.

**गुच्छा**—*पु.* १ फुलांचा गुच्छ. २ जुडगा. ३ तुरा (फेट्यांतील).

**गुज़र**—*पु.* [ फा. ] १ गुजराण; निर्वाह. २ प्रवेश; पोहोंच. (यौ.) **गुज़र-बसर**—*पु.* गुजराण; अुदरनिर्वाह.

**गुज़रगाह**—*स्त्री.* [ फा. ] १ रस्ता; वाट. २ नदी ओलांडण्याची जागा; अुतार.

**गुज़रना**—*क्रि.अ.* [फा.] १ कालक्षेप होणें. २ अेखाद्या ठिकाणावरून पुढें जाणें. ३ निर्वाह होणें. ४ गुदरणें; ओढवणें. (मु.) **किसी पर गुज़रना**—अेखाद्यावर प्रसंग बेतणें. **गुज़र जाना**—मरण पावणें.

**गुज़रबान**-पु॰ [ फा. ] नावाडी.

**गुज़रान**-पु॰ पाहा ' गुज़र '.

**गुजरी**-स्त्री॰ मनगटी.

**गुज़री**-स्त्री॰ [ फा. ] तिसऱ्या प्रहरीं रस्त्याच्या कडेला भरणारा बाजार.

**गुजरिया, गुजरेटी**-स्त्री॰ गवळण; गोपी. [ मागचा; भूतकालीन.

**गुज़श्ता**—वि॰ [ फा. ] व्यतीत;

**गुज़ारना**—क्रि॰ स॰ [ फा. ] १ निर्वाह करणें; दिवस कंठणें. २ पोहोंचविणें; समोर ठेवणें.

**गुज़ारा**—पु॰ [ फा. ] १ अुपजीविका; चरितार्थ. २ अुपजीविकेसाठीं दिली जाणारी रक्कम. ३ जकातीचें नाकें. [ विनंती.

**गुज़ारिश**—स्त्री॰ [फा.] निवेदन;

**गुज़ीर**—पु॰ [ फा. ] १ सुटका. २ अुपाय. ३ साधन. (यौ.) **नागुज़ीर**-अनिवार्य; अपरिहार्य.

**गुझरोट-रौट, गुझौट***—पु॰ सरकुती.

**गुझिया**—स्त्री॰ करंजी.

**गुट**-पु॰पाहा'गुट्ट'. [आवाज काढणें.

**गुटकना**-क्रि॰ अ॰ कबूतराप्रमाणें

**गुटका**—पु॰ १ गोळी; गुटिका. २ लहान आकाराचें पुस्तक.

**गुटबंदी-गुटबाज़ी**-स्त्री॰ गटबाजी; कंपूशाही.

**गुटरगूँ**—स्त्री॰.कबूतरांचा आवाज.

**गुटिका**—स्त्री॰ [अनु.] सिद्धी प्राप्त करून देणारी जडी-बुटी.

**गुट्ट**—पु॰ गट; कंपू.

**गुठ्ठल**— वि॰१ मोठी कोय किंवा बी आंत असलेलें(फळ).२ निर्बुद्ध; मठ्ठ. ३ कोयीच्या आकाराचा.पु॰ गांठ.

**गुठली**—स्त्री॰ कोय.

**गुडंबा**—पु॰ गुळांबा.

**गुड**— पु॰ गूळ. [ आवाज.

**गुडगुड**—पु॰ [अनु.] गुडगुड असा

**गुडगुडाना**—क्रि.अ॰ [अनु ] गुडगुड आवाज होणें. **गुडगुडाना**-क्रि.स॰ हुक्का पिणें. **गुडगुडाहट**-स्त्री॰ आवाज.

**गुडगुडी**-स्त्री॰ ( अनु. ) हुक्का.

**गुडधनियाँ - गुडधानी** - स्त्री॰ गुळपापडीचे लाडू.

**गुडमुड-गुडमुडी**—स्त्री॰ मुटका करून बसणें; गुडघ्यांत डोकें घालणें.

**गुडाकू**-पु॰ गोड तंबाखू; गुडाखू.

**गुडिया**-स्त्री॰ बाहुली. (मु.) **गुडियोंका खेल**-पोरखेळ; सोपें काम.

**गुड्डा**-पु॰ कपड्याची मोठी बाहुली. ( मु. ) **गुड्डा बाँधना**—निंदा करीत फिरणें.

**गुड्डी**-स्त्री॰ १ गुडघ्याची वाटी. २ लहान गुडगुडी; हुक्का.

**गुड्डी**—*स्त्री·* पतंग.

**गुणा**—*पु·* गुणाकार.

**गुणानुवाद**—*पु·* प्रशंसा; गुणगान.

**गुणी**—*वि·* गुणवान् ;तज्ञ; कारागीर.

**गुणी**—*पु·*१ निपुण पुरुष; २ मांत्रिक.

**गुत्थमगुत्था**—*पु·* १ गुंतागुंत. २ २ हातघाई.

**गुत्थी**—*स्त्री·* गुंता; गांठ.

**गुथना**—*क्रि· अ·* १ गुंफलें जाणें. २ गुंतागुंत होणें.३ कुस्तींत अेकमेकांशीं भिडणें.

**गुदकार—कारा, गुदगुदा**—*वि·* १ गलेलठ्ठ; मांसल. २ मअू.

**गुदगुदाना**—*क्रि· अ·* १ गुदगुल्या करणें. २ विनोद करणें; हंसविणें. ३ अुत्कंठित करणें.**गुदगुदी**—*स्त्री·* गुदगुली. २ अुत्कंठा.३ आल्हाद; अुल्हास.

**गुदड़ी**—*स्त्री·* गोधडी. (मु.) **गुदडीमें लाल**—अुकिरडयावर हिरा. **गुदड़ी बाजार** —*पु·* जुना बाजार; चोरबाजार.

**गुदरना***—*क्रि· अ·* [फा.] गुदरणें; ओढवणें. *क्रि· स·* निवेदन करणें; मांडणें.

**गुदांकुर**—*पु·* मूळव्याध.

**गुदाज़**—*वि·* [फा.] १ लठ्ठ; मांसल २ कोमल; दयाळू.

**गुदाना**—*क्रि· स·* गोंदविणें.

**गुदाम**—*पु·* [अिं.] वखार, गोदी.

**गुदारा***—*पु·* [फा.] नावेंतून नदी ओलांडून पैलतीरीं जाणें.

**गुद्दा**—*पु·* पाहा ‘ गूदा ’

**गुद्दी**—*स्त्री·* १ फळांतील गर २ डोळ्याच्या मागील भाग. ३ तळव्याचा मांसल भाग.

**गुन***—*पु·* गुण.

**गुनगुना**—*वि·* कोंबट.

**गुनगुनाना**—*क्रि· अ·* [अनु.] १ गुणगुणणें. २ नाकांत बोलणें.

**गुनना**—*क्रि.स·* १ गुणणें.२मोजणें. ३ घोकणें. ४ विचार करणें.

**गुनहगार**—*वि·* [फा.] गुन्हेगार; अपराधी. २ पापी.

**गुनहगारी**—*स्त्री·* [फा.] गुन्हेगारी.

**गुनही***—*पु·* [फा.] गुन्हेगार.

**गुना**—*पु·* पट; आवृत्ति. (अुदा. दुगुना.)

**गुनाह**—*पु·* [फा.] १ गुन्हा; अपराध. २ पाप.

**गुनिया—गुनी**—*पु·* गुणी व्यक्ति.

**गुपाल**—*पु·* १ गवळी. २ श्रीकृष्ण.

**गुप्तचर**—*पु·* हेर; गुप्त पोलीस.

**गुप्ती**—*स्त्री·* गुप्ती नांवाचें हत्यार.

**गुम्फा**—*पु·* १ फुलांचा गुच्छ २ टोपीचा गोंडा.

**गुफा**—*स्त्री·* गुहा; गुंफा.

**गुफ़्त**–*स्त्री.* [फा.] भाषण; संभाषण.
**गुफ़्तगू–गुफ़्तार**—*स्त्री.* [फा.] संभाषण; बातचीत.
**गुबरैला**–*पु.* शेणकिडा.
**गुबार**—*पु.* [अ.] १ धूळ. २ मनांत दडपून ठेवलेला राग, द्वेष, दुःख अि.
**गुबारा**– *पु.* } फुगा.
**गुब्बारा**–*पु.* }
**गुम**–*वि.* [फा.] हरवलेला; गमावलेला. २ अप्रसिद्ध; गुप्त; लपलेला.
**गुमनाम**–*वि.* १ निनांवी. २ अप्रसिद्ध; अज्ञात.
**गुमजी**–*स्त्री.* [फा.] घुमट.
**गुमटा**–*पु.* टेंगूळ.
**गुमटिहा**–*पु.* [फा.] नाकेदार.
**गुमटी**—*स्त्री.* [फा.] घराच्या छताचा सर्वांत अुंच भाग; घुमट.
**गुमर**–*पु.*[फा.] १ अभिमान; घमेंड. २ अढी; दीर्घ-द्वेष. ३ कुजबुज.
**गुमराह**–*वि.* [फा.] १ कुमार्गी; वाअीट आचरणाचा. २ मार्ग चुकलेला.
**गुमसुम**–*वि.* [अनु.] गप्प; स्तब्ध.
**गुमान**–*पु.* [फा.] १ अनुमान; अंदाज; अदमास. २ गर्व; अहंकार. ३ वाअीट लोकमत. **गुमानी**—*वि.* गर्विष्ठ.
**गुमाना**–*क्रि. स.* पाहा 'गँवाना'.
**गुमाश्ता**–*पु.* [फा.] गुमास्ता.
**गुम्मा**–*वि.* [फा.] घुम्या; कमी बोलणारा. [मख्खी.
**गुर**–*पु.* १ गुरुमंत्र; सल्ला. २ रहस्य;
**गुरगा**–*पु.* १ चेला; शिष्य. २ नोकर.
**गुरगाबी**—*पु.* [फा.] पुढें रुंद असलेला जोडा.
**गुरच**-*पु.* गुळवेल. [२ हिंमत; साहस.
**गुरदा**–*पु.* [फा.] १ यकृत; कोठा.
**गुरबत**–*स्त्री.* [अ.] १ परदेशांत निवास. २ सफर; प्रवास. ३ पराधीनता.
**गुरबा**–*पु.* [अ.] 'गरीब' चें बहु.
**गुरबा परवरी**–*स्त्री.* [अ. + फा.] गरीबांचें पालनपोषण; दीनदयालुता.
**गुराब**–*पु.*[दे.] तोफेची गाडी.
**गुरबी***–*वि.* गर्विष्ठ.
**गुराअी***–*स्त्री.* गोरेपणा.
**गुरिया**–*स्त्री.* मणि.
**गुरुआअी**–*स्त्री.* १ गुरूचें कर्तव्य किंवा धर्म. २ धूर्तता; चलाखी.
**गुरुआनी**–*स्त्री.* १ गुरुपत्नी. २ शिक्षिका.
**गुरुकुल**–*पु.* गुरूचें घर; गुरुगृहींची शाळा. [माणूस.
**गुरुघंटाल**–*पु.* चलाख, धूर्त, चतुर
**गुरुच**–*स्त्री.* पाहा. 'गुरच'

**गुरुता**–स्त्री· १ जडपणा (वजन). २ मोठेपणा; महत्त्व. ३ गुरुपण (गुरूचें कर्तव्य). [गुरुत्वाकर्षण.

**गुरुत्वाकर्षण**–पु· पृथ्वीचें आकर्षण.

**गुरुद्वारा**–पु· १ गुरु, महंत अि. चें निवासस्थान. २ शीखांचें मंदिर.

**गुरुबिनी***–स्त्री· गर्भवती स्त्री·

**गुरुभाअी**–पु· गुरुबंधु.

**गुरूब**–पु· [अ·] अस्त.

**गुरूर**–पु· [अ·] पाहा 'ग़रूर'.

**गुरेज़**–स्त्री· [फा.] १ अलिप्तता; दूर राहाणें. २ पळ काढणें. ३ विषयांतर.

**गुरेरना**· क्रि·स· डोळे वटारून पाहणें.

**गुरेरा, गुलेला**–पु· [फा.] गोफणींतील दगड; गलोल खडा.

**गुर्ज़**–पु· [फा.] गदा; सोटा. **गुर्ज़बर्दार**–गदाधारी सैनिक.

**गुर्राना**–क्रि· अ· [अनु.] १ गुरगुरणें. २ गुरकावणें. ३ क्रोधानें कर्कश आवाजांत ओरडणें.

**गुर्विणी**–वि· स्त्री· गर्भवती.

**गुल**–पु· [फा·] १ फूल. २ गुलाबाचें फूल. ३ रंगीबेरंगी ठिपका (पशूंच्या शरीरांवरील). ४ शरीरावर डाग दिल्याचें चिह्न. ५ हंसतांना गालाला पडणारी खळी. ६ वातीचा जळलेला भाग. ७ निखारा; विस्तव. (मु.) **गुल कतरना**–कागदाचीं किंवा कापडाचीं फुलें बनविणें, नक्षी तयार करणें. **गुल खिलना**– १ अघटित गोष्ट होणें. २ तंटाबखेडा होणें. **चिराग़ गुल करना**–दिवा विझविणें.

**गुल**—पु· [फा.] आरडाओरड; हलकल्लोळ. [गुलबाशीचें फूल.

**गुलअब्बास**—पु· [फा. + अ·]

**गुलक़न्द**–पु· [फा.] गुलकंद.

**गुलकारी**–स्त्री· [फा.] नक्षीकाम; वेलबुट्टीचें काम. [आरडाओरड.

**गुलगपाडा**–पु· [अ· + सं·]

**गुलगीर**–पु· [फा.] दिव्याची वात कापण्याची कात्री.

**गुलगुल**–वि· मऊ; कोमल.

**गुलगुला**–पु· अेक गोड पक्वान्न.

**गुलगोथना**—पु· ठेंगणा, गलेलठ्ठ मनुष्य; फुगीर गालाचा व अंगाचा माणूस.

**गुलचा**–पु· १ गालगुचा. २ प्रेमळपणानें गालावर मारलेली चापटी. **गुलचाना-गुलचियाना**–क्रि· स· गालगुचा घेणें.

**गुलचीं**–वि· [फा.] १ फुलें तोडणारा; माळी. २ तमासगीर.

**गुलछर्रा**—पु· स्वैर व स्वच्छंद

भोगविलास; (मु.) **गुलछर्रा अुडाना**–मौज करणें; चैन करणें.

**गुलज़ार**–पु· [फा.] बाग; बगीचा. *वि*·सुंदर;रम्य; शोभिवंत;हिरवेंगार.

**गुलतराश**–पु· [फा.] १ दिव्याची वात कापावयाची कात्री. २ दिवे विझविणारा नोकर. ३ बागेंतील झाडें कापण्याची माळ्याची कात्री.

**गुलतुर्रा**–पु· [ फा. ] लाल रंगाच्या फुलांचें अेक झाड.

**गुलदस्ता**–पु· [फा.] फुलांचा गुच्छ.

**गुलदान**–पु· [फा.] फुलदाणी.

**गुलदुम**–पु· [फा.] बुलबुल पक्षी.

**गुलनार**–पु· [ फा. ] १ डाळिंबाचें फूल. २ डाळिंबी रंग (गर्द व लाल रंग).

**गुलफ़ाम**–पु· [फा.] १ गुलाबी रंगाचा. २ अत्यंत सुंदर.

**गुलबकावली**–*स्त्री*· [फा. + सं· ] बकावलीचें फूल(पांढरें व सुवासिक).

**गुलबदन**–पु· [ फा. ] अेक प्रकारचें अुभ्या रेघांचें रेशमी कापड. *वि.* गुलाबासारखा सुंदर व कोमल शरीराचा; अत्यंत सुंदर. [पाकळी.

**गुलबर्ग**–पु· [फा.] गुलाबाची

**गुलमा**–पु· आवाळू; टेंगूळ.

**गुलमेंहदी**–*स्त्री*· [फा.] आश्विनांत फुलणारें अेक लहानसें झाड (याला अेकेरी पाकळ्यांचीं अनेक रंगांचीं फुलें येतात).

**गुलमेख**–*स्त्री*· [फा.] खिळा.

**गुलरू**–*वि*· [ फा. ] गुलाबासारखा चेहरा असणारा; अतिशय सुंदर.

**गुलशन**–पु· [ फा. ] बाग; बगीचा.

**गुलशब्बो**—*स्त्री* [फा ] रातराणीचें फूल.

**गुलसिताँ**–पु·[फा.]पाहा 'गुलिस्ताँ'.

**गुलाब**–पु· [फा.] १ गुलाब. २ गुलाबपाणी.

**गुलाबजामुन**—पु· [ फा. + सं· ] गुलाबजंबु; गुलाबजाम (अेक पक्वान्न). [दाणी.

**गुलाबपाश**—पु· [फा.] गुलाब-

**गुलाम**–पु· [अ·] १ गुलाम; दास. २ सेवक; नोकर. [दास्य.

**गुलामी**-*स्त्री*· [अ·] गुलामगिरी;

**गुलिस्ताँ**–पु· [फा.] बाग; वाटिका.

**गुलू**–पु· [फा.] १ गळा, २ आवाज.

**गुलूबंद**–पु· [ फा. ] १ गळपट्टा. २ गळ्यांतील दागिना.

**गुलेल**–*स्त्री*· [फा.] गोफण.

**गुलेलगल्ला**–पु· गोफणींतून फेंकावयाचा दगड किंवा मातीची गोळी.

**गुल्फ**–पु· घोटा (पायाचा).

**गुल्ला**–पु· [फा.] १ गोफणींतून मारावयाची मातीची गोळी; खडा.

२ आरडाओरडा. [भडक फूल.
**गुल्लाला**–पु. [फा.] अेक लाल
**गुल्ली**–स्त्री. १ विटी; गिल्ली. २ कोय; बीं. ३ मोहाचें बीं. ४ मधाचें पोळें. [सुपारी.
**गुवाक**–पु. १ सुपारी. २ चिकणी
**गुसाँअी***—पु. गोसावी; विरक्त साधु; जितेंद्रिय.
**गुस्ताख़**—वि. [फा.] अशिष्ट; अमर्यादशील; धृष्ट. **गुस्ताख़ी**–स्त्री. बेअदबी; अनादर; धाष्टर्य.
**गुस्ल**—पु. [अ.] स्नान. (यौ.) **गुस्लखाना**–पु. स्नानगृह.
**गुस्ले मैयत**–पु. [अ.] मृत व्यक्तीच्या शवाला घालण्यांत येणारें स्नान.
**गुस्ले सेहत**–पु. [अ.] आजारांतून बरें झाल्यानंतर करण्यांत येणारें स्नान. [क्रोध.
**गुस्सा**—पु. [अ.] घुस्सा; राग; (मु.) **गुस्सा अुतरना या निकलना**–क्रोध शांत होणें. **गुस्सा अुतारना**–अेखाद्यावर राग काढणें. **गुस्सा चढना**–राग येणें. **गुस्सा थूक देना**–मनांतून राग काढून टाकणें. **गुस्सा पी जाना**–राग आवरणें; सहन करणें. **गुस्सेसे लाल पीला होना**–अत्यंत क्रुद्ध होणें. [रागीट.
**गुस्सावर - गुस्सैल** वि. [अ.]

**गुहर**–पु. [फा.] मोती.
**गुहराना**–क्रि. स. हांक मारणें.
**गुहाँजनी**–स्त्री. रांजणवाडी.
**गुहाअी**—स्त्री. गुंफण्याची मजुरी.
**गुहार–रि**–स्त्री. धांवा; करुण हांक.
**गूँगा**–वि. [फा.] मुका; मूक.
**गूँजना**–क्रि. अ. १ गुंजारव करणें. २ प्रतिध्वनि होणें. **गूँज**–स्त्री. १ गुंजन. २ प्रतिध्वनि. [चालणें.
**गूँथना**–क्रि. स. १ गुंफणें. २ टाके
**गूँधना**–क्रि. स. तिंबणें; मळणें.
**गूजर**–पु. १ गवळी. २ क्षत्रियांची अेक जात. [२ गवळण.
**गूजरी**–स्त्री. १ गूजर जातीची.
**गूझा**–पु. १ मोठी करंजी. २ फळांतील रेषा. **गुझिया**–स्त्री. करंजी.
**गूथना**–पाहा ' गूँथना '.
**गूदड़**–पु. जुना फाटलेला कपडा.
**गूदा**–पु. १ गर; मगज. २ मेंदू.
**गून**—स्त्री. नाव ओढण्याचा दोर (सोल.)
**गून–गूना**–पु. [फा.] १ रंग; वर्ण; २ प्रकार. (यौ.) **गूनागूँ**–रंगीबेरंगी; तऱ्हेतऱ्हेचें.
**गूमडा**–पु. बेंड; जखम; सूज; आवाळूं.
**गूल**–पु. [अ.] वनदेव.
**गूलर**–पु. १ औदुंबराचें झाड. २ अुंबराचें फळ. (मु.) **गूलर**-

का फूल-अुंबराचें फूल ( दुर्लभ व्यक्ति अथवा वस्तु )
**गूह**-पु. विष्ठा.
**गृहस्थ**-पु. गृहस्थ; संसारी माणूस. **गृहस्थी**—स्त्री. १ गृहस्थाश्रम. २ गृहस्थी. संसार. ३ घरदार; शेतवाडी.
**गेंडना**-क्रि. स. १ शेताभोंवतीं कुंपण घालणें. २ घेरणें.
**गेंडली**-स्त्री. वेटोळें; कुंडलाकृति.
**गेंडा**—पु. १ अुसाच्या वरचीं पानें. २ अूस.
**गेंडुरी**-स्त्री. १ चुंबळ. २ सापाचें [ वेटोळें.
**गेंद**—पु. चेंडू.
**गेंदवा-गेंदुवा**-पु. लोड; तक्क्या.
**गेंदा**-पु. झेंडूचें झाड अथवा फूल.
**गेटिस**-पु. [अिं.] गार्टर.
**गेडना**—क्रि. स. १ शेताभोंवतीं बांध घालणें;कुंपण घालणें. २घेरणें; वेढणें.
**गेदा**—पु.पंख न फुटलेलें पक्ष्याचें पिलूं.
**गेय**—पु. गाणें. वि. गाण्यास योग्य.
**गेरना**—क्रि.स. १ पाडणें; टाकणें. २ फेंकणें; अुधळणें.
**गेरुआ**-वि.गेरूच्या रंगाचा;भगवा.
**गेसू**—पु. [फा.] केसांची बट.
**गेह***—पु. घर.
**गेहनी***—स्त्री. गृहिणी; घरधनीण.
**गेही***—पु. गृहस्थ.
**गेहुँआ**—वि. गव्हाच्या रंगाचा.
**गेहूँ**—पु. गहूं.
**गैंडा**—पु. गेंडा.
**गैंती**—स्त्री. कुदळ.
**गैन***—पु. गल्ली; बोळ.
**ग़ैब**-पु.[अ.] १ अप्रत्यक्ष;अपरोक्ष. २ गैरहजर. **ग़ैबत**-स्त्री. चुगली; पाठीमागें केलेली निंदा. **ग़ैबी**-वि. १ गुप्त; लपलेला. २ परका;अज्ञात.
**गैयर***—पु. हत्ती.
**गैया**—स्त्री. गाय.
**गैरंटी**—स्त्री. [ अिं. ] ग्यारंटी; [ खात्री.
**ग़ैर**—वि. [ अ. ] १ अन्य; दुसरा. २ परका. ३ 'अ' ह्या निषेध किंवा विरोधदर्शक अुपसर्गासारखा अर्थ व प्रयोग ( अुदा. गैरवाजिब ).
**ग़ैरत**—स्त्री. [अ ] १ लाज; शरम. २ अब्रू; शील. [ विनयी.
**ग़ैरतमंद**-वि.[अ.+फ.] लज्जाशील;
**ग़ैरमनकूला**-वि. [ अ. ] स्थावर; अचल. [ वाहित स्त्री. २ रखेली.
**ग़ैरमनकूहा**-वि.स्त्री.[अ.] १ अवि-
**ग़ैरमामूली**—वि.[अ.]असाधारण.
**ग़ैरमुनासिब**-वि. [अ.] अयोग्य; अनुचित.
**ग़ैरमुमकिन**-वि.[अ.] असंभाव्य; अशक्य.

**ग़ैरवाजिब**—*वि.* [अ.] गैरवाजवी; अयोग्य.

**ग़ैरहाज़िर**—*वि.* [अ.] गैरहजर. **ग़ैरहाज़िरी**—*स्त्री.* गैरहजेरी. अनुपस्थिति.

**गैरिक**—*पु.* १ गेरू; काव. २ सोनें.

**गैल**—*स्त्री.* मार्ग; रस्ता.

**गोंईं**—*स्त्री.* बैलांची जोडी.

**गोंठ**—*स्त्री.* धोतराचा कमरेभोंवतीं गुडाळलेला भाग.

**गोंठना**—*क्रि. स.* टोंक वांकविणें.

**गोंठना**—*क्रि. स.* वेढा देणें.

**गोंडा**—*पु.* १ आवार; गोठा. २ गांव; खेडें. [सारखें अेक झाड.

**गोंदी**—*स्त्री.* [फा.] बकुळीच्या झाडा-

**गो**—*स्त्री.* १ गाय. २ अिंद्रिय. ३ पृथ्वी. ४ किरण.

**गो**—*अ.* [फा.] जरी; यद्यपि. **गोकि**-जरी; यद्यपि.

**गोअिठाँ**—*पु.* गोवरी.

**गोअिंदा**—*पु.* [फा.] १ वक्ता. २ हेर; गुप्तचर. [सहचर; सवंगडी.

**गोअियाँ, गोअी**—*पु. स्त्री.* भिडू;

**गोअू***-*वि.* लपविणारा. [गोहत्या.

**गोकुशी**—*स्त्री.* [सं+फा.] गोवध;

**गोखा**—*पु.* झरोका.

**गोज़**—*पु.* [फा.] अपान वायु; पाद

**गोजर**—*पु.* कानकीड; कुरटी.

**गोट**—*स्त्री.* किनारी; फीत.

**गोट**—*स्त्री.* मंडळ; जमात.

**गोट**—*स्त्री.* सोंगटी; नरद.

**गोटा**—*पु.* १ किनारी; फीत. २ सुपारी, वेलदोडे, बदामगर अि. अेकत्र मिसळून केलेली मुखशुद्धि. ३ भाजलेले धणे. ४ शुष्क झालेला मळ.

**गोटी**—*स्त्री.* १ गोटी. २ सोंगटी; नरद. ३ फायद्याची बाब. (मु.) **गोटी जमना**—युक्ति सफल होणें.

**गोठ**—*स्त्री.* गोठा. २ श्राद्धकर्म. ३ सहल; सफर.

**गोड**—*पु.* पाय.

**गोडअित**—*पु.* गांवचा पहारेकरी.

**गोडना**—*क्रि. स.* खोदणें; खणणें; अुफाळणें. **गोड़ाअी**—*पु.* १ खणणें. २ खणण्याचें काम. ३ खोदण्याचा मोबदला.

**गोडाना**—*क्रि. स.* खणविणें.

**गोडापाअी**—*स्त्री.* सारखी येजा.

**गोत**—*पु.* गोत्र; वंश. २ समूह.

**गोतम**—*पु.* गौतम ऋषि.

**गोतमी**—*स्त्री.* अहिल्या.

**ग़ोता**—*पु.* [अ.] बुडी (यौ.) **ग़ोताखोर**—*पु.* पाणबुड्या. **ग़ोतामार**—*पु.* पाणबुडी. (मु.) **ग़ोता खाना**-सकटांत सांपडणें; गोत्यांत सांपडणें. **ग़ोता मारना**-बुडी मारणें.

**गोतिया-गोती**-*वि.* गोत्रज; आप्त.
**गोद**—*स्त्री.* [अ.] मांडी; अुत्संग; कूस. (मु) **गोद का**-लहान मूल. **गोद बैठना**-दत्तक जाणें. **गोदमें**-मांडीवर; कडेवर. **गोद भरना**-१ ओटी भरणें. २ मूल होणें. **गोद लेना**-१ दत्तक घेणें. २ कडेवर घेणें.
**गोदनहारी**-*स्त्री.* गोंदण्याचा धंदा [करणारी स्त्री
**गोदना**-*क्रि. स.* १ टोंचणें. २ गोंदणें पु. शरीरावर गोंदलेलें चिह्न.
**गोदाम**—*पु.* [अिं.] गोडाअुन; कोठार; वखार.
**गोधूलि** } **गोधूली** } *स्त्री.* संध्याकाळची वेळ.
**गोन**-*स्त्री.* गोणी; पोतें.
**गोनर्द**-*पु.* नागरमोथा.
**गोना***-*क्रि. स.* लपविणें; छपविणें.
**गोनिया**—*स्त्री.* गुण्या (गवंड्याचें हत्यार).
**गोनिया**-*पु.* ओझीं वाहणारा.
**गोपद**—*पु.* गाअीचा खुर.
**गोपना***-*क्रि. स.* लपविणें; छपविणें.
**गोपनीय**-*वि.* लपविण्यास योग्य; गुप्त.
**गोफन-ना**-*पु.* गोफण. [लेलें पान.
**गोफा**-*पु.* सुअिरा; पूर्ण न अुघड-
**गोबर**—*पु.* १ गाअीचें शेण. २ शेण. (मु.) **गोबरगणेश**-*वि.* १ ओबडधोबड. २ मूर्ख; बेअकली. **गोबरी**—*स्त्री.* १ गोवरी. २ शेणाचें सारवण किंवा लिंपण.
**गोभा**-*स्त्री.* आनंदाची लहर.
**गोभी**-*स्त्री.* फुलवर.
**गोमुखी**-*स्त्री.* गाअीच्या तोंडाच्या आकाराची जप करण्याची पिशवी.
**गोया**-*क्रि. वि.* [फा.] अर्थात्; जणूं काय. *वि.* बोलणारा.
**गोर**—*पु.* [फा.] कबर; थडगें. (यौ.) **गोरे गरीबाँ**-ज्या ठिकाणीं परकीय व गरीब लोकांचे मृतदेह पुरण्यांत येतात तें स्मशान.
**गोर**—*वि.* गौरवर्णीय; गोरा.
**गोरटा***—*पु.* गोरा माणूस.
**गोरटी**—*स्त्री.* गोरी स्त्री.
**गोरकन**-*पु.* [फा.] कबर खोदणारा.
**गोरखअिमली**-*स्त्री.* १ कल्पवृक्ष. २ अेक वृक्ष.
**गोरखधंधा**—*पु.* १ गुंतागुंतीचें प्रकरण. २ कोडें; कूट प्रश्न.
**गोरखर**-*पु.* [फा.] जंगली गाढव.
**गोरस**-*पु.* १ गाअीचें दूध, दही, ताक अि. २ अिंद्रियसुख; भोग; विलास. **गोरसी**-*स्त्री.* दूध गरम करण्याची शेगडी.
**गोरा**-*वि.* गौरवर्णीय. *पु.* पाश्चि-

मान्य मनुष्य (युरोपिअन). (यौ.) **गोरा चिट्टा**–गोरापान.
**गोराअी***—*स्त्री.* सौंदर्य; गोरेपणा. **गोरी**—*स्त्री.* सुंदर स्त्री.
**गोरू**—*पु.* जनावर.
**गोरोचन**—*पु.* गोरोचन.
**गोल**—*वि.* गोल; वाटोळा. (मु.) **गोल बात**–संशयित भाषण. **गोलगोल**—मोघम. **गोलमटोल**–वाटोळा; गरगरीत.
**ग़ोल**–*पु.* [*अ.*] झुंड; समूह; टोळी.
**गोलगप्पा**—*पु.* [*सं.* + अनु.] तिखटमिठाची भरीव व लहान पुरी.
**गोलमाल**-*पु.* गडबड-गुंडा; घोंटाळा.
**गोलमिर्च**–*स्त्री.* काळें मिरें.
**गोलाअी**—*स्त्री.* वाटोळेपणा; गोलपणा.
**गोला**–*पु.* गोळा.
**गोली**–*स्त्री.* १ गोळी (औषधाची). २ बंदुकीची गोळी. ३ गोटी.
**गोलीकाण्ड**–*पु.* गोळीबार.
**गोश**–*पु.* [फा.] कान.
**गोशमाली**–*स्त्री.* [फा.] १ कान पिरगळण्याची शिक्षा; कानपिचकी. २ शिक्षा; दंड; तंबी.
**गोशवारा**–*पु.* [फा.] १ सारांश; अहवाल. २ कुंडल. ३ शिरपेच. ४ मोती.
**गोशा**—*पु.* [फा.] १ गोषा. २ कोपरा. ३ अेकान्त-स्थान. ४ दिशा; बाजू. (यौ.) **गोशानशीन**–*वि.* पडदानशीन (*स्त्री*).
**गोश्त**–*पु.* [फा.] मांस.
**गोसाअी–गोसैयाँ**–*पु.* १ गोसावी. २ अीश्वर; प्रभु.
**गोह**—*स्त्री.* घोरपड.
**गोहन***—*पु.* १ सहचर; सवंगडी; मित्र. २ सहवास; संगत.
**गोहरा**—*पु.* मोठी गोवरी.
**गोहराना**—*क्रि. अ.* हांक मारणें; बोलविणें.
**गोहार–री**—*स्त्री.* १ धांवा; रक्षणासाठीं करुण हांक. २ आरडाओरड.
**गोही***–*स्त्री.* गुपित; गुप्त गोष्ट.
**गौं**–*स्त्री.* १ सुयोग; संधि. २ गरज; मतलब. ३ रीत; प्रकार. (यौ.) **गौं घात**—योग्य संधि (मु.) **गौंका यार**–मतलबी; स्वार्थी. **गौं पडना**–गरज पडणें.
**गौ**-*स्त्री.* गाय.
**गौख**–*स्त्री.* १ गवाक्ष; झरोका. २ ओटा. **गौखा**–*पु.*
**गौखा**—*पु.* गाअीचें कातडें.
**गौगा**—*पु.* [फा.] १ आरडाओरड. २ अफवा; लोकापवाद.
**गौतमी**—*स्त्री.* पाहा ‘ गोतमी ’

**गौन***—पु. गमन.

**गौनहाअी**—वि. स्त्री. नवऱ्याच्या घरीं गेलेली स्त्री. [मुलीची.)

**गौनहार**—स्त्री. पाठराखण (नवऱ्या

**गौनहारिन, गौनहारी**—स्त्री. नायकीण; गाण्याचा धंदा करणारी स्त्री.

**गौना**—पु. वराचें वधूसह स्वगृहीं गमन (लग्नांतील अेक संस्कार).

**गौनु***—पु. गमन; प्रयाण.

**ग़ौर**—पु. [अ.] सूक्ष्म विचार; चिंतन. २ बारकाअीनें लक्ष देणें.

**गौरिया**—स्त्री. [?] १ मातीची गुडगुडी; हुक्का. २ चिमणी (पक्षी).

**गौरीचंदन**—पु. लालचंदन; रक्तचंदन.

**गौरैया**—स्त्री. चिमणी (पक्षी).

**गौहर**—पु. [फा.] १ मोती. २ बुद्धिमत्ता. ३ वस्तूची मूळ प्रकृति.

**ग्याति***—स्त्री. ज्ञाति; जात.

**ग्यान***—पु. ज्ञान.

**ग्यारस**—स्त्री. अेकादशी तिथि.

**ग्यारह**—वि. अकरा.

**ग्रंथ**—पु. ग्रंथ; पुस्तक. **ग्रंथचुंबन**—पु. स्थूल वाचन. [शिखांचा धर्मग्रंथ.

**ग्रंथसाहब**—पु. [सं. + फा.]

**ग्रंथि**—स्त्री. गांठ.

**ग्रंथिज्वर**—पु. गांठीचा ताप; प्लेग.

**ग्रंथिबंधन**—पु. पाहा 'गठबंधन'.

**ग्रंथिल**—वि. गांठी असलेला.

**ग्रसना**—क्रि. स. १ ग्रासणें. १ घट्ट आंवळून धरणें. **ग्रसित**—वि. ग्रस्त.

**ग्रह**—पु. १ सूर्याभोंवती फिरणारा ग्रह. २ अत्यंत दुःख देणारा. ३ नवाची संख्या.

**ग्रांडील**—वि. [अिं.] खूप अुंच.

**ग्रामीण**—वि. खेड्यासंबंधीं.

**ग्रामोफोन**—पु. [अिं.] फोनो; फोनोग्राफ. [२ अडाणी; खेडवळ.

**ग्राम्य**—वि. १ गांवासंबंधी; ग्रामीण.

**ग्रास**—पु. घास.

**ग्रासना**—क्रि. स. १ ग्रासणें; व्यापून टाकणें. २ कष्ट देणें; त्रास देणें.

**ग्राह**—पु. १ मगर. २ ग्रहण (चंद्र-सूर्य). ३ पकडणें [करणारा.

**ग्राहक**—पु. गिऱ्हाअीक; खरेदी

**ग्रीखम, ग्रीषम***—पु. ग्रीष्म ॠतु.

**ग्लेसियर**—पु. [अिं.] हिमनदी; बर्फाचा प्रवाह.

**ग्वारफली**—स्त्री. गवारीची शेंग.

**ग्वाल—ला**—पु. गवळी. **ग्वालिन**—गवळण. [जमीन.

**ग्वैंडा***—पु. गांवाच्या आसपासची

**ग्वैंडे**—क्रि. वि. निकट; जवळ; समीप.

**ग्वैयाँ**—पु., स्त्री. भिडू; गडी; साथी.

# घ

**घँघरा**—पु. घागरा.
**घँघोलना**–क्रि. स. १ अेखादा पदार्थ विरघळविणें; घोळणें; ढवळणें. पाणी गढूळ करणें.
**घंटा**—पु. १ घंटा. २ तास.
**घंटाघर**–पु. घड्याळ दूरवरून दिसावें यासाठीं बांधलेला अुंच मिनार; घड्याळ-मिनार.
**घंटी**–स्त्री. १ लहान घंटा. २ घंटेचा आवाज. ३ घुंगुर. ४ पडजीभ.
**घअी***–स्त्री. १ पाण्यांतील भोंवरा. २ खांब; स्तंभ. [परकर.
**घघरा**–पु. **घघरिया** स्त्री. घागरा;
**घघोट***–स्त्री. [ अनु. ] गर्जना.
**घट**–पु. १ घागर. २ शरीर. [अुतरलेला.
**घट**–वि. १ कमी झालेला. २
**घटक**–पु. १ लग्नांत मध्यस्थी करणारा; लग्न जुळवून देणारा. २ वंशपरंपरा सांगणारा अुपाध्याय. ३ दलाल. [घरघर.
**घटका**–पु. मृत्युसमयीं लागलेली
**घटती**–स्त्री. १ अुणीव; कमतरता. २ अप्रतिष्ठा; मानहानि. [३ अस्तित्व.
**घटन**–पु. १ घडण. २ अुपस्थिति.
**घटना**—क्रि. स. १ कमी होणें; घटणें. २ पुरेसें न अुरणें.
**घटना**–क्रि. अ. १ लागू पडणें; योग्य असणें. २ होणें; घडणें.
**घटना**–स्त्री. प्रसंग; गोष्ट; घटना.
**घटबढ**—स्त्री. न्यूनाधिक्य; चढअुतार (किंमत वगैरे). [घेणारा.
**घटवाअी**—पु. नदीघाटावरील कर
**घटवाना**—क्रि. स. कमी करविणें; अुतरविणें.
**घटवार**–पु. १ नदीच्या कांठावरील जकात वसूल करणारा. २ नावाडी. ३ घाटावरील भिक्षुक. [ढग.
**घटा**–स्त्री. मेघसमूह; भरून आलेले
**घटाटोप**–पु. १ ढगांची दाटी; सर्व दिशांनीं भरून आलेले ढग. २ पडदा.
**घटाना**–क्रि. स. १ कमी करणें. २ वजा करणें. ३ अप्रतिष्ठा करणें.
**घटाव**–पु. १ कमतरता; न्यूनता. २ पूर ओसरणें; ओहोटी. ३ अवनति.
**घटिया**—वि. १ साधारण प्रतीचा; बेताबाताचा. २ स्वस्त. ३ अधम.
**घटिहा**–वि. १ कावेबाज; संधिसाधु. २ दगलबाज; विश्वासघातकी. ३ हुशार; चलाख. ४ दुष्ट. ५ व्यभिचारी. [हानि; नुकसान.
**घटी**–स्त्री. १ कमतरता; अुणीव. २
**घटोत्कच**–पु. महाभारतकाळीं भीम

व हिडिंबा यांच्यापासून जन्मलेला मुलगा. [ मुळें अुमटलेली खूण.

**घट्टा**–*पु.* घट्टा; सारखें घांसलें गेल्या-

**घडघडाना**–*क्रि. अ.* [ अनु. ] गडगडणें; घडघड आवाज होणें.

**घडघडाहट**–*स्त्री.* [अनु.] गडगडाट.

**घडनअी, घडनैल**–*स्त्री.* घागरींना बांबू बांधून डबकें अथवा लहान नदी ओलांडण्याकरितां तयार केलेली तात्पुरती लहानशी नाव.

**घडा**—*पु.* मोठी घागर. ( मु. ) **घडों पानी पड जाना**–लाजेनें मान खालीं घालणें.

**घडिया**–*स्त्री.* मूस; सोनें व चांदी वितळविण्याचा मातीचा लहान प्याला.

**घडियाल**—*पु.* मगर. २ घंटा.

**घडियाली**–*पु.* घंटा वाजविणारा.

**घडी**–*स्त्री.* १ घड्याळ. २ घटका. ३ वेळ; संधि. ४ योग्य वेळ. (मु.)**घडीघडी**–पुनः पुन;वारंवार.

**घडीदिया**–*पु.* मृताच्या जागेवर ठेवण्यांत येणारा दिवा अथवा घागर. [ घड्याळजी.

**घडीसाज़**–*पु.* [ स॰ + फा. ]

**घडौंची**—*स्त्री.* घडवंची; तिवअी.

**घतिया**–*पु.* घात करणारा माणूस; धोकेबाज.

**घतियाना**–*क्रि.स.* १फसविणें; घात करणें. २ चोरून ठेवणें; लपविणें.

**घन**–*पु.* १ढग. २घनफळ. ३घट्टपणा.

**घन**–*वि.* १ भरीव. २ कठिण. ३ दाट. ४ घट्ट. ५ मोठा.

**घनकोदंड**—*पु.* अिंद्रधनुष्य.

**घनघनाना**—*क्रि. अ.* [ अनु. ] घणघण आवाज होणें.

**घनघनाहट**–*स्त्री.* [अनु.]घणघणाट.

**घनघोर**—*वि.* १ दाट; घनदाट; गर्द. २ भीषण. *पु.* १ मेघगर्जना. २ कठोर; ३ भीषण ध्वनि.

**घनचक्कर**—*वि.* १ विक्षिप्त; चक्रम्. २ मूर्ख. ३ अुनाडटप्पू.

**घननाद**–*पु.* १ ढगांचा गडगडाट. २ रावणाचा मुलगा; मेघनाद.

**घनफल**—*पु.* घनफळ.

**घनबेल**—*वि.* वेलबुट्टीदार.

**घनमूल**—*पु.* घनमूळ.

**घना**—*वि.*१ दाट; गाढ. २ भरीव; भरदार. ३ दाट पालवी असलेला. ४दाट वस्ती असलेला.५ निकटचा; जवळचा; घनिष्ठ.६ पुष्कळ.

**घने**—*वि.* पुष्कळ; अधिक; अनेक.

**घनेरा-रे***–*वि.* अतिशय; पुष्कळ.

**घनो***—*वि.* दाट; गाढ; भरीव.

**घपची**–*स्त्री.* दोन्ही हातांची मिठी; पक्कड.

**चूमा**—पु. चुंबन; मुका.
**चूर**—वि. १ तल्लीन, गुंग २ धुंद.
**चूर**—पु. चुरा; चूर्ण. (मु.) **चूरचूर करना**—तुकडे तुकडे करणें; भुगा करणें.
**चूरन**-पु. चूर्ण; भुकटी.
**चूरमा**-पु. चुरमा.
**चूरमूर**-पु. [दि.] जोंधळ्याचें किंवा बाजरीचे सड; खुंट.
**चूरा**-पु. चूर्ण; भुगा.
**चूल**-पु. १ शिखा; शेंडी. २ केस.
**चूल**—स्त्री. [दे.] कुसू; सांधा करण्यासाठीं लाकडाचा निमुळता केलेला भाग.
**चूल्हा**-पु. चूल; शेगडी.
**चूसना**-क्रि. स. चुंफणें; चोखणें; शोषून घेणें.
**चूहडा, चूहर**-पु.[?] भंगी; मेहेतर.
**चूहा**-पु. [अनु.] उंदीर. [सांपळा.
**चूहादान**-पु.[अनु.+फा.] उंदराचा
**चेचक**—स्त्री. [फा.] देवीचा रोग.
**चेटक**-पु. १ सेवक; नोकर. २ दूत. ३ थाटमाट. ४ जादुगिरी.
**चेटकी**—पु. १ चेटूक करणारा; जादूगार. २ कुतूहल दाखविणारा; चमत्कार दाखविणारा. स्त्री चेटकीण.
**चेटी**-स्त्री. दासी.
**चेत**-पु. १ चेतना; सावधानता; जागृति. २ स्मरण; आठवण.
**चेतना**-स्त्री. चेतना, शुद्धि; शुद्धीवर असणें. [जागें होणें.
**चेतना**—क्रि. अ. सावध होणें.
**चेताना**-क्रि. स. सावध करणें; अिशारा देणें.
**चेतावनी**-स्त्री. चेतावणी; अिशारा.
**चेतिका***-स्त्री. चिता.
**चेर-रा***-पु. १ नोकर. २ शिष्य.
**चेराअी***—स्त्री. दास्यत्व.
**चेरी**—स्त्री. नोकरी; सेवा; दासी.
**चेला**—पु. १ शिष्य. २ शागीर्द.
**चेलिन, चेली**—स्त्री. शिष्या; विद्यार्थिनी.
**चेष्टा**-स्त्री. १ प्रयत्न; अुद्योग. २ अंगविक्षेप. ३ कामना; अिच्छा.
**चेहरा**-पु. [फा.] १ चेहरा; तोंड. २ पुढचा भाग. (मु.) **चेहरा अुतरना**— तोंड अुतरणें. **चेहरा होना**—सैन्यांत दाखल होणें.
**चैत**-पु. चैत्र महिना.
**चैती**-१ चैत्र महिन्यांत येणारें पीक (रब्बीचें पीक). २ चैत्रांत गायिला जाणारा विशिष्ट संगीत प्रकार.
**चैन**-पु.चैन; आराम; सुख.(मु.) **चैन अुड़ाना**-चैन करणें. **चैनकी नींद सोना**-निश्चिंत मनानें राहाणें. **चैनकी बन्सी बजाना**-चैन करणें.

**चैला**–पु· १ फोडलेलें लांकूड. २ जळण.

**चोंगा**–पु· [ ? ] नळकांडें; पोकळ नळी ( वस्तु वगैरे ठेवण्यासाठीं कागद, टिन अि.ची ).

**चोंच**–स्त्री· चोंच; तोंड.

**चोंच**—वि· १ अगाअू; शिष्ट. २ धूर्त; चलाख.

**चोंचाल**-वि·चवचाल;चंचल; अुल्लू.

**चोंचोंका मुरब्बा**–पु·[यौ.] गडबड; गोंधळ; चुथडा.

**चोंथ**–पु· [ अनु.] शेणाचा पोहटा.

**चोआ**–पु· अेक सुगंधित द्रव्य.

**चोकर**–कोंडा; भुसा.

**चोखा**–वि· १ चोख;खरा.२अुत्तम; श्रेष्ठ. ३ स्वच्छ; शुद्ध. पु· तिखट-मीठ लावलेले बटाटे किंवा भाजी.

**चोग़ा**–पु· [ तु. ] पोकळ, पायघोळ अंगरखा.

**चोज**–पु· [?] १ व्याजोक्ति; अुपहासगर्भित विनोद. २ सुभाषित.

**चोट**–स्त्री· १ आघात; प्रहार; टोला. २ घाव; जखम.

**चोटी**–स्त्री· १ शेंडी. २ शिखर. (मु.) **चोटीका पसीना अेडीतक बहाना**–खूप परिश्रम करणें; घाम गाळणें.

**चोट्टा**–पु· चोर; चोरटा.

**चोप***–पु· १ अिच्छा; मनीषा. २ आवड; रुचि. ३ अुत्साह.

**चोपी**–वि·१अिच्छुक. २ अुत्साही.

**चोपना***–क्रि· अ· मोहित होणें; आसक्त होणें.

**चोब**–स्त्री· [ फा. ]१ तंबूचा खांब. २ नगारा वाजविण्याची कामटी. ३ सोनें किंवा चांदीचा मुलामा दिलेला दंडा. ४ सोटा; दंड.

**चोबा**–पु· [फा.]भात (शिजविलेला).

**चोर**–पु· चोर.

**चोरकट**–पु· चोर; अुचल्या.

**चोरख़ाना**–पु·[हि+फा.] चोरकप्पा.

**चोरथन**—वि· स्त्री· धारेच्या वेळीं दूध चोरून ठेवणारी गाय, म्हैस वगैरे.

**चोरी**–स्त्री· चोरी.

**चोल**–पु· १ चोळी. २ अंगरखा. ३ वल्कल. ४ कवच. ५ अेक लता. ( हिच्यापासून लाल रंग निघतो ).

**चोलनी**–पु· १ कफनी. २ शरीर.

**चोलरंग**–पु· पक्का लाल रंग.

**चोला**—पु· १ पायघोळ अंगरखा; साधूंची पायघोळ कफनी. २ अंग; शरीर. ( मु. ) **चोला छोड़ना**–प्राणत्याग करणें. **चोला बदलना**–देहांतर करणें.

**चोली**—*स्त्री·* चोळी. (मु.)**चोली-दामनका साथ**-घनिष्ट मैत्री.
**चौंक**-*पु·* दचक.
**चौंकना**-*क्रि.अ·* दचकणें; बिचकणें.
**चौंकाना**-*क्रि· स·* दचकविणें; दिपविणें. [ दिपणें.
**चौंघ**-*स्त्री·* लखलखाटामुळें डोळे
**चौंधियाना**-*क्रि· अ·* दिपणें; प्रकाशानें डोळे दिपणें.
**चौंरी**—*स्त्री·* १ चवरी. २पांढऱ्या शेपटीची गाय. ३वेणीचा आगवळ.
**चौआ**—*पु·* १ चतुष्पाद जनावर. २हाताचीं चार बोटें.
**चौक**-*पु·*१चौक.२रांगोळी घातलेली जागा.(मु.) **चौक पूरना**-रांगोळी घालणें.
**चौकडी**-*स्त्री·* १ चौखुर धांवणें (हरिणाचें). २लांब उडी. ३ चार माणसांचा समूह; चौकडी. (मु.) **चौकडी भूल जाना**—अत्यंत घाबरणें; कांहीं न सुचणें.
**चौकन्ना**—*वि·* सावध; जागा; जागरूक.
**चौकस**-*वि·* १ सावध; जागरूक. २ ठीक; बरोबर. **चौकसी**-*स्त्री·* सावधगिरी; हुशारी; खबरदारी.
**चौका**—*पु·* १ स्वयंपाकाची जागा. २ चौकोनी तुकडा. ३ चौक.
**चौकी**—*स्त्री·* १ नाकें; चौकी. २ चौरंग. ३ पडाव; मुक्कामाची जागा. ४ पहारा. ५ लहान पोळपाट. ६ देवास किंवा परीस अर्पण केलेल्या वस्तू.
**चौकोर**-*वि·* चौकोनी.
**चौखंड**-*पु·* १ चार मजली घर. २ चार चौकी वाडा.
**चौखट**-*पु·* चौकट.
**चौखटा**-*पु·* चौकट; फ्रेम.
**चौखूँट**-*पु·* चारी दिशा; भूमंडळ. *क्रि· वि·* चोहींकडे.
**चौखूँटा**—*वि·* चौकोनी.
**चौगान**-*पु·* [ फा. ] १ अेक प्रकारचा चेंडूचा खेळ; पोलो. २ पोलोचें मैदान. ३ नगारा वाजविण्याच्या कामट्या.
**चौगिर्द**—*क्रि· वि·* [ स· + फा.] चोहोंकडे; चोहों बाजूंस.
**चौगुना**—*वि·* चौपट.
**चौगोशिया**—*स्त्री·* [ फा. ] चार टोकांचें टोपडें.
**चौघड**-*पु·* दांतांच्या हिरड्या.
**चौघडा**-*पु·* चार कप्पे असलेला विड्याचा डबा.
**चौचीर**-*वि·* चिंधड्या.
**चौडा**—*वि·* रुंद. **चौडाअी**-*स्त्री·* **चौडान**-*स्त्री·* रुंदी.

**चौतनी**—स्त्री· चार बंदांचें टोपडें.
**चौतरा**–पु·चबुतरा.
**चौथ**–स्त्री·१चतुर्थी.२चौथा हिस्सा; चतुर्थांश. **चौथा**–वि· चवथा.
**चौथपन***–पु· म्हातारपण.
**चौथाअी**—स्त्री· चौथाअी; अेक चतुर्थांश.
**चौदस**—स्त्री· चतुर्दशी.
**चौदह**–वि· चौदा.
**चौधरी**–पु·ज्ञातीचा प्रमुख.
**चौपअी–चौपाअी**— स्त्री· चौदा मात्रांचा अेक छंद.
**चौपट**–वि· नष्ट; नाश झालेला. **चौपटा**–वि· नाश करणारा.
**चौपड**—स्त्री· पाहा 'चौसर'.
**चौपाया**–पु· चतुष्पाद प्राणी (गाय, म्हैस अि. ).
**चौपाल**–पु· १ वरून छप्पर असलेली, पण चोहों बाजूंनीं खुली अशी बसण्याची जागा. २ बैठक. ३ ओसरी. ४ दालन. ५ चावडी. ६ पालखी.
**चौबगला**–पु· [स·+फा.]बाराबंदी.
**चौबा** } **चौबे** } पु· चतुर्वेदी ब्राह्मण.
**चौबारा**—पु·दुसऱ्या मजल्यावरील बसण्याची मोकळी जागा.
**चौबारा**—क्रि· वि· चौथ्यांदा.
**चौबीस**—वि· चोवीस.
**चौभड**–स्त्री· दाढ. [चारमजली.
**चौमंज़िला**—वि· [स· + फा. ]
**चौमासा**—पु· चातुर्मास. **चौमासिया**–वि· चातुर्मासांत होणारा.
**चौमुखा**–वि· चारी बाजूंस; चार तोंडांचा. [चौरस्ता; चौक.
**चौमुहानी**—स्त्री· [सं· + फा. ]
**चौरंग**–पु· तलवारीचा हात; खेळ. वि· तलवारीच्या वारानें कापला गेलेला.
**चौरंगा**–वि· चार रंगांचा.
**चौरस**–वि· १ चौरस. २ सपाट.
**चौरस्ता**–पु· चौक.
**चौरा**–पु· १ चबुतरा. २ समाधिस्थानाचा चबुतरा. ३ घरांतील दालन; सोपा. ४ चवळीची शेंग.
**चौराअी**–स्त्री· चवळीची पालेभाजी.
**चौरानबे**–वि· चौऱ्याण्णव.
**चौरासी**–वि· चौऱ्यांशी.
**चौराहा**–पु· चौक; चौरस्ता.
**चौरी**–स्त्री· लहान चबुतरा.
**चौरेठा**–पु·ओल्या तांदुळाची पिठी.
**चौल**–पु· मुंडण; जावळ.
**चौवन**–वि·चोपन्न.
**चौवा**–पु· चारी बोटांभोंवतीं गुंडाळला जाणारा दोरा; चार अंगुळें.
**चौवालीस**–वि· चव्वेचाळीस.

**चौसर**–पु. १ चौपट; सोंगट्यांचा खेळ. २ सोंगट्यांचा पट.

**चौसर**–पु. चार लडींचा हार.

**चौहट्टा**–पु. १ चौक; चौरस्ता. २ चोहोंकडून दुकानें असलेला चौक.

**चौहद्दी**–स्त्री. [ सं. + फा. ] चारी बाजूंची हद्द.

**चौहत्तर**–वि. चौऱ्याहत्तर.

**चौहरा**–वि. चार पदरी; चौघडीचा; चौपदरी.

## छ

**छंग***–पु. १ अुत्संग; मांडी; कूस. २ छाती.

**छंगुलिया, छंगुली***–स्त्री. करंगळी.

**छँटना**–क्रि. अ. १ अलग होणें. दूर होणें. २ निवडलें जाणें. ३ साफ होणें; स्वच्छ धुतलें जाणें. ४ अशक्त होणें. (मु.) **छँटा हुआ**–१ निवडलेला. २ धूर्त; कावेबाज.

**छँटवाना**–क्रि. स. १ निवड करून घेणें. २ कापविणें; तोडून घेणें. ३ सोलविणें.

**छँटाअी**–स्त्री. कापणें, निवडणें, धुणें अि. काम व त्याची मजुरी.

**छँडना**–क्रि. स. १ टाकणें; सोडणें २ कांडणें; कुटणें. [ काढून घेणें.

**छँडाना***–क्रि. स. हिसकावून घेणें;

**छंद**–पु. १ छंद. २ अभिलाषा; अिच्छा. ३ नाद; बंधन. ४ कपट; फसवणूक. ५ युक्ति.

**छः**–वि. सहा.

**छअी**–वि. क्षयी; क्षय होणारा किंवा झालेला. पु. चंद्र.

**छकडा**–पु. [ दे. ] मालाची वाहतूक करणारी बैलगाडी.

**छकडी**–स्त्री. १ सहांचा समूह; गट. २ सहा भोयांनी अुचलावयाची पालखी. ३ सहा घोड्यांची गाडी.

**छकना**–क्रि. अ. १ तृप्त होणें; संतुष्ट होणें ( खाअून पिअून ). २ दारू पिअून तर्र होणें. [२ त्रासणें.

**छकना**–क्रि. अ. १ चकणें; फसणें.

**छकाना**–क्रि. स. १ खावयास प्यावयास देअून तृप्त करणें. २ मद्यानें अुन्मत करणें.

**छकाना**–क्रि. स. १ चकविणें; आश्चर्यचकित करणें. २ त्रास देणें.

**छक्का**–पु. १ छक्का ( पत्त्याच्या खेळांतील ). २ सहांचा समूह किंवा सहा भागांची वस्तु. ३ द्यूतांतील अेक डाव. (मु.) **छक्का**

पंजा–छक्के पंजे; डावपेंच. **छक्के छूटना**–१ बुद्धि ताळ्याबर न राहणें. २ धीर सुटणें.

**छगडा**–*पु.* बोकड.

**छगन***–*वि.* छबकडा; सोनुला; लहान मुलांस लाडानें म्हणावयाचा शब्द. *पु.* लहान मूल; आवडतें मूल.

**छगल**–*पु.* बकरा.

**छगुनी**–*स्त्री.* करंगळी.

**छछिआ–छछिया** — *स्त्री.* ताक पिण्याचें किंवा मापण्याचें अेक लहान भांडें.

**छछूँदर**–*पु.* १ घूस. २ अेक प्रकारचा ताअीत. ३ फटाक्याचा अेक प्रकार ( चिंसुद्री ).

**छजना**–*क्रि. अ.* १ खुलून दिसणें; शोभणें; अुठावदार दिसणें. २ योग्य असणें; साजेसें असणें.

**छज्जा**–*पु.* १ सज्जा; गॅलरी. २ छताचा भिंतीच्या पुढें आलेला भाग.

**छटकना**–*क्रि. अ.* [ अनु. ] १ निसटणें; सटकणें. २ दूर दूर राहणें. ३ अुडी घेणें. ४ तावडींतून सुटणें.

**छटकाना**–*क्रि. स.* [ अनु. ] १ निसटूं देणें; सटकूं देणें. २ हिसडा देअून पकडींतून सोडविणें. ३ ओढून काढणें ( पकडींत किंवा दाबाखालीं असलेल्या वस्तूस ).

**छटपटाना**–*क्रि. अ.* [ अनु. ] १ तडफडणें; हातपाय झाडणें. २ तळमळ होणें; बेचैन होणें.

**छटपटी**–*स्त्री.* १ तळमळ; बेचैनी, घाबरें. २ तीव्र अुत्कंठा.

**छटाँक**–*स्त्री.* छटाक ( वजन ).

**छटा**—*स्त्री.* १ प्रकाश; दीप्ति. २ सौंदर्य; शोभा. ३ वीज.

**छटा**—*वि.* १ निवडक. २ धूर्त; बनेल. ३ पक्का.

**छठ**–*स्त्री.* षष्ठी ( तिथि ).

**छठा**–*वि.* सहावा.

**छठी**–*स्त्री.* जन्मानंतर सहाव्या दिवशीं होणारी पूजा किंवा संस्कार; सहावी. ( मु.) **छठीका दूध याद आना**–हैराण होणें; ब्रह्मांड आठवणें.

**छड़**–*स्त्री.* १ गज; आकडा. २ लांब व पातळ काठी. [ दागिना.

**छडा**–*पु.* पायांत घालावयाचा

**छडा**— *वि.* अेकटा; अेकाकी,

**छडिया**–*पु.* पहारेकरी.

**छत***–*पु.* क्षत; घाव; जखम.

**छत**–*स्त्री.* १ छत; चांदवा. २ गच्ची.

**छत***–*क्रि. वि.* असून देखील; राहून.

**छतगीर–छतगीरी**— *स्त्री.* [*सं.*+फा.] छत; चांदवा.

**छतरी**—स्त्री· १ छत्री. २ मंडप. ३ समाधीवरील छत्री. ४ कबुतरांसाठीं बांधलेला बांबूंचा ताटवा.

**छतिया***—स्त्री· छाती; वक्षस्थळ.

**छातियाना**—क्रि· स· १ आलिंगन देणें; कवटाळणें. २ बंदूक उडवतेवेळीं मूठ (कुंदा) छातीस लावणें.

**छातिवन**—पु· सप्तपर्णी; अेक वटवृक्ष.

**छतीसा**—वि· १ चतुर; शहाणा. २ धूर्त; कावेबाज.

**छत्ता**—पु· १ छत्री. २ मधमाशांचें पोळें. ३ छत्रीसारखी दूरवर पसरलेली वस्तु.

**छत्तीस**—वि· छत्तीस. (मु.) **छत्तीसका रिश्ता**—छत्तीसाचा आंकडा; वैर.

**छत्रछाया**—स्त्री· कृपाछत्र.

**छत्रबंधु**—पु· हीन कुळांत जन्मलेला क्षत्रिय.

**छत्राक**—पु· कुत्र्याची छत्री; अळंबें.

**छद**—पु· आवरण. [हिस्सा.

**छदाम**—पु· छदाम; पैशाचा चौथा

**छद्मी**—वि· कृत्रिम वेश धारण करणारा; कपटी; फसव्या.

**छन, छनक***—पु· अेक क्षण.

**छनक**—पु· [अनु.] १ छनछन असा आवाज; झणत्कार. २ छनछन आवाज होणें. ३ सटकणें; पसार होणें; दचकून पळणें. **छनकना**—क्रि· अ·

**छनकाना**—क्रि·अ· [अनु.] १ सावध करणें; जागें करणें. २ छनछन आवाज करणें.

**छनछनाना**—क्रि· अ· [अनु.] १ छनछन आवाज होणें. २ अुकळत्या तेलांत पाणी पडल्यामुळें तडतड आवाज निघणें. २ झंकार होणें.

**छनदा***—स्त्री· रात्र.

**छनना**—क्रि· अ· १ गाळलें किंवा चाळलें जाणें. २ छिद्रें पडणें; चाळणी होणें. ३ चौकशी होणें. ४ कढअींतून तळलेला पदार्थ बाहेर काढणें. ५ अंमल चढणें. ६ लागणें; जखम होणें (मु.) **गहरी छनना**—गाढ मैत्री असणें. [चाळवून घेणें.

**छनाना**—क्रि· स· गाळवून किंवा

**छनिक***-वि· क्षणिक; क्षणभंगुर.

**छन्न**—पु· [अनु.] तापलेल्या पदार्थावर पाणी पडल्यानें होणारा आवाज.

**छप**—स्त्री· [अनु.] अेखादी वस्तु पाण्यांत अेकदम पडल्याचा आवाज. क्रि· वि· सप् सप् (पाअूस पडण्याचा) आवाज.

**छपका-छपाका**—पु· डोक्यावर घालण्याचा अेक अलंकार.

**छपका-पाका**—*पु.* [अनु.] १ पाण्यांत हातपाय मारण्याची क्रिया. २ पाण्याचा सपका.
**छपद्**—*पु.* भ्रमर; भुंगा.
**छपन***—संहार; नाश.
**छपना**—*क्रि. अ.* १ छापलें जाणें. २ चिह्नांकित होणें. ३ देवी टोचल्या जाणें. [असलेला पलंग.
**छपरखट-खाट**—*स्त्री.* मच्छरदाणी
**छपरी*** – *स्त्री.* झोपडी; मठी.
**छपवाना**—*क्रि. स.* छापवून घेणें.
**छपा**—*वि.* छापलेला; मुद्रित.
**छपाना**—*क्रि. स.* छापवून घेणें.
**छपाअी**—१ छापण्याचें काम; मुद्रण. २ छापण्याची मजुरी.
**छप्पन**—*वि.* छप्पन्न. [छंद (षट् पद).
**छप्पय**—*पु.* सहा चरणांचा अेक
**छप्पर**—*पु.* छप्पर; छत. (मु.) **छप्पर पर रखना**—सोडून देणें; चर्चा न करणें. **छप्पर फाड़कर देना**– अकल्पितपणें देणें (दान, देणगी). [२ कांति. ३ फोटो.
**छवि**—*स्त्री.* १ शोभा; सौंदर्य.
**छबीला**—*वि.* देखणा; सुंदर.
**छब्बीस**—*वि.* सव्वीस.
**छमकना**—*क्रि. अ.* [अनु.] घुंगुर बांधून नाचणें. [आवाज.
**छमछम**—*स्त्री.* नूपुर, पैंजण अि.चा
**छमछमाना**—*क्रि. अ.* [अनु.] ‘छमछम’ आवाज चालणें.
**छमना***—*क्रि. स.* क्षमा करणें.
**छमा**—*स्त्री.* माफी; क्षमा.
**छमासी**—*स्त्री.* षण्मासिक श्राद्ध.
**छमाही**—*वि* सहामाही.
**छमुख**—*पु.* षडानन; कार्तिकेय.
**छय***—*पु.* क्षय; नाश.
**छर***—*पु.* कपट; फसवणूक.
**छरछर**—*पु.* छमछम (छडी मारल्याचा आवाज). [आग होणें.
**छरछराना**—*क्रि. अ.* चुरचुरणें;
**छरना**—*क्रि. अ.* गळणें; टपकणें; झरणें; झिरपणें. [टाकणें.
**छरना***—*क्रि. स.* १ फसविणें. २ मोहून
**छरभार***—*पु.* १ कामाची जबाबदारी किंवा बोजा. २ भानगड; बखेडा.
**छरहरा**—*वि.* १ अत्यंत चपळ. २ हलक्या अंगाचा; सडपातळ.
**छरा**—*पु.* १ वाळा. २ लड. ३ नाडी (विजारीची). ४ दोर.
**छरीला**—*पु.* दगडफूल.
**छर्दि**—*स्त्री.* वांति; उलटी.
**छर्रा**—*पु.* [अनु.] छर्रा; बंदुकीची बारीक गोळी. [बहाणा. ३ धूर्तता.
**छल**—१ कपट; फसवणूक. २ मिष;
**छलक, छलकन**—*स्त्री.* अुसळी; अुसळून बाहेर येणें.

**छलकना**—*क्रि. अ.* [ अनु. ] १ ओसंडणें; हिसळणें. २ अुसळून बाहेर पडणें; सांडणें.

**छलकना**—*क्रि.स.* [ अनु. ] अुसळविणें; हिसका देऊन सांडणें.

**छलछंद**—*पु.* ( यौ. ) कपट; फसवाफसवी.

**छलछलाना**—*क्रि. अ.* [ अनु. ] १ झुळझुळ वाहणें ( पाणी ). २ भरपूर असणें ( पाणी ).

**छलछिद्र**—*पु.* फसवेगिरी; कपटी वागणूक; लबाडी.

**छलना**—*क्रि. स.* फसविणें. प्रतारणा करणें; वंचना करणें. *स्त्री.* कपट; वंचना.

**छलनी**—*स्त्री.* चाळणी. (मु.) **कलेजा छलनी होना**—दुःखानें हृदय विदीर्ण होणें.

**छलाँग**—*स्त्री.* लांब अुडी.

**छला***—*पु.* १ आंगठी. २ आभा; दीप्ति; चमक.

**छलाना**—*क्रि.स.* प्रतारणा करविणें; फसविणें ( दुसऱ्याकडून ).

**छलावा**—*पु.* १ मधूनच दिसून नाहींसा होणारा भुताचा वगैरे प्रकाश. २ आग्या वेताळ. ३ जादू; अिन्द्रजाल.

**छलिया, छली**—*वि.* १ फसव्या; लबाड. २ कपटी. [वर्तुळाकार वस्तु.

**छल्ला**—*पु.* १ छल्ला; वेढें. २ वलय;

**छवा**—*पु.* वछडा; पशूचा छावा.

**छवाअी**—*स्त्री.* शाकारण्याचें काम व त्याची मजुरी; शाकारणी.

**छवाना***—*क्रि. स.* शाकारून घेणें.

**छवि**—*स्त्री.* १ शोभा; सौंदर्य. २ तसबीर.

**छवैया**—*पु.* छप्पर तयार करणारा; शाकारणी करणारा.

**छहरना-राना***—*क्रि. अ.* चौफेर पसरणें; अस्ताव्यस्त होणें; विसकटणें.

**छहियाँ-छाँ**—*स्त्री.* छाया; सावली.

**छाँगना**—*क्रि. स.* डहाळी किंवा फांदी तोडणें.

**छाँगुर**—*पु.* सहा बोटें असलेली व्यक्ति.

**छाँछ, छाछ**—*स्त्री.* ताक; मठ्ठा.

**छाँट**—*स्त्री.* १ निरुपयोगी टाकाअू वस्तु (कागदाची रद्दी, चिंध्या अि.) २ कात्रण. ३ कातरणें; कापणें.

**छाँटना**—*क्रि.स.* १ निवडणें (धान्य). २ निवड करणें; पसंत करणें. ३ कापणें; छाटणें. ४ अलग करणें; वेगळें करणें. ५ संक्षिप्त करणें. ६ स्वच्छ करणें.

**छाँडना***—*क्रि. स.* सोडणें; टाकणें; सोडून देणें. [ण्याची दोरी.

**छाँद**—*स्त्री.* जनावरांचे पाय बांध-

**छाँदना**—*क्रि.स.* १ आवळून बांधणें;

जखडणें. २ कळवा देणें; खोडा घालणें ( जनावरांना ).

**छाँव**–*स्त्री*· छाया; सावली.

**छाँह–ही**–*स्त्री*·१ छाया; २ सावलीची जागा. ३ आश्रय; आश्रयस्थान. ४ प्रतिबिंब. ५ भूतबाधा. (मु.)**छाँह न छूने देना**–सावलीला देखील अुभें राहूं न देणें. **छाँह बचाना**–दूर राहणें; संबंध टाळणें.

**छाँहगीर**–*पु*·[सं.+फा.]१ राजछत्र. २ आरसा.

**छाक**–*स्त्री*·१ दुपारचें जेवण. २ तृप्ति; अिच्छापूर्ति. ३ अंमल; नशा.

**छाकना**—*क्रि· अ·* १ तृप्त होणें. २ निशेंत मस्त होणें; खाअून अुन्मत्त होणें.

**छाग**–*पु*· बकरा; बोकड.

**छागल**—*पु*· बकरा; बकऱ्याच्या कातड्याची वस्तु.

**छाछ**—*स्त्री*· ताक.

**छाज**–*पु*· १ सूप. २ छप्पर. ३ सज्जा.

**छाजन**–*पु*·१ आच्छादन. २ वस्त्र. *स्त्री*· १ छप्पर; कौलार. २ कौलें शाकारण्याचें काम (यौ.) **भोजन-छाजन**-जेवणखाण व कपडालत्ता; अन्नवस्त्र.

**छाजना**–*क्रि· अ·* शोभून दिसणें; खुलून दिसणें.

**छाता**—*पु*· छत्री.

**छाती**–*स्त्री*· १ छाती; वक्षः स्थल. २ स्तन. ३ हृदय. ४ साहस; हिंमत. (मु.) **छाती जुड़ाना**–मन शांत व प्रफुल्लित करणें. **छाती ठंडी होना**—अभिलाषा पूर्ण होणें. **छातीपर पत्थर रखना**–दुःख सहन करण्यासाठीं मन कठोर करणें. **छातीपर मूँग** अथवा **कोदो दलना**-अेखाद्याच्या समोर त्याच्या विषयींच वाअीट बोलणें; वर्मी घाव घालणें. **छातीपर साँप लोटना**–१ अत्यंत दुःख होणें. २ मत्सरानें जळफळाट होणें. **छाती फटना**—दुःखानें हृदय व्यथित होणें.

**छात्रवृत्ति**-*स्त्री*·शिष्यवृत्ति; स्कॉलर-[शिप.

**छात्रालय**–*पु*· विद्यार्थी-वसतिगृह.

**छादन**–*पु*·आच्छादन; आवरण.

**छान**–*स्त्री*· छप्पर.

**छानना**–*क्रि.स*· १ गाळणें. चाळणें. [२ पूर्ण विचार. ३ निवडणें; निवड करणें. ४ पडताळून पाहणें. ५ तपास करणें. ६ मादक पेय पिणें.

**छान-बीन**—*स्त्री*· १ तपास; शोध.

**छाना**—*क्रि· स·* १ पसरविणें. २ झांकणें; आच्छादणें. ३ शाकारणें; छप्पर घालणें. *क्रि· अ·* १ राहणें; मुक्काम करणें. २ फैलणें; पसरणें.

**छापना**–*क्रि. स.* छापणें.

**छापा**—*पु.* [सं.] १ ठसा; छाप. २ मुद्रा; ठशाचें चिह्न; सील. ३ मुद्रा; मोहर. ४ रात्रींचा शत्रूं-वर हल्ला; छापा.

**छापाख़ाना**–*पु.*[स.फा.] छापखाना.

**छाम***–*वि.*[सं.]क्षीण;दुबळा;कृश.

**छाया**–*स्त्री.* सावली; छाया. [यौ.]

**छायावाद**–*पु.* हिन्दी काव्यांतील अेक पंथ; रहस्यवाद. [ राख.

**छार**—*पु.*१ क्षार.२ मीठ.३ भस्म;

**छाल**–*स्त्री.* झाडाची साल; वल्कल.

**छालना**–*क्रि. अ.* [सं.] १ गाळणें. २ छिद्रें पाडणें; चाळणी बनविणें.

**छाला**–*पु.*१साल.२ चामडें. ३ अंग भाजल्यामुळें किंवा सोलल्यामुळें निघालेलें सालडें. [ (पांढरी).

**छालिया, छाला**—*स्त्री.* सुपारी

**छावना***–*क्रि.स.* शाकारणें.

**छावनी**–*स्त्री.*१ छप्पर. २ सैन्याची मुक्कामाची जागा; छावणी.

**छावा**–*पु.* १ पुत्र; मुलगा. २ बछडा (जनावराचा). ३ जवान हत्ती.

**छाह***— ताक.

**छिछ**–*स्त्री.* [अनु.] शितोडा; थेंब.

**छिँडाना***–*क्रि. स.* हिसकावून घेणें.

**छिगुनी**—*स्त्री.* करंगळी.

**छिछला**—*वि.* अुथळ.

**छिछोरा**—*वि.* क्षुद्र, छछोर.

**छिछोरापन**–*पु.* छचोरपणा.

**छिटकना**—*क्रि. अ.* १ विखुरणें; पसरणें; २ प्रकाशाचे किरण चोहों-कडे पसरणें. [ विखुरविणें.

**छिटकाना**—*क्रि. स.* पसरविणें;

**छिटपुट–छिटफूट**—*वि.* फुटकळ; किरकोळ.

**छिडकना**–*क्रि.स.* शिंपडणें; शिंपणें.

**छिडकाओ**–*स्त्री.* शिंपणें, सडा.

**छिडकाव**—*पु.* सडा.

**छिडकवाना**—*क्रि. स.* शिंपवून घेणें (दुसऱ्याकडून).

**छिडना**–*क्रि.अ.* आरंभ होणें; चालू होणें; सुरुवात होणें.

**छितरना** *क्रि. अ.* विखुरणें; पसरणें.

**छितराना**—*क्रि. अ.* विखुरणें; अस्ताव्यस्त पसरणें (बारीक तुकडे किंवा कण). *क्रि. स.* विसकटणें; अुसकटून टाकणें;अस्ताव्यस्त करणें.

**छिति***–*स्त्री.* १ पृथ्वी. २ क्षिति.

**छितिज**—*स्त्री.* क्षितिज.

**छितिरुह***—*पु.* झाड.

**छिदना**—*क्रि. अ.* १ भोंक पडणें; भोकें भोकें असणें. २ बोचणें; टोंचणें. ३ जखमी होणें.

**छिदाना**–*क्रि.स.* १ भोंक पाडविणें. २ टोंचविणें; बोचाविणें; छेदविणें.

**छिद्र**–*पु*. १ छिद्र; भोंक. २ दोष; व्यंग.

**छिन***–*पु*. क्षण. **छिनक***–*क्रि*. *वि*. क्षणभर.

**छिनकना**–*क्रि*. *स*. शिंकरणें.

**छिनछबि***–*स्त्री*. वीज.

**छिनदा**–*स्त्री*. रात्र.

**छिनना**–*क्रि*. *अ*. हिसकावून घेतलें जाणें; हरण केलें जाणें.

**छिनवाना; छिनाना**–*क्रि*. *स*. हिसकावून घेण्याचें काम दुसऱ्याकडून करविणें.

**छिनाल**–*वि*. *स्त्री*. व्यभिचारिणी; कुलटा; परपुरुषगमिनी. **छिनाला**–*पु*. व्यभिचार; अनुचित संबंध.

**छिपकली**–*स्त्री*. [दे.] पाल.

**छिपना**–*क्रि*. *अ*. लपणें; आड होणें; दडणें.

**छिपाना**–*क्रि*. *अ*. लपाविणें; गुप्त ठेवणें; दडाविणें.

**छिपाव**–*पु*. लपवालपवी; गौप्य.

**छिमा**–*स्त्री*. क्षमा.

**छिया**–*स्त्री*. १ त्याज्य व घृणित वस्तु. २ विष्ठा. (मु) **छिया छरद करना**–छीः थू करणें; त्याज्य समजणें.

**छिरकना, छिलकना***–*क्रि*. *स*. शिंपडणें.

**छिरेटा**–*पु*. अेक प्रकारचा वेल.

**छिलका**–*पु*. साल; टरफल.

**छिलना**–*क्रि*. *अ*. १ तासलें जाणें. २ सालटें निघणें.

**छिलाना**–*क्रि*. *स*. सोलून घेणें.

**छींक**–*स्त्री*. शिंक. **छींकना**–*क्रि*. *अ*. शिंकणें; शिंक येणें.

**छींका**–*पु*. पाहा ' छीका '.

**छींट**–*स्त्री*. १ शिंतोडा. २ चिटाचें कापड (वेलबुट्टीचें).

**छींटा**–*पु*. १ शिंतोडा. २ वळवाचा पाअूस. ३ ठिपका; डाग; खूण; वण. (मु.) **छींटा कसना**–टोमणा मारणें.

**छीका**–*पु*. १ शिंकें. २ बैलाच्या तोंडावर बांधावयाचें दोरीचें जाळें. ३ दोरखंडाचा झुलता पूल. ४ जाळीदार खिडकी.

**छीछडा**–*पु*. वाअीट मांसाचा तुकडा.

**छीछालेदर**–*स्त्री*. [अनु.] दुर्दशा; दुर्गति; छीःथू.

**छीजना**–*क्रि*. *अ*. झिजणें; सुकणें; कमी होणें. **छीज**–*स्त्री*. १ झीज; नुकसान. २ कमतरता.

**छीति***–*स्त्री*. क्षति; हानि.

**छीतीछान***–*वि*. छिन्नविच्छिन्न.

**छीन***–*वि*. क्षीण, अशक्त.

**छीनना**–*क्रि*. *स*. १ हिसकावून घेणें; हिसकावणें. २ टाकी लावणें (छन्नीनें). ३ कापणें; अलग करणें.

**छीना-झपटी**–*स्त्री*. १ खेंचाखेंच.

२ ओढाताण; हिसकाहिसकी.

**छीप**-*वि.* चपळ वेगवान्.

**छीप**-*स्त्री.* १ छाप; ठसा; डाग. २ अंगावर चट्टे अुठण्याचा रोग.

**छीपी**—*पु.* १ कपड्यावर बेलबुट्टी काढणारा. २ शिंपी. [ चीट.

**छीवर**-*स्त्री.* छिटाचें जाड कापड;

**छीमी**-*स्त्री.* शेंग.

**छीर***-*पु.* क्षीर; दूध.

**छीरज***-*पु.* दहीं.

**छीरप***—*पु.* बालक; बच्चा.

**छीरफेन***—*पु.* दुधावरची साय; मलअी

**छीलना**-*क्रि. अ.* १ सोलणें; तासणें २ खरडणें; खरवडून काढणें.

**छीलर**-*पु.* अुथळ डबकें.

**छुआछूत**—*स्त्री.* १ स्पर्शास्पर्श; शिवाशीव. २ स्पर्शास्पर्श विचार.

**छुअीमुअी**-*स्त्री.* लाजाळूचें झाड.

**छुच्छी**-*स्त्री.* १ बारीक पोकळ नळी किंवा फुंकणी. २ चमकी. ३ चोखणें.

**छुट***-*अव्य.* शिवाय; व्यतिरिक्त.

**छुटकाना***—*क्रि. स.* १ सोडविणें. २ सोडणें; मुक्त करणें.

**छुटकारा**—*पु.* १ सुटका; मुक्तता; मोकळीक. २ त्रास किंवा संकटांतून मुक्तता.

**छुटाना**-*क्रि. स.* पाहा 'छुडाना'.

**छुट्टा**—*वि.* १ मोकळा; सुटा सुटसुटीत. २ अेकटा.

**छुट्टी**—*स्त्री.* १ सुटका; मुक्तता. २ सवड; फुरसत. ३ सुट्टी; रजा. ४ जाण्याची परवानगी. ( मु. ) **छुट्टी पाना**—सुटका होणें.

**छुडवाना**—*क्रि. स.* दुसऱ्याकडून सोडवून घेणें.

**छुडाना**—*क्रि. स.* १ सोडविणें; ( बांधलेली, गुंतलेली वस्तु ); मुक्त करणें. २ कामावरून काढणें. ३ व्यसनांतून सोडविणें.

**छुत्***—*स्त्री.* क्षुधा; भूक.

**छुतहरा**-*वि.* अशुद्ध; अपवित्र.

**छुतिहर**-*पु.* १ कुपात्र; नीच माणूस. २ विटाळलेलें भांडें अथवा घडा.

**छुतिहा**-*वि.* १ अस्पृश्य. २ कलंकित; दोष असलेला.

**छुतैला**-*वि.* स्पर्शजन्य; सांसर्गिक.

**छुद्र**-*वि.* क्षुद्र; लहान.

**छुधा**-*स्त्री.* क्षुधा; भूक.

**छुधित**—*वि.* क्षुधित; भुकेला.

**छुपना**—*क्रि. अ.* लपणें.

**छुपाना**-*क्रि. स.* लपविणें.

**छुभित***—*वि.* १ क्षुब्ध झालेला. २ २ घाबरलेला.

**छुभिराना***—१ क्षुब्ध होणें; विचालित होणें. २ घाबरणें.

**छुरा**—पु· १ सुरा. २ न्हाव्याचा वस्तरा. **छुरी**--स्त्री· सुरी; चाकू.
**छुलछुलाना**—क्रि· अ· ठिबकणें.
**छुलाना**—क्रि· स· १ स्पर्श करणें; शिवणें. २ स्पर्श करविणें; शिवविणें.
**छुवाना**·क्रि· स· पाहा ' छुलाना '.
**छुवाव**—पु· १ स्पर्श. २ संबंध. ३ अुपमा.
**छुहना***—क्रि· अ· १ स्पर्श करणें. २ रंग दिला जाणें; लिंपलें जाणें.
**छुहारा**—पु· १ खारीक. २ खजूर; (पेंड).
**छूँछा**—वि· १ रिकामा; रिक्त. २ निःसार; निःसत्त्व. ३ निर्धन.
**छू**–पु· [अनु.] मंत्र म्हणून फुंक मारण्याचा आवाज. (यौ.) **छूमंतर**–पु·जादू. (मु.) **छूमंतर–होना**–पळून जाणें; अदृश्य होणें.
**छूट**–स्त्री·१ सुटका; मुक्तता. २ सूट (पैशाची). ३ अवकाश; रिकामपणा. ४ शिवीगाळ.
**छूटना**–क्रि· अ· १ सुटणें. २ मुक्त होणें. ३ सैल होणें. ४ सुटणें; बाकी राहणें; करावयाचें राहणें; विसरून राहणें. ५ रवाना होणें; प्रस्थान करणें. ६ सुटणें (तीर, बंदूक). ७ भंग पावणें; मोडणें (व्रत).८ पाणी सुटणें. ९ कामावरून निघणें किंवा काढलें जाणें. १० विभक्त होणें; वियोग होणें.
**छूत**–स्त्री· विटाळ; स्पर्श. (यौ.) **छूतकी बीमारी**–सांसर्गिक रोग.
**छूतछात**–स्त्री·शिवाशिव; विटाळ.
**छूना**–क्रि· अ· स्पर्श होणें. क्रि· स· १ स्पर्श करणें; शिवणें. २ लिंपणें.
**छेंकना**—क्रि· स· १ अडविणें; आडकाठी करणें. २ आच्छादित करणें. ३ रेघा ओढून मर्यादा घालणें; जागा धरून बसणें.
**छेंक**–छिद्र; भोंक.
**छेडछाड** स्त्री·अडवणूक; आडकाठी.
**छेडना**–क्रि· स· १ खोडी करणें; छेडणें. २ कुचेष्टा करणें. ३ त्रास देणें; छळणूक करणें. ४ थट्टामस्करी करणें. ५ कार्यारंभ करणें.
**छेड़वाना**–क्रि· स· खोडी करविणें; दुसऱ्याकडून चेष्टा करविणें.
**छेत्र**–पु· १ क्षेत्र; स्थान. २ शेत.
**छेद**—पु· छिद्र; भोंक.
**छेदना**–क्रि· स· १ भोंक पाडणें; छेदणे. २ कापणें. [ चोथा; चक्का.
**छेना**—पु· दुधाची नासकवणी किंवा
**छेनी**–स्त्री· १ किंकरें; सुताराचें लांकडास भोंक पाडण्याचें अेक हत्यार २ छिन्नी; टाकी.
**छेम***–पु· क्षेमकुशल.

छेरी–छेली–स्त्री· बकरी; शेळी.
छेह*–पु· १नाश. २ आघात; वार.
छेह*–स्त्री· राख; माती.
छेह–स्त्री· छाया.
छै–वि· सह्य. स्त्री· क्षय; नाश.
छैया*–पु· लहान मुल; छवकडा.
छैल*–पु· नखरेबाज माणूस; रंगेल माणूस.
छैलचिकनियाँ–पु· [दे.] नखरेबाज व्यक्ति; आंबटशोकी.
छैलछबीला, छैला–पु· [दे.] थाटमाट करणारा पुरुष; नखरेबाज व्यक्ति.
छौंक–स्त्री· फोडणी. [फोडणीस टाकणें.
छौंकना–क्रि· स· फोडणी देणें;
छौंकडा–पु· पोरगा. लहान मुलगा.
छोकडापन–पु· १ पोरपण. २ बाल्यावस्था.
छोटा–वि· १लहान. २कमी वयाचा. ३ सामान्य; तुच्छ. ४ थोडा. छोटाओ–स्त्री· १ लहानपण. २ नीचपणा. छोटापन–स्त्री· १ लहानपण, बालपण. (मु.) छोटी हाज़िरी–स्त्री· सकाळची न्याहारी.
छोटा लाट–पु· [सं.+अं.] गव्हर्नर.
छोडना–क्रि.स· १ सोडणें. २ फेंकणें; टाकणें. ३ वगळणें. (मु.) छोडकर–अतिरिक्त; शिवाय. [सोडविणें.
छोडवाना–क्रि· स· दुसऱ्याकडून
छोडाना–क्रि· स· १ सोडाविणें; विलग करणें. २ बडतर्फ करणें.
छोनिप*–पु· राजा.
छोनी*–स्त्री· पृथ्वी.
छोप–पु· १गिलावा; थर. २ गिलाव्याचें काम. ३आघात. ४ अडोसरा.
छोपना–क्रि· स· थापणें; लिंपणें; बुजविणें; भरून टाकणें.
छोभना*–क्रि.अ· १ रमणें; तल्लीन होणें. २ क्षुब्ध होणें. [दिसणारा.
छोभित*–वि· शोभिवत; खुलून
छोभित*–वि· क्षुब्ध; विचलित.
छोर–पु· १ टोंक; शेवट. २ सीमा; हद्द. ३ किनार; कांठ. (यौ.) ओर-छोर–आदि-अन्त; ठावठिकाणा.
छोरा–पु· पोरगा; मुलगा. छोरी–स्त्री· पोरगी; मुलगी. [यौ.] छोरा-छोरी–स्त्री· हिसकाहिसकी.
छोलना*–क्रि.स· सोलणें; खरडणें.
छोह–पु· १ ममता; प्रेम. २ अनुग्रह कृपा. छोहना–क्रि· अ· १ क्षुब्ध होणें; विचलित होणें. २प्रेम करणें.
छोहरा–पु· छोकरा; मुलगा.
छोहरी–स्त्री· मुलगी.
छोहाना–क्रि· स· प्रेम करणें.
छोहिनी*–स्त्री· अक्षौहिणी.
छौंकना–क्रि· स· [अनु.] फोडणी देणें; भाजी फोडणीस घालणें.
छौना–पु· पशूचा बच्चा; पिल्लूं.
छौलदारी–स्त्री· [दे.] लहान तंबू; राहुटी.

# ज

**जंक्शन**–पु.[अिं.]१ संगम; सांधा. २ ज्या ठिकाणीं दोन किंवा अधिक आगगाड्यांचे रस्ते अेकत्र मिळतात तें स्टेशन.

**जंग**–पु. [फा.] लढाअी; युद्ध. **जंगजू**–वि. १ युद्धास तत्पर. २ भांडखोर.

**जंग**–पु. [फा.] गंज; तांबेरा.

**जंगम**–वि. चल; अेका जागेवरून दुसऱ्या जागीं नेता येण्यासारखी वस्तु.

**जंगल**–पु.१अरण्य; वन. २वाळवंट.

**जँगला**–पु. [पोर्तु.] खिडकी; दार किंवा सज्जांत लावलेले गज.

**जंगली**–वि. १ रानांत अुत्पन्न होणारें. २ जंगलांत राहणारा; वन्य; रानटी. ३ जंगलासंबंधीं.

**जंगार**–पु.[फा.]तांब्याचा निळसर क्षार; तांब्यावर चढणारा निळा गंज.

**जंगी**–वि.[फा.] १ लढाअीसंबंधीं. २ लढाअू. ३ सैनिक; फौजी. ४ मोठा; धिप्पाड. [सेनापति.

**जंगी लाट**–पु. [फा.+अिं.] सर

**जंघा**–स्त्री. मांडी.

**जँचना**–क्रि.अ. १ तपासणी होणें; परीक्षा होणें. २ योग्य किंवा लायक ठरणें. ३ पटणें; प्रतीत होणें; अुमजणें. **जँचा**–वि. तपासलेला.

**जंजार, जंजाल**–पु. १ घोटाळा; भानगड; दगदग; जजाळ. २ गुंतागुंत; बंधन. ३ मोठें जाळें. ४ अुपद्व्याप.

**ज़ंजीर**–स्त्री. [फा.] १ साखळी; शृंखला. २ बेडी. ३ दाराची कडी.

**जंतर**–पु. १ यंत्र; कळ. २ मंतरलेला ताअीत. ३ अेक दागिना.

(यौ.) **जंतर-मंतर**–पु. १ जादूटोणा. २ वेधशाळा.

**जंतरी**–स्त्री. १ पंचांग. १ जंत्री. ३ धातूच्या तारा काढण्याचें लहानसें यंत्र. ४मांत्रिक; जादूटोणा करणारा. ५ वाद्य वाजविणारा.

**जँतसार**—स्त्री. जातें रोवण्याची जागा. [यंत्र. २ यंत्र; कळ.

**जंता**–पु.१धातूच्या तारा काढण्याचें

**जंतु**–पु.प्राणी; जनावर(कीटक नव्हे).

**जंत्र**—पु. १ गळ्यांतील ताअीत. २ यंत्र; कळ. ३ कुलूप.

**जंत्रित**–वि. बंद; भरलेला.

**जंत्री**—पु.१ वाद्य. २ वीणा वाजविणारा; वाद्य वाजविणारा.

**जंबीर**–*पु.* लिंबाचा अेक आंबट प्रकार. **जंबीरी नीबू**–*पु.*
**जंबु**–*पु.* जांभूळ ( फळ ).
**जँभाअी**–*स्त्री.* जांभअी.
**जँभाना**–*क्रि. स.* जांभअी देणें.
**जअी**–*स्त्री.* जव; जवाचे कोवळे अंकुर.
**ज़अीफ़**–*वि.* [अ.] १ दुर्बळ; कमजोर. २ वृद्ध; म्हातारा. **ज़अीफ़ी**–*स्त्री.* १ वार्धक्य; म्हातारपण. २ अशक्तपणा.
**जकंद्**–*स्त्री.* [फा.] अुडी; झेंप.
**ज़क**–*स्त्री.* [अनु.] १ पराभव. २ हानि; तोटा. ३ लाज. [ २ नाद; छंद.
**जक**–*स्त्री.* [अनु.] २ हट्ट; दुराग्रह.
**जक**–*पु.* १ कंजुष मनुष्य. २ धनाची राखण करणारें भूत.
**जकड**–*स्त्री.* जखड; ताण.
**जकडना**–*क्रि. स.* १ जखडणें. २ घट्ट आवळून बांधणें; करकचून बांधणें. ( मु. ) **जकडबंद करना**–१ करकचून बांधणें. २ मुठींत ठेवणें.
**जकना***–*क्रि. अ.* [अनु.] आश्चर्यचकित होणें; स्तिमित होणें.
**ज़कात**–*स्त्री.* [अ.] १ दान. २ कर; जकात.
**ज़कावत**–*स्त्री.* [ अ. ] बुद्धिमत्ता.
**ज़की**–*वि.* [अ.] बुद्धिमान्.
**जकित***–*वि.* १ चकित; विस्मित.
**ज़ख़ामत**–*स्त्री.* [अ.] जाडी; स्थूलता.
**ज़ख़ीम**–*वि.* [अ.] जाडजूड; मोठा.
**ज़ख़ीरा**–*पु.* [अ.] १ कोठी; कोठार. २ ढीग. ३ खजिना. ४ वस्तुसंग्रहालय.
**ज़ख़्म**–*पु.* [ फा. ] जखम; घाव; आघात. ( मु ) **ज़ख़्म ताजा या हरा हो जाना**—भूतकालीन दुःखाची पुनः आठवण होणें.
**ज़ख़्मी**–*वि.* [फा.] जखमी; घायाळ.
**जगत्**–*पु.* जग.
**जगत्सेठ**–*पु.* मोठा सावकार; श्रेष्ठ.
**जगत**–*स्त्री.* विहिरीभोंवतीं बांधलेला चबुतरा.
**जगतसेठ**–*पु.* धनाढ्य व्यापारी.
**जगना**–*क्रि. अ.* १ जागें होणें; अुठणें ( झोपेंतून ). २ सावध होणें. ३ जागृत होणें ( देवी, देवता अि. ). ४ अुत्तेजित होणें. ५ धुमसून पेट घेणें ( विस्तव ).
**जगमगाना**–*क्रि. अ.* [अनु.] चमकणें; लखलखणें. **जगमगाहट**—*स्त्री.* चकाकी; लखलखाट. [ अुठविणें.
**जगवाना**–*क्रि. स.* जागें करविणें;
**जगह**–*स्त्री.* [फा.] १ जागा; स्थान. २ हुद्दा; पद. ३ संधि.
**जगाना**–*क्रि. स.* १ जागें करणें. २ सावध करणें. ३ शुद्धीवर आणणें. ४ विस्तव फुलविणें.

**जगार***—*स्त्री.* जाग्रण.

**जगीला***–*वि.*जाग्रणामुळें आळसा-वलेला; झोंपेस आलेला.

**जग्य**–*पु.* यज्ञ. [२ त्याज्य; गर्ह्य.

**जघन्य**–*वि.* १ अंतिम; पराकाष्ठेचा.

**जचना**–*क्रि.* *अ.* पाहा ' जँचना '.

**ज़च्चा**–*स्त्री.* [फा.] बाळंतीण.

**ज़च्चाखा़ना**—*पु.* सूतिकागृह; बाळंतिणीची खोली.

**जज**–*पु.* [अिं.] न्यायाधीश.

**जजी**-*स्त्री.*[अिं.]न्यायाधीशाचें काम.

**जजमान**–*पु.* यजमान.

**जज़र व मद्**–*पु.* [*अ.*] समुद्राची भरती–ओहोटी.

**जजा़**–*स्त्री.* [*अ.*] १ मोबदला. २ प्रतिकार. ३ परिणाम.

**जज़ायर**–*पु.* [*अ.*]द्वीपसमूह; बेटें.

**जज़िया**–*पु.* [*अ.*] जिझिया कर.

**जज़ीरा**–*पु.* [*अ.*] द्वीप; बेट.

**जज़ीरानुमा**–*पु.* [*अ.*] द्वीपकल्प.

**जज़्ब**-*पु.*[*अ.*] १ आकर्षण. २ शोषण.

**जज़्बा**-*पु.* [*अ.*] भावना; आवेश.

**जज़्बात**–*पु.* [*अ.*] भावना (अनेक).

**जटना**–*क्रि.* *स.* ठकविणें लुबाडणें.

**जटा**-*स्त्री.* १केसांच्या जटा. २पारंब्या.

**जटाना**—*क्रि.* *स.* दुसऱ्याकडून ठकविणें.

**जटाजूट**–*पु.* लांब जटा.

**जटामासी**–*स्त्री.* सुगंधित मसाला. (काष्ठौषधि).

**जटिल**–*वि.* गुंतागुंतीचा; बिकट.

**जठर**–*पु.* पोट. *वि.* वृद्ध; म्हातारा.

**जठेरी**–*स्त्री.*जख्खड म्हातारी. [मूळ.

**जड**–*स्त्री.* १ वृक्षाचें मूळ. २ पाया;

**जडता**–*स्त्री.* जडता; अचेतनता.

**जडना**–*क्रि.* *स.*१ जडविणें. २ बस-विणें; ठोकणें; मारणें. ३ मारणें; प्रहार करणें. ४ चुगली सांगणें.

(मु.) **नाल जड़ना**–नाल मारणें.

**जडवाना,जडाना**–*क्रि.* *स.* जडवून घेणें. **जडाअी**–*स्त्री.* जडविण्याचें काम. **जडाअू**–*वि.* ज्यावर रत्न किंवा इतर पदार्थ जडविले आहेत असा; जडविण्यास योग्य.

**जडावर**—*पु.* थंडींत घालावयाचे कपडे; गरम कपडे. [जवाहिऱ्या.

**जडिया**–*पु.*जडावाचें काम करणारा;

**जडी**–*स्त्री.* औषधी वनस्पति; जडी-बुटी. [यौ.] **जडीबूटी**–*स्त्री.* जडीबुट्टी; औषध.

**जत***–*वि.* जितका.

**जतन***—*पु.* यत्न; प्रयत्न.

**जतनी**—*पु.* १ प्रयत्नशील पुरुष; अुद्योगी पुरुष. २ हुशार;तरतरीत. *वि.* प्रयत्नशील.

**जतलाना, जताना**—*क्रि.* *स.* १

बजावणें; खडसून सांगणें. २ जाणीव करून देणें; पूर्वसूचना देणें.
**जति–ती***–पु. यति; संन्यासी.
**जतु**—पु. १ डिंक. २ लाख. ३ शिलाजीत. [ २ कुटि; झोपडी.
**जतुगृह**—पु. १ लाखेचें घर.
**जतेक***-क्रि. वि. जितका. [तुकडी.
**जत्था**–पु. १ झुंड; टोळी. २ जथा;
**जद्पि**–अ. यद्यपि; जरी.
**जदल**—पु. [अ.] युद्ध; भांडण.
**जदीद**—वि. [अ.] नवीन.
**जद्द**—पु. [अ.] प्रयत्न. (यौ.) **जद्दो जहद्**–धडपड; धांवपळ.
**जन**–पु. लोक; जनता.
**ज़न**–स्त्री. [फा.] १ स्त्री. २ पत्नी.
**जनक**–पु. १ बाप; पिता. २ जनक राजा. [ राजाचे भाअूबंद.
**जनकौर***–पु. १ जनकपूर. २ जनक
**ज़नख़ा**–वि. पु. [फा.] १ नपुंसक; हिजडा. २ बायकी हावभाव करणारा; नाचणारा.
**जनतंत्र**–पु. लोकशाही.
**जनता**–स्त्री. लोक; प्रजा. [ करणें.
**जनना**–क्रि. स. जन्म देणें; अुत्पन्न
**जननी**–स्त्री. माता; आअी.
**जनपद**–पु. १ वस्ती; गांव. २ प्रदेश.
**जनम**—पु. जन्म.
**जनमना**–क्रि. अ. जन्मणें; जन्म घेणें.
**जनम-घूँटी**–स्त्री. बाळगुटी. (मु.) **जनमघूँटीमें पडना**–बाळकडू मिळणें; संवय असणें.
**जनम-सँघाती**–पु. जन्माचा सोबती.
**जनमाना**–क्रि. स. जन्म देणें.
**जनयिता**–पु. पिता; बाप.
**जनरव**–पु. १ किंवदंती; अफवा. २ बदनामी. ३ गोंधळ; कोलाहल.
**जनरल**–पु. [अिं.] सेनापति; मुख्य अधिकारी.
**जनवरी**–पु. [अिं.] जानेवारी.
**जनश्रुति**–स्त्री अफवा.
**जनवास–सा**—पु. १ जानोसा; वरपक्षास राहण्यासाठीं दिलेली जागा. २ सभा.
**जनसंख्या**–स्त्री. लोकसंख्या.
**जनसाधारण**–पु. [यौ.] सामान्य जनता. [२ सुअिणीची फी.
**जनाअी**–स्त्री. १ सुअीण; दाअी.
**जनाज़ा**–पु. [अ.] १ शव; प्रेत. २ तिरडी.
**ज़नानख़ाना**–पु [फा.] अंतःपुर.
**जनाना**–क्रि. स. बजावणें; जतावणें.
**जनाना**–क्रि. स. बाळंतपण करणें.
**ज़नाना**–वि. [फा.] १ स्त्रियांसंबंधीं. २ नपुंसक. ३ भित्रा; नेभळट. पु.

१ अंत:पुर; गोशा. २ स्त्री; पत्नी. ३ हिजडा. **ज़नानापन**–पु. स्त्रीत्व.
**जनाब**–पु. [अ.] महाराज; महाशय.
**जनाव** पु. जाणीव; सूचना; अिशारा.
**जनि***–स्त्री. १ जन्म; अुत्पत्ति. २ स्त्री. ३ आअी; माता. ४ भार्या; पत्नी. ५ जन्मभूमि.
**जनि***– अव्य. नाहीं; नको; न.
**जनियाँ***–स्त्री. [ फा.] प्रियतमा; प्रिया.
**जनी**–स्त्री. १ दासी. २ आअी. ३ मुलगी. वि. स्त्री. जन्मलेली; अुत्पन्न.
**जनु**–क्रि. वि. जणुं काय; जसें.
**जनूब**–स्त्री. [अ.] दक्षिण दिशा.
**जनेअू–व**—पु. १ जानवें. २ अुपनयन; मुंज.
**जनेत**–स्त्री. वरात ( लग्नाची ).
**जनेसु***– पु. राजा.
**जनैया**–वि. माहितगार; जाणणारा.
**जन्नत**–स्त्री. [अ.] स्वर्ग. [आयुष्य.
**जन्म**—पु. १ जन्म; अुत्पत्ति. २
**जन्मना**–क्रि. अ. जन्मणें; जन्मास येणें.
**जन्मपत्री**–स्त्री. जन्मपत्रिका.
**जन्माना**—क्रि. स. जन्म देणें; जन्मास घालणें.
**जन्मान्तर**–पु. पुनर्जन्म; दुसरा जन्म.
**जन्य**—पु. १ साधारण मनुष्य. २ लोकापवाद; अफवा. ३ पुत्र; मुलगा. ४ युद्ध; लढाअी. ५ जन्म. ६ राष्ट्र. वि. १ राष्ट्रीय. २ अुद्भूत. ३ अुत्पन्न झालेला.
**जप**—पु. जप. (यौ.) **जपतप**–पु. जपजाप्य; पूजापाठ.
**जपना**–क्रि. स. जप करणें. **जपनी**–स्त्री. जपमाळ; गोमुखी.
**जफ़ा**–स्त्री. [फा.] १ सक्ती. २ जुलूम; अत्याचार. ३ आपत्ति; संकट.
**जफ़ाकश**–वि. [फा.] कष्ट सहन करणारा; सहनशील. [शिटी; शीळ.
**जफ़ील**–स्त्री. [अ.] शिटीचा आवाज;
**जब**–क्रि. वि. जेव्हां. (मु.) **जबजब**–जेव्हां जेव्हां. **जबतब**–जेव्हां तेव्हां; नेहमीं.
**जबडा**—पु. जबडा.
**जबर**–वि. [अ.] १ बलवान्; शक्तिवान्. २ दृढ; मजबूत. **जबरअी**–स्त्री. बळजबरी; अत्याचार.
**ज़बरदस्त**–वि. [अ.+फा.] जबर्दस्त; बळकट. [ चार; जुलूम; अन्याय.
**ज़बरदस्ती**–स्त्री. [अ.+फा.] अत्या-
**जबरन्**–क्रि. वि. [अ.] बळजबरीनें.
**जबरा**–वि. [अ.] जबरदस्त; बळकट.
**जबरा**–पु. [अिं.] झेब्रा; अेक प्रकारचें घोड्यासारखें जनावर.
**ज़बह**–पु. [अ.] हिंसा; गळ्यावर

सुरी चालवून केलेली हत्या.

**ज़बान**–स्त्री·[फा.] १ जीभ. २ बात; भाषा. ३ प्रतिज्ञा; वायदा. ४ बोलण्याची पद्धत; संभाषण. **ज़बान–ज़द**-वि·प्रचलित. (मु.) **ज़बान खींचना**–अुद्धटपणाबद्दल कठोर शासन करणें. **ज़बान खुलना**–अुद्धटपणें बोलणें. **ज़बान खोलना**-तोंड अुघडणें. **ज़बान पकडना**–बोलूं न देणें. **ज़बानपर ताला लगाना**–तोंडाला कुलूप घालणें. **ज़बान हिलाना**–तोंडांतून शब्द काढणें.

**ज़बानदराज़**–वि· [फा.] अुमेट.

**ज़बानबंदी**—स्त्री· [फा.] लेखी अुत्तर; जबानी.

**ज़बानी**–वि·[फा.] तोंडी; मौखिक. (यौ.) **ज़बानी याद करना**–तोंडपाठ करणें.

**ज़बून**–वि·[फा.] वाअीट; खराब.

**ज़ब्त**–पु· [अ.] जप्त केलेली वस्तु. वि· १ जप्त केलेलें. २ सहन केलेलें; संयमित.

**जब्बार**–वि·[फा.] जुलूम करणारा.

**जब्र**–पु· [अ.] १ जबरदस्ती. २ जुलूम; अत्याचार.

**जमघट**–पु· जमाव; गर्दी.

**ज़मज़म**–पु·[अ.] मक्केतील काव्याजवळील पवित्र विहीर.

**जमना**–क्रि· अ· १ थिजणें; गोठणें; जमणें. २ जम बसणें; आसन स्थिर होणें. ३ संवय होणें. ४ रंग चढणें; रंगणें (गाणें अि.).

**जमना**–क्रि· अ· अुगवणें; अुपजणें; अुत्पन्न होणें.

**जमना**—स्त्री· यमुना नदी.

**जमनिका***–स्त्री· [दे.] पडदा.

**जमराज**–पु· यमराज.

**जमलोक**–पु· यमलोक; नरक.

**जमवट**–स्त्री· विहिरीच्या बुडाशीं बसविलेला लांकडाचा गोलाकार तक्ता (चिखल वर येअूं नये म्हणून).

**जमहूर**–पु·[अ.] १ जनता. २ राष्ट्र. **जमहूरियत**–स्त्री· लोकशाही.

**जमा**–वि·[अ.] १ अेकत्र केलेला. २ अेकूण मिळविलेला. ३ जमा (पैसे). स्त्री· १ संचित धन; मुद्दल. २ भांडवल; धन. ३ मालगुजारी; जमीनमहसूल. ४ बेरीज (गणित).

**जमाअी**--पु· जामात; जांवअी.

**जमाअत**– } स्त्री· [अ.] १ जात; जमात. २ कक्षा; वर्ग.
**जमात**– }

**जमादात**–स्त्री· [अ.] दगड व खनिज पदार्थ.

**जमादार**—पु· [फा.] शिपायांचा नाअीक; जमादार.

**ज़मानत**—स्त्री· [ अ· ] जामीन. जामीनकी.

**जमाना**—क्रि· स· १ जमविणें; गोळा करणें. २ विरजण घालणें.

**जमाना**—पु·[अ·] समय; वेळ; काळ.

**ज़मानासाज़**—वि· [ अ· + फा. ] संधिसाधू; स्वार्थसाधू.

**जमाबंदी**-स्त्री·[फा.]कुळांच्या जमीन महसुलाची नोंद असलेली वही.

**जमामार**-वि· [ अ· + स· ] दुसऱ्याचे पैसे बळकावून बसणारा.

**जमाल**—पु· [ अ· ] सौंदर्य; रूप.

**ज़मावडा**—पु· जमाव; गर्दी.

**ज़मींदारतंत्र-वाद**—पु· [ फा. + स· ] सरंजामशाही; जमीनदारी पद्धति. [ जामशाही.

**ज़मींदारशाही**—स्त्री· [फा.] सरं-

**ज़मींकंद**-पु· [ फा. + सं· ] सुरण.

**ज़मीन**-स्त्री·[फा.] भूमि;जमीन (मु.) **ज़मीन आसमान एक करना** या **ज़मीन आसमानके कुलाबे मिलाना**—भगीरथ प्रयत्न करणें. **जमीन आसमानका फ़रक़**—आकाश पाताळाचें अंतर.

**जमीनदोज़**—वि· [फा.]जमीनदोस्त.

**ज़मीमा**-पु· [ अ· ] परिशिष्ट.

**ज़मीर**-पु· [ अ· ] १ मन. २ विवेक. ३ सर्वनाम ( व्याकरण ). ४ सदसद्विवेकबुद्धि.

**जमैयत**—स्त्री· [ अ· ] १ मनाची शांति. २ सेना; फौज.

**जम्हाई**—स्त्री· जांभई.

**जयघोष**—पु· जयजयकार.

**जयजीव***-पु· नमस्काराचा प्रकार; ‘ जय असो व जगा ’.

**जयना***—क्रि· अ· जय होणें.

**जया**—स्त्री· १ दुर्गा. २ पार्वती. ३ पताका; ध्वज. वि· जय देणारी.

**जयी**—वि· विजयी.

**जर***—पु· वृद्धावस्था; म्हातारपण.

**ज़र**—पु· [फा. ]१ सोनें. २ संपत्ति; धन. [ पक्षी.

**जरकटी**—पु· [ दे. ] एक शिकारी

**ज़रकस-सी**—वि· [फा.] जरीचा.

**ज़रकोब**—पु· [ फा. ] वर्ख, वेगड इ. बनविणारा.

**ज़रखेज़**—वि·[फा.] सुपीक (जमीन).

**जरछार**-वि·भस्मीभूत;नष्ट. [कठिण.

**जरठ**—वि· १ जीर्ण; वृद्ध. २ कर्कश;

**जरतुश्त-दुश्त**—पु· [ फा. ] पारसी धर्मसंस्थापक—झरतुष्ट्र.

**ज़रद**—वि· [ फा. ] पिवळा; पीत.

**ज़रदा; जर्दा**—पु· [फा.] १ साखरभातासारखें एक पक्वान्न. २ जर्दा (तंबाखू). ३ पिवळ्या रंगाचा घोडा.

**ज़रदालू**—पु· [ फा. ] जरदाळू.

**ज़रदोज़**—[पु. फा.] जरतारीचें काम करणारा.

**ज़रदोज़ी**—स्त्री. [फा.] जरतारीचें काम.

**जरन***—स्त्री. १ जळजळ; दाह; मानसिक ताप.

**ज़रब**—स्त्री. [अ.] १ आघात; मार. २ गुणाकार. (मु.) **ज़रब देना**—चडवणें; ठोकणें. **ज़रब ख़फ़ीफ़**—हलका घाव. **ज़रब शहीद**—जबर दुखापत; घाव.

**जरबीला***-वि. [फा.]सुंदर;रमणीय.

**ज़रर**—पु.[अ.] १ अिजा; आघात; मार. २ तोटा; हानि; नुकसान.

**जरा**—स्त्री. म्हातारपण.

**ज़रा**—वि., क्रि. वि. [अ.] थोडा; किंचित्; कमी.

**ज़राअत**—स्त्री. [अ.] १ शेती; शेतकी काम. २ जिराअित जमीन; लागवड केलेली जमीन. ३ पीक.

**ज़राअत-पेशा**—पु. [अ.+फा.] शेतकरी; किसान.

**ज़राफ़त**—स्त्री. [अ.] हास्यविनोद.

**जराव***—वि. [सं.] जडाअू.

**जरायम**—पु.[अ.] गुन्हे; अपराध. ('जुर्म'चें बहु.) (यौ.) **जरायम पेशा**—गुन्हेगार जमातीचे लोक.

**ज़रिया**—पु. [अ.] १ संबंध; वशिला. २ हेतु; कारण. ३ अुपाय.

**ज़री**—स्त्री. [फा.] जरीचें काम.

**जरीदा**-वि. [फा.]अेकटा;अेकाकी.

**ज़रीफ़**—पु. [अ.] विनोदी; थट्टेखोर माणूस. २ बुद्धिमान्.

**जरीब**—स्त्री. [अ.] मोजणीची सांखळी (जमीन, शेत).

**जरीवाना**—पु. [फा.] दंड.

**ज़रीया**—पु. पाहा 'ज़रिया'.

**ज़रूर**—वि. [अ.] १ जरूरी; आवश्यक.२ अनिवार्य. क्रि. वि. अवश्य.

**ज़रूरत**—स्त्री. [अ.] जरूर; आवश्यकता; गरज.

**ज़रूरियात**—स्त्री. [अ.] गरजा; आवश्यकता; ('ज़रूरी'चें बहु.)

**ज़रूरी**—वि. [अ.] जरूरीचा; आवश्यक.

**ज़र्क़बर्क़**—वि. [अ.] झगझगीत, भडकदार.

**ज़र्द**—वि. [फ़ा.] पिवळा; जर्द.

**ज़र्दरू**—वि. [फा.] ज्याचा चेहरा फिका पडला आहे असा; लज्जित.

**ज़र्दा**—स्त्री. [फा.] १ पिवळेपणा. २ मोहर. ३ अंड्यांतील पिवळा भाग. ४ पाहा 'जरदा'.

**ज़र्दी** स्त्री.—[फा.] पिवळेपणा.

**ज़र्बुलमसल**—स्त्री. [अ.] म्हण; लोकोक्ति.

**ज़र्रा**—पु. [अ.] कण; अणुरेणु;अंश.

**जर्राह**—पु. [अ.] शस्त्रवैद्य.

**जल**—पु. १ जळ; पाणी. २वाळा. ३ पूर्वाषाढा नक्षत्र.

**जल चादर**—स्त्री. [ सं.+फा. ] पाण्याचा शांत व स्थिर असा पृष्ठभाग.

**ज़लज़ला**—पु. [ अ. ] भूकंप.

**जलडमरूमध्य**—पु. सामुद्रधुनी.

**जलन**—स्त्री. १ जळजळ; दाह; आग. २ ओीर्ष्या; असूया; मत्सर.

**जलना**—क्रि. अ. १ जळणें. २ पेटणें. ३ओीर्ष्या, द्वेष करणें; कुढणें. ४ पोळणें; भाजणें. (मु.) **जली कटी** या **जली भुनी बात**— मर्मभेदक व अत्यंत अप्रिय कथन.

**जलपना**—क्रि. अ. वल्गना करणें; फुशारकी मारणें; बढाओी मारणें.

**जलपान**—पु. न्याहारी; फराळ.

**जलप्रपात**—पु. धबधबा.

**जलप्लावन**— पु. १ महापूर. २ प्रलय. [ होणारा वेत.

**जलबेत**-पु. जलाशयाजवळ अुत्पन्न

**जलभँवरा**-पु. पाण्यावर अत्यंत जलद चालणारा काळा किडा; निवळी.

**जलयान**–पु. जहाज. [ 'जल्वा'.

**जलवत** स्त्री. } पहा 'जल्वत'
**जलवा** पु. }

**जलवाना**–क्रि. स. आग लावविणें.

**जलवायु**–स्त्री. हवापाणी.

**जलसा**–पु. [ अ. ] १ सभा; अधिवेशन. २ समारंभ; अुत्सव. ३ जलसा; मैफल (गाणें-बजावणें.)

**जलहरी**–स्त्री. अभिषेकपात्र.

**जलाजल**—पु. [ अनु. ] झालर; नक्षीदार काठ.

**जलातन**–वि. १ चिडखोर;रागीट; तापट. २ द्वेषी; मत्सरी.

**जलाना**– क्रि. स. १ जाळणें. २ पेटविणें; लावणें (दिवा). ३ जाळून राख करणें. ४ पोळविणें; भाजविणें. ५ द्वेष किंवा ओीर्ष्या अुत्पन्न करणें; भडकविणें. [ मत्सर.

**जलापा**— पु. ओीर्ष्या; असूया;

**जलाल**— पु. [अ.] १ तेज; प्रकाश; प्रभा. २ प्रभाव; दरारा; वचक.

**जला–वतन**— वि. [अ.] देशांतून हद्दपार केलेला. **जला–वतनी**-स्त्री. हद्दपारी.

**जलावन**–पु. अिंधन; जळण;सरपण.

**जलाहल**— वि. जलमय प्रदेश.

**जलील**– वि. [ अ. ] श्रेष्ठ; बडा.

**ज़लील** - वि. [ अ. ] १ तुच्छ. २ अपमानित. [२ वरात.

**जलूस**– पु. [ अ. ] १ मिरवणूक.

**जलेबी**–स्त्री. १ जिलबी. २ वेटोळें.

**जलोका–जलौका**–स्त्री. जळू.

**जल्द**–क्रि.वि. [अ.] जलद; लवकर.

**जल्दबाज़**–*वि.* [*अ.* + फा.] घाओी करणारा; लवकर काम करणारा.

**जल्दी**—*स्त्री.* [*अ.*] घाओी; तांतडी. *क्रि. वि.* लौकर.

**जल्पना**– *क्रि. अ.* मिजास दाखविणें; शेखी मिरविणें. [ २ क्रूर मनुष्य.

**जल्लाद्**–*पु.* [*अ.*] १ फांशी देणारा.

**जल्वत**-*स्त्री.* [*अ.*]प्राकट्य;जाहीरपणा.

**जल्वा**— *पु.* [*अ.*] शोभा.

**जल्वागाह**—*स्त्री.* [*अ.* + फा.] १ आपली शोभा दाखविण्याचें स्थान. २ जग.

**जल्सा**–*पु.* पाहा 'जलसा'.

**जवाँमर्द्**–*वि.* [फा.] शूरवीर; मर्द.

**जवाँ–जवान**–*वि.* [फा.]१ तरुण. २वीर. ३ शिपाओी. **जवानी**–*स्त्री.* तारुण्य; यौवन.

**जवाव**–*पु.* [*अ.*] १ जबाब; अुत्तर. २ फेड; बदला. ३ बरोबरीची किंवा जोडीची वस्तु. ४ नोकरी-वरून काढल्याचा हुकूम. (यौ.) **जवाब दावा**–*पु.*कोर्टांत वादीच्या अर्जास प्रतिवादीनें दिलेलें अुत्तर.

**जवावदेह**—*वि.* [*अ.* + फा.] जबाबदार. [( 'जाब्ता'चें बहु.)

**ज़वावित**–*पु.* [*अ.*] नियम; कायदे

**जवाबी**–*वि.* [*अ.*] अुत्तराचें.(यौ.) **जवाबीकार्ड**–जोडकार्ड.

**ज़वाल**–*पु.* [*अ.*] १ अवनति. २ जंजाळ; संकट.

**जवाहर**–*पु.* [*अ.*] जवाहीर; रत्न.

**जवाहरात**–*पु.* [*अ.*] रत्नें; जड-जवाहीर. [समारंभ. २आनंद; हर्ष.

**जशन, जश्न**–*पु.*[फा.] १ अुत्सव;

**जस***–*क्रि. वि.* जसा.

**जस***-*पु.* यश; कीर्ति.

**जसुधा–जसुमती**–*स्त्री.* यशोदा.

**जस्ता**-*पु.* जस्त.

**जहँ***–*क्रि. वि.* जेथें.

**जहँडना–डाना**—*क्रि. अ.* १नुक-सान सोसणें. २ फसणें.

**जहद्**–*स्त्री.* [*अ.*] प्रयत्न; परिश्रम.

**जहदा**–*पु.* [?] दलदल. [समज.

**ज़हन**–*पु.* [*अ.*] बुद्धि; धारणा;

**जहना***–*क्रि.स.* १ सोडणें;टाकणें. २ नाश करणें.

**जहन्नुम**—*पु.* [*अ.*] नरक. (नु.) **जहन्नुममें जाय**–चुलींत जावो.

**ज़हमत**–*स्त्री.* [*अ.*] १ आपत्ति; संकट. २ झंझट; बखेडा;भानगड.

**ज़हर**–*पु.* [फा.] विष. (नु.) **ज़हर अुगलना**–मर्मभेदक शब्द बोलणें; वाक्प्रहार करणें. **ज़हरका घूँट पीना**–अपमान गिळून गप्प बसणें. **ज़हरकी पुडिया**–अति भयंकर.

**ज़हरबाद**–*पु.* [ फा. ] काळपुळी.
**ज़हरमोहरा**–*पु.* [ फा.] अेक काळा दगड ( यानें सापाचें विष अुतरतें अशी समजूत आहे ).
**ज़हरीला**–*वि.* [ फा. ] विषारी.
**जहल**–*पु.*[*अ.*]अज्ञान;अडाणीपणा.
**जहाँ** *पु.* [ फा. ] जग.
**जहाँ,**—*क्रि. वि.* जेथें; ज्या ठिकाणीं. (मु.) **जहाँका तहाँ**–जेथल्या तेथें. **जहाँ तहाँ**–१ अितस्ततः. २ अिकडेतिकडे; सर्वत्र.
**जहाँपनाह**–*पु.* [ फा. ] १ विश्वाचें रक्षण करणारा. २ सम्राटाचें संबोधन.
**जहाज़**–*पु.* [ *अ.* ] जहाज.
**जहान**–*पु.* [फा.] जग; दुनिया.
**जहालत**–*स्त्री.* [ *अ.*] अज्ञान.
**जहिया***–*क्रि. वि.* जेव्हां.
**जहीं***–*क्रि. वि.* कोठेंहि.
**ज़हीन**–*वि.*[*अ.*] हुशार; बुद्धिमान्. तैलबुद्धीचा. [मदतनीस.
**जहीर**—*पु.* [ *अ.* ] साहाय्यक;
**ज़हूर**—*पु.* [ *अ.* ] १ प्रकाशन; प्रकट होणें. २अुत्पन्न होणें; आरंभ. ( मु. ) **जहूरमें आना**–प्रकट होणें
**जहेज़**—*पु.* [ *अ.* ] लग्नांत वरपक्षाला दिलें जाणारें धन; हुंडा, करणी वगैरे.

**जाँ**–*स्त्री.* [ फा. ] पाहा 'जान'.
**जाँगडा**–*पु.* [ दे. ] भाट; चारण.
**जाँगर**–*पु.* ताकद; सामर्थ्य.
**जाँगलू**—*वि.* [ फा. ] खेडवळ; अडाणी. [ चड्डी; जंघा.
**जाँघ**–*स्त्री.* मांडी. **जाँघिया**–*पु.*
**जाँच**–*स्त्री.* १ परीक्षा; तपासणी. २ शोध; चौकशी. ( यौ. ) **जाँच पडताल**–*पु.* शोध; चौकशी.
**जाँचक***—*पु.* याचक; भिकारी.
**जाँचना**–*क्रि.स.* तपासणें; पारखणें.
**जाँत, जाँता**–*पु.* जातें.
**जाँफ़िशानी**–*स्त्री.* [ फा. ] खूप मेहनत; जिवावर अुदार होणें.
**जाँ–ब–लब**—*वि.* [फा.] मरणोन्मुख; मरणासन्न.
**जाँबाज़**–*वि.* [फा.] १खूप परिश्रम करणारा. २जिवावर अुदार होणारा; तळहातावर शिर घेणारा.
**जाँवर***–*पु.* गमन.
**जा***—सर्व. १जो. २ ज्या (विभक्ति प्रत्यय लागतांना होणारें रूप.)
**जा**–*स्त्री.* [ फा. ] जागा; ठिकाण. ( यौ. ) **जा-ब-जा**–ठिकठिकाणीं.
**जा**–*वि.* [फा.] योग्य. (यौ.) **जा–बे–जा**—योग्यायोग्य; बरेंवाअीट.
**जाअी**–*स्त्री.* कन्या.
**जाकड**–*पु.* [?] जांगड; दुकानांतून

मोघम आणलेला माल ( पसंती-साठीं ).

**जाके***–सर्व. ज्याचा. अव्य.जाऊन.

**जाको***–सर्व. ज्याला.

**जाग**–पु. यज्ञ; याग.

**जाग**–स्त्री. जागा; ठिकाण.

**जाग**–स्त्री. जागरण.

**जागना**–क्रि. अ. १ जागें होणें; झोंपेंतून अुठणें. २ जाग्रण करणें; जागें राहणें. ३ सावध होणें. ४ अुदयास येणें; नांवारूपास येणें; प्रज्वलित होणें. (मु.) **जागता**–साक्षात्; प्रत्यक्ष.

**जागवलिक**–पु. याज्ञवल्क्य.

**जागीर**–स्त्री. [ फा. ] जहागीर.

**जागीरदार**–पु. १ जहागीरदार. २ श्रीमंत; सरदार. [मागणारा.

**जाचक**—पु. याचक; भिकारी;

**जाजरा***–वि. जर्जर; जीर्ण.

**जा-ज़रूर**–पु. [ फा. ] शौचकूप; संडास. [ जाजम; गालिचा.

**जाजम, जाजिम**–स्त्री. [ फा. ]

**जाठ**–पु. गुऱ्हाळांतील ओंडका.

**जाडा**—पु. १ थंडी; गारठा. २ हिंवाळा; शीतकाल. [ २ जात.

**ज़ात**–स्त्री. [ अ. ] १ शरीर; देह.

**जातना**–स्त्री. १ यातना; कष्ट. २. यमयातना.

**जातँपात**–स्त्री. जातपात; ज्ञाति.

**जातसपति**–पु. वरुण.

**जाति**–स्त्री. जात; जमात. २ जन्म.

**ज़ाती**–वि. [ अ. ] १ व्यक्तिगत. २ आपला; स्वतःचा. [संबंधीं.

**जातीय**–वि. १ राष्ट्रीय. २ जाती-

**जाते***–अव्य. ज्यामुळें.

**जात्रा**–स्त्री. यात्रा.

**जादूगर**–पु. [ फा. ] जादूगार.

**जादूगरी**–स्त्री. जादूगिरी.

**जान**–स्त्री. [ फा. ] १ प्राण; जीव. २ बळ; सामर्थ्य. ३ सार; तत्त्व. ( मु. ) **जान आना**–शोभा येणें. **जानका गाहक**–जीव घेणारा. **जानके लाले पडना**–जिवावर बेतणें. **जान खाना**–त्रास देणें; हैराण करणें. **जान छुडाना** या **बचाना**-भानगडीतून सुटका करून घेणें. **जान जोखों**—जीव संकटांत घालून. **जान देना**–जीव टाकणें; तळमळणें. **जानपर खेलना**–जीव धोक्यांत घालणें. **जान हथेलीपर लेना**–तळहातावर शिर घेणें.

**जान**–स्त्री. १ अनुमान; अंदाज. २ ज्ञान; माहिती. ( यौ. ) **जान पहचान**–परिचय; ओळख.

**जानकार**—वि. १ माहितगार; तज्ज्ञ. २ चतुर; कुशल.

**जानकारी**–*स्त्री*. माहिती; ज्ञान.
**जानदार**–*वि*.[फा.] सजीव; जिवंत.
**जाननहार**–*वि*. जाणणारा.
**जानना**–*क्रि. स*. १ जाणणें; समजावून घेणें. २ ओळखणें; माहिती असणें. [जाणतेपणा.
**जानपना**–*पु*. चातुर्य; बुद्धिमत्ता;
**जानमनि**–*पु*. ज्ञानी पुरुष.
**जानमाज़**–*स्त्री*. [फा.] ज्याच्यावर बसून नमाज पढतात तें आसन
**जानवर**–*पु*. [फा.] १ जनावर; पशु. २ प्राणी; जीव.
**जानशीन**–*वि*. [फा.] वारसदार.
**जानहु**--*अव्य*. समजा; गृहीत धरा.
**जानाँ**–*पु*. *स्त्री*. [फा.] प्रेमपात्र, प्रियतमा.
**जाना**–*क्रि. अ*. १ जाणें. २ अलग होणें. ३ नुकसान होणें. ४ हरवणें; गमावणें. ५ गुजरणें; येऊन ठेपणें. ६ नष्ट होणें.
**जानि**–*स्त्री*. भार्या; पत्नी.
**जानिब**–*स्त्री*. [अ.] दिशा; बाजू.
**जानिबदार**–*वि*. [फा ]पक्षपाती; तरफदार.
**जानी**–*वि*. [फा.] प्राणांशीं संबंध असणारा. (मु.) **जानी दोस्त**–जीवश्च कंठश्च मित्र. **जानी दुश्मन** —हाडवैरी.
**जानुपाणि, जानुपानि***–*क्रि. वि*. रांगत (हात व गुडघे टेकत)चालणें.
**जानु**–*पु*. गुडघा.
**ज़ानू**–*पु*. [फा.] १ मांडी; जांघ. २ गुडघा. (मु.) **दो ज़ानू बैठना**–गुडघे टेकणें.
**जापक**–*पु*. जप करणारा. [खोली.
**जापा**–*पु*. सूतिकागृह; बाळंतिणीची
**जाफ़त**–*स्त्री*. [अ.] मेजवानी.
**जाफ़रान**–*पु*. [अ.] केशर.
**जाफ़रानी**–*वि*. केशरी.
**जाफरी**–*स्त्री*. [अ.] १ कामठ्यांचा तट्या. २ झेंडूचें फूल.
**ज़ाप्ता**–*पु*. [अ.] नियम; कायदा. (यौ.) **ज़ाप्ता दीवानी**–*पु*. दिवाणी कायदा. **ज़ाप्ता फौजदारी**—*पु*. फौजदारी कायदा.
**जाम**—*पु*. याम; प्रहर.
**जाम**–*पु*. [फा.] पेला. [कापड.
**जामदानी**–*स्त्री*. [फा.] बुट्टीदार
**जामन**–*पु*. विरजण.
**जामा**–*पु*. [फा.] पोशाख; (मु.) **जामे से बाहर होना**–अत्यंत क्रुद्ध होणें.
**जामा**–*वि*. १ जमा करणारा. २सर्व; एकूण. (यौ.) **जामा मसजिद**–शहरांतील मोठी व मुख्य मशीद.
**जामिक***—*पु*. पहारेकरी; मंत्री.

**ज़ामिन**–*पु.* [अ.] दुसऱ्यास जामीन राहणारा.
**जामिनी**—*स्त्री.* रात्र.
**जामुन**–*पु.* जांभूळ.
**जामुनी**-*वि.* जांभळ्या रंगाचा.
**जामें***–अव्य. १ ज्यांत. २ तर; यासाठीं कीं.
**जाय**–*स्त्री.* [फा.] जागा; स्थान.
**ज़ायक़ा**–*पु.* [अ.] चव; स्वाद. **ज़ायक़ेदार**–*वि.* चवदार; चविष्ट.
**ज़ायचा**–*पु.* [फा.] जन्मपत्रिका;
**जायज़**–*वि.* [अ.] उचित. योग्य.
**जायज़ा**–*पु.* [अ.] १ तपासणी; सिंहावलोकन. २ हजेरी.
**जायदाद**—*वि.* [फा.] जमीन-जुमला; मालमत्ता.
**जायनमाज**—*स्त्री.* [फा.] नमाज पढतांना जमिनीवार अंथरावयाची लहानशी सतरंजी.
**जाया**—*स्त्री.* पत्नी.
**ज़ाया**—*वि.* [अ.] नष्ट.
**जाये- जायो**-*वि. पु.* मुलगा; पुत्र.
**जार**–*पु.* उपपति; यार.
**ज़ार**–*पु.* [फा.] जागा; स्थान. (यौ.) **सब्ज़ ज़ार**–हिरवेंगार मैदान. *वि.* अत्यंत अधिक. (मु.) **ज़ार ज़ार रोना**—खूप रडणें. **ज़ार-व-क़तार**–सतत; निरंतर.
**जारत**–*स्त्री.* पाहा 'जियारत'.
**ज़ारशाही**–*स्त्री.* [अिं. + फा.] रशियाच्या झार बादशहाची राजवट.
**जारी**–*वि.* [अ.] प्रचलित; चालू.
**जारी**–*स्त्री.* जारकर्म.
**जाल**–*पु.* १ मासे किंवा पक्षी धरण्याचें जाळें. २ पाश; जाळें. ३ कोळ्याचें जाळें. (फसविण्याची युक्ति). **जालदार**–*वि.* जाळीदार.
**जाल**–*पु.* [अ.] कपट; फसवेगिरी.
**जालसाज़**-*पु.* [अ. + फा.] ठग; फसव्या. **जालसाजी**–*स्त्री.* १ लबाडी; फसवेगिरी. २ खोटे कागद अगर नाणीं बनविणें.
**जाला**–*पु.* १ कोळ्याचें जाळें. २ डोळ्यांतील सारा. ३ जाळें. ४ रांजण (पाणी भरून ठेवण्याचा).
**जालिका**–*स्त्री.* १ समूह. २ जाळी.
**ज़ालिम**–*वि.* [अ.] जुलूम करणारा; क्रूर.
**ज़ालिमाना**–*वि.* [अ.] जुलमी.
**जालिया**–*वि.* फसव्या; ठग.
**जाली**–*वि.* [अ.] बनावटी; खोटा.
**जाली**–*स्त्री.* १ जाळी. २ कशीदा. ३ जाळीदार कापड. ४ आंब्यांतील केसर; रेषा.
**ज़ाविदाँ**–*क्रि. वि.* [फा.] सदैव;

हमेशा. *वि.* सदैव टिकणारा; अविनाशी.

**ज़ाविया**–*पु.* [ अ. ] कोण; कोना.

**ज़ावेद**—*वि.* [ फा. ] स्थायी; अविनश्वर.

**जासु***–*वि.* ज्याचा.

**जासूस**–*पु.* [अ.] जासूद; हेर. **जासूसी**–*स्त्री.* हेराचें काम.

**जाह**–*पु.* [अ.] १ श्रेष्ठ पद; किताब. २ प्रतिष्ठा.

**जाहि**—*वि.* ज्याला.

**ज़ाहिद**–*पु.*[अ.] अुपासक; धर्मनिष्ठ.

**ज़ाहिर**–*वि.* [ अ. ] १ जाहीर; प्रकट. २ माहीत असलेला.

**ज़ाहिरदार**—*वि.* [ अ.+फा. ] दिखाअू. **जाहिरदारी**— *स्त्री.* दिखाअूपणा.

**ज़ाहिरा**–*क्रि. वि.* [अ.] १ प्रत्यक्ष; अुघड. २ वरवर पाहतां; सकृत्-दर्शनीं. **ज़ाहिरी**—*वि.* वरून दिसणारा; बाह्य.

**जाहिल**—*वि.* [ अ. ] १ मूर्ख; अज्ञानी. २ अशिक्षित. [ फूल.

**जाही**–*स्त्री.* जाअीसारखें अेक सुगंधी

**ज़िंद**—*पु.* [ अ. ] भूत.

**ज़िंदगानी**– } *स्त्री.*[फा.]१ आयुष्य;
**ज़िंदगी.**– } जीवन.२वय; अुमर.

**ज़िंदाँ**–*पु.*[फा.] तुरुंग; बंदिशाळा.

**ज़िंदा**-*वि.*[फा.] जिवंत.(यौ.)**ज़िंदादिल**–*वि.* १ आनंदी; प्रसन्न. २ विनोदी. **जिन्दादिली**–रसिकता; विनोदी वृत्ति.

**जिंस**—*स्त्री.* [ अ. ] १ प्रकार; तऱ्हा. २ वस्तु; जिन्नस. ३ सामान; सामग्री. ४ धान्य.

**जिंसवार**—*पु.*[अ. + फा. ]पेरणीचें नोंदणीबुक (ज्यांत तलाठी शेतांतील धान्यांची नांवें लिहितो). *वि.* जिन्नसवार; क्रमवार.

**जिअु***–*पु.* जीव.

**ज़िक्र**—*पु.* [ अ. ] अुल्लेख; चर्चा.

**जिगर**—*पु.* [ फा. ] १ हृदय. काळीज. २ मन; चित्त. **जिगरी**–*वि.* १ घनिष्ठ; जीवश्च कंठश्च. २ अंतःकरणांतली (गोष्ट); हृदयापासूनची.

**जिगरा**—*पु.* [फा.] साहस; हिंमत.

**ज़िच–ज़िच्च**—*स्त्री.* [ फा. ] १ नाअिलाज; असहाय्यता; पेंच; अडवणूक. २ बुद्धिबळाच्या खेळांतील पेंचप्रसंग.

**जित***—*पु.* विजय. *वि.* जिंकलेला.

**जित***–*क्रि. वि.* जिकडे.

**जितना**–*वि.* जितका.

**जितवना***– *क्रि. स.* अुघड करणें; प्रकट करणें.

**तोशदान**–पु· [ फा. ] १ फराळाचा डबा. २ काडतुसांची चामड्याची पिशवी.

**तोशा**–पु· [ फा. ] फराळ (प्रवासास जातांना बरोबर घेतलेले फराळाचे पदार्थ ); शिदोरी. [ वस्त्रागार.

**तोशाखाना**–पु· [ तु.+फा. ] राजांचें

**तोष-तोस**-पु· तृप्ति; संतोष.

**तोहफा**—पु· [ अ· ] १ बक्षीस. २ भेट; नजराणा; देणगी.

**तोहमत**–स्त्री· [अ.] आरोप; आळ.

**तोहर–रा, तोहार***–सर्व. तुमचा.

**तोहि–हे***–सर्व. तुला.

**तौंस***–स्त्री·तहान. [ निघणें.

**तौंसना**–क्रि· अ· होरपळणें; भाजून

**तौंसा**–पु· अुष्णता; अुष्मा.

**तौंसियत**–स्त्री· विस्तवाची आंच.

**तौ***—क्रि· वि· तर

**तौफ़ीक़** स्त्री·[अ·]१ अीश्वराची कृपा. २ श्रद्धा; भक्ति. ३ सामर्थ्य.शक्ति.

**तौर**–पु· [ अ· ] १ वर्तन; वागणूक. २ दशा; स्थिति. ३ तऱ्हा; पद्धत.

**तौलगि***-अव्य. तोंपर्यंत.

**तौलना**–क्रि· स· १ तोलणें; वजन करणें. २ ओंगण घालणें.

**तौलिया**–स्त्री·,पु· [ अिं ] टॉवेल.

**तौहीन**—स्त्री· [ अ· ] अपमान; बेअिज्जत; अप्रतिष्ठा.

**त्याग**—पु· त्याग; सोडणें; अुत्सर्ग. ( यौ. ) **त्यागपत्र**–राजीनामा

**त्यागना**—क्रि· स· सोडणें; त्याग करणें. [ २ त्याप्रमाण; तसें.

**त्यों**—अव्य. १ तेव्हां; तत्काल.

**त्योरी**—स्त्री· दृष्टि; नजर. ( मु. ) **त्योरी चढना या बदलना**–रागानें डोळे वटारणें. **त्योरीमें बल पडना, त्योरी चढाना**–रागानें कपाळाला आठ्या घालणें.

**त्योहार** / **त्यौहार** } पु· सण; पर्व.

**त्रिपथ-गामिनी**–स्त्री· गंगा नदी.

**त्रिदिव**—पु· स्वर्ग.

**त्रिय-त्रिया**—स्त्री· स्त्री.

**त्रिसना***–स्त्री· तृष्णा.

**त्रुटि**—स्त्री· अुणीव; चूक.

## थ

**थंब-भ**—पु· स्तंभ; खांब. [स्थिर.

**थंमित***—वि· १ स्तंभित. २ अचल;

**थकना**–क्रि· अ· १ थकणें; दमणें २ कंटाळणें. ३ वार्धक्यानें थकणें.

**थकान**—स्त्री· थकवा.

**थकाना**—क्रि· स· थकविणें.

**थकामाँदा**–*वि.* थकलेला-भागलेला

**थकावट–हट**–*स्त्री.* थकवा. [श्रांत.

**थकौहाँ***–*वि.* थकलेला; भागलेला;

**थगित**–*वि.* स्थगित; तहकूब.

**थन**–*पु.* चतुष्पाद प्राण्याचे स्तन.

**थनी**–*स्त्री.* अजागल-स्तन.

**थनेला**–*पु.* स्त्रियांच्या स्तनांवर होणारा फोड.

**थनैत**–*पु.* १ गांवचा पुढारी. २ जमीनदाराचा खंड वसूल करणारा गुमास्ता.

**थपकना**–*क्रि. स.* [ अनु. ] थोपटणें; गोंजारणें. **थपकी**–*स्त्री.* थापटी (प्रेमानें थोपटणें.).

**थपथपाना** *क्रि. स.* थोपटणें.

**थपन***–*पु.* स्थापना.

**थपना, थपाना, थापना**–*क्रि. स.* १ स्थापना करणें. २ लौकिक गाजविणें; नांव मिळविणें.

**थपेडा**–*पु.* [ अनु. ] १ थप्पड. २ प्रहार; आघात. [थोपटून धरणारा.

**थमकारी***–*वि.* १ संयमी. २

**थमना**–*क्रि. अ.* १ थांबणें; थबकणें. २ धीर धरणें. ३ बंद होणें; चालू नसणें.

**थर**–*पु.* १ थर; घडी. २ स्थळ.

**थरकना, थरथराना, थर्राना**–*क्रि. अ.* [ अनु. ] थरथर कांपणें.

**थरमामीटर**–*पु.* [ अं. ] तापमानदर्शकयंत्र; थर्मामीटर.

**थर्राना**–*क्रि. अ.* पाहा ' थरकना '.

**थल**–*पु.* १ स्थळ; जागा; ठिकाण. २ कोरडी जमीन. ३ वाळवंट; रेताड जमीन.

**थलथल**–*वि.* वातानें अंग सुटलेला.

**थलबेडा**–*पु.* पत्ता; ठावठिकाण; थांग.

**थली**–*स्त्री.* १ स्थान; ठिकाण. २ तळ. ३ बैठक. ४ वाळवंट.

**थवई**–*पु.* गवंडी.

**थहना***–*क्रि. स.* ठाव घेणें. [कांपणें.

**थहराना**–*क्रि. स.* [अनु.] थरथर

**थहाना**–*क्रि. स.* १ थांग लावणें. २ अेखाद्याच्या विद्वत्तेविषयीं किंवा योग्यतेविषयीं अंदाज करणें.

**थाँग** *स्त्री.* १ चोर किंवा डाकूचें गुप्त स्थान. २ थांग; शोध.

**थाँगी**–*पु.* १ चोरीचा माल विकत घेणारा. २ चोरांचा मुख्य. ३ चोराना चोरीची माहिती देणारा. ४ गुप्त हेर.

**था**–*क्रि. अ.* होता ('है' चें पुल्लिंगी अेकवचनी भूतकाळाचें रूप).

**थाति–थाती**–*स्त्री.* १ ठेव; अनामत. २ वेळीं अुपयोगी पडावी म्हणून राखून ठेवलेली वस्तु. ३ स्थैर्य.

**थान**-*पु.* १ स्थान; ठिकाण. २ राहण्याची जागा; निवासस्थान. ३ देवस्थान. ४ तबेला. ५ कपडयाचें ठाण. ६ संख्या.

**थाना** *पु.* पोलीसचौकी.

**थानेदार**-*पु.* [सं. + फा.] फौजदार; पोलीसचौकीवरील अधिकारी.

**थाप**-*स्त्री.* १ थाप (तबल्याची) २ थप्पड. ३ ठसा. ४ प्रतिष्ठा; मर्यादा. ५ प्रमाण. ६ शपथ.

**थापन**-*पु.* स्थापन; प्रतिष्ठापना.

**थापना**-*क्रि. स.* १ स्थापणें; बसविणें. २ बनविणें *स्त्री.* स्थापना; प्राणप्रतिष्ठा.

**थापा**-*पु.* १ हाताच्या पंजाचा छाप; ठसा. २ शेतांत धान्याच्या राशीवर मातीनें किंवा शेणानें केलेली खूण. ३ ढीग; रास.

**थामना**-*क्रि. स.* १ थांबविणें, अडविणें. २ थोपवून धरणें; धरून ठेवणें. ३ सहायता करणें; मदत करणें. ४ सांभाळणें. ५ जबाबदारी घेणें.

**थाल**-*पु.* मोठी परात. **थाली**-*स्त्री.* ताट; थाळी; परात. (मु.) **थाली का बैंगन**-पगडी बदलणारा; चंचल.

**थाह**-*स्त्री.* १ थांग; खोली. १ थांग; पत्ता. ३ सीमा; अंत.

**थाहना**-*क्रि. स.* अंदाज पाहणें; ठाव घेणें; थांग पाहणें.

**थाहरा***-*वि.* उथळ.

**थिगली**-*स्त्री.* ठिगळ

**थिर***-*वि.* १ स्थिर; अचल. २ शांत. ३ स्थायी; टिकाऊ.

**थिरक**-*पु.* नृत्यांतील पदविक्षेप; पदविन्यास.

**थिरकना**-*क्रि. अ.* नाचणें.

**थिरना**-*क्रि. अ.* १ तरंगरहित होणें; शांत व संथ होणें (पाण्याचा प्रवाह). २ निवळणें. ३ तळाशीं जमणें.

**थिराना**-*क्रि. अ.* स्थिर होणें. *क्रि. स.* स्थिर होऊं देणें.

**थीगली**-*स्त्री.* पाहा ' थिगली.'

**थीता** *पु.* १ स्थैर्य. २ शांति; धैर्य.

**थुक्का फजीहत**-*स्त्री.* [सं.+अ.] १ छी थू; फजीती. २ भांडण; झगडा.

**थुडी**-*स्त्री.* [अनु.] छी थू; धिक्कार. (मु.) **थुडी थुडी करना**-छी थू करणें. [मितव्ययी; कंजूप.

**थुरहता**-*वि.* १ लहान हाताचा. २

**थूक** *पु.* थुंकी.

**थूकना**-*क्रि. अ.* १ थुंकणें. २ धिक्कारणें; निंदा करणें. (मु.) **किसी पर थूकना**-तुच्छ समजणें; दोष देणें. **थूक कर चाटना**-कबूल करून नाकारणें. **थूक**

देना–निंदा करणें; सोडून देणें.

**थूथन-थूथना**–पु· [दे.] लांबट तोंड. (अुंट अि.) [लांब तोंड.

**थूथरा**–पु· १ नागाचा फणा. २

**थून-नी**–*स्त्री*· १ खांब. २ आधार.

**थूल-थूला*** — *वि*· १. स्थूल; जाड. २ बेढब.

**थूहर** — पु· शेरीचें झाड.

**थेअीथेअी** — *वि*· [अनु.] थयथय (नाचणें).

**थेगली** — *स्त्री*· ठिगळ.

**थेथर** — *वि*· [दे.] थकलेला; शांत.

**थैला** — पु· १ पिशवी; थैली. २ खिसा. **थैली**–*स्त्री*· पिशवी.

**थैलीदार** — पु· [दे.+फा.] १ खजिन्यांत रुपयांची ने-आण करणारा माणूस. २ कॅशिअर.

**थैलीबरदारी** — *स्त्री*· [दे.] थैली पोंचविण्याचें काम.

**थोक** — पु· १ ढीग; रास. २ समूह. ३ ठोक विक्री. (मु.) **थोक करना**–अेकत्र करणें.

**थोडा** — *वि*· थोडा; अल्प; कमी. *क्रि· वि*· अल्प प्रमाणांत. (यौ.) **थोडा बहुत**–थोडेंफार;थोडेंबहुत. **थोडा ही**–जवळ जवळ नाहीं.

**थोती** — *स्त्री*· [दे.] जनावराच्या तोंडाचा पुढील भाग.

**थोथा** — *वि*· [दे.] १ पोकळ; रिकामा. २ तथ्य नसलेला. ३ बोथट. ४ कुचकामाचा.

**थोपडी** — *स्त्री*· थप्पड; चपराक.

**थोपना**–*क्रि· स*· १ थापणें; लिंपणें. २ गळयांत घालणें; माथीं मारणें.

**थोरा-थोरिक***–*वि*· थोडा; अल्प.

## द

**दंग** -*वि*· [फा.] थक्क; विस्मित.

**दंगअी**–*वि*· [फा.] १ दंगाधोपा करणारा. दंगेखोर. २ अुपद्‌व्यापी; अुपद्रवी. ३ प्रचंड; भयंकर.

**दंगल**-पु·[फा.]१ कुस्तीचा आखाडा. २कुस्तीची शर्यत. ३समूह; जमाव. ४ मोठी गादी. ५ चढाओढ.

**दंड** — पु· १ दंड· सोटा. २ दंड; जोर (व्यायाम). ३ साष्टांग नमस्कार; दंडवत. ४ दंड; शिक्षा.

**दंडक**–पु· १दंडा; काठी. २ शास्ता.

**दंडना** — *क्रि· स*· शिक्षा देणें; दंड करणें.

**दँतिया** — *स्त्री*· लहान दांत.

**दँतुला**–*वि*·मोठ्या दांतांचा; दातरा.

**दंद**–पु· द्वंद्व; तंटा; झगडा. **दंदी**–वि· भांडखोर.

**दंदाना**—पु· [फा.] दांते; दात्याची ओळ (फणी, करवत अि. चे दाते) **दंदानेदार**–वि· दांतेदार; दाते असलेला.

**दंदाशिकन**–वि· [फा.] १ सडेतोड (अुत्तर). २ दांत पाडणारा.

**दंपा***–स्त्री· [अनु.] वीज.

**दंभी**–वि· १ ढोंगी. २ घमेंडखोर.

**दँवरी**-स्त्री· धान्याची मळणी.

**दंस***–पु· दंश.

**दअी***–पु· १ अीश्वर. २ दैव; प्रारब्ध, (मु.) **दअी का घाला**–दुर्दैवी, कमनशिबी. **दअीमारा**–वि· दैवी आपत्तींत सांपडलेला.

**दकियानूसी**—वि· [अ.] १ अत्यंत प्राचीन. २ सनातनी; बुरसटलेला.

**दक़ीक़ा**—पु· [अ·] १ युक्ति, अुपाय. २ सूक्ष्म गोष्ट.

**दक्खिन**–पु· १ दक्षिण दिशा. २ दाक्षिणेकडील प्रदेश.

**दक्खिनी**–स्त्री· अुर्दू भाषा.

**दक्षिण**—पु· दक्षिण दिशा. वि· १ अुजवा. २ अनुकूल. (यौ.) **दक्षिण पवन**– वसंत ऋतूंतील अुन्मादक वारा.

**दख़ल**–पु· [अ.] १ अधिकार; ताबा. २ हस्तक्षेप; ढवळाढवळ. ३ प्रवेश; शिरकाव.

**दख़लयाबी**–स्त्री· [अ. + फा.] अधिकार किंवा ताबा मिळविणें.

**दख़ील**–वि· [अ.] ताबा ठेवणारा. **दख़ीलकार**–पु· बारा वर्षांच्या वहिवाटीचा हक्क सांगणारा.

**दगड**–पु·[दे.] नगारा.

**दग़दग़ा**–पु· [अ.] १ भय; भीति. २ संशय; शंका; धुगधुग. ३ अेक कंदील. **दग़दग़ी**–स्त्री· भीति.

**दगधना**—क्रि· अ· जळणें. क्रि· स· १ जाळणें. २ दुःख देणें.

**दगना**–क्रि·अ· १ सुटणें (बंदूक, तोफ अि.). २ करपणें; जळून जाणें. ३ डागळलें जाणें; डाग पडणें. ४ प्रसिद्ध, प्रख्यात होणें [रस्ता.

**दगर-रा***–पु· १ अुशीर; विलंब. २

**दग़ल**–पु· [अ.] १ दगा; कपट; धोका. २ बहाणा. [डगला.

**दगला**–पु· [दे.] जाड अंगरखा;

**दगहा**—वि· प्रेताला अग्नि देणारा व क्रियाकर्म करणारा.

**दगहा**–वि· डाग दिलेला; चरका दिलेला. [२ फसवणूक.

**दग़ा**–स्त्री· [अ.] १ कपट; धोका.

**दग़ादार, दग़ाबाज़**—वि· [अ.+ फा.] दगाबाज; कपटी.

**दग़ैल**–*वि.* [अ.] १ डागळलेला. २ दोष असलेला *पु.* दगाबाज.

**दचकना**–*क्रि.अ.* [अनु.] १ ठेच किंवा धक्का लागणें. २ दबणें. ३ हिसका बसणें. *क्रि. स.* १ धक्का देणें. २ दाबणें. [पडणें;

**दचना**–*क्रि.अ.* [अनु.] खालीं येणें.

**दच्छकुमारी***–*स्त्री.* पार्वती.

**दढियल**–*वि.* दाढी राखणारा; दाढीवाला.

**दतवन, दतुअन, दतुवन**—*स्त्री.* १ दातवण (बाभूळ, लिंब अि. चें) २ तोंड धुणें.

**दत्त**–*वि.* दिलेला.(यौ.) **दत्तचित्त**–अेखाद्या कामांत पूर्ण लक्ष घालणारा; रमून गेलेला.

**दत्त-दत्तक**–*पु.* दान; दत्तक (यौ.) **दत्त-विधान**–दत्तक घेण्याचें कार्य.

**दत्ती**–*स्त्री.* वाङ्निश्चय.

**ददरा**–*पु.* [दे.] गाळावयाचें वस्त्र.

**ददिया ससुर**–*पु.* आजेसासरा.

**ददिहाल**–*पु.* [अनु.] कूळ; वंश.

**ददोरा**—*पु.* गांध.

**दध-धि**–*पु.* १ दही. २ वस्त्र; कपडा.

**दधि***–*पु.* समुद्र.

**दधिकाँदो**–*पु.* गोकुळ आष्टमीच्या दिवशीं दह्यांत हळद मिसळून अेकमेकांचें अंगावर फेकतात तो अुत्सव.

**दधिसुत**—*पु.* १ कमळ. २ चद्र. ३ मोतीं. ४ विष.

**दधिसुत**–*पु.* लोणी.

**दनादन**–*क्रि.वि.*[अनु.] १ दणादण आवाज करीत. २ आनंदानें. ३ सतत.

**दनुज**–*पु.* दानव; दैत्य.

**दन्दा**–*वि.* [फा.] दांत.

**दन्दा-शिकन**–*वि.* [फा.] १ दांत काढणारा. २ कठोर.

**दपटना**–*क्रि. अ.* दटावणें;दरडावणें. **दपेट**–*स्त्री.* दटावणें; दरडावणी.

**दपु***–*पु.* दर्प; अहंकार; घमेंड.

**दफतर, दफ्तर**–*पु.* [फा.]१कचेरी; कार्यालय. २ सविस्तर वृत्तान्त.

**दफती**–*स्त्री.* [अ.] पुष्ठा (पुस्तकाचा); पुष्टीपत्र.

**दफनाना**–*क्रि.स.*[अ.]पुरणें;गाडणें. **दफन**–*पु.* प्रेत पुरण्याचा विधि.

**दफा**–*स्त्री* [अ.] १ वेळा; खेपा. २कायद्याचें कलम. *वि.* दूर केलेला; तिरस्कृत. (मु.) **दफा लगाना**–कायद्याचें कलमाखालीं खटला भरणें.

**दफादार**—*पु.* [अ. + फा.] नाआीक; फौजदार.

**दफीना**–*पु.* [अ.] पुरलेलें धन.

**दफ्तरी**–*पु.* [अ.] बुक बाअिंडर.

**दफ्तरीखाना**—पु. [फा.] बुक-बाइंडिंग विभाग.

**दबंग**–*वि.* प्रभावशाली; रुबाबदार.

**दबगर**-पु.[दे.] १कातड्याचें बुधलें बनविणारा. २ढाल बनविणारा.

**दबना**—*क्रि. अ.* १ दबणें; चेपलें जाणें. २ टिकाव न धरणें; मागें हटणें. ३ लाचार होणें. ४ फिक्कें पडणें. ५वजन पडल्यामुळें नम्र होणें. ६ लाजणें; संकोच करणें.

(मु.) **दबी ज़बान से कहना**–ध्वनित करणें; स्पष्ट न बोलणें.

**दबसट**–*पु.* दाब; दडपण.

**दबाना**—*क्रि. स.* १ दाबणें; चेपणें २ मागें हटविणें. ३ दडपण घालणें; दाब आणणें ४ बळकावणें. ५ असहाय करून सोडणें. ६ पुरणें; गाडणें. ७ दमन करणें. ८ बळकावणें.

**दबाव**— *पु.* दाब; दडपण; वजन.

**दबीज़**—*वि.* [फा.] दाट; घट्ट.

**दबैल**—*वि.* १ अंकित; ताबेदार. २ नमून वागणारा.

**दबोचना**-*क्रि. स.* १ लपविणें, छपविणें. २ झडप घालून दाबणें; दडपणें. [राहूं न देणें. २ दाबणें.

**दबोरना**—*क्रि. स.* १ समोर उभें

**दम**—*पु.* १ संयम. २ शिक्षा. ३ घर. ४ चिलखत.

**दम** *पु.* [फा] १ श्वास; दम. २ चिलिमीचा दम; झुरका. (मु.) **दम अखडना**—श्वास थांबणें; शिथिल होणें. **दम घोंटकर मारना**–गळा दाबून मारणें. **दम खींचना**–१ गप्प बसणें. २ श्वास घेणें. **दम घुटना**–श्वास कोंडणें; जीव गुदमरणें. **दम तोडना**–शेवटचा श्वास घेणें. **दम फुलना**–दम लागणें; धापा टाकणें. **दम भरना**–अभिमानपूर्वक एखाद्याची स्तुति करणें. **दम मारना; दम लेना**–विसांवा घेणें. **दम खुश्क होना** अथवा **सूखना**–भीतीनें गांगरल्यामुळें श्वास थांबणें. **नाक में दम आना**—नाकीं नऊ येणें. **दम देना**–फसविणें. (यौ) **दम झांसा**-फसवणूक. **दम दिलासा** अथवा **दमपट्टी**–खोटी आशा.

**दमकना**–*क्रि. अ.* चकाकणें; लकलकणें. **दमक**-*स्त्री.* तेज, चमक.

**दमकल**–*स्त्री.*[फा.+सं.]१ आगीचा बंब. २ पाणी हापसण्याचा बंब. ३ पंप. **दमकला**— *पु.* रंग किंवा गुलाबपाणी शिंपण्याचें पिचकारी असलेलें भांडें.

**दमखम**–*पु.* [फा.] १ दृढता; मजबुती. २ जीवनशक्ति; प्राण. ३ तलवारीचें पातें किंवा धार.

**दमचूल्हा**–*पु.* लोखंडी शेगडी.

**दमदिलासा**–*पु.* [फा.] थाप, फसवणूक. [ सयम. ३ शिक्षा.

**दमन**–*पु.* १ दडपून टाकणें. २

**दमबाज़**–*वि.* [फा.] फूस देणारा.

**दमाद**–*पु.* जांवई.

**दमामा**–*पु.* नगारा.

**दमारि***–*पु.* वणवा; दावानल.

**दमैया***–*वि.* हरणारा; नाहींसे करणारा.

**दयनीय**–*वि.* केविलवाणा.

**दयानत**–*स्त्री.* [अ.] दानत; अिमान; विश्वासूपणा. [ विश्वासू.

**दयानतदार**–*वि.* [अ. + फा.]

**दयाना***–*क्रि. अ.* द्रवणें; दयाळू होणें.

**दयालु**–*वि.* दयाळू. २ दयेस पात्र.

**दयावना***–*वि. पु.* १ दीन;

**दयिना**–*स्त्री.* पत्नी; बायको.

**दरआमद**–*स्त्री.* [फा.] १ आगमन; आंत येणें. २ मालाची आयात.

**दर**–*पु.* १ भेग; फट. २ दरी; गुफा, कंदरा. ३ भीति. ४ शंख.

**दर**–*पु.* दल; झुंड; समूह.

**दर**–*पु.* [फा.] दार; दरवाजा. १ दर; भाव २ पुरावा. (मु.)

**दर दर अलख जगाते घूमना**- लोकांना जागृत करीत हिंडणें.

**दर दर मारा मारा फिरना**– दारोदार हिंडणें; देशोधडीस लागणें.

**दरकना**–*क्रि. अ.* अुलणें; फाटणें.

**दरकाना**–*क्रि. स.* फाडणें. **दरका**- *पु.* १ भेग; चीर २ मार; तडाखा.

**दरकार**–*वि.* [फा.] आवश्यक; जरुरीचा. *स्त्री.* जरुरी; आवश्यकता.

**दर-किनार**–*क्रि. वि.* [फा.] वेगळे; बाजूला. [ दरमजल.

**दरकूच** *क्रि. वि.* [फा.] मजल

**दरखास्त**-*स्त्री.* [फा.] १ विनंति; प्रार्थना. २ अर्ज; विनंतिपत्र

**दरख्त**–*पु.* [फा.] वृक्ष; झाड.

**दरगाह**–*स्त्री.* [फा.] १ दरगा (मुसलमानांचें समाधिस्थान). २ अुंबरठा; प्रवेशद्वार. ३ दरबार; कचेरी [अलग. २ माफी मिळालेला.

**दर-गुज़र**–*वि.* [फा.] १ वेगळा;

**दरज**–*स्त्री.* भेग; चीर; फट.

**दरद, दर्द**–*पु.* [फा.] १ पीडा; वेदना; दुःख. २ दया; करुणा.

**दर-दर**–*क्रि. वि.* [फा.] दारोदार; घरोघर.

**दरदराना**–*क्रि. स.* भरडणें; ठेचणें.

**दरदरा**–*वि.* भरड दळलेला.

**दरना**–क्रि. स. १ दळणें. २ चेचणें. ३ नाश करणें.

**दरप***—पु. दर्प; घमेंड.

**दरपना**-क्रि. अ. १ संतापणें; रागावणें. २ गर्व करणें; घमेंड करणें.

**दरपनी**—स्त्री. लहान आरसा.

**दरपरदा**-वि. [फा.] १ पडद्याआड. २ लपूनछपून. [समोर.

**दर-पेश**–क्रि. वि. [फा.] पुढें;

**दर-पै**–क्रि. वि. [फा.] अेखाद्याच्या पाठीमागें; अेखाद्याच्या शोधांत. (मु.) **किसी के दर-पै होना**-अेखाद्याच्या पाठीस लागणें; अेखाद्याला त्रास देणें.

**दरब, दर्ब***— पु. १ धन; द्रव्य. २ सोनें, चांदी अि. धातू

**दरबा**—पु. [फा.] खुराडें; सोपा; कबुतरखाना.

**दरबान**—पु. [फा.] पहारेकरी; द्वारपाल. **दरबानी**–स्त्री. पहारा; पहारेकऱ्याचें काम.

**दरभ**–पु. दर्भ.

**दरमा**–पु. [दे.] चटअी.

**दरमान**–पु. [फा.] १ औषध; दवा. २ चिकित्सा; अुपाय. [वेतन.

**दरमाहा**–पु. [फा.] दरमहा; मासिक

**दरमियान**—पु. [फा.] मध्य. क्रि. वि. दरम्यान; मध्यंतरीं.

**दरमियानी**—वि. [फा.] मधला. पु. समेट घडवून आणणारी व्यक्ति; मध्यस्थ.

**दरवाज़ा**–पु. [फा.] दार; दरवाजा.

**दरवेश**–पु. [फा.] १ फकीर; दरवेशी. २ भिकारी.

**दरशाना**–क्रि.स. पहा 'दरसाना'.

**दरस, दरसन**–पु. १ ओझरती भेट; दृष्टादृष्ट. २ रूप; सौंदर्य. ३ दर्शन.

**दरसना***–क्रि. अ. दृष्टीस पडणें. क्रि. स. पाहणें.

**दरशनी–सनी** स्त्री. आरसा; दर्पण.

**दरसाना**— क्रि. स. दर्शविणें; दाखविणें. [कप्पा.

**दराज**–स्त्री. [अिं.] टेबलाचा खण,

**दराज**–वि. [फा.] मोठा.

**दराज**–स्त्री. भेग; फट.

**दरारना**—क्रि. अ. भेग पडणें; फाटणें. **दरार**–स्त्री. चीर; फट; भेग.

**दरारा**–पु. रेटा; धक्का.

**दरिंदा**–पु. [फा.] हिंसक पशु.

**दरिया**–पु. [फा.] १ नदी. २ समुद्र. **दरियाअी**–वि. १ नदीसंबंधीं; नदीजवळचा. २ समुद्रासंबंधीं.

**दरियादिल**—वि. [फा.] अुदार.

**दरियाफ्त**–वि. [फा.] ज्ञात; माहितीचा; पत्ता लागलेला.

दरिया-बरार-पु. [फा.] मळीची जमीन.

दरियाबुर्द—पु. [ फा. ] नदीच्या प्रवाहानें वाहून गेलेली जमीन.

दरी-स्त्री. १ दरी. २ गुंफा.

दरी-स्त्री. सतरंजी.

दरीखाना-पु. [सं. + फा.] पुष्कळ दरवाजे असलेलें घर.

दरीचा— पु. [फा.] १ झरोका; २ खिडकी. ३ खिडकीजवळची बसण्याची जागा.[दुकान किंवा बाजार.

दरीबा-पु. [फा.] पानतंबाखूचें

दरेग-पु. [फा.] १ दुःख; खेद. २पश्चात्ताप. ३ कमतरता; अुणीव.

दरेरना-क्रि. स. चेंदामेंदा करणें; रगडणें;वाटणें. [२ पाण्याची ओढ.

दरेरा—पु. १ रेटा; धक्का.

दरोग-पु. [फा.] खोटें; असत्य. दरोगहलफी—स्त्री. खरें बोलण्याची शपथ घेअून खोटें बोलणें (विशेषतः कोर्टांत).

दर्ज़-वि. [फा.] नमूद; लिखित.

दर्ज़-स्त्री. [फा.] भेग; फट.

दर्जन—पु. [अिं] डझन; बारा वस्तूंचा समूह. [श्रेणी;वर्ग.३ हुद्दा.

दर्जा—पु. [अ.] १ पद; दर्जा. २

दर्ज़ी-पु. [फा.] शिंपी.

दर्द-पु. [फा.] १ दुःख; पीडा. २ दया; करुणा. (मु.) दर्द खाना—दया दाखविणें.

दर्दनाक-वि. [फा.] करुणाजनक.

दर्दमंद—वि. [फा.] १ दुःखी; पीडित. २ दयाळू.

दर्रा-पु. [फा.] १ डोंगरांतील दरी. २ डोंगरामधील अरुंद वाट; घाट.

दर्राना-क्रि. अ. [अनु.] बेधडक निघून जाणें.

दल-पु. १ पान; दळ. २ फुलाची पाकळी. ३ तमालपत्र. ४ समूह ५ फौज; सैन्य. ६ गट; पक्ष.

दलक-स्त्री. [अ.] गोधडी.

दलक-स्त्री. १ आघातामुळें अुत्पन्न झालेला कंप. २ ठणका; ठसठस. दलकन-स्त्री. १ कंप; थरकांप. २ आघात.

दलकना-क्रि. अ. १ भेग पडणें; फाटणें. २ सावध होणें. ३ त्रासणें. ४ थरकांप होणें. क्रि.स. भिवविणें.

दलदल-स्त्री. दलदल. दलदला—वि. दलदलीची.

दलना-क्रि.स. १ दळणें. २ वाटणें. ३ चेंदामेंदा करणें; चिरडणें. ४ मळणें. [संघटना

दलबंदी—स्त्री. [सं. + फा.] पक्ष-

दलबल—पु. फौजफाटा. [भांडण.

दलबाजी—[सं.+फा.] पक्षबाजी;

**दलबादल**— पु· १ मेघसमूह. २ मोठी फौज. ३ मोठा मंडप.

**दलमलना**—क्रि· स· १ मळणें. अेकजीव करणें. २ चेंदामेंदा करणें; चिरडणें. ३ नाश करणें.

**दलहन**—पु· डाळीचीं धान्यें.

**दलान**–पु·दालन.अडत्या; [मध्यस्थ.

**दलाल-दल्लाल**—पु· [अ·] दलाल;

**दलिद्दर**–पु· दारिद्र्य वि· दरिद्री.

**दलिया**—पु· १ भरडलेलें धान्य. २ रवा. [वाद. २ वादविवाद.

**दलील**—स्त्री· [अ·] १ युक्ति-

**दव**—पु· १ दावाग्नि. २ जंगल. ३. अग्नि.

**दवकैया**—पु· जरीची तार तयार करण्यासाठीं सोनें, रुपें ठोकून पत्रा तयार करणारा.

**दवन***—पु· नाश; पाडाव.

**दवनी**—स्त्री· धान्याची मळणी.

**दवारिया***–स्त्री· वणवा; दावाग्नि.

**दवागि, दवागिन**– स्त्री· वणवा; दावाग्नि.

**दवा,दवाअी**—स्त्री·[अ·]१औषध. २ अुपचार; अिलाज. (यौ.) **दवादारू**–औषधपाणी.

**दवाखाना**–पु· [फा.] औषधालय.

**दवात**–स्त्री·[अ·] दौत.

**दवामी**–वि· [अ·] चिरकाल टिकणारा; स्थायी. [कायमधारापद्धति.

**दवामीबंदोबस्त**—पु· [अ·+फा.]

**दवारी***–स्त्री· दावानल.

**दशहरा**–पु· १ ज्येष्ठ शुद्ध दशमी (यास गंगादशहरा असें म्हणतात.) २ विजयादशमी; दसरा.

**दशाह**–पु· मृतकाचा दहावा दिवस.

**दस**–वि· दहा. [३ शिखर.

**दसन***—पु· १ दांत. २ कवच.

**दसना**–क्रि· अ· पसरणें; फैलावणें. क्रि· स· पसरणें; अंथरूण घालणें पु· बिछाना, अंथरूण. [रावण.

**दसमाथ***—पु· दहा शिरें असलेला

**दसी**–स्त्री· १ वस्त्राचा शेवटचा भाग; दशा. २ कापडाचें ठाण.

**दस्तंदाज़ी**–स्त्री· [फा.] हस्तक्षेप; ढवळाढवळ; लुडबुड.

**दस्त**—पु·[फा.]१ जुलाबाचें औषध; रेचक. २ जुलाब. ३ हात.

**दस्तक**–स्त्री· [फा.] १ टिचकी; दार ठोठावणें. २ महसूल वसुलीचा परवाना. ३ मालवाहतुकीचा परवाना. ४ महसूल. [शिल्पकला.

**दस्तकार**–पु·[फा.] हस्तकौशल्याचें काम करणारा; कारागीर. **दस्तकारी**–स्त्री· हस्तकौशल्य;

**दस्तखत**–पु·[फा.] हस्ताक्षर; सही.

**दस्तगीर**—*वि.* [फा.] संकटांत साहाय्य करणारा.

**दस्तबरदार**—*वि.*[फा.] अेखाद्या वस्तूवरील आपला ताबा सोडणारा.

**दस्तयाब**–*वि.*[फा.] हस्तगत; प्राप्त.

**दस्तरखान–ख्वान**—*पु.* [फा.] जेवणाच्या वेळीं ताटाखालीं अंथरावयाची चादर.

**दस्ता**–*पु.* [फा.] १ मूठ (काठी किंवा शस्त्र). २ फुलांचा गुच्छ. ३ कागदाचा दस्ता. ४ मूठ (हातांत राहील अितकें). ५ शिपायांची तुकडी.

**दस्ताना**–*पु.* [फा.] हातमोजा.

**दस्तार**–*स्त्री.* [फा.] पगडी.

**दस्तार–बंद**—*पु.* [फा.] पगडी बांधणारा.

**दस्तावर**—*वि.* [फा.] रेचक.

**दस्तावेज**–*स्त्री.* [फा.] दस्तैवज.

**दस्ती**— *वि.* [फा.] हाताचें. *स्त्री.* १ मशाल. २ लहान मूठ. ३ लहान कलमदान.

**दस्तूर**– *पु.* [फा.] १ पद्धत; वहिवाट; चाल. २ नियम; कायदा. ३ पारशी धर्मगुरु. [ कमिशन.

**दस्तूरी**—*स्त्री.* [फा.] दलाली;

**दह**—*वि.* [फा.] दहा (संख्या).

**दह**–*पु.* डोह; खोल पाण्याची जागा.

**दह**—*स्त्री.* जाळ; आगीचा डोंब.

**दहकना**– *क्रि. अ.* १ चेतणें; पेट घेणें; भडकणें. २ अंग तापणें.

**दहकान**—*पु.* [फा.+अ.] खेडवळ; गांवढळ माणूस.

**दहकाना**—*क्रि. स.* १ चेतविणें; पेटविणें; शिलगावणें.

**दहडदहड**–*क्रि. वि.* धडाडून पेटणें.

**दहना**—*क्रि. अ.* १ जळणें; भस्म होणें. २ रागावणें; जळफळणें. *क्रि. स.* १ जाळणें. २ दुःख देणें.

**दहना**—*क्रि. अ.* रुतणें; खचणें.

**दहनि***—*स्त्री.* दहन; जळणें.

**दहपटना**–*क्रि. स.* [फा.] अुध्वस्त करणें; जमीनदोस्त करणें; **दहपट**-*वि.* १ अुध्वस्त; जमीनदोस्त. २ तुडविलेला; पायाखालीं चिरडलेला.

**दहर**—*पु.* १ डोह. २ हौद; कुंड.

**दहरना***— *क्रि. अ.* थरकांप होणें; भयभीत होणें. [**दहल**-*स्त्री.* थरकांप.

**दहलना**— *क्रि. अ.* थरकांप होणें.

**दहला**–*पु.* [फा.] दश्श्या (पत्त्यांतील).

**दहलाना**— *क्रि. स.* भिवविणें.

**दहलीज़**— *स्त्री.* [फा.] अुंबरा; अुंबरठा.

**दहशत**—*स्त्री.* [फा.] भीति; भय. (यौ.) **दहशत अंगेज**–भयानक; भीषण. **दहशत ज़दा**–भयमीत.

**दहा**-- पु· [ फा. ] १ मोहरमचा महिना. २ मोहरमचे दहा दिवस. ३ ताबूत.

**दहाअी**—स्त्री· [ फा. ] १ दहावा; दशांश. २ संख्येंतील 'दहं' स्थान.

**दहाडना**— क्रि· अ· [अनु.] गर्जना करणें; किंकाळी फोडणें. ( मु. ) **दहाड मारना** १ किंकाळी फोडणें. २ धाय मोकलून रडणें; मोठ्यानें रडणें. **दहाड**—स्त्री· १ हिंस्र पशूची गर्जना; किंकाळी. २ आर्तस्वर.

**दहाना**—पु· [ फा. ] १ रुंद तोंड. २ नदीचें मुख. ३ मोरी.

**दहिना**—वि· अुजवा.

**दहिने** —क्रि· वि· अुजवीकडे. (मु.) **दहिने होना**—अनुकूल होणें.(यौ.) **दहिने बाअें**—दोन्ही बाजूंस.

**दहु***-अव्य. १ किंवा; अथवा. २ कदाचित्. [भांडें.

**दहेंडी**—स्त्री·दही विरजण्याचें मातीचें

**दहेज़**—पु· [अ·] हुंडा, आंदण अि. लग्नांत वरपक्षास दिलें जाणारें धन.

**दाँ**—पु· [ फा. ] जाणणारा; तज्ज्ञ; माहितगार.

**दाँत**—पु· दांत. (मु ) **दाँतों अुँगली काटना** किंवा **दाँतों तले अुँगली दबाना**—१ चकित होणें; मुग्ध होणें. २ खेद प्रकट करणें. **दाँत काटी रोटी**—जीवश्च कंठश्च मैत्री. **दाँत चबाना**—रागानें दांत खाणें. **दाँत पीसना**—रागानें दांत खाणें, **दाँत तोडना**—हैराण करणें. **दाँत बैठ जाना**—दांतखीळ बसणें. **दाँतोंमें तिनका लेना**—दांतीं तृण धरणें.

**दाँता किटकिट**—स्त्री· [सं·+अनु.] १वाचावाची;झगडा. २शिवीगाळ.

**दाँति**-स्त्री·१अिंद्रियनिग्रह; अिंद्रियदमन. २ अधीनता ३ नम्रता; विनय.

**दाँती**—स्त्री· कोयता; विळा.

**दाँती**—स्त्री· बत्तिशी ( दंतपंक्ति ).

**दाँवरी**-स्त्री· दावें; दोर.

**दाअुँ**—पु पाळी; खेप.

**दाअू**—पु·१वडील भाअू.२ कृष्णाचा वडील भाअू बलदेव.

**दाख***—स्त्री· १ द्राक्ष. २ मनुका. ३ बेदाणा; किसमीस.

**दाखिल**—वि·[अ.] १ हजर; दाखल झालेला. २ शिरकाव झालेला. ३ मिसळलेला; भाग घेतलेला.(मु.) **दाखिल करना**—दाखल करणें; जमा करणें.

**दाखिल-खारिज**—पु· [ अ·+फा. ] सरकारी कागदपत्रांत संपत्तीच्या वारसांच्या नांवाची केलेली नोंद.

**दाखल-दफ्तर**–*वि.* [*अ.*+फा.] निकालांत निघालेला; दप्तरीं जमा झालेला ( कागद ).

**दाखिला**-*पु.*[*अ.*] प्रवेश; शिरकाव.

**दाग**–*पु.* [ फा. ] १ डाग; डागळल्याची खूण. २अग्निसंस्कार. ३दाह.

**दागना**–*क्रि. स.* [फा.] १ डाग पाडणें. २ पोळविणें; डागणें. ३जाळणें. ४ डागणें (बंदुक, तोफ).

**दागबेल**–*स्त्री.* [फा+सं.] १ पाया खोदण्यासाठीं आंखलेल्या रेघा. २ पाया. [ मत्सर.

**दाघ***–*पु.* १ अुष्णता, २ अीर्ष्या;

**दाजन-झन***–*स्त्री.* १दाह २ अीर्षा.

**दाजना**–– *क्रि. अ.* १ जळणें, २ द्वेष करणें.

**दाडिम**—*पु.* डाळिंब.

**दाढ**––*स्त्री.* डरकाळी; गर्जना.

**दाढना***—*क्रि. स.* जाळणें; भस्म करणें.

**दाढीजार**––*पु.* १ दाढी जळालेला. २ अेक शिवी (स्त्रिया रागावल्यावर पुरुषांना देतात. ) [देणारा.

**दात, दाता, दातार***– *पु.* दाता;

**दातुन, दातौन**––*स्त्री.* दांतवण.

**दाद**-*स्त्री.* अेक चर्मरोग; गजकर्ण.

**दाद**–*स्त्री.* [फा.] न्याय; दाद (मु.) **दाद देना**– १ न्याय करणें. स्तुति करणें.

**दादनी**–*स्त्री.*[फा.] १ परत फेडीची रक्कम. २ ऋण; कर्ज.

**दादा**–– *पु.* आजोबा ( वडिलांचे वडील. ) २ थोरला भाअू. ३ वृद्धांसाठीं आदरसूचक शब्द. (मु.) **दादाके भालपर फातिहा पढना**–आयत्या पिठावर रेघोट्या ओढणें. **दादी**––*स्त्री.* आजी.

**दादा**––*पु.* [ फा. ] फिर्यादी; दाद मागणारा.

**दादु***––*स्त्री.* गजकर्ण.

**दादुर**–बेडूक.

**दाध***—*स्त्री.* दाह; दुःख; ताप.

**दाधना***––*क्रि. स.* जाळणें; नष्ट करणें. [ वस्तु; ३ कर; वसूल.

**दान**––*पु.* १ दान. देण्यांत आलेली

**दान-दाँ**––*वि.* [ फा. ] १ ज्ञाता; माहितगार. २ आश्रयदाता.

**दानवारि**—*पु.* हत्तीचा मद.

**दाना**–*पु.* [फा.] १ धान्याचा कण. २ धान्य. ३ भाजलेलें धान्य. ४ बीं. ५ दाणा ( मोती अि. ) ६ मणी. ७ रवा. ८ कण. (मु.) **दाने-दानेको तरसना**–खावयास न मिळणें. **दाने दानेको मुहताज**–अत्यंत गरीब.

**दाना**-वि.[फा.] १बुद्धिमान; हुशार. २ ज्ञानी. ३चतुर.

**दानाअी**--स्त्री. [फा.] बुद्धिमत्ता; हुशारी. [पिणें. २ अुपजीविका.

**दानादानी**-पु.[फा.+सं.]१ खाणें-

**दानिश**-स्त्री.[फा.]अक्कल, हुशारी.

**दानिशमंद**-वि. [फा.] बुद्धिमान्; समजूतदार. **दानिशमंदी**- स्त्री. बुद्धिमत्ता. [ रवाळ.

**दानेदार**--वि. [ फा. ] दाणेदार;

**दानी**--वि. अुदार; दानशूर.

**दानौ***-पु. दानव.

**दाप**-पु. १ दर्प; अहंकार. २ ताकद; शक्ति. ३ राग; क्रोध. ४ अुत्साह. ५ दुःख; मनस्ताप.

**दापना***—क्रि. स. १ दाबणें. २ मनाअी करणें. [ ३ समूह; रास.

**दाम**-पु. १ दोरी. २ माळ; लड.

**दाम**-पु. १ मूल्य, किंमत. २ धन. ३ रुपया. (मु.) **दाम चुकाना**-किंमत देणें; पैसे देणें.

**दाम**—पु. [ फा. ] पाश; बंधन.

**दामन**-पु. [ फा. ] १ पदर; अंचल. २ डोंगराचा पायथा. ३ कोट, अंगरखा अि. चा खालचा भाग.

**दामनगीर**--पु. [ फा. ] १ दावेदार. २ विरोधक.

**दामाद**--पु. [ फा. ] जांवअी.

**दामासाह**-पु. [ दे. ] दिवाळखोर. स्त्री. **दामासाही**—देणेदारांना मिळालेली रक्कम.

**दामी**-स्त्री. महसूल; कर. वि. बहुमोल.

**दायँ य**-पु. १ खेप; वेळ. २ पाळी.

**दायज-जा**—पु. हुंडा.

**दायमी**—वि. [ अ. ] स्थायी.

**दायमुल-हब्स्**-पु. [ अ. ] जन्मठेप.

**दायर**—वि. [ अ. ] १ रुजू; दाखल (दावा, फिर्याद). २ चालता; फिरता. (मु.) **दायर करना**-फिर्याद दाखल करणें.

**दायरा**-पु.[अ.] घेर; परीघ; वर्तुळ.

**दाया**--स्त्री. [ फा. ] दाअी.

**दाया***--स्त्री. दया; कृपा.

**दायाद**-पु. १ वांटेकरी (संपत्तीचा). २ गोत्रज. ३ मुलगा. वि. वांटेकरी.

**दायित्व**--पु. जबाबदारी.

**दायें**-क्रि. वि. अुजवीकडे. (मु.) **दायें होना**-अनुकूल होणें; प्रसन्न होणें.

**दार, दारा**-स्त्री. पत्नी; भार्या.

**दारचीनी**—स्त्री. दालचिनी.

**दारमदार**-पु. [फा.] १ आधार; आश्रय. २ अवलंब; आसरा.

**दारि***—स्त्री. डाळ.

**दारिँअु**-पु. १ डाळिंब. २ वेलदोडा.

**दारिका***- *स्त्री*· १ बालिका; मुलगी. २ कन्या. [ निर्धनता.
**दारिद***—*पु*· दारिद्र्य; गरीबी;
**दारुण**-*वि*· भयंकर; घोर.
**दारू**-*स्त्री*· [फा.] १ मद्य; दारू. २ औषध. ३ बंदुकीची दारू.
**दारोगा**-*पु*· [ फा. ] फौजदार.
**दारोमदार**—*पु*· पहा 'दारमदार'
**दार्शनिक**-*वि*· दर्शन शास्त्रासंबंधीं; तत्त्वज्ञानासंबंधीं. *पु*· तत्त्वज्ञानी; तत्त्वज्ञ.
**दाल**-- *स्त्री*· डाळ. (मु.) **दाल-गलना**--डाळ शिजणें; स्वार्थ साधणें. **दाल दलिया**-मीठ भाकर. **दालमें कुछ काला होना**-काळें-बेरें असणें. **दाल रोटी**-भाजी भाकरी; साधें जेवण.
**दालमोट**-*स्त्री*· खारी डाळ; तळलेली मसालेदार डाळ.
**दालान**-*पु*· [फा.] व्हरांडा; ओसरी.
**दावँ**-*पु*· १ पाळी; खेप; फेरा. २ संधि; योग. ३ डाव; पेंच. ४ कपट; युक्ति.
**दावँरी**-*स्त्री*· दावें; दोरी. [ (धान्य)
**दावँना-वना**-*क्रि· स*· मळणें.
**दावत**-*स्त्री*· [ *अ*· ] मेजवानी.
**दावा**-*पु*· [ *अ*· ] १ हक्क; दावा; अधिकार. २ फिर्याद. ३ आरोप. ४ ठांसून सांगणें. (मु.) **दावा करना**-१ ठांसून सांगणें; निश्चय-पूर्वक सांगणें. २ दावा, फिर्याद करणें.
**दावा**-*स्त्री*· वणवा.
**दावात**-*स्त्री*· [ *अ*· ] दौत.
**दावादार-दावेदार**-*पु*· [*अ*·+फा.] दावेदार; हक्क सांगणारा. [ आग.
**दावानल**—*पु*· अरण्यांत लागलेली
**दास्तान**—*स्त्री*· [ फा. ] कहाणी; वृत्तांत.
**दाहना-हिना**-*वि*· उजवा.
**दाहिना-देना**—( मु. ) प्रदक्षिणा घालणें. [ खपली.
**दिअली**-*स्त्री*· १पणती. २जखमेवरील
**दिआ**-*पु*· दिवा; पणती.
**दिक्**-*स्त्री*· दिशा; बाजू.
**दिक**—*वि*· [*अ*·] १ त्रस्त; हैराण. २ अस्वस्थ; आजारी. *पु*· क्षयरोग. (मु.) **दिक करना**—त्रास देणें; सतावणें.
**दिक्कत**—*स्त्री*· [ *अ*· ] १ अडचण. २ त्रास; संकट. ३ कठिणता.
**दिखलाना**-*क्रि· स*· दाखविणें. **दिखलाई**-*स्त्री*· पाहण्याची किंवा तपासण्याची फी.
**दिखहार***-*पु*· दर्शक; पाहणारा.
**दिखावटी**-*वि*· दिखाऊ; वरपांगी.

**दिखावा**—पु· अवडंबर; देखावा; ढोंग; दिखाअूपणा. [२दाखविणारा.
**दिखैया***—पु· १ पाहणारा; प्रेक्षक.
**दिखौआ**—*वि·* दिखाअू; बाह्यात्कारी.
**दिगर**—*वि·* [फा.] अन्य; दुसरा.
**दिग्घ***—*वि·* दीर्घ; लांब.
**दिठवन**—पु· कार्तिक शुद्ध अेकादशी.
**दिठाना**—*क्रि· अ·* दृष्ट लागणें. *क्रि· स·* दृष्ट लावणें. **दिठौना**—पु·तीट. (दृष्ट लागूं नये म्हणून).
**दिढ***—*वि·* दृढ; मजबूत.
**दिढाना**—*क्रि· स·* दृढ करणें.
**दिन**—पु· दिवस. (मु.) **दिन चढना** अथवा **निकलना**-सूर्योदय होणें. **दिन छिपना** अथवा **डूबना**-सूर्य मावळणें. **दिन ढलना**-संध्याकाळ होणें. **दिन दूना रात चौगुना होना**-१ शुक्लेंदुवत् वृद्धिंगत होणें. २ भरभराट होणें. **दिन दहाडे**—दिवसाढवळ्या; भर दिवसां. **दिन काटना** अथवा **पूरे करना**-१ वेळ घालविणें. २ गुजराण करणें; निर्वाह करणें.
**दिनचर्या—र्य्या**—*स्त्री·* दिवसभरांतील काम अथवा कार्यक्रम.
**दिन-ब-दिन**—*क्रि· वि·* [सं+फा.] दिवसेंदिवस.
**दिनमणि**—पु· सूर्य.
**दिनराअि***—पु· सूर्य.
**दिनाअी***—*स्त्री·* विषारी पदार्थ.
**दिनार**—पु· [फा.] मोहोर (नाणें), *वि·* जुना.
**दिनेश**—पु· सूर्य. [दिनांधत्व.
**दिनौंधी**—*स्त्री·* दिवसा न दिसणें;
**दिपति***-*स्त्री·* दीप्ति; प्रकाश; तेज.
**दिपना***-*क्रि·अ·*प्रकाशणें; चमकणें.
**दिव***—पु· दिव्य; परीक्षा.
**दिमाग**—पु· [*अ.*] १ मेंदू; मस्तिष्क. २ बुद्धि; अक्कल. दिमागी-*वि·* बौद्धिक. [१ बुद्धिमान. २ गर्विष्ठ.
**दिमागदार**—*वि·* [*अ·* + फा.]
**दियट**—*स्त्री·* ठाणवअी; ठाणअी.
**दियना***—पु· दिवा.
**दियरा-दिया**—पु· दिवा; दीपक.
**दियारा**-पु· [फा.] मळीची जमीन.
**दिरम**—पु· [*अ·*] १ चांदीचें अेक नाणें. २ साडेतीन मासे वजन.
**दिरद***—पु· हत्ती. [अुपचार.
**दिरमान**—पु· [फा.] अिलाज;
**दिरमानी**—पु· वैद्य.
**दिल**—पु· [फा.] १ हृदय; अंतःकरण. २ मन. (मु.) **दिल कडा करना**—हिंमत बांधणें. **दिलका बादशाह**—१ अत्यंत अुदार. २ लहरी. **दिलके फफोले फोडना**—आपला राग काढणें. **दिल देना**—

प्रेम करणें. **दिलसे**—मनापासून; मन लावून. [मनोहर;
**दिलकश-शा**–*वि.* [फा.] आकर्षक;
**दिलगीर**–*वि.* [फा.] १ अुदास. २ दुःखी.
**दिलचला**–*वि.* [फा.] १ साहसी; धाडसी. २ शूर. ३ स्वच्छंदी.
**दिलचस्प**–*वि.* [फा.] मनोवेधक; चित्ताकर्षक. **दिलचस्पी**–*स्त्री.* आवड; गोडी.
**दिलजमअी**–*स्त्री.* [फा.] १ संतोप. २ मिलाप. ३ खातरजमा; विश्वास.
**दिलजला**—*वि.* [फा.] जीव पोळलेला; दुःखी.
**दिलजोअी**—*स्त्री.* [फा.] समाधानी वृत्ति. [मोहक; आकर्षक.
**दिल फरेब**–*वि.* [फा.] मनोहर;
**दिलवर**—*पु.* [फा.] प्रियकर. *स्त्री.* प्रेयसी; प्रिया.
**दिलबस्ता**—*वि.* [फा] प्रेमी; ज्याचें अेखाद्या व्यक्तीवर अथवा वस्तूवर प्रेम बसलें आहे असा.
**दिलबस्तगी**—मनोरंजन.
**दिलरुबा**—*पु.* [फा.] प्रियकर; प्रेमपात्र. *स्त्री.* प्रियकरी. [देववर्णे.
**दिलवाना, दिलाना**—*क्रि. स.*
**दिलावर**–*वि.* [फा.] १ शूर; बहादूर. २ अुत्साही.
**दिलासा**–*पु.* [फा.] धीर; सांत्वन.
**दिली**–*वि.* [फा.] १ हार्दिक; २ घनिष्ठ
**दिलेर**–*वि.* [फा.] १ बहादूर; शूर. २ साहसी. **दिलेराना**-*वि.* वीरोचित.
**दिलेरी**–*स्त्री.* बहादुरी; शौर्य.
**दिल्लगी**–*स्त्री.* [फा.] थट्टा; मस्करी; विनोद. **दिल्लगी बाज़**–*पु.* थट्टेखोर; विनोदी. (मु.) **दिल्लगी अुडाना**–अुपहास करणें.
**दिव**–*पु.* १ स्वर्ग. २ आकाश. ३ वन. ४ दिवस. [नाहीं असा. २ अुवड.
**दिवांध**–*पु.* १ ज्याला दिवसां दिसत
**दिवाकर**–*पु.* सूर्य.
**दिवाला**–*पु.* दिवाळें. (मु.) **दिवाला मारना**-दिवाळें काढणें. **दिवालिया**–*वि.* दिवाळखोर.
**दिष्टि, दिसिटि**–*स्त्री.* दृष्टि.
**दिसंबर**–*पु.* [अिं.] डिसेंबर महिना.
**दिस-सि***- *स्त्री.* दिशा.
**दिसावर**–*पु.* परदेश. [दाखविणारा.
**दिसैया*** —*वि.* १ पाहाणारा. २
**दिहंदा**—*वि.* [फा.] दाता; देणारा.
**दिहाडा**—*पु.* १ वाअीट स्थिति. २ दिवस.
**दीअट, दीआ**–*पु.* दिवा.
**दीक्षांत**–*पु.* शिक्षणाची समाप्ति. (यौ.) **दीक्षांत भाषण**–पदवीदान प्रसंगीं करण्यांत येणारें भाषण.

**दीखना**—*क्रि.अ.* दिसणें; दृष्टिगोचर होणें.

**दीगर**—*वि.* [फा.] अन्य; दुसरा.

**दीघी**—*स्त्री.* १ मोठी विहीर. २ तलाव.

**दीठ***—*स्त्री.* १ दृष्टि. २ नजर; वाअीट नजर. ३ कृपादृष्टि. (मु.) **दीठ जलाना**—दृष्ट काढणें.

**दीदा**—*पु.* [फा.] १ दृष्टि; नजर. २ डोळा. **दीदा लगना**—मन लावणें. **दीदेका पानी ढल जाना**—निर्लज्ज बनणें.

**दीदार**—*पु.*[फा.] दर्शन; भेट.

**दीदा व दानिस्ता**—*क्रि.वि.*[फा.] जाणून बुजून; बुद्धिपुरस्सर.

**दीदी**—*स्त्री.* वडील बहिणीला हांक मारण्याचें टोंपण नांव; अक्का.

**दीन**—*वि.* १ गरीब. २ दुःखी. ३ विनम्र.

**दीन**—*पु.* [अ.] धर्म.

**दीनदार**—*वि.*[अ. + फा.] धार्मिक; आपल्या धर्मावर श्रद्धा ठेवणारा.

**दीन-दुनिया**—*स्त्री.* [अ.] अिहलोक व परलोक

**दीनार**—*पु.* [फा.] १ सोन्याचा दागिना. २मोहर; सुवर्णमुद्रा.

**दीने अिलाही**—*पु.* [अ.] अकबर बादशाहानें स्थापन केलेला अेक धर्मपंथ.

**दीपक**—*पु.* दिवा. [२ कीर्ति; प्रताप.

**दीपत***—*स्त्री.* १ दीप्ति; कांति; चमक.

**दीपना***—*क्रि.अ.* चकाकणें; प्रकाशणें. *क्रि.स.* प्रकाशित करणें [भूमिका.

**दीबाचा**—*पु.* [फा.] प्रस्तावना;

**दीमक**—*स्त्री.* [फा.] वाळवी (पुस्तकें खराब करणारा किडा).

**दीयट-वट**—*स्त्री.* १ दिवा ठेवण्याची तिवअी; टाणअी. २ दिवा.

**दीया**—*पु.* दिवा.

**दीयासलाअी**—*स्त्री.* आगकाडी.

**दीरघ***—*वि.* १ दीर्घ; लांबट. २ मोटा. [२ नांवाजलेला; विख्यात.

**दीर्घश्रुत**—*वि.* १ दूरवर अैकूं जाणारा.

**दीवान**—*पु.* [अ.] १ राजसभा. २ दिवाण; राजाचा मंत्री. ३ गज्जलसंग्रह.

**दीवाना**—*वि.*[फा.]१ छांदिष्ट;नादी. २ अेकाद्या ध्येयानें वेडा झालेला.

**दीवानी**—*स्त्री.* [फा.] १ दिवाणगिरी. २ दिवाणी कचेरी.

**दीवार-ल**—*स्त्री.* [फा.] भिंत.

**दीवारगीर**—*पु.* १ दिवा ठेवण्यासाठीं भिंतीला केलेली जागा. २ भिंतीला टांगण्याचा दिवा.

**दीसना**—*क्रि.स.* दिसणें; नजरेस येणें.

**दुंद**–पु. द्वंद्व; दोन मनुष्यांतील युद्ध अथवा झगडा. २ अुत्पात; अुपद्रव. ३ जोडा; युग्म.

**दुंद**–पु. नगारा.

**दुंबा**–पु.[ फा.] मेंढा.

**दु**–वि. 'दो' चें संक्षिप्त रूप. ( समासांत वापरण्यासाठीं. अु. दुगुना )

**दुआ**–स्त्री. [ अ. ] प्रार्थना; विनंति. २ आशीर्वाद. [ नद्यांमधील प्रदेश.

**दुआब-बा**–पु. [फा.] दोआब; दोन

**दुआर**—पु. दरवाजा; द्वार. **दुआरिया**–स्त्री.

**दुआरी**–स्त्री. लहान दरवाजा.

**दुआल**–स्त्री. [ फा. ] १ कातडें. २ कातड्याचा पट्टा. **दुआली**–स्त्री. धार लावण्याच्या यंत्राचा पट्टा.

**दुअिज**–स्त्री. द्वितीया ( तिथि )

**दुकाल** पु. दुष्काळ.

**दुकूल**–रेशमी वस्त्र.

**दुकेला**–पु. सोबती असलेला. (यौ.) **अकेला दुकेला**–अेकटा-दुकटा. **दुकेला** क्रि. वि. दुसऱ्याबरोबर.

**दुक्का**–वि. जोडी. ( यौ.)**अिक्का दुक्का**–अेकटादुकटा.

**दुक्की**–स्त्री. पत्यांतील दुरी.

**दुखंडा** —वि. दुमजली.

**दुखडा**–पु. करुण कहाणी; रडगाणें. २ कष्ट; विपत्ति. ( मु. ) **दुखडा रोना**–स्वतःची करुण कथा सांगणें; दुःख सांगणें. [ २ पीडा होणें.

**दुखना**–क्रि. अ. १ दुखणें; दुखावणें.

**दुखरा***–पु. १ दुःखाची कथा. २ संकट; आपत्ति. [ कष्टी.

**दुखारा-री, दुखियारा**–वि. दुःखी;

**दुखौहाँ***—वि. दुःखदायक. [पुत्री.

**दुख्तर**–स्त्री.[ फा.] कन्या; मुलगी;

**दुगअी**—स्त्री. [दे.] व्हरांडा.

**दुगदुगी**–स्त्री. [अनु.]१ छातीच्या मध्य भागाचा खोल भाग. २ अेक दागिना.

**दुगना** —वि. दुप्पट.

**दुग्ग***—पु. दुर्ग; किल्ला.

**दुचंद**–वि. [फा.] दुप्पट.

**दुचित***–वि. १ गोंधळलेला; अस्थिर. २ चिंतायुक्त.

**दुचितअी***—स्त्री. संदेह, चित्ताची अस्थिरता. **दुचिताअी**—स्त्री. आशंका; द्विधा मनःस्थिति.

**दुजानू**—क्रि.स.[फा.] गुडघे टकून बसण्याची क्रिया.

**दुजेश***–पु. द्विजेश; ब्राह्मणश्रेष्ठ.

**दुटूक**— वि. दोन तुकडे झालेला; तुटलेला. (मु.) **दुटूक बात**– थोडक्यांत पण स्पष्ट कथन.

**दुतकारना**—*क्रि. स.* [ अनु. ] धुडकावून लावणें; झिडकारणें.
**दुतकार**—*स्त्री.* धिक्कार; झिडकार.
**दुति**—*स्त्री.* १ कांति; तेज २ शोभा; सौंदर्य. ३ किरण.
**दुतिया-तीया***—*स्त्री.* द्वितीया(तिथि)
**दुदल्लाना** -*क्रि.स.*[अनु.]झिडकारणें.
**दुधमुँहा** —*वि.* अंगावर दूध पिणारा; तान्हा; लहान.
**दुधार-दुधैल**—*वि.* पुष्कळ दूध देणारी; दुधाळ.
**दुधिया, दूधिया** - *वि.* १ दुधाच्या रंगाचा. २ दुधाचा; दूध मिसळलेला.
**दुनवना***—*क्रि. अ.* दुमडणें.
**दुनियवी–यावी**— *वि.* [ अ. ] जगाशीं संबंध असलेलें; सांसारिक; ऐहिक; लौकिक.
**दुनियाँ***—*स्त्री.* [अ.] जग. (यौ.) **दीन-दुनिया**— लोक-परलोक.
**दुनियादार**—*वि.* [ अ. + फा. ] १ संसारांत गुरफटलेला २ व्यवहार-कुशल. **दुनियादारी**—*स्त्री.* प्रपंच; व्यवहार (कार्य साधून घेण्याचा. )
**दुनियावी**—*वि.* पहा ' दुनियवी '.
**दुनियासाज़**— *वि.* [स.+फा. ] व्यवहारचतुर.
**दुनी***—*स्त्री.* [ अ. ] दुनिया; जग.
**दुन्यवी**—*वि.* पहा ' दुनियवी, '
**दुपट्टा**—*पु.* दुपेटा; उपरणें. (मु.) **दुपट्टा तानकर सोना**--निश्चित झोंपणें;पांघरूण घेऊन स्वस्थ झोंपणें.
**दुपल्ली**—*वि.* दुहेरी; दोन घड्या असलेली. [ *स्त्री.* दुपार.
**दुपहर, दुपहरिया, दुपहरी**—
**दुफ़सली**-*वि.* [ सं.+अ. ] दोन्हीं हंगामांत होणारें पीक.
**दुबकना**-*क्रि.अ.* १ दबणें २ लपणें.
**दुबकाना**-*क्रि.स.* १दावणें, दटावणें. २ लपविणे.
**दुबधा**—*स्त्री.* १ चुचकळा; द्विधा चित्त; अनिश्चितपणा. २ संदेह; संशय. ३ चिंता; काळजी.
**दुबराना**—*क्रि. अ.* दुबळें होणें; क्षीण होणें.
**दुबला**-*वि.* १ दुबळा; अशक्त. २ सडपातळ; कृश. **दुबलापन**—*पु.* क्षीणता; कृशता.
**दुबारा, दोबारा**-*क्रि. वि.* [फा ] दुसऱ्यांदा; फिरून.
**दुबिधा**-*स्त्री.* पहा 'दुबधा'.
**दुमंज़िला**-*वि.* [ स.+फा. ] दोन मजली.
**दुम**-*स्त्री.* [फा.] शेपूट
**दुमाता**- *स्त्री.* सावत्र आई.
**दुमुहाँ**-*वि.* १ दुतोंड्या. २ कपटी.
**दुरद–द्विरद***-*पु.* हत्ती.

**दुरदाम***–*वि.* दुर्दम; कष्टसाध्य.

**दुरदुराना**–*क्रि. स.* धुडकावणें; झिडकारणें.

**दुरना***–*क्रि. अ.* दूर होणें; नजरेआड होणें; लपणें.

**दुरपदी***–*स्त्री.* द्रौपदी.

**दुरमुस**–*पु.* चोपणी; पिटणी; ठोकणी.

**दुराज**–*पु.* १ वाओीट राज्य. २ दोन राजांची मालकी असलेलें राज्य. **दुराजी**–दोन राजांचें.

**दुराना**–*क्रि. अ.* १ दूर असणें; लांब असणें. २ छिपून राहणें. *क्रि. स.* १ दूर करणें. २ टाकणें; सोडणें. ३ लपविणें.

**दुराव**–*पु.* १ गुपित; गौप्य. २ कपट.

**दुरुखा**–*वि.* [ सं.+फा. ] १ दोन्हीं बाजूंस तोंडें असलेला; दोमुखी. २ दोन्हीं बाजूंस दोन रंग असलेला.

**दुरुपयोग**–*पु.* वाओीट अुपयोग.

**दुरुस्त**–*वि.* [ फा. ] १ चांगल्या स्थितींत असलेला. २ योग्य; अुचित. ३ नीट; व्यवस्थित. **दुरुस्ती**–*स्त्री.* सुधारणा; दुरुस्ती.

**दुरुह**–*वि.* दुर्बोध; गूढ.

**दुरेफ, द्विरेफ**–*पु.* भ्रमर; भुंगा.

**दुर्ग**–*पु.* किल्ला; गड.

**दुर्गत**–*वि.* दुर्गतीस प्राप्त झालेला; दरिद्री. *स्त्री.* दुर्गति.

**दुर्गपाल, दुर्गाध्यक्ष**–*पु.* किल्लेदार.

**दुर्गम**–*वि.* बिकट; अवघड.

**दुर्घटना**–*स्त्री.* अपघात. २ संकट; आपत्ति.

**दुर्दशा**–*स्त्री.* वाओीट दशा; दुरवस्था.

**दुर्र**–*पु.* [अ.] मोतीं.

**दुर्रा**–*पु.* [फा.] चाबूक.

**दुलत्ती**–*स्त्री.* दुगाणी.

**दुलभ***–*वि.* दुर्लभ; दुर्मिळ.

**दुलहन, दुलहिया, दुलही**–*स्त्री.* नवविवाहित स्त्री; नवरी मुलगी.

**दुलहा, दुल्हा**–*पु.* १ नवरा मुलगा; नवरा. २ पति.

**दुलहेटा**–*पु.* [दे.] लाडका मुलगा.

**दुलारना**–*क्रि. स.* लाड करणें. **दुलार**–*पु.* लाड; प्रेम. **दुलार**–*वि.* लाडका; प्रिय.

**दुवा**–*स्त्री.* पहा ‘ दुआ ’.

**दुशवार**–*वि.* [ फा. ] १ अवघड; कठीण. २ दुस्सह; असह्य.

**दुशाला**–*पु.* [ सं.+फा.] शाल.

**दुशासन***–*पु.* दुःशासन ( धृतराष्ट्राचा पुत्र).

**दुश्चिंता**–*स्त्री.* काळजी; अनिष्ट होण्याची भीति.

**दुश्मन**–*पु.* [ फा. ] दुष्मन; शत्रु. **दुश्मनी**–*स्त्री.* वैर; शत्रुता.

**दुसरिहा***–*वि.* १ जोडीदार, मित्र. २ प्रतिस्पर्धी.

**दुसाल**–पु. आरपार भोंक.
**दुसूती**–स्त्री. अेक प्रकारची चादर.
**दुसेजा**–पु. मोठा पलंग. [मुलगा.
**दुहता**–पु. दौहित्र; नातू; मुलीचा
**दुहत्था**–वि. दोन्हीं हातांनीं केलेलें; दुहाती (काम).
**दुहना**–क्रि. स. १ धार काढणें; दूध काढणें. २ पिळून काढणें; निःसत्त्व करणें.
**दुहनी**–स्त्री. धार काढण्याचें भांडें.
**दुहाअी, दुहावनी**–स्त्री. १ धार काढण्याचें काम. २ धार काढण्याची मजुरी.
**दुहाअी**–स्त्री. १ करुण हांक; धांवा. २ घोषणा; दवंडी. ३ शपथ. ४ जयजयकार. (मु.) **दुहाअी देना**–अखाद्याचें नांव घेअून मदतीसाठीं हांक मारणें; जयजयकार करणें.
**दुहाग**–पु. १ दुर्भाग्य. २ वैधव्य.
**दुहागिन**–स्त्री. विधवा.
**दुहागी**–वि. स्त्री. अभागिनी.
**दुहाना**–क्रि. स. धार काढविणें.
**दुहिता**–स्त्री. कन्या; मुलगी.
**दुहिन***–पु. ब्रह्मदेव.
**दुहेला**–वि. १ कठीण; दुःसाध्य. २ दुःखी. पु. कठीण; त्रासदायक.
**दूक***–वि. काहीं. [दोष देणें.
**दूखना***–क्रि. स. दोष लावणें;
**दूज**–स्त्री. द्वितीया (तिथि). (मु.) **दूजका चाँद होना**–दर्शन दुर्लभ होणें.
**दूध**–पु. दूध. (मु.) **दूधका जला मट्ठा भी फूँक फूँक कर पीना**–दुधानें तोंड पोळलें म्हणून ताकहि फुंकून पिणें. (मु.) **दूधका दूध और पानीका पानी**–योग्य न्याय. **दूधकी मक्खीकी तरह निकालकर फेंक देना**–खड्याप्रमाणें अुचलून बाजूस काढणें. **दूधों नहाओ पूतों फलो**–संपत्ति व संतति यांचें सुख भरपूर लाभो. **माताके दूधको लजाना**–वाअीट कृत्य करणें.
**दूध-पिलाअी**–स्त्री. १ दूध पाजणारी दाअी. २ लग्नांतील अेक रीत. ३ दुग्धपान.
**दूध-पूत**– पु. संतति-संपत्ति (लाक्षणिक)
**दूधमुँहा**–वि. १ अंगावर पिणारें (मूल). २ अगदीं लहान. **दूधमुख**–अंगावर पिणारा. [पाढरा स्वच्छ.
**दूधिया**-वि. दुधाच्या रंगाचा;
**दून**–स्त्री. दुपटी (संख्या). (मु.) **दूनकी लेना** अथवा **हाँकना**–प्रौढी मिरविणें; बाता मारणें.
**दूना**–वि. दुप्पट.

**दूनौं***– *वि.* १ दोघेहि २ दोन्हीं.

**दूब**–*स्त्री.* दुर्वा; हरळी.

**दूबदू**—*क्रि. वि.* [फा.] समोरा-समोर; प्रत्यक्ष.

**दूबरा**–*वि.* दुबळा; अशक्त.

**दूभर**–*वि.* कठीण; अवघड.

**दूमना**–*क्रि.अ.* हलणें; डोलणें.

**दूरंदाज़**–(फा.) दूरदर्शी.

**दूरंदेश**–*वि.* [फा.] दूरदर्शी.

**दूर**–*क्रि.वि.* दूर; लांब. (मु.) **दूरकी बात**–अवघड गोष्ट. **दूरकी कौडी अुठाना (लाना)**–थोडासा फायदा असलेली अवघड गोष्ट करणें; नवीन शोध लावणें. (मु.) **दूरके ढोल सुहावने**–दुरून डोंगर साजरे. [हुशारी.

**दूरदर्शिता**–*स्त्री.* दूरदर्शीपणा;

**दूरदर्शी**–*वि.* दूरदर्शी; परिणामाचा विचार आधीं करणारा.

**दूरबीन**–*स्त्री.* [फा.] दुर्बीण.

**दूरवर्ती**–*वि.* दूरचा; लांबचा.

**दूरी**–*स्त्री.* अंतर; लांबी.

**दूर्वा**–*स्त्री.* दूर्वा; हरळी.

**दूलन**–*पु.* डोलणें; हलणें; झोंका.

**दूलह, दूल्हा**– *पु.* नवरा; वर.

**दूल्हन**–*स्त्री.* नवरी; वधू.

**दूषण**–*पु.* दोष; अवगुण.

**दूसरा**–*वि.* दुसरा.

**दूहा***–*पु.* दोहा.

**दृक-दृग**–*पु.* डोळा; नेत्र; दृष्टि.

**दे, देअी***– *स्त्री.* स्त्रियांचा आदर-सूचक शब्द; देवी.

**देखनहारा**-*पु.* पाहणारा; निरीक्षक.

**देखना**–*क्रि.स.* १ पाहणें. २ तपासणें; पाहणी करणें; परीक्षा करणें. ३ शोधणें; हुडकणें. ४ देखरेख ठेवणें. ५ अनुभव करणें. ६ विचार करणें; समजणें. ७ ठीक करणें; निश्चित करणें. (मु.) **देखना-सुनना**–माहिती करून घेणें.

**देखभाल**–*स्त्री.* देखरेख; निरीक्षण; पाहणी. [दाखविणें. २ समजाविणें.

**देखराना--वना***– *क्रि. स.* १

**देखादेखी**–*स्त्री.* भेट; दर्शन. *क्रि.वि.* दुसऱ्याचें पाहून; अनुकरण करून.

**देखाव**–*पु.* १ दृष्टीचा टप्पा; २ थाटमाट. [२ थाटमाट.

**देखावट**–*स्त्री.* १ देखावा; दिग्दर्शन.

**देग**–*पु.* [फा.] हंडा (अन्न शिजवण्याकरितां) **देगचा**–*पु.* लहान भांडें. **देगची**–*स्त्री.*

**देन**–*स्त्री.* १ देणगी; दिलेली वस्तु. २ दान (देण्याची क्रिया).

**देनदार**– *पु.* [सं. + फा.] ऋणी; देणेकरी.

**देना**–*क्रि.स.* १ देणें. २ सोंपविणें. ३ टेवणें. ४ लावणें.५ बंद करणें.

**देमान***–*पु.* [ फा. ] दिवाण; मंत्री.

**देर–री**–*स्त्री.* [ फा. ] १ अुशीर; विलंब. २ वेळ.

**देव**– *पु.* देव.

**देव**–*पु.* [फा.] १ दैत्य; राक्षस. २ धिप्पाड माणूस.

**देवता**–*पु.* देव.

**देवधुनि**– *स्त्री.* गंगानदी. [ लिपि.

**देवनागरी**–*स्त्री.* नागरी (बाळबोध)

**देवर**– *पु.* १ दीर. २ नवऱ्याचा धाकटा भाअू. **देवरानी**–*स्त्री.* धाकट्या दिराची बायको; धाकटी जाअू.

**देवल**–*पु.* पुजारी; पंड्या.

**देवल**–*पु.* देअूळ.

**देवव्रत**–*पु.* भीष्मपितामह.

**देवसर**–*पु.* मानसरोवर. [ देणेदार.

**देवाल**–*वि.* १ दाता; देणारा. २

**देश**–*पु.* देश. (मु.) **देशदेशका**–नाना देशांचा.

**देशनिकाला**–*पु.* हद्दपार केलेला.

**देशीय**–*वि.* स्वदेशी; देशांत तयार झालेला.

**देस**–*पु.* देश.

**देसावर**–*पु.* विदेश; देशांतर. *वि.* परदेशी.

**देह**–*स्त्री.* देह; शरीर. (मु) **देह छूटना**–मरणें; मृत्यु होणें. **देह छाडना**—मरण पावणें. **देह धरना**–जन्म घेणें.

**देहपात**–*पु.* मृत्यु.

**देहरा**–१ देव्हारा. २ देअूळ; मंदिर.

**देहरा***–*पु.* देह; शरीर.

**देहरी–ली***–*स्त्री.* अुंबरा; अुंबरठा.

**देहात**–*पु.* [ फा. ] खेडें; गांव.

**देहाती**–*वि.* १ ग्रामीण; खेड्यांत राहणारा. २ अडाणी.

**दैन***–*पु.* दैन्य

**दैन**–*पु.* [ अ.] कर्ज.

**दैयत***–*पु.* दैत्य; राक्षस.

**दैया***-*पु.* दैव. अव्य. आश्चर्य किंवा दुःखोद्गार. [ अकस्मात्.

**दैवात्**— *क्रि. वि.* अचानक;

**दैवी**–*वि.* १ देवासंबंधीं; दैवासंबंधी. २ आकस्मिक.

**दो**–*वि.* दोन (मु.) **दो चार**–थोडे. **दो दिनका** — अल्पकालीन; तात्पुरता.

**दोअू**–*वि.* दोघेहि; दोन्हीं.

**दोआब**–*पु.* [ फा. ] दुआब; दोन नद्यांतील प्रदेश.

**दोख**–*पु.* दोष; अपराध.

**दोगला**–*वि.* [ फा.] लेकावळा; जारज; अकुलीन.

**दोगा**—पु॰ १ जाड पांघरूण. २ गिलावा; चुना.
**दोच**—स्त्री॰ १ बुचकळी. २ धाक; दटावणी. ३ दुःख; कष्ट.
**दोज़ख**—पु॰ [फा.] नरक, **दोज़खी**—वि॰ महान् पापी. [टेकून (बसणें).
**दोज़ानू**—क्रि॰ वि॰ [फा.] गुडघे
**दोतरफा**—वि॰ [सं॰ + फा॰] दोन्हीं बाजूंचा; दोन्हींकडचा. क्रि॰ वि॰ दोन्हींकडे; दोन्हीं बाजूंस.
**दोतला**—वि॰ दुमजली.
**दोन**—पु॰ दरी.
**दोन**—पु॰ १ संगम. २ दोन नद्यांमधील प्रदेश. ३ संगमस्थान.
**दोना**—पु॰ द्रोण.
**दोनों**—वि॰ दोघेहि.
**दोपल्ली**—वि॰ दोन पदरी. स्त्री॰ विशेष प्रकारची घडीची टोपी (कापडाचे दोन तुकडे शिवून तयार केलेली).
**दोपहर**—स्त्री॰ दुपार; दोन वेळां.
**दोबारा**—क्रि॰ वि॰ [फा.] दोनदां;
**दोमुँहा साँप**—पु॰ १ दुतोंडी साप. २ दुतोंड्या. ३ कुटिल; कपटी.
**दोरंगी**—स्त्री॰ १ दोन रंग असलेला. २ कपट; फसवणूक.
**दोराहा**—पु॰ [सं॰ + फा॰] दोन रस्ते फुटतात तें ठिकाण.
**दोरुखा**—वि॰ [सं॰ + फा.] १ दोन्हीं बाजूंचा. २ ज्याच्या दोन्हीं बाजूंस सारखे रंग आहेत असा. ३ अेका बाजूस अेक रंग व दुसऱ्या बाजूस दुसरा रंग असलेला.
**दोश**—पु॰ [फा.] खांदा. **दोश–ब–दोश**—खांद्याला खांदा लावून; समानतेनें.
**दोस***—पु॰ दोष.
**दोसूती**—स्त्री॰ दोसुती चादर.
**दोस्त**—पु॰ [फा.] मित्र. **दोस्ती**—स्त्री॰ मैत्री.
**दोस्ताना**—पु॰ [फा.] दोस्ती; मैत्री.
**दोहता**—पु॰ दौहित्र; नातू (मुलीचा मुलगा). **दोहती**—स्त्री॰ नात.
**दोहत्थड़**—दोन्हीं हातांनीं मारलेली थप्पड.
**दोहद**—स्त्री॰ डोहाळे.
**दोहन**—पु॰ धार काढणें.
**दोहर**—स्त्री॰ दोन पदरी चादर.
**दोहरा**—वि॰ पु॰ १ दुहेरी. २ दुप्पट.
**दोहराना**—क्रि॰ स॰ पुनरावृत्ति करणें; अुजळणी करणें.
**दोहाअी**—स्त्री॰ १ करुण हांक; धांवा. २ शपथ. ३ घोषणा. ४ जयजयकार.
**दोहाक–ग***—पु॰ दुर्भाग्य.
**दौं***—अव्य. १ अथवा; किंवा; तर. २ कोण जाणे.

**दौंरी**–स्त्री. [ दे. ] मळणीकरितां जुंपलेल्या बैलांचा ताडा.

**दौ***–स्त्री. वणवा. [उद्योग; परिश्रम.

**दौड–धूप**–स्त्री. १ धांवपळ. २ प्रयत्न;

**दौडना**–क्रि. अ. १ धांवणें; पळणें. २ प्रयत्न करणें; धांवपळ करणें. (मु.) **चढ दौडना**–हल्ला चढविणें; आक्रमण करणें.

**दौडान**–स्त्री. धांव; धांवपळ.

**दौडाना**–क्रि. स. १ पळविणें; धांवविणें. २ विरळ्या चालावयास लावणें. ३ ये-जा करावयास लावणें. ४ पाठलाग करणें.

**दौना**–पु. १ दवणा (सुगंधी रोपटें).

**दौर**–पु. [अ.] १ चक्कर; फेरी. २ भ्रमण; संचार. ३ प्रभाव. ४ क्रम; पाळी. (यौ.) **दौर–दौरा**–प्रभाव; प्राबल्य.

**दौरा**–पु. [अ.] १ दौरा; भ्रमण. २ फेरा. ३ झटका (रोगाचा).

**दौरान**–पु. [ फा. ] १ संचार; ख्याति. २ प्रवास. ३ पाळी; खेप.

**दौलत**–स्त्री. [अ.] धन; संपत्ति.

**दौलतखाना**–पु. [ अ. + फा. ] घर; निवासस्थान ( आदरार्थी ).

**दौलतमंद**–[ अ. + फा. ] श्रीमंत; संपन्न.

**द्यौस***–पु. दिवस.

**द्रवना**–क्रि. अ. द्रवणें; पाझरणें.

**द्रष्टा**–वि. पाहाणारा; भविष्यकाळ जाणणारा; महापुरुष.

**द्रुम**–पु. झाड; वृक्ष.

**द्विज**—पु. १ ब्राह्मण; क्षत्रिय; वैश्य. २ पक्षी. ३ चंद्र. ४ दांत.

**धंका***– पु. १ धक्का. २ प्रहार; आघात. [ गुंतागुंत; जंजाळ.

**धंधक, धंधरक**– पु. संसारांतील

**धंधकधोरी**–पु. रात्रंदिवस कामांत गढलेला. [ २ बहाणा.

**धँधला**–पु. १ पाखंड; ढोंग; कपट.

**धंधा**–पु. धंदा; व्यवसाय;

**धँवना**— क्रि. स. भाता फुंकणें किंवा चालविणें.

**धँसना**– क्रि. अ. १ घुसणें; जोरानें आंत शिरणें. २ रुतणें; फसणें.

**धक**– स्त्री. [अनु.]धडधड; ( हृदयांतील ); धकधक. ( मु. ) **जी धकधक करना**–१ ऊर धडधडणें. २ आश्चर्यचकित होणें.

**धकधकना**– क्रि. अ. [ अनु. ] १ धडधडणें; ऊर खालींवर होणें. २ धगधगणें; भडभड पेटणें.

**धकधकी**–स्त्री. धडधड; धुगधुगी ( हृदयाची ).

**धकपकाना**–क्रि. अ. [अनु.] घाबरणें; गांगरून जाणें; भयभीत होणें.

**धका*–** *पु.* धक्का; आघात.

**धकियाना–** *क्रि.स.* १ धक्का देणें; ढकलणें. २ गचांडी देणें.

**धकेलना–** *क्रि. स.* ढकलणें.

**धक्कमधक्का–** *पु.* **धक्कमधक्की–** *स्त्री.* **धक्कामुक्की–** *स्त्री.* १ धक्काबुक्की; मारामारी. २ ढकलाढकली. [ ठोकर. ३ आघात.

**धक्का–** *पु.* १ धक्का; हानि. २

**धगडा–** *पु.* जार.

**धगधरी–** *वि.* [दि.] १ लाडकी स्त्री. २ कुलटा; व्यभिचारिणी.

**धज–** *स्त्री.* १ आरास; शोभा. २ सुंदर मांडणी.

**धज्जी–** *स्त्री.* १ चिंधी. २ कागदाची पट्टी. ३ लोखंडाची लांब पट्टी. (मु.) **धज्जियाँ अुडाना**–टर अुडविणें; फजिती करणें.

**धडंग–** *वि.* नागडा-अुघडा.

**धड–** *स्त्री.* ( अनु. ) अेखादी वस्तु वरून खालीं पडतांना धाडकन् होणारा आवाज.

**धड–** *पु.* १ धड. २ झाडाचें खोड.

**धडक–** *स्त्री.* [ अनु. ] धडकी; भय; भीति. [ धडकी.

**धडकन–** *स्त्री.* [ अनु. ] धडधड;

**धडकना–** *क्रि. अ.* धडधडणें; छाती अुडणें ( भीतीनें ).

**धडका–** *पु.* [ अनु. ] १ धडधड; २ धडकी. ३ बुजगावणें.

**धडकाना–** *क्रि.स.* भिवविणें; घाबरविणें.

**धडल्ला–** *पु.* [अनु.]धडाका;सपाटा.

**धडल्लेसे**–अथवा **धडल्ले के साथ**–बेधडक; अेकदम. [ अि ).

**धडा–** *पु.* वजन; जोख ( शेर, अच्छेर

**धडाका–** *पु.* [ अनु. ] गडगडाट; धडधड असा आवाज. (मु.)**धडाके से**–झटपट. [ आवाज.

**धडाम–** *पु.* [अनु.] खालीं पडण्याचा

**धडी–** *स्त्री.* १ चार किंवा पांच शेरांचें वजन. २ पान खाल्ल्यावर ओठांवर अुठणारी तांबडी रेषा.

**धतकारना–** *क्रि.स.* [अनु.] धुडकावणें; झिडकारणें.

**धधक–** *स्त्री.* १ आगीचा भडका; आगीचा डोंब. २ आंच.

**धधकना–** *क्रि.अ.* [अनु.] धगधगणें; भडभडणें.

**धधकाना–** *क्रि. स.* [अनु.] आग पेटविणें. [ रची ओढणी.

**धनक–** *पु.* १ धनुष्य. २ अेक प्रका-

**धनतेरस–** *स्त्री.* धनत्रयोदशी(आश्विन वद्य त्रयोदशी ).

**धनधाम–** *पु.* घरदार व धनदौलत

**धनधारी–** *पु.* धनाढ्य; श्रीमंत.

**धना-धनि***–*स्त्री.* स्त्री; युवती.
**धनि***–*वि.* धन्य.
**धनिया**–*पु.* १ कोथिंबीर. २ धने.
**धनी**–*वि.* १ श्रीमंत; धनवान्. २ मालक; स्वामी. (यौ.) **धनी धोरी**– रक्षक; स्वामी; मालक. (मु) **बातका धनी**–खरें बोलणारा; बोलल्याप्रमाणें वागणारा.
**धनुकबाओ**—*स्त्री.* धनुर्वात.
**धनुर्धर-धनुर्धारी**–*पु.* धनुष्यबाण बाळगणारा; लढवय्या.
**धनुहाओ**–*स्त्री.* धनुर्युद्ध.
**धन्ना***–*वि.* धन्य. [प्रशंसनीय.
**धन्य**–*वि.* १ धन्य; कृतकृत्य. २
**धन्यवाद**–*पु.* १ शाबासकी; प्रशंसा. २ आभार. ३ अभिनंदन.
**धन्वा**–*पु.* १ धनुष्य. २ जलहीन प्रदेश.
**धप**–*स्त्री.* [ अनु. ] धपकन खालीं पडल्याचा आवाज.
**धप**–*स्त्री.* [ अनु. ] धपका; धपाटा.
**धपना**–*क्रि. अ.* १ जोरांत चालणें; भरभर चालणें. २ मारणें.
**धप्पा**– *पु.* १ धपका; रट्टा; टोसा. २ तोटा. [कलंक.
**धब्बा**–*पु.* [ दे. ] १ डाग; ठिपका. २
**धमक**–*स्त्री.* १ धपकन खालीं पडल्याचा आवाज. २ आघात; मार.
**धमकना**–*क्रि. अ.* [अनु.] १ धपकन खालीं पडणें. २ दुखणें ( डोकें ). ३ येऊन टेपणें.
**धमकाना**–*क्रि. स.* [अनु.] १ धमकावणें. २ दटावणें.
**धमकी**–*स्त्री.* धमकी; धाक; भीति.
**धमधमाना**–*क्रि. अ.* धमूधम् शब्द करणें; बडवून काढणें.
**धमाका**–*पु.* [ अनु. ] १ मोठी किंवा जड वस्तु वरून खालीं पडल्याचा आवाज. २ अपघात; धक्का.
**धमाचौकडी**–*स्त्री.* [अनु.] १ धांगडधिंगा; धिंगामस्ती. २ उपद्रव; कोलाहल. [दाडगाओ
**धमार**—*स्त्री.* [अनु.] अुपद्रव;
**धम्म**–*पु.* [अनु.] धप्प असा आवाज.
**धयपना***–*क्रि. स.* १ चूर्ण करणें. २ मर्दन करणें; दाबणें.
**धरक***–*स्त्री.* [ अनु. ] १ धडकी. २ धुगधुग. ३ शंका.
**धरता**–*पु.* कर्जदार; देणेदार.
**धरती**–**स्त्री.* १ पृथ्वी. २ जमीन.
**धरन**–*स्त्री.* १ तुळओ. २ गर्भाशयाची आधार-नलिका. ३ हट्ट.
**धरना**–*क्रि. स.* १ धरणें; पकडणें. २ थांबविणें. ३ ठेवणें ( रखेली ). ४ गहाण ठेवणें. ५ अनामत ठेवणें. ६ धारण करणें; वापरणें. ७ स्वीकारणें.

**धरना**–*पु.* धरणें. (मु.) **धरना देना**–धरणें धरून बसणें.
**धरसना**–*क्रि. अ.* घाबरणें; भिणें; भयभीत होणें. *क्रि. स.* १ अपमान करणें. २ दाबून टाकणें.
**धराऊ**–*वि.* १ बहुमोल. २ पुष्कळ दिवसाचा ठेवलेला; ठेवणीचा.
**धरहरा** – *पु.* मनोरा.
**धरातल**–*पु.* १ पृथ्वी. २ क्षेत्रफळ.
**धराना**–*क्रि. स.* १ पकडविणें. २ निश्चित करणें; ठरविणें. ३ ठेवविणें.
**धरोहर**–*स्त्री.* ठेव; अनामत.
**धर्म**–*पु.* १ धर्म; संप्रदाय. २ स्वभाव. ३ कर्तव्य. ४ कायदा. न्याय; नीति. (मु.) **धर्म कमाना**–पुण्य मिळविणें. **धर्म बिगाडना**–धर्म भ्रष्ट करणें. **धर्मपत्नी**–*स्त्री.* लग्नाची बायको. **धर्मसंकट**– *पु.* बुचकळा; अनिश्चितपणा.
**धर्षण**–*पु.* १ अनादर; अपमान. २ आक्रमण; हल्ला. ३ असहिष्णुता. ४ दमन.
**धवल**–*वि.* शुभ्र; पांढरा.
**धस**–बुडी; डुबकी. [खोकला.
**धसक**–*स्त्री.* [अनु.] ढास; कोरडा
**धसकना**–*क्रि. अ.* १ रुतणें. २ द्वेष करणें. मत्सर करणें. ३ भिणें. [होणें.
**धसना***–*क्रि. अ.* ध्वस्त होणें; नष्ट
**धसाना**–*क्रि. स.* खुपसणें; घुसडणें.
**धाँधना**–*क्रि. स.* [दे.] १ बंद करणें. २ अधाशीपणानें खाणें.
**धाँधल-ली**–*स्त्री.* [अ.] १ धांदल; गडबड. २ कपट; फसवेगिरी.
**धाँधली**–*वि.* १ गडबड्या; धांदरट. २ लुच्चा; फसव्या.
**धाओ**–*स्त्री.* दाओ; दूध पाजविणारी बाओ; आया.
**धाक**–*स्त्री.* [अनु.] १ भय; भीति. २ प्रसिद्धि. ३ प्रभाव. (मु.) **धाक-जमाना**–वर्चस्व बसविणें.
**धाडना**–*क्रि. अ.* [दे.] रागावणें. क्रोध करणें.
**धात**–*स्त्री.* धातु.
**धाता***–*पु.* १ ब्रह्मदेव. २ शिव. *वि.* पालक; रक्षक. [दाओ. ३ पृथ्वी.
**धात्री***–*स्त्री.* १ आओ; माता. २
**धाधि**–*स्त्री.* ज्वाळा.
**धान**–*पु.* साळी; भात.
**धानपान**–*वि.* सडपातळ; नाजूक.
**धाना***–*क्रि. अ.* १ धांवणें; पळणें. २ प्रयत्न करणें.
**धानी**–*स्त्री.* १ साळीच्या पानांच्या रंगासारखा रंग; फिकट हिरवा रंग. २ स्थान. [जोंधळे.
**धानी**–*स्त्री.* भाजलेले गहूं किंवा
**धाप**–*पु.* १ अेक मैल किंवा दोन

मैलांचें अंतर. २ लांब-रुंद मैदान. ३ शेताच्या मोजणीचें माप.

**धाप**—*स्त्री.* संतोष; तृप्ति.

**धापना***-*क्रि. अ.* १ संतुष्ट होणें; तृप्त होणें. *क्रि. स.* संतुष्ट करणें.

**धापना**-*क्रि. स.* धांवणें; पळणें.

**धा-भाई**-*पु.* दूधभाऊ.

**धाम**—*पु.* १ स्थान; मंदिर; घर. तीर्थ. २ शरीर. ३ विष्णु.

**धायँ**—*स्त्री.* [अनु.] तोफेचा किंवा बंदुकीचा आवाज; धडाम असा आवाज.

**धाय**—*स्त्री.* दाई; धात्री.

**धार**—*पु.* १ पावसाची जोराची वृष्टि. २ ऋण; कर्ज. ३ प्रांत; विभाग; प्रदेश.

**धार**—*स्त्री.* १ धारा; प्रवाह. २ शस्त्राची धार. ३ किनारा. ४ मना. ५ दिशा; बाजू (मु.)

**धार निकालना**—दूध काढणें.

**धारक**—*वि.* १ धारण करणारा. २ ऋणको; कर्ज काढणारा.

**धारणा**—*स्त्री.* १ समजूत; कल्पना. २ बुद्धि; ज्ञान; स्मृति.

**धारना**—*क्रि. स.* १ धारण करणें; २ जबाबदारी पत्करणें. ३ ऋण करणें; उधार घेणें.

**धारा**-*स्त्री.* १ पाण्याचा प्रवाह. २ पावसाची सर. ३ समूह; झुंड. ४ रेघ; रेषा. ५ कायद्याचें कलम.

**धारावाही**—*वि.* प्रवाही; चालू; क्रमशः.

**धारासभा**—*स्त्री.* [लोकप्रतिनिधि-सभा. विधिमंडळ;

**धारि***—*स्त्री.* १ अखंड प्रवाह. २ समूह; झुंड. ३ सेना.

**धारीदार**—*वि.* [सं. + फा.] रेघारेघांचें कापड; धारीदार कापड.

**धार्मिक**—*वि.* धर्माशीं संबंध असलेला; धर्मयुक्त.

**धावना**—*क्रि. अ.* धावणें; पळणें.

**धावनि**-हल्ला; चढाई.

**धावरी**—*स्त्री.* पांढऱ्या रंगाची गाय. *वि.* शुभ्र; स्वच्छ.

**धावा**-*पु.* १ हल्ला; चढाई. २ दौड.

**धिंग**—*स्त्री.* दंगामस्ती; धिंगाणा.

**धिंगाई**-*स्त्री.* दांडगाई; मस्ती.

**धिंगा**—*पु.* निर्लज्ज.

**धिंगाना**-*क्रि. स.* धिंगाणा घालणें; खोड्या करणें.

**धिक्, धिग्***—अव्य. तिरस्कार-सूचक शब्द; धिक; छीः.

**धिय-धीया**—*स्त्री.* कन्या; मुलगी.

**धिरवना***; **धिराना***—*क्रि. स.* धमकाविणें; दरडावणें.

**धींग**—*पु.* धट्टाकट्टा, मजबूत माणूस. *वि.* १ धट्टाकट्टा. २ पापी.

**धींगड-डा, धींगरा, धींगा**—पु. १ पाजी; बदमाश. २ धट्टाकट्टा; आडदांड. [अुपद्रव. २ जबरदस्ती.
**धींगाधींगी**—स्त्री. १ धांगडधिंगा;
**धी**—स्त्री. १ बुद्धि; अक्कल. २ मन. ३ कर्म.
**धी**—स्त्री. कन्या; मुलगी.
**धीजना**—क्रि. स. ग्रहण करणें; स्वीकारणें; अंगीकारणें.
**धीम, धीमा, धीर**—वि. १ शांत. २ धीमा; मंद. ३ नरम, सहनशील.
**धीर**-वि.. धीराचा; धैर्यवान्.
**धीरज***—पु. धैर्य; धीर. (मु.) **धीरज बँधना**—धीर येणें; धीर वाटणें.
**धीरता**—स्त्री. १ धीर-वृत्ति; धैर्य. २ संतोष; समाधान. ३ मनाचा खंबीरपणा.
**धीरे**—क्रि. वि. सावकाश; आस्ते आस्ते. २ गुपचुप; कोणाला न समजूं देतां.
**धुँआ**—पु. धूर.
**धुँआस, धुँबास**-स्त्री. अुडदाचें पीठ.
**धुंद-धुंध**—स्त्री. १ डोळ्याला कमी दिसणें. २ अंधार (धुळीमुळें झालेला). ३ धुरळा.
**धुंधला**—वि. १ अंधुक; अस्पष्ट. २ धुरकट. **धुँधलापन**—पु. अंधुकपणा.
**धुंधुकार**—पु. १ गडगडाट; कडकडाट. २ अंधार.
**धुआँ-वाँ**—पु. धूर. [ वोट.
**धुआँकश**—पु. [सं. + फा.] आग-
**धुआँधार**—वि. १ धुरानें भरलेला. २ मुसळधार. ३ आवेशयुक्त.
**धुआँना**—क्रि. अ. धुरकटणें.
**धुआँयँध**—वि. धुरकट वासाचा. स्त्री. अपचन झाल्यानें येणारी ढेकर.
**धुकडपुकड**—पु [अनु.] १ धाकधूक; भीति. २ द्विधा चित्त. ३ घाबरगुंडी; गाळण.
**धुकधुकी**-स्त्री. [अनु.] १ धुगधुगी २ धाकधुक. [ न्याचा आवाज.
**धुकार-री**—स्त्री. [अनु.] नगा-
**धुज-जा***—स्त्री. ध्वजा; पताका.
**धुन**—स्त्री. १ नाद; छंद; ध्यास. २. काळजी; चिंता. ३ विचार. (मु.) **धुनका पक्का अथवा पूरा**—दृढनिश्चयी; हातीं घेतलेलें काम तडीस नेणारा. **धुन बाँधना या लगाना**— रटत राहाणें. **धुन सवार होना**— छंद लागणें; डोक्यांत वेड शिरणें. [ चाल.
**धुन**-स्त्री. गाण्याची चाल; पदाची
**धुनकना**-क्रि. स. १ पिंजणें. २ मारणें; चोपणें. ३ हलवणें; डोलविणें. ४ अेकसारखें काम करणें.

**धुनकी**—स्त्री· १ धनुकली; पिंजण. २ लहान पिंजण.
**धुनना**—क्रि· स· पाहा 'धुनकना'.
**धुनवाना**—क्रि·स· पिंजण्याचें काम दुसऱ्याकडून करविणें.
**धुनि-नी***—स्त्री· १ ध्वनी; आवाज. २ गाण्याची लय.
**धुनियाँ**—पु· पिंजारी.
**धुमीला**—पु·वि· धुरकट. **धुमीली**-स्त्री·
**धुरंधर**—वि· अुत्तम; श्रेष्ठ; प्रमुख.
**धुरियाना**— क्रि·स· धूळ अुडाविणें; धूळ फेंकणें.
**धुर्री**—पु· कण; लहान तुकडा.
**धुलना**— क्रि· स· १ धुतलें जाणें. *२ साफ होणें; धुअून निवणें.
**धुलाअी**—स्त्री· धुणावळ किंवा धुवण-काम. [ धुवविणें; स्वच्छ करणें.
**धुलवाना, धुलाना**— क्रि· स·
**धुलेंडी**— स्त्री· धुळवड ( होळीचा दुसरा दिवस ).
**धुवन***—स्त्री· अग्नि.
**धुस्स**— पु· १ मातीचा ढीग. २ नदीचा बांध; बंधारा. [ २शाल.
**धुस्सा**—पु· १पातळ घोंगडी;कांबळें.
**धूआँ आ**—पु· धूर.
**धूत**—वि·१ धुतलेला.२ धूर्त; कपटी.
**धूना**-पु· धूप; सुगंधी द्रव्य.
**धूप**—स्त्री· १ अून्ह. २ धूप.
**धूपछाँव-छाँह**—स्त्री· (यौ.) १ अून्ह-सावली. २ निरनिराळ्या रंगांची झांक असलेलें कापड.
**धूपना***—क्रि· अ· धूप लावणें.
**धूपना**-क्रि·स· धांवपळ करणें; दौडणें.
**धूपबत्ती**— स्त्री· अुदबत्ती.
**धूम**— स्त्री· १ गडबड; कोलाहल. २ अुपद्रव; अुत्पात. ३ प्रसिद्धि; वाहवा; प्रशंसा. ४ थाटमाट.
**धूमधाम**—स्त्री· धामधूम.
**धूमक धैया**— स्त्री· धुडगूस; दंगामस्ती. [ ३ महादेव.
**धूमकेतु**—पु·१ शेंडें नक्षत्र. २ अग्नि.
**धूमधडक्का**-पु· धूमधडाका.
**धूमल-ली**— वि· १ धुरकटलेला· २ फिकट. [ बंदूक. ३ ध्वंस.
**धूरधानी*** —स्त्री· १ धूळधाण. २
**धूरि***—स्त्री· धूळ.
**धूल-लि**—स्त्री· धूळ. ( मु. ) (**किसी की**) **धूल अुडना**—बदनाम होणें; अपकीर्ति होणें. **धूल चाटना**—अत्यंत नम्रता दाखविणें. **धूल छानना—धूल फाँकना**—वणवण हिंडणें.
**धूला**—पु· [ दे. ] खंड; तुकडा.
**धूसर**—वि· धुळीनें भरलेला; धुळकट.
**धृष्ट**—वि· १ अुद्धट. २ निर्लज्ज.

**धृष्टता**—*स्त्री*· १ उद्धटपणा. २ निर्लज्जता.

**धेला**—*पु*· अधेला; अर्धा पैसा.

**धेली**—*स्त्री*· अधेली; आठ आणे.

**धोंधा**—*पु*· १ गोळा. २ बेडौल शरीर, वस्तु अि. (मु.) **मिट्टीका धोंधा**—गुळाचा गणपति; मूर्ख.

**धोअी**—*स्त्री*· टरफल काढलेली डाळ.

**धोअी**—*पु*· राजगिरा.

**धोकड**—*वि*·[दे.] धट्टाकट्टा; मजबूत.

**धोका-खा**—*पु*· १ दगा; कपट; फसवणूक. २ धूर्तता. ३ हूल. (मु.) **धोखा खाना**—फसणें; भ्रमांत पडणें. **धोखेकी टट्टी**—फसवणूक; भ्रम. **धोखे में अथवा धोखे से**—चुकून; न कळत.

**धोखेवाज़**—*वि*· [सं. + फा.] फसव्या; धूर्त. **धोखेबाजी**—*स्त्री*· फसवाफसवी.

**धोती**—*स्त्री*· १ धोतर. २ लुगडें.

**धोती**—*स्त्री*· धौती (योगांतील अेक क्रिया).

**धोना**—*क्रि· स*· धुणें; साफ करणें. (मु.) **हाथ धोना**—गमावून बसणें. **हाथ धोकर पीछे पडना**—हात धुअून पाठीमागें लागणें.

**धोब**—*पु*· धुणें.

**धोबी**—*पु*· परीट. **धोबिन**—*स्त्री*· धोबीण. (मु.) **धोबी का कुत्ता**—रिकामटेकडा; बेवारशी. [ निकट.

**धोरे-रै***—*क्रि· वि*· जवळ; समीप;

**धौं***—*अव्य*. १ न जाणें; देव जाणें. २ अथवा; किंवा.

**धौंकना**—*क्रि·स*· १ भाता फुंकणें; भाता चालविणें. २ फुंकणें.

**धौंकनी—धौंकी**—*स्त्री*· १ भाता २ फुंकणी.

**धौंकिया**—*पु*· भाता चालविणारा.

**धौंताल**—*वि*· १ नादिष्ट; छांदिष्ट. २ चपळ; चलाख. ३ धट्टाकट्टा; सशक्त.

**धौंस**—*स्त्री*· १ धमकी; दटावणी. २ दडपण; वजन. ३ धोका; फसवणूक.

**धौंसना**—*क्रि· अ*· दटावणें; धमकावणें.

**धौंसपट्टी**—*स्त्री*· फसवणूक; ठकबाजी.

**धौंसा**—*पु*· १ मोठा नगारा. २ सामर्थ्य; शक्ति.

**धौरी**—*स्त्री*· पांढऱ्या रंगाची गाय.

**धौल**—*स्त्री*· [अनु.] १ थाप; धपका; थप्पड. २ नुकसान; तोटा.

**धौल***—*वि*· धवल.

**धौलधक्का**—*पु*· रपाटा; मार.

**धौलधप्पड**—*पु*· [अनु.] १ मारामारी; धक्काबुक्की. २ अुपद्रव.

**धौला***–*वि.* धवल; पांढरा.

**ध्यान**–*पु.* १ लक्ष. २ चिंतन; मनन. ३ विचार.

**ध्वज**–*पु.***ध्वजा**–*स्त्री.* निशाण; झेंडा पताका.

**ध्वन्य**–*पु.* व्यंग्यार्थ.

**ध्वांत**–*पु.* अंधकार; अंधेर.

## न

**नंग-धडंगा**–*वि.* [सं.+अनु.] नागडाउघडा.

**नंगा**-*वि.* १ नागवा; उघडा; नग्न. २ निर्लज्ज; निलाजरा. ३ दरिद्री. ४ लुच्चा. [दरिद्री.

**नंगावुच्चा–बूचा**––*वि.* कफल्लक.

**नंगालुच्चा**-*वि.* नीच;बदमाश;पाजी.

**नँगियाना**–*क्रि. स.* १ नागडें करणें. २ हिरावून नेणें; बळकावणें.

**नंगेसिर**–*वि.* बोडका.

**नंद***–*पु.* १ आनंद. २ परमेश्वर. ३ मुलगा. ४ नंद (गोकुळचा).

**नंदन–नंदनवन**–*पु.* इंद्राचें उपवन; सुंदर स्थान.

**नंदना***–*क्रि. अ.* आनंदित होणें; प्रसन्न होणें–*स्त्री.* मुलगी.

**नंदेऊ, नंदोई***–*पु.*नणंदेचा नवरा.

**नंबर**–*पु.* [इं.] १ संख्या; गणना. २ वर्तमानपत्राचा अंक. ३ कापड मोजण्याचा गज.**नंबरी**-*वि.* प्रसिद्ध; मशहूर.

**नंबरदार**—*पु.* [इं. + फा.] १ शेतसारा वसूल करण्यांत सरकारला मदत देणारा.२ जमीनदार.

**नंबरवार**–*वि.* [इं.+फा.] क्रमशः.

**नंस***––*वि.* नष्ट झालेला; नाश पावलेला.

**न**–*अव्य.* नाहीं; नको. (मु.) **न के बराबर**–फार थोडें.

**नअी***–*वि.* नीतिज्ञ.

**नअी**–*स्त्री.* नदी. *वि.* नवीन.

**नअुआ***–*पु.* न्हावी.

**नअुत***–*वि.*वांकलेला; नत.

**नअुलि***–*वि.*नवा; ताजा. [नवोढा.

**नओढ**–*स्त्री.* नवविवाहिता युवती;

**नककटा**–*वि.* १ नाक कापलेला. २ मानहानि किंवा अप्रतिष्ठा झालेला. ३ निर्लज्ज; बेशरम.

**नकघिसनी**–*स्त्री.* १ नाक घांसणें. २ दीनता; लीनता; अजीजी.

**नकचढा**–*पु.* चिडखोर.

**नकचुटनी**—*स्त्री.* लहान कात्री (नाकांतील केस कातरण्याची).

**नक़द**—*पु.* [अ.] नगद पैसा-

अडका; रोख नाणें; रोकड. *वि.* रोख. *क्रि. वि.* रोख.

**नकब**—*स्त्री.* [अ.] चोरी करण्यासाठीं घराच्या भिंतीस पाडलेलें भोंक.

**नकब-ज़न**—*पु.* [अ.+फा.] घरफोड्या. **नकबज़नी**—*स्त्री.* घरफोडी.

**नकबेसर**—*स्त्री.* १ मुरकी; लवंग. २ लहान नथ.

**नक़ल**—*स्त्री.* [अ.] १ लेख, दस्तैवज अित्यादिकांची लिपीबरहुकूम केलेली प्रत; प्रती. २ नक्कल; अनुकरण. ३ गमतीची गोष्ट; चुटका. ४ सोंग. [बहुरूपी.

**नक़लची**—*पु.* [अ] नकलाकार;

**नक़लनवीस**—*पु.* [अ. + फा.] लेख, कागद पत्रादिकांच्या प्रती करणारा कारकून.

**नक़ली**—*वि.* [अ.] १ कृत्रिम; बनावट. २ खोटा.

**नकसीर**—*स्त्री.* घोळणा फुटणें; नाकांतून रक्त येणें. [आणणें.

**नकाना***—*क्रि. स.* नाकीं नअू

**नकाब**—*स्त्री.*, *पु.* [अ.] १ बुरखा. २ तोंड झांकलें जाअील अशा बेतानें घेतलेला पदर.

**नकारना**-*क्रि. अ.* नाकारणें.

**नकारा**—*वि.* [फा.] १ निरुद्योगी. २ निरुपयोगी; कुचकामाचा.

**नकाशना**—*क्रि. स.* [अ.] नक्षीकाम करणें (खोदून).

**नकियाना**–*क्रि. अ.* १ नाकांत बोलणें. २ हैराण होणें.

**नकीब**—*पु.* [अ.] भाट; चारण.

**नकुआ**—*पु.* नाक. (मु.) **नकुअन जीव आना**-नाकीं नअू येणें.

**नकेल**-*पु.* अुंटाची वेसण.

**नक्का**-*स्त्री.* सुअीचें नाक; नेडें.

**नक्कारख़ाना**—*पु.* [फा.] नौबतखाना.

**नक्कारची**—*पु.* [फा.] नौबत वाजविणारा; गुरव. [नौबत; डंका.

**नक्कारा**—*पु.* [फा.] नगारा;

**नक़्क़ाल**—*पु.* [अ.] नकल्या; नकलाकार; विदूषक. **नक्काली**-*स्त्री.* नक्कल करण्याचें कार्य.

**नक्काश**—*पु.* [अ.] १ नक्षीकाम करणारा (शिल्पकाम, वेलबुट्टी, कशीदा अि.) २ चित्रकार. **नक्काशी**-*स्त्री.* चित्रकला; नक्षी; कौशल्याचें काम.

**नक्कू**—*वि* १ लांब नाकाचा; नाकाड्या. २ अहंमन्य. ३ तिरशिंगराव.

**नक्श**–*वि.* [अ.] चित्रित केलेलें; कोरलेलें; खोदलेलें (चित्र, तसबीर). *पु.* शिक्का; ठसा; छाप.

**नक्शा**—पु. [अ.] १ रेखाकृति; चित्र; तसवीर. २ आराखडा. ३ नकाशा. ४ ढब; तऱ्हा; पद्धत. ५ स्थिति; दशा.

**नक्शा-नवीस**—वि. [अ. फा.] नकाशे तयार करणारा.

**नक्शी**—वि. [अ.] नक्षीकाम. [दोरा.

**नख़**—स्त्री. [फा.] पतंगाचा रेशमी

**नख**—पु. नख. (यौ.) **नख-शिख** नखशिखांत वर्णन; साऱ्या शरीराचें वर्णन.

**नखछोलिया***—पु. नखाची खूण

**नखत, नखतर***—पु. नक्षत्र.

**नखतराज, नखतेस**—पु. चंद्र.

**नखना**—क्रि. अ. ओलांडलें जाणें; अुल्लंघिलें जाणें. क्रि. स. अुल्लंघिणें.

**नखरा**—पु. [फा.] यौवनसुलभ चांचल्य; नटवेपणा.

**नखशिख**—पु. १ नखापासून शेंडीपर्यंत सर्व शरीर. २ शरीराच्या सर्व अवयवांचें वर्णन. (यौ.) **नखशिख से**—नखशिखांत.

**नखास**—पु. [अ.] गुरांचा बाजार.

**नाखियाना**—क्रि. स. ओरखडणें; बोचकारणें (नखानें).

**नखी**—पु. हिंस्र पशु.

**नखोटना***—क्रि. स. ओरखडणें; बोचकारणें.

**नगण्य**—वि. तुच्छ, निरुपयोगी; हिशेबांत नसलेला.

**नगन***—वि. नागवा; नग्न.

**नगराअी***—स्त्री. १ नागरिकत्व. २ चातुर्य.

**नगवासी**—स्त्री. नागपाश.

**नगाडा**—पु. नगारा. [जवळ.

**नगीच**—क्रि. वि. [फा.] नजीक;

**नगीना**—पु. [फा.]. जडावाचें रत्न (आंगठीमध्यें बसविण्याचा हिऱ्याचा खडा); दागिना.

**नगीनासाज़**—पु. [फा.] १ आंगठींत खडे जडविणारा. २ हिऱ्याचे पैलू पाडणारा; दागिने बनविणारा.

**नग्न**—वि. १ नागवा. २ अुघड; स्पष्ट. [भावगीत. २ मधुर स्वर.

**नग्मा**—पु. [अ.] १ राग; गीत;

**नग्र***—पु. नगर; शहर.

**नघना***—क्रि. स. ओलांडणें.

**नचनि***—स्त्री. नाच.

**नचनी**—स्त्री. नर्तिका. [नाचविणें.

**नचवाना, नचाना**—क्रि. स.

**नचवैयाँ**—पु. नाचणारा.

**नचौहाँ**—*वि. चंचल; नाचरा.

**नछत्री***-वि. भाग्यवान्; भाग्यशाली.

**नज़दीक**—वि. [फा.] जवळ; समीप. **नज़दीकी**—वि. जवळचा.

**नज़म**—स्त्री. [अ.] कविता.

**नज़र**–स्त्री.[अ.] १दृष्टि. २कृपादृष्टि. ३ देखरेख. ४ लक्ष. ५ पारख. ६नजर; दृष्ट. ७भेट. (मु.) **नज़र-आना**–दिसणें. **नज़र अुतारना**–दृष्ट काढणें.

**नज़र–अन्दाज़**—वि.[अ. + फा.] नजरेंतून सुटलेला; दृष्टिपथांत न आलेला.

**नज़रना**–क्रि.अ. [अ.] दृष्ट लागणें.

**नज़र–बाग**—पु. [अ.] घराभोंवतालची बाग.

**नज़रसानी**—स्त्री. [अ.] फिरून निरखून पाहणें; सूक्ष्म निरीक्षण.

**नज़रहाया**—वि. [अ.] दृष्ट लावणारा. [देणें; अर्पण करणें.

**नज़रानना**—क्रि. स. [अ.] भेट

**नज़रि, नज़रिया**-स्त्री. नजर; दृष्टि.

**नज़राना**—पु. [अ.+फा.] नजराणा; भेट, अुपहार.

**नज़ला**-पु. [फा.] १ पडसें; सर्दी. २ डोळ्यांतून पाणी वाहण्यापूर्वी होणारी डोळ्याची जळजळ.

**नज़ा**–पु.[अ.] मरणापूर्वींचा शेवटचा श्वास; मरणसमयींची अवस्था.

**नज़ाकत**–स्त्री. [फा.] सुकुमारता; कोमलता; नाजूकपणा.

**नजात**—स्त्री. [अ.] १ सुटका. २ मोक्ष.

**नज़ारा**–पु. [अ.] १ दृश्य; देखावा. २ प्रेमकटाक्ष.

**नाज़िकाना** --क्रि. स. [फा.] जवळ येणें. [दृष्टान्त.

**नज़ीर**—स्त्री. [अ.] अुदाहरण;

**नज़ूम**—पु. [अ.] फलज्योतिष.

**नज़ूमी**–पु.ज्योतिषी. [कारी जागा.

**नज़ूल**—पु. [अ.] गांवांतील सर-

**नज्ज़ारा**–पु. [अ.] पाहा 'नज़ारा.'

**नटअी**–स्त्री. [दे] गळा.

**नटखट**—वि. १ खोडकर; अुपद्रवी. २ धूर्त; लबाड. **नटखटी**-स्त्री. खोडसाळपणा.

**नटना**—क्रि. अ. १ नाकारणें. २ नाचणें. ३ अभिनय करणें.

**नटनि***—स्त्री. १ नाचणारी स्त्री; नर्तकी. २ नाकबुली.

**नटवना***–क्रि. स. अभिनय करणें.

**नटसार***–स्त्री. नाट्यशाळा.

**नटसाल**—स्त्री. [दे.] १ कांट्याचें टोंक पायांत रुतून झालेलें कुरूप व त्यापासून होणारा ठणका. २ वेदना.

**नटुआ–वा**–पु. [दे.] १ नट; नाटक करणारा. २ खोडकर बालक.

**नठना**–क्रि. स. नष्ट करणें क्रि.अ.नष्ट होणें. [२ कसणें; बांधणें.

**नढना**—क्रि. अ. १ गुंफणें.

**नतर,नतरु,नतु***-*क्रि.वि.* नाहींतर.
**नति***-*स्त्री.* १ प्रणाम. २ विनय.
**नतीजा**–*पु.* [फा.]परिणाम; निकाल; शेवट.
**नत्थी**–*स्त्री.*कागदपत्र अडकवून अगर टांचून ठेवण्याची तार किंवा दोरा.
**नथ**–*स्त्री.* १ नथ. २ वेसण. [भोंक.
**नथना**–*पु.* १ नाकपुडी. २ नाकाचें
**नथना**–*क्रि. अ.* टांचलें जाणें; अेकाच दोऱ्यानें शिवलें जाणें.
**नथनी**–*स्त्री.* १ नथ. २ लोलक.
**नद**–*पु.* मोठी नदी. [डरों (पशूंचें).
**नदना**–*क्रि. अ.* १ वाजणें. २ ओर-
**नदारद**–*वि.* [फा.] लुप्त; बेपत्ता.
**नादिया**–*स्त्री.* लहान नदी.
**नदी-नद्दी**–*स्त्री.* नदी.
**ननँद–ननद**-*स्त्री.* नणंद.
**ननदोअी**–*पु.* नणंदेचा नवरा.
**ननसार–ल ननिआअुर**–*स्त्री.*[दे.] आजोळ.
**ननियाससुर**–*पु.* आजेमामस.
**ननिहाल**–*पु.* आजोळ.
**नन्हा**-*वि.* लहान; चिमुकला; छोटा. **नन्हाअी**–*स्त्री.* १ लहानपणा. २ अप्रतिष्ठा. **नन्हैया***–*वि.* लहान; छोटा.
**नपाअी**–*स्त्री.* मोजणी.
**नपाक**–*वि.* [फा.] अपवित्र.
**नत्ता**–*पु.* नातू; मुलाचा मुलगा.
**नफ़र**–*पु*–[फा.] १ सेवक; नोकर. २ व्यक्ति. [घृणा; तिटकारा.
**नफ़रत**–*स्त्री.* [अ.] तिरस्कार;
**नफ़री**–*स्त्री.* [अ.] १ अेक दिवसाची मजुरी. २ मजुरीचा दिवस.
**नफ़ासत**-*स्त्री.* [अ.] अुत्तमपणा; अुमदेपणा.
**नफ़ीर**–*वि.* [अ.]तिरस्कार करणारा. *स्त्री.* १ आक्रोश; २ फिर्याद.
**नफ़ीस**–*वि.* [अ.] १ अुत्तम. २ स्वच्छ; सुंदर; नाजूक. [प्रेषित.
**नबी**-*पु.* [अ.] पैगंबर; अीश्वराचा
**नबेडना**–*क्रि. स.*संपविणें; सावरणें;
**नबेडा**–*पु.* निकाल; सावरासावर. निर्णय; निर्वाळा.
**नब्ज़**–*स्त्री.* [अ.] नाडी.
**नभचर–नभचारी–नभश्चर**– *पु.* १ चंद्र; सूर्य. २पक्षी. ३ विमान.
**नम**–*वि.* [फा.] ओला.
**नमक**–*पु.* फा.] १ मीठ. २ विशेष प्रकारचें लवण.(यौ.) **नमकहलाल**-*वि.* कृतज्ञ. **नमकहराम**–*वि.* बेअिमान; कृतघ्न.(मु.) **नमक अदा करना**–अुपकाराची फेड करणें. **नमक खाना**–मीठ खाणें. **नमक-मिर्च लगाना**–तिखटमीठ लावून

सांगणें. कटेपर नमक छिडकना- जखमेवर मीठ शिंपडणें.
**नमकख्वार**-*वि.* [ फा. ] अिमानी ( सेवक ); मीठ खाणारा.
**नमक-सार**—*पु.* [ फा. ] मीठ तयार होण्याची जागा; मिठागर.
**नमकीन**—*वि.* [ फा. ] १खारट; रुचकर; खमंग. २ सुंदर.
**नमदा**—*पु.* [ फा. ] १ कांबळी; घोंगडी. २ लोंकरीचें कापड.
**नमना**—*क्रि. अ.* नमणें; झुकणें.
**नमनि***-*स्त्री.* प्रणाम; नमस्कार.
**नमाज़**-*स्त्री.* [फ.] नमन; मुस्लिम-अीश्वर प्रार्थना.
**नमाज़ी**-*पु.* [फा.] नमाज पढणारा.
**नमाना**-*क्रि. स.* नमविणें; वांकविणें.
**नमिस**-*स्त्री.* [ फा. ] दुधाचा फेस ( रात्रीं दंवांत ठेविलेलें दूध घुसळून काढतात तो ).
**नमी**-*स्त्री.* [ फा.] ओलावा; ओल.
**नम्र**-*वि.* झुकलेला; विनीत. [नदी.
**नय**-*पु.* १ नीति. २ नम्रता. *स्त्री.*
**नयकारी***-*पु.* नर्तक.
**नयना***-*क्रि. अ.* १ नमणें; वांकणें; नम्र होणें. २ प्रणाम करणें. [वस्त्र.
**नयनू**-*पु.* १ लोणी. २ झिरझिरीत
**नयर***—*पु.* नगर; शहर.
**नया**-*वि.* १नवा;नवीन. २अननुभवी.
**नयापन**—*पु.* नावीन्य; नवेपणा.
**नयाम**—*पु.*[फा.] तलवारीचें म्यान.
**नर**—*पु.* १ पुरुष. २ शंकु. [झाड.
**नरकट**—*पु.* अेक प्रकारचें वेताचें
**नरगिस**—*स्त्री.* [ फा.] अेक प्रकारचें फूल ( अुर्दू, फारसी काव्यांत प्रियतमेच्या डोळ्यांस या फुलांची अुपमा देतात ).
**नरनाह***—*पु.* राजा; नरेश.
**नरनाहर**-*पु.* नरसिंह.
**नरम दल**—*पु.* [ फा. + सं. ] मवाळ पक्ष. [शेवरीचा कापूस.
**नरमा**—*स्त्री.* [ फा. ] देवकापूस;
**नरमाअी**-*स्त्री.* [ फा. ] कोमलता; नरमी.
**नरजना**-*क्रि.अ.*[फा.] नाराज होणें.
**नराट्***-*पु.* नरेश; राजा.
**नरिंद**—*पु.* नरेन्द्र; राजा.
**नरीना**-*वि.* [ फा. ] पुरुषजाती-संबंधीं; पुल्लिंगी.
**नर्द**-*स्त्री.* [ फा.] सोंगटी; मोहरा.
**नर्म**—*वि.* [फा.] १ मृदू; कोमल. २ लवचीक. ३ मंद. ४ आळशी; सुस्त. ५ लवकर पचणारा.
**नर्मदिल**-*वि.* [ फा. ] कोमल अंतःकरणाचा.
**नर्स**-*स्त्री.* [ अिं. ] रोग्याची शुश्रूषा करणारी; परिचारिका.

**नला**–पु· नळ; नळी. **नली**–स्त्री·
**नवंबर**–पु· [अिं.] नोव्हेंबर महिना.
**नवना***–क्रि·अ· १ वांकणें; झुकणें. २ नमणें; नम्र होणें. ३ नमन करणें. **नवन**–नमन.
**नवनि**–स्त्री· नम्रता; दीनता.
**नवनीत**–पु· लोणी.
**नवल**–वि· १ नवीन. २ सुंदर. ३ तरुण. [शृंगार. वि· सोळा.
**नवसत**, **नवसप्त***–पु· सोळा
**नवसर**–वि· लहान वयाचा.
**नवाज**–वि· [फा.] कृपा करणारा.
**नवाजना***–क्रि· स· [फा.] अनुग्रह करणें; दया दाखविणें.
**नवाना**–क्रि· स· नमविणें; वांकविणें.
**नवासा**–पु· [फा.] नातू (मुलीचा मुलगा).
**नवीनता**—स्त्री· नावीन्य.
**नवीस**—पु· [फा.] लिहिणारा. **नवीसी**–स्त्री· १ लिहिणें; लिहिण्याचें काम. २ लिखाअी; लिहिणावळ.
**नवेद**–पु· आमंत्रण; निमंत्रण.
**नवेला**—वि· १ नवीन. २ तरुण.
**नवोढा**–स्त्री· नुकतेंच लग्न झालेली; नववधू; नवयौवना.
**नव्य**–वि· नवीन; नूतन. [नष्ट होणें.
**नशना**, **नसना***–क्रि· अ· नासणें;
**नशा**—पु· [अ·] १ दारूचा कैफ. २ मादक पदार्थ. ३ मद; गर्व. (मु.) **नशा किरकिरा हो जाना**— अप्रिय घटना घडल्यामुळें मादक पदार्थाच्या गुंगीचा आनंद नाहींसा होणें; विरस होणें. **नशा छाना (आँखोंमें)**–धुंदी चढणें. **नशापानी**–मादक पदार्थ. **नशा हिरना होना**–धुंदी अुतरणें.
**नशाना***–क्रि· स· १ नासविणें; बिघडविणें. २ नाश करणें; नष्टविणें.
**नशीला**–वि· [फा.] मादक; गुंगी आणणारा. [अुताराची जमीन.
**नशेब**––पु· [फा.] खोलगट व
**नश्तर**–पु· [फा.] जखम चिरण्याचा किंवा फोड फोडण्याचा बारीक तीक्ष्ण चाकू.
**नष***—पु· नख.
**नषत***—पु· नक्षत्र.
**नसंक***—वि· पु· निःशंक.
**नस**—स्त्री· नाडी; रग. (मु.) **नस-नसमें**–सबंध शरीरांत. **नसनस फडक अुठना**-अत्यंत आनंद होणें.
**नसतरंग**–पु· अेक वाद्य.
**नसतालीक**–पु· [अ·] वळणदार व सुंदर अक्षर.
**नसब**–पु· [अ·] १ वंश. २ वंशावळ.

**नसबनामा**–पु. [अ. + फा.] वंशावळ; वंशवृक्ष. [सहायता.
**नसर**–स्त्री. [अ.] १ गद्य. २ मदत;
**नसवार**—स्त्री. तपकीर.
**नसीनी, नसेनी-नसैनी***—स्त्री. शिडी; जिना.
**नसीब**—पु. [अ.] नशीब.
**नसीबवर**–वि. (अ. + फा.] सुदैवी; भाग्यवान्. [वायुलहरी.
**नसीम**–स्त्री. [अ.] शीतल, मंद
**नसीहत**—स्त्री. [अ.] १ अुपदेश; बोध. २ सल्लामसलत.
**नस्र**—स्त्री. [अ.] १ मदत; सहायता २ पक्षाचें समर्थन. ३ गद्य.
**नस्ल**—स्त्री. [अ.] जाति; वंश.
**नहँ***—पु. नख.
**नहछू**—पु. लग्नांतील अेक विधि (वराचीं नखें कापण्याचा).
**नहना***—क्रि. स. जुंपणें; कामास लावणें.
**नहर**—स्त्री. [फा.] कालवा.
**नहरनी**—स्त्री. नाचकणें (नख काढण्याचें).
**नहरुआ**—पु. [दे.] नारू.
**नहलाना**—क्रि. स. न्हाअू घालणें; स्नान करविणें.
**नहस**—वि. [अ.] अशुभ; अपवित्र.
**नहान**–पु. स्नान.
**नहाना**–क्रि. अ. स्नान करणें; न्हाणें.
**नहार**—वि. [फा.] अनशापोटीं.
**नहारी**—स्त्री. [फा.] न्याहारी.
**नहीं**—अव्य. नाहीं.
**नहूसत**–स्त्री. [अ.] १ औदासीन्य; खिन्नता. २ अशुभ लक्षण.
**नाँअुँ**—पु. नाम.
**नाँघना**–क्रि. अ. ओलांडणें; अुल्लंघणें.
**नाँठना***—क्रि. अ. नष्ट होणें.
**नाँद**—स्त्री. गुरांना दाणापाणी देण्याचें घमेलें; डोणी.
**नाँदना**—क्रि. अ. १ गर्जना करणें. २ शिंकणें. ३ प्रसन्न होणें.
**नाँयँ-नाँव***–पु. नाम. नांव.
**नाँयँ***–अव्य. १ नाहीं. २ समान.
**ना**—अव्य. १ नाहीं; नको. २ ना.
**नाअिक***–पु. स्वामी. [बेकी; फूट.
**नाअित्तिफाकी**—स्त्री. [फा.+अ.]
**नाअिन**—स्त्री. न्हाविण.
**नाअी**—पु. न्हावी.
**नाअु***—स्त्री. नौका.
**नाअुम्मीद-नाअुम्मेद**–वि. [फा.] निराश; नाअुमेद. **नाअुम्मीदी**–स्त्री. निराशा.
**नाअू**—पु. न्हावी.
**नाक**—स्त्री. १ नाक. २ प्रतिष्ठा; अिज्जत. (मु.) **नाक कटना**–अब्रू जाणें. **नाकका बाल**–१ लाडका;

आवरता. २ सल्लागार. **नाक घिसनी**–विनवणी, अजीजी. **नाक भौं चढाना**–नाक मुरडणें; कपाळ्याला आंठ्या घालणें. **नाकमें दम करना**–नाकीं नअू आणणें. **नाक रखना**–अब्रू राखणें. **नाक रगडना**-अजीजी करणें; विनवणी करणें. **नाकों चने चबवाना (चबाना)**- खूप त्रास देणें; हैराण करणें. **नाकों दम आना (होना)**–हैराण होणें; नाकीं नअू येणें.

**नाकडा**—*पु.* नाकाचा रोग; फोड.

**नाक़द्र**—*वि.* [फा.] अप्रतिष्ठित.

**ना–कस**—*वि.*[अ.] नीच; तुच्छ.

**नाका**—*पु.* १ नाकें; पोलिसचौकी. २ रस्त्याचा कोपरा. ३ फाटक; प्रवेशद्वार. [अयोग्य. २ अशिक्षित.

**नाक़ाबिल**–*वि.* [फा.] १ नालायक;

**ना–काम**—*वि.*[फा.] १ अयशस्वी. २ निराश.

**नाक़िस**—*वि.* [ अ. ] १ अुणीव असलेला; अपूर्ण. २ वाअीट; कुच-कामाचा. ३ सदोष.

**नाखना***—*क्रि. स.* १ नष्ट करणें. २ ओलांडणें; अुल्लंघन करणें. ३ टाकणें; घालणें.

**नाखुदा**—*पु.* [ फा. ] नावाडी.

**नाख़ून**—*पु.* [ फा. ] नख.

**नागझाग**–*पु.* अफू.

**नागफनी**–*स्त्री.* निवडुंग.

**नागरता***–*स्त्री.* नागरिकत्व.

**नागरी**—*स्त्री.* १ शहरांत राहाणारी स्त्री; निपुण स्त्री. २ देवनागरी ( बालबोध ) लिपि.

**नागवार**–*वि.* [फा.] अप्रिय.

**नागहानी**–*वि.* [फा.] अनपेक्षित; अकस्मात् घडलेलें.

**नागा**—*पु.* [ फा.] खाडा.

**नागाह**–*क्रि. वि.* [ फा. ] अेका-अेकीं; अचानक.

**नागिन**–*स्त्री.* नागीण.

**नागेसर**–*पु.* १ शेषनाग. २ अैरावत.

**नाचकूद**–*स्त्री.* १ नाचणें; खिदळणें. वागडणें. २ अुपद्व्याप; धडपड.

**नाचना**–*क्रि.अ.* नाचणें; नृत्य करणें.

**नाचाकी**-*स्त्री.* [फा.] १ बेबनाव; फूट. २ आजारपण; अस्वस्थता.

**ना-चार**–*क्रि. वि.* [ फा. ] नाअि-लाजानें. *वि.* असहाय. [२ असंबद्ध.

**नाचीज़**—*वि.* [फा.] १ तुच्छ.

**नाज**–*पु.* धान्य.

**नाज़**–*पु.* [फा.] १ नखरा. २ अैट. ३ दिमाख. **नाज़बरदार**-*वि.*आर्जव करणारा; आर्जवी; खुशामत्या.

**नाज़नीं**–*स्त्री.* [ फा. ] सुंदर स्त्री; सुंदरी.

**नाज़रीन**–*पु.* बहु. [*अ*] १ प्रेक्षक. २ वाचक. [ अनुचित.

**नाजायज़**–*वि.*[फा. + *अ.*] अयोग्य;

**नाज़िम**–*पु.* [*अ.*] व्यवस्थापक.

**नाज़िर**—*पु.* [ फा. ] निरीक्षक; देखरेख करणारा.

**नाज़ेबा**–*वि.* [फा.] १ न शोभणारा. २ विजोड. ३ अनुचित.

**नाट**–*पु.* १ नाच. २ नक्कल.

**नाटना**–*क्रि. अ.* वचनभंग करणें.

**नाटा**–*वि.* ठेंगणा; खुजा.

**नाठ**—*पु.* नाश; अभाव.

**नाठा**–*पु.* निःसंतान; निर्वंश झालेला.

**नाड**–*स्त्री.* मान.

**नाडी** *क्रि.* नाडी; धमनी. ( मु. ) **नाडी छूट जाना**–नाडी बंद पडणें.

**ना-तमाम**–*वि.* [ फा. + *अ.* ] अपूर्ण; अर्धवट.

**नातर-रु***–अव्य. नाहीं तर.

**ना-तवानी**–*स्त्री.* [ फा. ] दौर्बल्य; अशक्तपणा.

**नाता**–*पु.* नातें; संबंध. [कमजोर.

**जा-ताकत**–*वि.*[फा. + *अ.*] दुर्बल;

**नाती**–*पु.* नातू. [ संबंधानें.

**नाते**–*क्रि. वि.* करितां; साठीं;

**नातेदार**–*वि.* [सं.+ फा.] नातलग.

**नाथ**–*स्त्री.* वेसण.

**नाथना**–*क्रि. स.* वेसण घालणें; टोंचणें. [ अकली; अज्ञानी.

**नादान**–*वि.* [ फा. ] मूर्ख; बे–

**नादार**–*वि.* [ फा. ] गरीब; दरिद्री.

**नादिम**–*वि.* [ *अ.* ] लाज्जित.

**नादिर**–*वि.* [ फा. ] १ अद्‌भुत. २ दुर्लभ; विरळा. [ जुलूम.

**नादिरशाही**–*स्त्री.*[फा.] बेबंदशाही;

**नाधना**—*क्रि. स.* जुंपणें; जोडणें.

**नाधा**—*पु.* पन्हाळ; जुंवाला बांधण्याचा कातडी पट्टा; सापती.

**नान**—*स्त्री.* [फा.] भाकरी; चपाती.

**नान-खताअी** —*स्त्री.* [ फा. ] बिस्किटांचा अेक प्रकार.

**नान-बाअी**—*पु.* [ फा. ] पावरोटी विकणारा; गेटीवाला. [आजोबा.

**नाना**—*पु.* [ दे. ] आअीचे वडील;

**नानी**—*स्त्री.* आजी. ( मु. ) **नानी याद आना** अथवा **मर जाना**–संकट कोसळणें; आपत्ति गुदरणें.

**नानिहाल**—*पु.* [दे+सं] आजोळ.

**नान्हरिया, नान्हा**—*वि.* लहान.

**नाप**–*स्त्री.* माप; तोल; जोख.

**नापना**—*क्रि. स.* १ मापणें; माप घेणें. २ तोलणें; जोखणें.

**नापजोख, नापतौल**—*स्त्री.* माप; तोल; वजन.

**नापसंद**—*वि.* [ फा. ] नापसंत.

**नापाक**—*वि.* [फा.] १ अशुद्ध; अपवित्र. २ गचाळ; घाणेरडा.

**नापैद**—*वि.* [फा.] लुप्त; गडप झालेला. [पन्हाळ.

**नावदान**—*पु.* [फा.] गटार; मोरी;

**नाबालिग**—*वि.* [फा. + अ.] अज्ञान; वयांत न आलेला.

**नाम**—*पु.* नांव. (मु.) **नामपर मिटना** अथवा **मरना**–प्रेम करणें; प्रेमासाठीं सर्वस्व अर्पण करणें. **नाम लेना**–नांव घेणें. **नाम होना** अथवा **निकलना**–नांव होणें. **नाम लगाना** अथवा **धरना**–दोष लावणें; नांवें ठेवणें. **नाम का**–नांवाचाच; नामधारी. **नाम रखना**–नांव ठेवणें; नामकरण करणें. **नामोनिशान**–खूण; ठाव; पत्ता; छडा; माग.

**नामज़द**—*वि.* [फा.] १ नेमलेला; नियुक्त केलेला. २ प्रसिद्ध; विख्यात.

**नामधराअी**—*स्त्री.* बदनामी; अपकीर्ति. [हिजडा. २ भित्रा.

**नामर्द**—*वि.* [फा.] १ नपुंसक;

**नामलेवा**—*पु.* १ नांव घेणारा. २ वारस.

**नामवर**–*वि.* [फा.] प्रसिद्ध; विख्यात.

**नामा**—*पु.* [फा.] १ पत्र; चिठ्ठी. २ पुस्तक; ग्रंथ.

**नामाक़ूल**—*वि.* [फा.] १ अयोग्य; अनुचित. २ अवास्तव; गैरवाजवी.

**नामालूम**—*वि.* [फा. + अ.] १ अपरिचित; परका. २ माहीत नसलेला. [महशूर

**नामी**—*वि.* प्रसिद्ध; विख्यात;

**ना-मुआफ़िक़**–*वि.* [फा. + अ.] १ अयोग्य. २ वाअीट.

**नामुनासिब**—*वि.* [फा. + अ.] १ अनुचित; अयोग्य. २ न शोभणारा. [अशक्य; असंभाव्य.

**नामुमकिन**—*वि.* [फा. + अ.]

**नामुराद**—*वि.* [फा.] १ ज्याची अिच्छा पूर्ण झालेली नाहीं असा; विफल-मनोरथ. २ दुर्दैवी.

**नामूस**–*स्त्री.* [फा.] अब्रू; अिज्जत. २ पातिव्रत्य. **नामूसी**—*स्त्री.* अप्रतिष्ठा; बदनामी. ['नाम'.

**नामोनिशान**—*पु.* (यौ.) पाहा

**नायब**—*पु.* [अ.] १ मुखत्यार. २ सहाय्यक; मदतनीस. ३ मुनीम.

**नायाब**—*वि.* [फा.] १ दुर्मिळ. २ अुत्तम; श्रेष्ठ. [रंगाच्या.

**नारंगी**—*स्त्री.* नारिंग. *वि.*–नारिंगी

**नार**–*स्त्री.* मान. [पापी; भयंकर.

**नारकी-नारकीय**–*वि.*-नरकासंबंधी;

**नारा**–*पु.* [अ.] घोषणा. *पु.* नाडा.

**नाराज़**—*वि*. [फा.] असंतुष्ट; अप्रसन्न; नाखुश.
**नारि**—*स्त्री*. १*स्त्री*. नारी. २नाडी.
**नारियल**—*पु*. नारळ. **नारियली**—*स्त्री*. १खोबरें. २ नारळीची गुडगुडी.
**नारी**—*स्त्री*. स्त्री महिला.
**नाल**—*स्त्री*. १ कमळाचा देंठ. २ बंदुकीची नळी. ३ नाळ. ४मोरी. ५ फुंकणी; नळी.
**नाल**—*पु*. [अ.] घोडा अित्यादिकांच्या पायांस मारावयाचा नाल.
**नालकी**—*स्त्री*. अेक प्रकारची पालखी.
**नालबंद**—*वि*. *पु*. [अ. + फा.] नाल बसविणारा; नालकरी.
**नाला**—*पु*. नाला; ओढा.
**नाला**—*पु*. [फा.] १ रडत रडत प्रार्थना करणें; रडणें. २ शोक; विलाप. [तक्रार; दावा.
**नालिश**—*स्त्री*. [फा.] फिर्याद;
**नाव**—*स्त्री*. १ नाव; होडी.
**नावक**—*पु*. [फा.] १ अेक प्रकारचा लहान तीक्ष्ण बाण. २ मधमाशीचा डंख.
**नावर-रि***—*स्त्री*. नौका.
**ना-वाकिफ़**—*वि*. [फा. + अ.] अपरिचित.
**नाविक**-*पु*. नावाडी. [सारखें फळ.
**नाशपाती**—*स्त्री*. [तु] सफरचंदा-
**नाशवान्**—*वि*. नश्वर; नष्ट होणारें.
**नाशाद**-*वि*. [फा] १ अप्रसन्न; दुःखी. २ दुर्दैवी.
**नाश्ता**-*पु*. [फा.] न्याहरी; फराळ.
**नास** —*स्त्री*. तपकीर. **नासदान**—*पु*. [हि + फा.] तपकिरीची डबी.
**नासमझ**-*वि*. निर्बुद्ध.
**नासह**-*वि*. [अ.] अुपदेश देणारा.
**नासापुट**-*पु*. [यौ.] नाकपुडी.
**नासिर**—*वि*. [अ.] १ गद्यलेखक. २ संरक्षक; सहाय्यक.
**नासी***—*वि*. नाशक; नाश करणारा. [भगेंद्र; भगंदर.
**नासूर**—*पु*. [अ.] १खोल व्रण. २
**नाह***-*पु*. स्वामी; प्रभु.
**नाहक**—*क्रि. वि*. [फा] विनाकारण; व्यर्थ.
**नाह-नूह**-*स्त्री*. नकार.
**नाहमवार**-*वि*. [फा.] १ अुंचसखल; खडबडीत. २ नालायक.
**निंदरिया**—*स्त्री*. झोंप.
**नाहर**—*पु*. सिंह; वाघ.
**नाहरू**—*पु*. [दे.] नारू. [येणें.
**निअराना-यराना***-*क्रि.अ*. जवळ
**निआन***-*पु*. परिणाम; शेवट; अंत.
**निआमत**-*स्त्री*. [अ.] बहुमोल वस्तु; दुर्लाभ; अलभ्य लाभ.

**निकम्मा**—*वि.* बेकार; कुचकामाचा; निरुपयोगी.

**निकर**-*पु.* समूह; राशि. [हाफ पँट.

**निकर**—*स्त्री.* [अं.] अर्धी चड्डी;

**निकरना** *—*क्रि.अ.* उदय होणें; प्रकट होणें.

**निकलना**—*क्रि. अ.* १ निघणें; आंतून बाहेर येणें. २ वेगळें होणें; निराळें होणें. ३ अुद्भवणें. ४ दिसूं लागणें. ५ सुटणें (प्रश्न, कोडें अि.); अुमगणें. [होणें.

**निकसना**—*क्रि. अ.* निघणें; प्रकट

**निकाअी**—*पु.* [फा.] चांगुलपणा.

**निकाम**—*वि.* निरुपयोगी; व्यर्थ. *क्रि. वि.* व्यर्थ; वृथा.

**निकाय**—*पु.* समूह; रास.

**निकारना***—*क्रि. स.* पाहा 'निकालना'.

**निकालना**—*क्रि. स.* १ काढणें. २ टरविणें. ३ प्रकट करणें. ४ आरंभ करणें. ५ वेगळें करणें. ६ कमी करणें. ७ सुटका करणें; सोडविणें. ८ निर्वाह करणें; चालविणें. ९ सोडविणें (प्रश्न वगैरे). १० शोध लावणें. ११ कर्ज वगैरे काढणें १२ कशीदा काढणें. १३ काढणें(नोकरीवरून).

**निकास**—*पु.* १ बाहेर निघण्याची वाट (दार; दरवाजा). २ खुली जागा. ३ सुटकेचा अुपाय. ४ अुत्पन्नाची साधनें; अुत्पन्न. ५ निर्गत. [करणें.

**निकासना**—*क्रि. स.* काढणें; वेगळें

**निकासी**-*स्त्री.* १ प्रस्थान. २ निर्गत. ३ अुत्पन्न. ४ मालाचा खप. ५ कर; जकात. ६ जमीनदाराचा नफा; मिळकत. ७ रवानगी.

**निकाह**—*पु.* [अ] निका; विवाह.

**निकिष्ट***—*वि.* निकृष्ट.

**निखंग***—*पु.* भाता (बाणांचा).

**निखट्टू**—*वि.* १ निरुद्योगी; अैतखाअू. २ कुचकामाचा. ३ आळशी; सुस्त.

**निखरना**—*क्रि. अ.* १ निर्मल होणें. २ रंग खुलून दिसणें.

**निखरी**-*स्त्री.* तळलेले पदार्थ (तुपांत) ओवळ्यानें खातां येतील असे.

**निखार**—*पु.* १ स्वच्छता; निर्मळपणा. २ श्रृंगार; सजावट.

**निखारना**—*क्रि. स.* धुणें; निर्मळ करणें; साफ करणें.

**निखालिस**—*वि.* [सं. + फा.] १ शुद्ध; निर्भेळ. २ निखालस.

**निखेध***—*पु.* निषेध.

**निखोट**—*वि.* निर्दोष; निर्भेळ. *क्रि. वि.* बेधडक; निस्संकोचपणें.

**निगड**–*स्त्री*. १ हत्तीला बांधण्याचा सांखळदंड. २ बेडी. [निरीक्षण.
**निगरानी**–*स्त्री*. [फा.] देखरेख;
**निगरु***–*वि*. हलका (वजनानें).
**निगलना**–*क्रि. स*. १ गिळणें. २ गिळंकृत करणें; लुबाडणें (धन).
**निगहबान**––*पु*. [फा.] देखरेख करणारा; निगा ठेवणारा. **निगहबानी**–*स्त्री*. १ रक्षण. २ निगा; देखरेख:
**निगार**–*वि*. [फा.] वेलबुट्टीचें काम करणारा. *पु*. १ चित्र; तसबीर. २ मूर्ति. ३ वेलबुट्टी.
**निगाली**–*स्त्री*. हुक्क्याची नळी.
**निगाह**–*स्त्री*. [फा.] १ नजर; दृष्टि. २ मेहेरबानी; कृपादृष्टि. ३ चित्त; लक्ष. ४ पारख.
**निगि***–*वि*. अत्यंत प्रिय.
**निगुनि**–*वि*.गुणरहित [न घेतलेला.
**निगुरा**–*वि*. गुरु न केलेला; दीक्षा
**निगोडा**–*वि*. १ निर्लज्ज; बेशरम. २ नीच; दुष्ट. ३ अनाथ. ४ सडाफटिंग. ५ दुर्दैवी .
**निग्रहना*** –*क्रि. स*. १ धरणें; पकडणें २ अडवणें. ३ शिक्षा देणें.
**निघटना***–*क्रि. अ*. समाप्त होणें.
**निघरघट**–*वि*. निगरगट्ट; बेशरम.
**निचल***–*वि*. निश्चल स्थिर; अचल.
**निचला**–*वि*. १ खालचा. २ कमी प्रतीचा.
**निचाई, निचान**–*स्त्री*. १ उतार; उतरण. २ कमीपणा. ३ नीचपणा.
**निचै***–*पु*. समूह.
**निचोड**– *पु*. १ सार; सत्त्व. २ निष्कर्ष; तात्पर्य.
**निचोडना**–*क्रि. स*. १ पिळणें; दाबून काढणें. २ उकळणें ३ सार किंवा निष्कर्ष काढणें.
**निचोना***-*क्रि. स*. पिळणें.
**निचोल**–*स्त्री*. ओढणी (स्त्रियांची).
**निचौहाँ**––*वि*. खालच्या बाजूस वांकलेला. [शुद्ध; एकमात्र.
**निछनियाँ***–*क्रि. वि*. पूर्णपणें. *वि*.
**निछल***–*वि*. कपटरहित; निश्चल.
**निछान***––*वि*. शुद्ध; निखालस. *क्रि. वि*. पूर्णपणें. [समर्पण.
**निछावर**––*स्त्री*. १ ओवाळणी. २
**निज**–*वि*. १ आपला; स्वतःचा. २ मुख्य. ३ खरें; ठीक. अव्य. अवश्य. (मु.) **निज करके** – १ अवश्य. २ विशेषतः. **निजी**–खासगी.
**निज़ाम**–*पु*. [*अ*.] १ बंदोबस्त; व्यवस्था. २ क्रम. ३ पाया; मूळ. ४ मोतीं किंवा रत्नांची लड. *पु*. हैद्राबादचा निजाम. [शक्तिहीन.
**निज़ोर***–*वि*. दुबळा; कमजोर;

**निझरना**–*क्रि. अ.* १ पूर्णपणें झडून जाणें. २ गळून पडणें. ३ रिकामें होणें. ४ निर्वाळा देणें.

**निठि**–*क्रि. वि.* कसें तरी करून; मोठ्या कष्टानें; कसेंबसें.

**निठल्ला**–*वि.* [ दे. ] निरुद्योगी; रिकामटेकडा; बेरोजगार. *क्रि. वि.* निरर्थक. [ फुरसत. २ बेकारी.

**निठाला**– *पु.* [ दे. ] १ रिकामपणा;

**निठुर**–*वि.* निष्ठुर; क्रूर; निर्दय. **निठुरता**–*स्त्री.* निर्दयपणा. क्रौर्य.

**निठुरआी–राआी***–*स्त्री.* निष्ठुरपणा.

**निठौर**–*पु.* वाआीट जागा.

**निडर** —*वि.* १ निर्भय; धीट. २ निश्शंक. **निडरपन–ना**— *पु.* धाडस; निर्भयता.

**निडै***—*क्रि. वि.* जवळ.

**निढाल**—*वि.* १ शिथिल; थकला–भागलेला. २ निरुत्साही. ३ जड; सुस्त.

**निढिल***–*वि.* १ कसून बांधलेला. २ टणक.

**नित** —अव्य. नित्य; दररोज; सदा-सर्वदा. (मु.) **नितानित** —दररोज.

**नितांत**–*वि.* अत्यंत; पुष्कळ; बिलकुल; सर्वथा.

**निति***– अव्य. नित्य.

**नितंभ***—*पु.* ढांव.

**निथरना**–*क्रि. अ.* तळाशीं सांचणें; जमणें ( गाळ ).

**निथार**—*पु.* गाळ खालीं बसल्यामुळें झालेलें स्वच्छ पाणी.

**निथारना**—*क्रि. स.* १ झांकणें. २ तळाशीं गाळ बसविणें.

**निदर्आी***–*वि.* निर्दयी; क्रूर; निष्ठुर.

**निदरना***–*क्रि. स.* १ अपमान करणें; अनादर करणें. २ तिरस्कार करणें. ३ मात करणें.

**निदलन***–*पु.* निर्दलन; नाश.

**निदहना***–*क्रि. स.* जाळणें.

**निदान**–*पु.* १ कारण. २ शेवट; अंत. ३ निदान; रोग चिकित्सा; अव्य. सरते शेवटीं.

**निदेश**—*पु.* आज्ञा; आदेश.

**निधडक**—*क्रि. वि.* [अनु ] निस्संकोचपणें; बेधडक.

**निधन–नी***–*वि.* निर्धन; दरिद्री.

**निधन**–*पु.* १ मृत्यु; मरण. २ नाश.

**निधि**—*स्त्री.* १ द्रव्य; निधि. २ गाडलेलें द्रव्य. ३ नवाची संख्या.

**निनरा, निनार-रा**–*वि.* वेगळा; निराळा; न्यारा.

**निनाद**–*पु.* आवाज; शब्द.

**निनान***—*पु.* १ शेवट; अंत. २ लक्षण. *वि.* निकृष्ट. *क्रि.वि.* शेवटीं.

**निनानवे**–*वि.* नव्याण्णव. (मु.)

**निनानवे के फेरमें पडना**—जास्त पैसा मिळविण्यासाठीं सारखी धडपड करीत राहणें.

**निनावाँ**—*पु.* तोंडांतील आंतल्या बाजूस येणाऱ्या लहान पुटकुळया.

**निनौना***-*क्रि.स.* वांकविणें;नमविणें.

**निन्नानवे—निन्यानवे**—*वि.* पाहा ' निनानवे '

**निन्यारा***—*वि.* न्यारा; निराळा.

**निपंग***—*वि.* अपंग; लुळा.

**निपजना***—*क्रि. अ.* निपजणें; उत्पन्न होणें.

**निपजी***—*स्त्री.* १ उत्पत्ति. २ लाभ.

**निपट**—*अव्य.* निव्वळ; अगदीं; बिलकुल.

**निपटना**—*क्रि. अ.* १ निवृत्त होणें; मोकळें होणें. २ समाप्त होणें. ३ ठरणें; निश्चित होणें.

**निपटारा**—*पु.* १ निर्णय. २ समाप्ति.

**निपातना***—*क्रि. स.* पाडणें; निःपात करणें. **निपात**—*पु.* निःपात; नाश.

**निपूत***—*वि.* निपुत्रिक; निस्संतान.

**निपोरना**—*क्रि. स.* बाहेर काढणें; दाखविणें ( दांत ).

**निफन***—*वि.* पूर्ण. *क्रि.वि.* पूर्णपणें; चांगुलपणें. [जाणें.

**निफरना**—*क्रि. अ.* छेदून आरपार

**निफरना**—*क्रि. अ.* खुलणें; निरभ्र होणें.

**निफल***—*वि.* निष्फळ.

**निफ़ाक**—*पु.* [*अ.*] १ फूट; वैर. २ विरोध; वैमनस्य; बिघाड.

**निबकौरी**—*स्त्री.* लिंबोळी; निंबोणी.

**निबटना**—*क्रि. अ.* १ मोकळें होणें; निवृत्त होणें. २ संपणें; खलास होणें. ३ ठरणें.

**निबटना**—*क्रि. स.* संपविणें; मिटविणें. २ चुकतें करणें; फेडणें. ३ ठरविणें. [२ सोडवणूक; निर्वाळा.

**निबटेरा**—*पु.* १ निकाल; निवाडा.

**निबडना***—*क्रि. अ.* १ समाप्त होणें. २ निर्णय होणें. ३ सोडवणूक होणें.

**निबर***-*वि.* निर्बल; अशक्त.

**निबरना**—*क्रि. अ.* १ सुटका होणें. २ अलग होणें; सुटणें.

**निबहना**—*क्रि. अ.* १ निर्वाह होणें. २ तडीस जाणें; पार पडणें. ३ भागणें;निभणें. [नाहीं असें ठिकाण.

**निबहुर**—*पु.* जेथून परत येणें शक्य

**निबाहना**—*क्रि.स.* १ निर्वाह करणें; योगक्षेम चालविणें. २ चरितार्थ चालविणें. ३ तडीस नेणें; पार पाडणें. **निबाह**—*पु.* १ निर्वाह; गुजराण; योगक्षेम. २ परंपरेचें रक्षण. ३ पूर्ति. ४ सुटकेचा किंवा

बचावाचा मार्ग.

**निबुआ–बा**—पु. लिंबू. [ सुटणें.

**निबुकना***–क्रि. अ. बंधमुक्त होणें;

**निबेडना**—क्रि. स. १ सोडविणें; मोकळें करणें. २ विलग करणें. ३ निर्णय, निवाडा करणें. **निबेडा**–पु. १ सुटका; मुक्ति. २ बचाव. ३ निर्णय; निर्वाळा. ४ त्याग.

**निभना**–क्रि. अ. १ पार पडणें; निभणें. २ टिकणें; तगणें. ३ सिद्धीस, तडीस जाणें. ४ पालन होणें.

**निभरम***–वि. भ्रमरहित. क्रि. वि. बेधडक.

**निभाना**–क्रि.स. १ पार पाडणें; निभावणें. २ चालू ठेवणें. ३ तडीस नेणें. ४ टिकविणें.

**निभावना**–क्रि.स. १ निभावणें. २ सोसणें. ३ कष्टानें निर्वाह करणें.

**निमकी**—स्त्री. [ फा. ] १ लिंबाचें लोणचें. २ तिखटामिठाची शंकरपाळीं.

**निमज्जन**-पु. स्नान. [बुरखा. २ डगला.

**निमा, नीमा**–पु. [फा.] १ एक तऱ्हेचा

**निमिख, निमेख, निमेष**–पु. १ निमिष; पळ. २ पापणी लवणें; पातें.

**निम्न**—वि. खालचा. ( यौ. ) **निम्नांकित**–खालीं लिहिलेलें.

**नियत**–वि. १ निश्चित. २ परिमित. ३ नेमलेला; नियोजित.

**नियति**–स्त्री. १ नेमणूक. २ स्थैर्य. ३ दैव; भाग्य. ४ अनिवार्य गोष्ट.

**नियर***—अव्य. निकट; जवळ. **नियराई**–स्त्री. सान्निध्य; सामीप्य.

**नियराना***–क्रि. स. जवळ येणें.

**नियाई***–वि. न्यायी.

**नियाज़**-स्त्री. [फा.] १ अभिलाषा; कामना. २ प्रेम व्यक्त करणें. ३ दीनता; अजीजी; नम्रता. ४ वडील माणसांचा आशीर्वाद; प्रसाद. ५ मृतकानिमित्त गरिबांना दिलें जाणारें जेवण. ६ भेट; देणगी. ७ मोठ्यांचा परिचय.

**नियान***—पु. परिणाम; शेवट.

**नियामत**–स्त्री. [ अ. ] १ अलभ्य किंवा दुर्लभ वस्तु. २ पक्वान्न. ३ धनदौलत. [ राख; माती.

**नियार**–पु. सोनाराच्या दुकानांतील

**नियारा**–वि. अलग; दूर.

**नियारिया**–पु. १ झारेकरी ( सोनाराच्या दुकानांतील केरकचरा चाळून त्यांतून सान्याचे कण काढणारी जात ). २ चतुर माणूस.

**नियारे**–अव्य. अलग; वेगळे. (मु.) **वारे नियारे होना**–१ निर्वाळा होणें. २ श्रीमंत होणें.

**नियाव***–पु. न्यायनीति.

**नियुक्ति**–*स्त्री*· नेमणूक.
**नियोग**–*पु*· १ नियोजित करण्याचें काम; नियुक्ति; प्रेरणा. २ द्वितीय पतिकरण.
**निरंकार***–*पु*· निराकार.
**निरंतर**–*वि*·स्थायी; कायमचा. *क्रि· वि*· सदैव; सतत.
**निरक्षन**–*पु*· निरीक्षण.
**निरखना***–*क्रि· स*· पाहाणें; निरीक्षण करणें.
**निरग***–*पु*· नृग राजा.
**निरगुन***–*वि*· निर्गुण.
**निरच्छ***–*वि*· आंधळा.
**निरतना***–*क्रि· स*· नाचणें.
**निरत**–*वि*·गढलेला; मग्न झालेला; व्यग्र; तत्पर. [ निराधार.
**निरधार**–*पु*· निर्धार; निश्चय. *वि*·
**निरपना***–*वि*· परक्याचा.
**निरबहना***–*क्रि·अ*· निभणें;निर्वाह होणें. [ २ निवाडा; निर्वाळा.
**निरबेरा***–*पु*·१ सुटका; सोडवणूक.
**निरमर–ल**—*वि*· निर्मळ; स्वच्छ.
**निरमोल**–*वि*· अुत्तम; बहुमोल.
**निरय**–*पु*· नरक.
**निरवलंब**–*वि*· निराश्रित; असहाय.
**निरवच्छिन्न**––*वि*· संतत; सतत; क्रमशः [ रण; निस्तार.
**निरवार***–*पु*· १ सुटका. २ निस्त-
**निरसंक***–*वि*·१निःशंक. २निर्भय.
**निरा**—*वि*· १ निव्वळ; केवळ; अगदीं. २शुद्ध; निर्भेळ; निखालस.
**निराखर**–*वि*·निरक्षर; अशिक्षित.
**निराअी**–*स्त्री*· निंदणी; भांगलणी (तण काढणें.) [ काढणें.
**निराना**–*क्रि· स*· निंदणें, तण
**निरापन–पुन***—*वि*· दुसऱ्याचा.
**निराळा**—*पु*· अेकान्तस्थान. *वि*· १ विलक्षण; अद्भुत. २ अपूर्व; निराळा. [ अुदास; विरक्त.
**निरास–सी***—*वि*·१ निराश. २
**निरीक्षण**–*पु*·.निरीक्षण; देखरेख.
**निरीह**–*वि*· १ अुदासीन; विरक्त. २ शांतिप्रिय. ३ निरिच्छ.
**निरुज**—*वि*· निरोगी.
**निरुवार**–*पु*· १ सुटका; मोकळीक. २ सोडवणूक. ३ निर्णय; निश्चय. ४ निवारण.
**निरुवारना***—*क्रि· अ*· सुटणें; मोकळें होणें (गुंतागुंत).
**निरुवारना***–*क्रि· स*· सोडविणें; मोकळें करणें.
**निरेखना***-*क्रि·स*· निरखून पाहणें; टक लावून पाहणें.
**निरै***–*पु*· नरक.
**निर्ख़**–*पु*· [फा.] भाव; दर. [यादी.
**निर्ख़नामा**—*पु*· वस्तूंच्या दराची

**निर्घोष**—पु. शब्द; आवाज. वि. शब्दरहित.
**निर्जन**—वि. मनुष्यरहित; अेकांत; सामसूम. [मेलेला.
**निर्जीव**—वि. प्राणरहित; जड;
**निर्त***-पु. नृत्य; नाच.
**निर्तक***-पु. नर्तक; नाचणारा.
**निर्तना***-क्रि.अ. नाचणें. [करणें.
**निर्दहना***—क्रि. स. जाळणें; दहन
**निर्देश**—पु. १ आज्ञा; आदेश. २ ठराव. ३ निर्णय. ४ अुल्लेख.
**निर्बंध**—पु. १ प्रतिबंध; अडचण. २ आग्रह; हट्ट.
**निर्भर**—वि. १ परिपूर्ण; भरलेला. २ अवलंबून; आश्रित; आधारित.
**निर्मना***—क्रि. स. निर्माण करणें; बनविणें. [अुपजीविका करणें.
**निर्वहना***—क्रि.अ. निर्वाह करणें;
**निर्वाचक**—पु. मतदार.
**निर्वाचन**—पु. निवडणूक; मतदान.
**निर्वासन**—पु. हद्दपारी.
**निर्वासित**—वि. हद्दपार करण्यांत आलेला. [निःसंशय.
**निर्विवाद्**—वि. भांडण-रहित;
**निलय**—पु. घर; स्थान; जागा.
**निलहा**—वि. नीळवाला; नीळीचा व्यापारी.
**निवाज़**—वि. [फा.] कृपा करणारा.
**निवाडा**—पु. [दे.] लहानशी नाव.
**निवार**—स्त्री. [फा.] नवार.
**निवाला**—पु. [फा.] घांस.
**निवेश**—पु. १पडाव; तळ. २लग्न-घर. ३ प्रवेश.
**निशा**—स्त्री. रात्र.
**निशाखातिर**—स्त्री. [अ. + फा.] खातरजमा; समाधान.
**निशान**—पु. [फा.] १चिह्न; खूण. २ लक्षण. ३ अवशेष. ४ डाग; चट्टा. ५ आंगठा; निशाणी. ६ ठावठिकाण. ७ ध्वजा; पताका.
**निशानदेही**—स्त्री. [फा.] ओळख देणें. (समन्स बजावितांना खूण पटविणें).
**निशाना**—पु. [फा.] नेम; लक्ष्य.
**निशानी**—स्त्री. [फा.] १ स्मारक; स्मृतिचिह्न. २खूण; चिह्न.
**निशि**—स्त्री. रात्र.
**निशीथ**—स्त्री. मध्यरात्र; अर्धी रात्र.
**निश्चय**—पु. निश्चय; निश्चितपणा.
**निश्चित**—वि. नक्की; ठरलेला.
**निषेध**—पु. मनाअी.
**निष्कासन**—पु. हाकलणें; घालविणें.
**निष्कृति**—स्त्री. सुटका.
**निष्प्रेही***—वि. निस्पृह.
**निसंस***—वि. १ दुष्ट. २ मृतप्राय

**निसंसना**—*क्रि. अ.* जोरानें श्वास घेणें; धापा टाकणें.

**निस***-*स्त्री.* रात्र.

**निसक***-*वि.* निःशक्त; दुर्बळ.

**निसत***-*वि.* असत्य.

**निसद्योस***-*क्रि.वि.* रात्रंदिवस.

**निसबत, निस्वत**—*स्त्री.* [*अ.*] १ संबंध. २ तुलना; बरोबरी. ३लग्नासंबंधीं मागणी; साखरपुडा; वाङ्निश्चय. [नसलेला.

**निसयाना**—*वि.* बेहोष; शुद्धीवर

**निसरना***—*क्रि. अ.* बाहेर पडणें.

**निसवादला***- *वि.* स्वादरहित; बेचव.

**निसस***—*वि.* बेशुद्ध; बेहोष.

**निसाँक**—*वि.* निर्भय; निश्चित.

**निसाँस-सा**—*पु.* सुस्कारा. *वि.* मृतप्राय.

**निसानन***—*पु.*१ संध्याकाळ. २चंद्र.

**निसाफ***—*पु.* [*अ.*] न्याय.

**निसार**—*पु.* [*अ.*] समर्पण; बलिदान.

**निसियर***—*पु.* चंद्र.

**निसु***—*स्त्री.* रात्र.

**निसेनी-निसैनी**—*स्त्री.* शिडी.

**निसोग***—*वि.* १ शोकरहित. २ निश्चित.

**निसोधु***—*स्त्री.* बातमी; संदेश.

**निस्फ़**—*वि.* [*अ.*] अर्धा.

**निस्राव**—*पु.* स्राव.

**निःस्व**—*वि.* निःस्वार्थ.

**निहंग***—*वि.* एकाकी.

**निहंग-लाड़ला**—*वि.* [ ? ] अतिशय लाडावलेला.

**निहकाम***—*वि.* निष्काम.

**निहचय***—*वि.* निश्चय; बेत.

**निहचल***—*वि.* निश्चल; स्थिर.

**निहत्थ-निहत्था**—*वि.* १ निःशस्त्र. २ कंगाल.

**निहपाप***—*वि.* निष्पाप.

**निहफल***—*वि.* निष्फळ.

**निहाँ**—*वि.* [ फा. ] गुप्त.

**निहाई**—*स्त्री.* आवरण.

**निहायत**—*वि.* [ *अ.* ] अत्यंत; पुष्कळ. *स्त्री.* हद्द; सीमा.

**निहार**—*पु.* १ धुकें. २ दंव. ३ बर्फ.

**निहारना**—*क्रि. स.* निरखणें; लक्ष लावून पाहणें.

**निहाल**—*वि.* [ फा. ] १ प्रसन्न; आनंदित. २ संतुष्ट; तृप्त.

**निहाली**-*स्त्री.* [ फा. ] १ उशी; लोड. २ लेप; रजई.

**निहित**—*वि.* ठेवलेला; स्थापिलेला.

**निहोरना**—*क्रि. स.* १ प्रार्थना करणें; विनंति करणें. २ विनवणें; आर्जविणें.

**निहोरा**—*पु.* १ कृतज्ञता; उपकार.

२ विनंती. ३ विश्वास. ४ आश्रय. ५ प्रार्थना; विनवणी.

**नींद्**–*स्त्री*· झोंप; निद्रा. (मु.) **नींद् खुलना**–जाग येणें. **नींद् खुलना या अुचटना**–झोंपमोड होणें; जागें होणें. **नींद् पडना**–झोंप येणें; **नींद् हराम होना**–झोंप मुळींच न येणें.

**नींद्डी***—*स्त्री*· निद्रा; झोंप.

**नींव**—*स्त्री*· पाहा ' नीवँ '

**नीक-का**–*वि*· १ सुंदर; चांगला. २ प्रामाणिक; भला. **नीकी**–*स्त्री*· चांगुलपणा; भलाअी.

**नीके**—*क्रि· वि*· चांगल्या रीतीनें.

**नीचा**—*वि*· १ खालचा. २ वांकलेला; झुकलेला. ३ क्षुद्र; नीच; कमी दर्जाचा.(मु.) **नीचा–अूँचा**–१ अुंचसखल. २ ओवडधोबड. भलाबुरा. ४ नफातोटा. **नीचा दिखाना**–तुच्छ लेखणें; मानभंग करणें; हरविणें. **नीचाअी**–*स्त्री*· कमीपणा.

**नीचू***–*क्रि· वि*· खालीं.

**नीचे**–*क्रि· वि*· खालीं; तळाशीं. **नीचे अूपर**–१ खालींवर. २ अुलथापालथा.

**नीजन***–*पु*· निर्जन; ओसाड.

**नीझर**—*पु*· झरा.

**नीठी***–*क्रि.वि*·अनिच्छेनें; कसेंतरी.

**नीठो***–*वि*· अप्रिय; अनिष्ट.

**नीड**—*पु*· पक्ष्याचें घरटें.

**नीति**–*स्त्री*· १ आचार; पद्धत. २ सदाचार; नीति. ३ धोरण. ४ युक्ति; अुपाय; हिकमत.

**नीबू**—*पु*· लिंबू.

**नीम**—*पु*· लिंबाचें झाड; कडुलिंब.

**नीम**—*वि*· [फा.] अर्धा.

**नीमन**—*वि*· चांगला; निरोगी.

**नीमरज़ा**—*वि*· [फ़ा.] कांहींसा संतुष्ट; अर्धसंतुष्ट.

**नीमास्तीन**—*स्त्री*· [फा.] अर्ध्या बाह्यांचा अंगरखा; कोपरी.

**नीयत**—*स्त्री*· [अ.] १ अिरादा; अिच्छा. २ अुद्देश; हेतु. (मु.) **नीयत बदलना** किंवा **बदल जाना**–अिरादा बदलणें. **नीयतमें फ़रक़ आना**–मनांत काळेंबेरें येणें; बेअिमानी सुचणें. **नीयत बांधना**–संकल्प करणें; निश्चय करणें.

**नीर**—*पु*· पाणी; तीर्थ.

**नीरद**—*पु*· ढग.

**नीरव**–*वि*· शांत; आवाजरहित.

**नीरे***–*क्रि· वि*· जवळ; निकट.

**नीरोग**—*वि*· निरोगी.

**नीलम**–*पु*· अिंद्रनीलमणि; नीलकांतमणि

**नीला**–*वि*· निळा.

**नीलाम**–पु. [पोर्तु. ] लिलांव.
**नीलोफर**—पु. [फा. ] नील कमल.
**नीवँ–व**—स्त्री. १ पाया ( घराच्या अिमारतीचा.) २ मूळ आधार. ३ स्थापना.(मु.) **नीवँ डालना**–पाया घालणें; स्थापन करणें. **नीवँ पड़ना**–पाया घातला जाणें.
**नुक़ता**–पु.[अ.]अनुस्वार;टिंब;बिंदु. (यौ.) **नुक़ताअे नज़र**–दृष्टिकोण; दृष्टिबिंदु. **नुक़ताचीं**—दोष काढणारा.
**नुक़ताचीनी**–स्त्री. [फा. ] टीका; छिद्रान्वेषण.
**नुक़तादाँ**–स्त्री. [फा.] १ मर्मज्ञ. २ हुशार; बुद्धिमान्. [ (पक्कान्न)
**नुकती**—स्त्री. [फा. ] मोतीचूर.
**नुक़सान**–पु. [अ.] नुकसान; हानि; तोटा.
**नुक़सान देह**–वि.[अ.]हानिकारक.
**नुकाना**–क्रि. स. लपविणें.
**नुकीला**–वि. [फा.] अणकुचीदार.
**नुक्कड़**–पु. [फा.] १ टोंक; अग्र. २ शेवट. ३ कोंपरा.
**नुक्ता**–पु. [अ.] पाहा 'नुकता'
**नुक्स**–पु. [अ. ] १ दोष; कसर; त्रुटि. २ अुणीव; अपूर्णता.
**नुचना**–क्रि. अ. अुपटलें जाणें; ओरखडलें जाणें.
**नुचवाना**–क्रि.स.अुपटून काढविणें; ओरबडून काढणें.
**नुनाअी***–स्त्री. लावण्य; सौंदर्य.
**नुनेरा**–पु. मीठ बनविणारा.
**नुमा**–वि. [फा.] १ दिसणारा. २ दाखविणारा. ३ समान; सदृश.
**नुमाअिश**–स्त्री. [फा.] १दिखाअूपणा;थाटमाट;डामडौल.२प्रदर्शन.
**नुमाअिशी**–वि.दिखाअू ; बेगडी.
**नुमायन्दा**–पु. [ फा. ] प्रतिनिधि.
**नुमायाँ**–वि. [फा.] स्पष्ट झालेला; प्रकट; अुघड.
**नुसख़ा**—पु. [ अ. ] वैद्य किंवा डॉक्टरांचें प्रिस्क्रिप्शन.
**नून***–वि. कमी; अपुरें; थोडेसें.
**नून**–पु. मीठ. [ शोभा; सौंदर्य.
**नूर**–पु. [ अ.] १ तेज; प्रकाश. २
**नेक***–वि. थोडा; किंचित्.
**नेक**–वि. [फा.] १ चांगला; भला. २ शिष्ट; सज्जन. ३ प्रामाणिक.
**नेकचलन**-वि. [फा+सं.]सद्वर्तनी; सदाचारी. [ गळाटी.
**नेकटाअी**–स्त्री. [ अिं. ] नेकटाय;
**नेकनाम**—वि. [ फा. ] चांगली कीर्ति असलेला; सुप्रसिद्ध.
**नेकनीयत**–वि. [फा. + अ.] सद्विचारी; प्रामाणिक. [प्रामाणिकपणा.
**नेकी**–स्त्री. [फा.] १ चांगुलपणा. २

**नेग**–पु. संभावना; अहेर.
**नेगटी***–पु. अहेर देणारा किंवा संभावना करणारा.
**नेज़ा–नेज़ाल**–पु. [फा.] भाला.
**नेज़ाबरदार**–पु. [फा.] भाला किंवा झेंडा घेऊन चालणारा.
**नेटा**–पु. [दे.] १ शेंबूड. २ मेकूड.
**नेठना***–क्रि. अ. १ नष्ट करणें. २ नाकबूल करणें.
**नेडे**–क्रि. वि. निकट.
**नेति**–स्त्री. धुमळखांबाची दोरी.
**नेनुआ**–पु. [दे.] घोसाळें.
**नेपथ्य**–पु. वेशभूषा; शृंगारगृह; नाटकाच्या पडद्याच्या मागील भाग.
**नेफ़ा**–पु. [फा.] नाडा ओंवण्याची पोकळी.
**नेब–व**–पु. [फा.] १ साहाय्यक; मदतनीस. २ मंत्री; चिटणीस.
**नेमत**–स्त्री. पाहा 'नियामत'.
**नेवग***–पु. [दे.] संभावना; अहेर.
**नेवता***–पु. आमंत्रण; बोलावणें.
**नेवर**–पु. १ वाळे; नूपुर. २ मुंगूस. –स्त्री. जखम; घोड्याच्या पायाची जखम.
**नेवला**–पु. मुंगूस.
**नेवारना***–क्रि. स. निवारणें; निवारण करणें.
**नेसुक, नैसुक***–वि. थोडा; किंचित्.
**नेस्त**–वि. [फा] नसलेला. (यौ)
**नेस्तनाबूद**–नष्टभ्रष्ट; नेस्तनाबूत.
**नेह; नेहरा***–पु. स्नेह; प्रेम. वि. स्निग्ध.
**नेही***–वि. स्नेही.
**नै**–स्त्री. १ नदी.
**नै**–स्त्री. १ नीति. २ आचारविचार.
**नैर्ऋत***–पु. १ दक्षिण-पश्चिम दिशा. २ राक्षस.
**नैक–कु**–वि. [फा.] चांगला; भला; प्रामाणिक.
**नैचा**–पु. [फा.] हुक्क्याची नळी.
**नैन***–पु. नयन; डोळा.
**नैनसुख**–पु. अेक प्रकारचें तलम कापड.
**नैनू**–पु. लोणी.
**नैया**–स्त्री. नाव; होडी; नौका.
**नैरंग**–पु. [फा.] १ कपट. २ जादू-टोणा. ३ चमत्कारिक गोष्ट. ४ चित्राची रूपरेषा; आराखडा.
**नैसा***–वि. कुरूप; वाईट.
**नैहर**–पु. माहेर.
**नोक**–स्त्री. [फा.] टोंक; अग्र; अणकुची. **नोकदार, नुकीला**·वि. अणकुचीदार; निमुळता; टोंकदार.
**नोकझोंक** स्त्री. [फा.] थाटमाट; डामडौल.
**नोखा**–वि. १ अनोळखी. २ अद्‌भुत.
**नोच**–स्त्री. ओरखडा; बोचकारा.
**नोचखसोट**–स्त्री. हिसकाहिसकी; ओढाताण; जबरदस्तीनें हिसकावणें.
**नोचना**–क्रि. स. १ अुपटणें. २

ओरखडणें; बोचकारणें. ३ हिस-
कावून घेणें. [(चलन). २ टिप्पण.
**नोट**–पु· [अिं.] १ कागदी नोट
**नोन**–पु· मीठ. [२ अंबोशी.
**नोनचा**–पु· [दे.+फा.] १ लोणचें.
**नोनछी**–स्त्री· [दे.] खारट माती.
**नोना**–पु· १ लोणा. २ खारी
माती. ३ सीताफळ. *वि·* १ खारट.
२ सुंदर. **नोनिया**–पु· लोणारी;
मीठ विकणारा; खाऱ्या.
**नोर–ल**–*वि·* १ नवीन; २ सुंदर.
**नौ**–*वि·* नअू. (मु.) **नौ दो ग्यारह
होना**–पसार होणें.
**नोकर**–पु·[फा.]नोकर. **नौकरानी**–
*स्त्री·* मोलकरीण.
**नौकरशाही**-*स्त्री*·[फा.] नोकरशाही;
सरकारी नोकरांचें राज्य. **नौकरी**–
*स्त्री·* नोकरी. [न होवो.
**नौज**–अव्य. अीश्वर न करो; असें
**नौजवान**–*वि·* [फा.] तरुण.
**नौजवानी**–*स्त्री·* तारुण्य. [मेवा.
**नौजा**–*स्त्री·* [फा.] चिलगोजा; सुका
**नौतन***–*वि·* नवीन; नवा.
**नौतम***–*वि·* नवीन.
**नौदसी**–*स्त्री·* [दे.] जमीनदारा-
कडून नअू रुपये कर्जाअू घेऊन
सालअखेर दहा रुपये परत देण्याची
प्रथा.

**नौधा***–*वि·* नवविधा भक्ति.
**नौनिहाल**–पु· [फा.] १ कोंवळें
रोप. २ तरुण; नवयुवक.
**नौबढ**—*वि·* नुक्ताच अुदयास
आलेला.
**नौबत**—*स्त्री·* [फा.] १ प्रसंग;
पाळी. २ स्थिति; दशा. ३
नगारा; चौघडा.
**नौबती**—पु· [फा.] १ नौबत
वाजविणारा. २ पहारेकरी. ३
मोठा तंबू; शामियाना.
**नौरंग***—पु· [फा.] औरंगजेब.
**नौरतन**—पु· नवरत्न.
**नौरोज़**—पु· [फा.] पारशांचा
वर्षारंभाचा दिवस.
**नौलखा***—*वि·* नअू लाख किंम-
तीचा; बहुमोल. [आरमार.
**नौशक्ति**—*स्त्री·* नाविक शक्ति;
**नौशा**—पु· [फा.] नवरदेव.
**नौसत***—पु· सोळा शृंगार.
**नौसादर**—पु· [फा.] नवसागर.
**नौसाली**–*वि·* मअू; गुळगुळीत.
**नौसिखिया-खुआ**–*वि·* नवशिक्या.
**नौसेना**—*स्त्री·* आरमार.
**नौहड**—पु· मातीचें नवें मडकें.
**न्याति**—*स्त्री·* ज्ञाति; जात.
**न्यारा**—*वि·* १ जवळ नसलेला.

२ वेगळा; दुसरा; निराळा. ३ अद्भुत.
**न्यारिया**—पु. झारेकरी; सोनाराच्या राखेंतून सोनें काढणारा.
**न्यारे**–क्रि. वि. १ निराळे; वेगळे. २ दूर. [अुचित गोष्ट. ३ नियम.
**न्याव-न्याय***—पु. १ न्याय. २.
**न्यास**-पु. १ स्थापना. २ समर्पण; त्याग. ३ ठेव; अनामत. ४ संन्यास.
**न्योछावर**–स्त्री. अर्पण; बलिदान.
**न्योतना**—क्रि. स. आमंत्रण देणें.
**न्योता**–पु. निमंत्रण.
**न्हाना***—क्रि. अ. स्नान करणें; आंघोळ करणें.

## प

**पंक**—पु. चिखल.
**पंकज**—कमळ.
**पंक्ति**-स्त्री. १ ओळ. २ पंगत.
**पंख**—पु. पंख. [पाकळी.
**पँखडी, पँखुडी**—स्त्री. फुलाची
**पंखा**—पु. पंखा. [नोकर.
**पंखाकुली** –पु. पंखा हालविणारा
**पंखापोश**—पु. [सं. + फा.] पंख्याची खोळ.
**पंखेरू**—पु. पक्षी. [२ निरुपयोगी.
**पंगा**—वि. १ पांगळा; लंगडा.
**पंच**—पु. १ पांच (संख्या). २ समाज; समुदाय. ३ लोक. ४ पंच; निवाडा देणारा.
**पंचत्व**—पु. मृत्यु; मरण.
**पंछा**—पु. १ जखमेची लस. २ झाडाचा चीक.
**पंछी**—पु. पक्षी. [सापळा.
**पंजर**—पु. १ पिंजरा. २ हाडांचा
**पंजा**—पु. [फा.] १ हाताचा पंजा २ पांचाचा गट. ३ पंजा. (पत्त्यांतील.) (मु.) **छक्कापंजा**–डावपेंच.
**पंजारा**– पु. पिंजारी.
**पँजीरी**—स्त्री. खिरापत (कणीक साखर मिसळून.) [करणारा.
**पँजेरा**—पु. तांबट; भांडीं तयार
**पँडवा**—पु. [?] रेडकूं.
**पंडा**–पु. पुजारी; पंड्या.
**पंडाल**—पु. [दे.] सभेच्या अधिवेशनासाठीं तयार केलेला मंडप.
**पंडिताअी**–स्त्री. विद्वत्ता; पांडित्य.
**पंडिताअू**—वि. १ पंडितासारखें. २ विद्वत्ताप्रचुर.
**पंडितानी**—स्त्री. पंडिता स्त्री.
**पंडुक**–पु. मैनेसारखा अेक पक्षी.
**पँतीजना**–क्रि. स. पिंजणें. **पँतीजी** स्त्री. धनुकली; पिंजण. [प्रवासी.

**पंथकी, पंथिक***--पु. पथिक; **पंथान***-मार्ग; रस्ता.

**पंद**-स्त्री. [फा.] शिकवण.

**पँवरना**-क्रि. अ. १ पोहणें. २ ठाव घेणें; पत्ता काढणें.

**पँवरि-री**-स्त्री. दरवाजा; फाटक.

**पँवरिया**-पु. १ पहारेकरी; चौकीदार. २ मंगलाष्टकें अि. (मंगल प्रसंगीं) म्हणणारा. [२ पोवाडा.

**पँवाडा**-पु. १ पाल्हाळ; चऱ्हाट.

**पंशाखा**-स्त्री. मशाल.

**पंसारी**-पु. गंधी; काष्ठौषधें व सुगंधी पदार्थ विकणारा.

**पंसेरी**-स्त्री. पांसरी; पांचशेरी माप.

**पअिसना**-क्रि. अ. शिरणें; प्रवेश करणें. **पअिसार**-पु. प्रवेश.

**पअुँरि-अुरी,-पौरी**-स्त्री. १देवडी. २ पायरी.

**पअुँरी-अुरी**—स्त्री. खडावा.

**पकड-धकड**—स्त्री. धरपकड.

**पकडना**—क्रि. स. १ पकडणें; धरणें. २ कैद करणें. ३ थांबविणें.

**पकडवाना**—क्रि. स. पकडविणें; पकडून देणें.

**पकडाना**-क्रि. अ. हातांत देणें.

**पकना**-क्रि. अ. १ पिकणें. २शिजणें.

**पकवान**-पु. पक्वान्न.

**पकवाना, पकाना**—क्रि. स. १ पिकविणें; पिकवून घेणें. २ शिजवून घेणें. **पकाअी**-१ पिकविण्याची मजुरी. २ पिकविण्याचें काम. [**पकौडी**-स्त्री.

**पकौडा**-पु. १ भजें. २ वडा.

**पक्का**-वि. १ पिकलेला; तयार झालेला. २ पूर्ण; पक्का. ३ निपुण. तज्ज्ञ. ४ दृढ; मजबूत; टिकाअू. ५ स्थिर; निश्चल. ६ संवय असलेला; रुळलेला. ७ प्रौढ. ८ शिजलेला. (मु) **पक्का खाना अथवा पक्की रसोअी**-तुपांतून तळलेले पदार्थ; पाण्यांत न शिजविलेले.

**पक्खर, पाखर***-स्त्री. लढाओचे प्रसंगीं हत्ती किंवा घोडे यांचे अंगावर घालावयाची लोखंडी झूल.

**पक्ष**-पु. १ पक्ष; बाजू. २ पंख. (यौ.) **पक्षपात**— तरफदारी. **पक्षाघात**-अर्धांगवायु.

**पखंडी**-पु. १ पाखंडी. २ गारुडी.

**पख**-पु. पक्ष; पंधरवडा.

**पख**-स्त्री. [फा.] १ विष्ठा; मल. २ आरडाओरड. ३ असभ्य भाषण; दुर्वचन. ४ अडचण.

**पखडी**-स्त्री. पाकळी; पुष्पदल.

**पखराना**-क्रि. स. धुवून घेणें.

**पखवाडा-वारा**-पु. पंधरवडा.

**पखान, पाखान***-पु. पाषाण; दगड.

**पखाना, पाखाना**–पु· [ फा. ] १ शौचकूप; संडास. २ विष्ठा; मैला.

**पखाना**–पु· म्हण.

**पखारना**–क्रि·स·धुणें; स्वच्छ करणें.

**पखावज**—स्त्री· पखवाज; मृदंग. **पखावजी**–पु· पखवाज वाजविणारा.

**पखी, पखीरी***–पु· पक्षी.

**पखुरी**—स्त्री· पाकळी.

**पखेरु**–पु· पांखरूं; पक्षी.

**पखतून**-वि· [ पश्तो ] पश्तो भाषा बोलणारा; पठाण.

**पग***-पु १ पाय. २ दोन पावलांमधील अंतर; पाऊल.

**पगडंडी**–स्त्री· पाऊलवाट; पायवाट.

**पगतरी, पगनियाँ**–स्त्री· पादत्राण; जोडा.

**पगदासी**–स्त्री· १जोडा. २ खडाऊ.

**पगना**—क्रि· अ· १ आंतूनबाहेरून पाकानें भरणें. २ प्रेमांत रंगून जाणें. ३ मुरणें.

**पगल्ला**—पु· वेडा.

**पगहा, पघा**—पु· दावें; दोर. **पगहिआँ**–स्त्री· दावें; दोर.

**पगुसना**–क्रि· अ· १ रवंथ करणें. २ पचविणें.

**पचकना**–क्रि· अ· पिचणें; दबणें.

**पगा**–पु· अुपरणें.

**पगा***–वि· तल्लीन; अनुरक्त.

**पगाना**—क्रि· स· १ पाकवून घेणें. २ प्रेममग्न करणें.

**पगार***–पु· आवाराची भिंत.

**पगार**—पु· १ पाण्याचा अुतार. २ चिखल. [ मुहूर्त.

**पगाह**—स्त्री· [फा.] पहाट; ब्राह्म-

**पगिया***–स्त्री· पगडी. [ पचविणें.

**पगुराना**–क्रि·स·१ रवंथ करणें. २

**पचकल्यान**— पु· पंचकल्याणी घोडा ( ज्याचे चार पाय व डोकें पांढरें असून बाकी अंग तांबडें किंवा काळें असतें असा घोडा ).

**पचखा**—पु· पंचक; पांचांचा गट.

**पचगुना**–वि· पांचपट. [२लावणी.

**पचडा**–पु· १बखेडा; लचांड; व्याप.

**पचना**—क्रि·अ·१ पचणें. २ दुसऱ्याचें धन किंवा वस्तु आपली होणें; पचनीं पडणें. ३ अतिशय थकणें. ४ झिजणें

**पचमेल**—वि· १ पांच प्रकारच्या वस्तूंची मिसळ. २ अनेक वस्तूंचें मिश्रण.

**पचलोना** — पु· पांच प्रकारच्या मिठांनीं युक्त असलेला पदार्थ.

**पचहरा**—वि· १ पांच थर असलेला. २ पांच वेळां केलेला.

**पचाना**—क्रि· स· १ पचविणें. २

दुसऱ्याचें धन किंवा वस्तु लुबाडणें.

**पचारना**—*क्रि.स.* १ आव्हान देणें. २ मोठ्यानें ओरडणें.

**पचास**—*वि.* पन्नास ( संख्या ). **पचासा**-*पु.* अेकाच तऱ्हेच्या पन्नास वस्तूंचा समूह.

**पचीस**—*वि.* पंचवीस ( संख्या ).

**पचीसी**-*स्त्री.* १ अेकाच तऱ्हेच्या पंचवीस वस्तूंचा समूह. २ पंचविशी ( आयुष्य ). ३ सोंगट्यांचा खेळ.

**पचोतरसो**-*पु.* अेकशें पांचांचा गट.

**पचौर, पचौली**—*पु.* गांवचा पुढारी; पंच.

**पच्चड; पच्चर**—*पु.* पाचर.

**पच्ची**-*स्त्री.* जडावाचें काम. **पच्चीकारी**-*स्त्री.* जडावाची कला. (मु.) ( किसी में ) **पच्ची हो जाना**-अेकजीव होणें.

**पच्छ**-*पु.* १ पंख. २ पक्ष; पंधरवडा.

**पच्छिम**—*पु.* पश्चिम दिशा.

**पच्छी**-*पु.* पक्षी.

**पछडना**—*क्रि. अ.* १ चीत होणें. २ मागें राहणें; रेंगाळणें.

**पट**-*पु.* १ वस्त्र; कापड. २ पडदा. ३ चित्रपट. ४ पापणी. ५ पालथा. *क्रि. वि.* झटकन्; तावडतोब.

**पछताना**-*क्रि. वि.* पश्चात्ताप करणें.

**पछतावा**—*पु.* पश्चात्ताप.

**पछना**-*क्रि. अ.* १ गोंदलें जाणें. २ थोडेंसें चिरलें जाणें. *पु.* गोंदण्याचें किंवा चिरण्याचें शस्त्र.

**पछलना**—*पु.* मागें वळणें; हटणें; माघार घेणें.

**पछवाँ, पछहिया**-*वि.* पश्चिमेकडील.

**पछाँह**—*पु.* पश्चिमेकडील प्रदेश. **पछाँहिया, पछाँही**-*वि.* पश्चिमेकडील. [ २ बेशुद्धी; मूर्च्छा.

**पछाड**—*स्त्री.* १ आपटी; हापटी.

**पछाडना**-*क्रि. स.* आपटणें; चीत करणें.

**पछानना***-*क्रि. स.* ओळखणें.

**पछिआना**-*क्रि.स.* मागोमाग जाणें.

**पछुवाँ**-*वि.* पश्चिमेकडचा ( वारा ).

**पछोडना**-*क्रि. स.* पाखडणें; साफ करणें ( सुपांत घालून ).

**पजरना***-*क्रि. अ.* जळणें; पेटणें.

**पजारना** -*क्रि.स.* जाळणें; पेटविणें.

**पजावा**—*पु.* [ फा. ] विटा भाजण्याची भट्टी; आवा.

**पज्ज**—*पु.* शूद्र.

**पटंबर** —*पु.* रेशमी कापड.

**पटकन** -*स्त्री.* १ आपटी; हापटी. २ थप्पड. ३ छडी; काठी.

**पटकना**-*क्रि. स.* आपटणें; पाडणें; चीत करणें. **पटकनिया, पटकनी**—*स्त्री.* आपटी; हापटी.

**पटडा**-पु. पेळू बनविण्याचा पाट; लांकडाचा तक्ता.

**पटतर***—पु. १ बरोबरी; साम्य. २ उपमा. *वि.* चौरस; सपाट.

**पटतरना**—*क्रि. अ.* उपमा देणें.

**पटतारना**—*क्रि. स.* जमीन सपाट करणें.

**पटना**—*क्रि. अ.* १ जमीन सपाट होणें. २ पाटणी होणें; कडीपाट होणें. ३ आपसांत पटणें; जमणें.

**पटनी**—*स्त्री.* कायम भाडेपट्टयानें घेतलेली जमीन.

**पटपटाना**—*क्रि. अ.* भूक, तहान, थंडी इ.मुळें त्रासणें. *क्रि. अ.* शोक करणें; दुःख करणें.

**पटपर**—*वि.* सपाट; समतल. पु. १मळीची जमीन. २उजाड स्थान.

**पटबीजना**—पु. काजवा.

**पटमंडप**—पु. तंबू; राहुटी; डेरा.

**पटरा**–पु. लांकडाची लांबरुंद फळी; तक्ता. (मु.) **पटरा कर देना**–जमीनदोस्त करणें; उध्वस्त करणें.

**पटरानी**–*स्त्री.*पट्टराणी.

**पटरी**–*स्त्री.* १ लांकडाची पातळ व लांब फळी; तक्ती. २ जरीची फीत किंवा कांठ. ३ एक प्रकारची बांगडी. ४ पायवाट (सडकेच्या बाजूची).५ बगीच्यांतील फुलझाडांच्या आजूबाजूचा लहान रस्ता. ६ आगगाडीचा रूळ.

**पटल**–पु.१ छप्पर;छत. २ आवरण; पडदा. ३ डोळयाची पापणी.

**पटवा**–पु. १ पटवेकरी; पाटोळी २ एक प्रकारचा तलम ताग.

**पटवाना**–*क्रि. स.* १ जमीन सपाट करवून घेणें. २ छत बनवून घेणें.

**पटवारगरी**–*स्त्री.* [*सं.* + फा.] कुळकर्ण्याचें किंवा तलाठ्याचें काम किंवा हुद्दा. [चढविणारी दासी.

**पटवारी**–पु. कुळकर्णी. *स्त्री.* कपडे

**पटवास**–पु. तंबू; शिबिर.

**पटसन**–पु. १ तागाचें झाड; ज्यूट. २ तागाचे दोरे.

**पटहार**–पु. पटवेकरी.

**पटा**–पु.पट्टा (दांडपट्टा). २ थप्पड.

**पटाई**—*स्त्री.* जमीन सपाट करण्याचें काम किंवा त्याची मजुरी.

**पटाका**–पु. [अनु.] १ आपटबार; फटाका. २ थप्पड.

**पटाना**–*क्रि. स.* १ जमीन सपाट करविणें. २ पाटणी किंवा छत बनविणें. ३ कर्ज फेडणें. ४ भाव ठरविणें.

**पटाव**–पु. १ सपाट किंवा सारखें करण्याचें काम. २ सपाट किंवा सारखी जागा. ३ पाटणी.

**पटिया**–स्त्री· १ पाटी (लिहिण्याची). २ दगडाचा चौकोनी तुकडा. ३ वाजेचें लांकूड.

**पटी**–स्त्री· १ कापडाची लांब पट्टी. २ पटका; कंबरबंद. ३ नाटकाचा पडदा.

**पटीर**–पु· १ अेक प्रकारचें चंदन. २ खैराचें झाड. ३ वटवृक्ष.

**पटीलना**–क्रि· अ· १ अेखाद्याला आपल्या बाजूचें करून घेणें. २ कमविणें. ३ टकविणें. ४ सफलतापूर्वक अेखादें काम संपविणें.

**पटुका-टूका**–पु·१·अुपरणें. २शेला. ३ चादर.

**पटुली**–स्त्री· लहान झोंपाळा.

**पटेवाज़**–पु· [सं· + फा.] १ पट्टा खेळणारा; पट्टा चालविण्यांत निपुण. २ धूर्त.

**पटेर**–पु· लव्हाळा.

**पटेला**—पु· बसण्याकरितां मधला भाग सारखा केलेली अशी मोठी वाहतुकीची नाव.

**पटोर-ल**—पु· १ तोंडल्यासारखें भाजीचें फळ; पडवळ. २ अेक प्रकारचें रेशमी कापड.

**पटोरी**–स्त्री· रेशमी साडी.

**पट्ट**—पु· १ पाटी ( लिहिण्याची ). २ ढाल. ३ अुपरणें; दुपट्टा. ४ राजसिंहासन. ५ रेशमी कापड.

**पट्टा**–पु· १ पट्टा; जमिनीच्या मालकीचें अधिकारपत्रक. २ पट्टा; ( गळयाचा, कमरेचा ) ३ पाट. ४ बिल्ला. ५ पट्टा ( शस्त्र ).

**पट्टी**—स्त्री· १ फूटपट्टी. २ अुपदेश; सल्ला. ३ वस्त्राची किनार; कांठ. ४ लांकडाचा वांसा. ५ लिहिण्याची पाटी. ६ फूस. ७ कापडाची चिंधी. ८ कागदाचें चिटोरें. ९ संपत्तीचा हिस्सा.

**पट्टीदार**–पु· [सं· + फा.] पातीदार.

**पट्टीदारी**–स्त्री· १ पाती; भागीदारी. २ वांटप होअू शकत नाहीं अशी जमीन. [काश्मीरी पट्टू.

**पट्टू**—पु·अेक प्रकारचें गरम कापड;

**पट्ठा**—पु· १ लांब, जाड पान. २ स्नायु. ३ शरीरांतील जाड शीर. ४ जवान; तरुण माणूस. ५ कुस्ती खेळणारा पहिलवान.

**पठनेटा**—पु· [पश्तो] पठाणाचा मुलगा. [पाठावेणें.

**पठवाना**—क्रि· स· दुसऱ्याकडून

**पठान**—पु· [पश्तो] पठाण; अफगाण; काबुली.

**पठाना***–क्रि·स· पाठविणें.

**पठावनि-नी**—स्त्री· रवानगी; बोळवण; पाठवणी.

**पठिया**–*स्त्री·* तरुणबांड *स्त्री·*

**पठछाति–त्ती**·*स्त्री·* १ वळचण; छप्पर. २ माळा ( सामान ठेवण्याचा ).

**पडता**–*पु·* वस्तूची मूळ किंमत.

**पडताल**—*स्त्री·* १ सूक्ष्म निरीक्षण; तपासणी. २ पडताळा. ३ पीक पाहणी ( तलाठी किंवा कुलकर्णी यांजकडून ).

**पडतालना**—*क्रि· स·* १ तपासणें. २ पडताळून पाहणें.

**पडती**—*स्त्री·* पडीत जमीन. ( मु. ) **पडती अुठाना**–पडीत जमीन नांगरून सुपीक करणें. **पडती छोडना**–जमीन पाडून ठेवणें; जमीन न नांगरतां मोकळी ठेवणें.

**पडना**—*क्रि·अ·* १ पडणें; कोसळणें. २ येअून ठेपणें. ३ पसरलें जाणें. ४ दाखल होणें. ५ हस्तक्षेप करणें. ६ विश्रांति घेणें; आराम करणें.

**पडपोता**–*पु·* पणतू.

**पडवा–पड्‌िवा**–*स्त्री·* पाडवा; प्रतिपदा. [ मुक्कामाची जागा.

**पडाव**–*पु·* १ मुक्काम; तळ. २

**पडिया**–*स्त्री·* [ दे. ] पारडी; रेडी.

**पडोस**—*पु·* शेजार. **पडोसी**—*पु·* शेजारी. (मु.) **पडोस करना**–शेजारीं येऊन राहणें. (यौ.) **पास पडोस**–शेजार.

**पढंत**–*स्त्री·* अभ्यास. **पढंता**–*वि·* अभ्यासू.

**पढना**–*क्रि· स·* १ शिकणें. २ वाचणें. ३ अुच्चारण करणें. ४ घोकणें. ( यौ. ) **पढालिखा**–शिक्षित.

**पढवाना**—*क्रि· स·* दुसऱ्याकडून शिक्षण देवविणें.

**पढाअी**–*स्त्री·* विद्याभ्यास; अध्ययन.

**पढाअी**–*स्त्री·* १ शिकविण्याचें काम; अध्यापन. २ शिकविण्याची कला.

**पढाना**—*क्रि· स·* १ शिकविणें. २ बोलावयास शिकविणें (पक्ष्यास). ३ समजाविणें.

**पतंग**–*पु·* १ पक्षी. २ पतंग; वावडी. ३ पतंग ( दिव्यावर अुडणारा. ) ४ सूर्य.

**पतंगबाज़**—*पु·* [ सं.+फा. ] पतंग अुडविण्याचा शौकी.

**पतंग–पतंगा**–*पु·* पतंग ( किडा ).

**पतझड**–*स्त्री·* शिशिर ऋतु; झाडाचीं पानें झडण्याचा काळ.

**पतपानी**–*पु·* १ प्रतिष्ठा; मान. २ अब्रू; लज्जा. [ पर्ण

**पतर***·*वि·* १ दुर्बळ; कृश. २ पानें;

**पतरा–ला**–*वि·* १ पातळ. २ किडकिडीत; सडपातळ. ३ अशक्त; कमजोर. ( मु. ) **पतला पडना**–दुर्दशा होणें. **पतलापन**–*पु·* किड-

क्रिडीतपणा. **पतला हाल**–वाईट स्थिति; दुर्दशा.
**पतलून**–पु. [ अं ] पाटलोण.
**पतलो**––स्त्री. [ दे. ] छप्पर बनविण्यास लागणारें गवत.
**पतवार–री**––स्त्री. सुकाणूं.
**पता**––पु. [फा.]१ पत्ता; ठिकाण. २ शोध; तपास. ३ जाणीव; माहिती. ४ रहस्य. [ ढीग.
**पताओ**–स्त्री. झडलेल्या पानांचा
**पताका**–स्त्री. झेंडा; निशाण. (मु.) **पताका खडी करना (बाँधना)** १ विजयी होणें. २ दहशत बसविणें. [ जंगल.
**पतार***––पु. १ पाताळ. २ दाट
**पतिआना–याना**–क्रि. स. विश्वास टाकणें **पतिआर**–पु. विश्वास.
**पतिदेवा**–स्त्री. पतिव्रता स्त्री.
**पतीजना, पतीनना***––क्रि. स. विश्वास टेवणें; खरें मानणें.
**पतीर**–स्त्री. पंक्ति; ओळ; रांग.
**पतीला**–पु. [ फा. ] पातेलें.
**पतीली**––स्त्री. १ पितळ किंवा तांब्याचा गुंड. २ पातेलें.
**पतुकी***–स्त्री. मडकें.
**पतुरिया**–स्त्री. वेश्या.
**पतुली**–स्त्री. [दे.] पाटली (दागिना).
**पतुही**–स्त्री. [ दे. ] कोंवळी शेंग.
**पतोखा**–पु. पानाचा द्रोण.
**पतोह–हू**–स्त्री. सून; पुत्रवधू.
**पत्तल**–स्त्री. १ पत्रावळ. २ एका माणसास पुरेल इतकें अन्न. ३ पानांत वाढलेलें अन्न. (मु ) **एक पत्तल में खानेवाले**–एकमेकांत रोटीबेटी व्यवहार करणारे.
**पत्ता**–पु. पान; पर्ण.
**पत्ती**–स्त्री. १ लहान पान. २ पाती; हिस्सा. ३ पाकळी. ४ भांग.
**पत्तीदार**–पु. [ सं. + फा. ] पातीदार; भागीदार.
**पत्थर**–पु. दगड. (मु.) **पत्थर की लकीर**–वज्रलेप; दगडावरची रेघ. **पत्थर का कलेजा**–कठोर हृदय. **पत्थर चटाना**–धार लावणें. **पत्थर पर दूब जमना**–अशक्य गोष्ट होणें.
**पत्थरफूल**–पु. दगडफूल.
**पत्र**–पु. १ पान; पर्ण. २ वर्तमानपत्र. ३ पत्र; चिठ्ठी.
**पत्रकार**–पु. संपादक.
**पत्रवाहक**–पु. पोस्टमन.
**पत्रा**–पु. १ पंचांग. २ बेगड.
**पत्री**–स्त्री. चिठ्ठी; पत्र.
**पथ**–पु. १ मार्ग; रस्ता. २ पथ्य.
**पथराना**–क्रि. अ. १ सुकून कठिण होणें. २ शिळें होणें. ३ निर्जीव होणें.

**पथरी**–स्त्री· १ दगडी. २ मूतखडा. ३ गारगोटी. ४ धारेचा दगड.
**पथरीला**–वि· खडकाळ.
**पथिक, पथी**–पु· पांथस्थ; वाटसरू.
**पथु***–पु· मार्ग; रस्ता.
**पद्***–पु·१ पाय. २पदचिह्न. ३दर्जा; हुद्दा. ४ काम; व्यवसाय. ५ वस्तु; चीज. ६कवितेचा चरण. ७ शब्द.
**पदत्राण**––पु· पादत्राण; जोडा.
**पदाना**–क्रि· स· पादविणें (खेळांत); हैराण करणें.
**पदिक***–पु· गळयांतील ताईत.
**पदी***–पु· पायदळ शिपाई; प्यादा.
**पदुम–पद्म**–पु· कमळ.
**पधारना**–क्रि· अ· आगमन होणें. क्रि·स· आदरसत्कार करणें; सन्मानानें बसविणें.
**पन**––पु· बाजार.
**पन**––पु· प्रतिज्ञा.
**पनकपडा**–पु· जखमेवर बांधावयाची कापडाची ओली पट्टी.
**पनघट**–पु· पाणी भरण्याची जागा; नदीचा घाट.
**पनच**–स्त्री·प्रत्यंचा; धनुष्याची दोरी.
**पनचक्की**–स्त्री· पाणचक्की.
**पनडुब्बा**–– पु· १ पाणबुड्या. २ पाणबुड्या पक्षी. **पनडुब्बी**–स्त्री· पाणबुडी; सबमरीन.
**पनपना**–क्रि· अ· १ टवटवीत होणें. २ प्रकृति पुन्हां सुधारणें.
**पनबट्टा**–पु· पानांचा डबा.
**पनभरा, पनहरा**––पु· पाणी भरण्याचें काम करणारा; पाणक्या.
**पनवाडी**- पु· तांबोळी.
**पनवारा**– पु· १ पत्रावळ. २ एका माणसास पुरेल इतकें अन्न.
**पनसाल**–स्त्री· पाणपोई.
**पनसाल** - स्त्री· १ पाण्याची खोली मोजण्याचें यंत्र. २ पाणपोई.
**पनसुइया**–स्त्री· छोटी नांव.
**पनहा**-पु·१ पन्हा (कापड इ.चा). २ रहस्य. ३ चोरीचा माग काढणारा.
**पनही**–स्त्री· जोडा; पादत्राण.
**पना**–पु· पन्हें (कैरीचें किंवा चिंचेचें).
**पनाती**– पु· पणतू. **पनातिन**–स्त्री.
**पनाला**–पु· १ मोरी. २ पन्हाळें.
**पनाह**– स्त्री· १ रक्षण. २ रक्षण किंवा आश्रय मिळण्याचें स्थान; आश्रयस्थान.
**पनिहा**– वि· १ पाण्यांत राहणारा. २ पाण्यांत मिसळलेला. ३ पाण्यासंबंधीं.
**पनिहा**– पु· हेर; गुप्तचर.
**पनी***–पु· प्रतिज्ञा करणारा.
**पनीर**–पु·[फा.] १ दूध फुटून निघणारा चोथा; आमीक्षा. २ चक्का.

**पनीरी**–स्त्री॰ [दे] १ आळें (फुलझाडें ज्यांत लावतात तें). २ रोपटें.
**पनीला**–वि॰ पाणचट.
**पनुआँ**–वि॰ फिका; नीरस.
**पनैला**–पु॰ १ मेणकापड. २ खळ लावलेलें कापड.
**पनौटी**–स्त्री॰ [दे.] विड्याचा डबा.
**पन्नग**—पु॰ साप.
**पन्ना**—पु॰ १ पाच; रत्नाचा अेक प्रकार. २ वर्ख. ३ पान; पृष्ठ.
**पन्नी**—स्त्री॰ बेगड. [तयार करणारा.
**पन्नीसाज़**–पु॰ [सं॰ + फा.] बेगड
**पपडा**—पु॰ १ ढलपा. २ पापुद्रा.
**पपडिया-कत्था**–पु॰ [दे.] पांढरा कात. [पापुद्रा सुटणें; पोपड येणें.
**पपडियाना**–क्रि॰ अ॰ १ सुकणें. २
**पपडी**—स्त्री॰ १ पोपडा; पापुद्रा. २ खपली. ३ अेक प्रकारची मिठाअी (पापडी). [चातक.
**पपिहरा, पपिहा, पपीहा**–पु॰ [दे.]
**पपीता**—पु॰ [दे.] पोपअी.
**पब्लिक**—स्त्री॰ [अिं.] जनता; लोक. वि॰ जाहीर; सार्वजनिक.
**पयद्-योद्***–पु॰ मेघ; ढग. [समुद्र.
**पयधि-पयनिधि, पयोधि**—पु॰
**पयस्विनी**—स्त्री॰ १ दूध देणारी गाय. २ बकरी. ३ नदी.
**पयान, प्रयाण**—पु॰ प्रयाण.
**पयाम**—पु॰ [फा.] संदेश.
**पयार-ल**–पु॰ पेंढा; भातेण; कडबा. (मु.) **पयाल गाहना** अथवा **झाडना**–फुकट मेहनत करणें.
**पयोज**—पु॰ कमळ.
**पर**–अव्य. १ पण; परंतु. २ पश्चात्; नंतर. ३ वर. [३ भिन्न.
**पर**–वि॰ १ अन्य; दुसरा. २ मित्र.
**पर**—पु॰ [फा.] पंख. [पणती.
**परअी**—स्त्री॰ मातीचा दिवा; मोठी
**परकटा**—वि॰ [फा. + सं॰] पंख कापले गेलेला.
**परकना***—क्रि॰ अ॰ १ मिळून जाणें; परिचित होणें. २ चट लागणें; सोकावणें.
**परकाजी**—वि॰ परोपकारी.
**परकाना**—क्रि॰ स॰ सोकविणें; चटक लावणें.
**परकार-ल**—पु॰ [फा.] कंपास.
**परकाला**—पु॰ १ जिना; शिडी. २ अुंबरा; अुंबरठा.
**परकाला**–पु॰ [फा.] १ तुकडा; खंड. २ ठिणगी. ३ कांचेचा तुकडा. (मु.) **आफ़तका परकाला**–भयंकर मनुष्य.
**परकासना***–क्रि॰ स॰ १ प्रकाशित करणें; प्रकाश देणें. २ प्रकट करणें. क्रि॰ अ॰ प्रकाशणें.

**परकिति ती***—*स्त्री*. प्रकृति; तब्येत.

**परकीया**— *स्त्री*. जारिणी.

**परकोटा** —*पु*. १ किल्ल्याचा कोट. २ आवाराची भिंत.

**परख**–*स्त्री*. परीक्षा; पारख.

**परखना** —*क्रि. स*. प्रतीक्षा करणें; वाट पाहणें.

**परखना** — *क्रि.स*. पारखणें; परीक्षा करणें. [ पारख करणारा.

**परखवैया, परखैया**–*पु*. पारखी;

**परखाना**-–*क्रि.स*. १ पारख करविणें. २ सोंपविणें.

**परग**––*पु*. पाऊल; कदम. [ होणें.

**परगसना***–*क्रि.अ*. प्रकाशणें; प्रगट

**परगाढ***–– *वि*. प्रगाढ; गहन.

**परगास*** — *पु*. प्रकाश.

**परगासना**––*क्रि. अ*. प्रकाशित होणें. *क्रि. स*. प्रकाशित करणें.

**परघनी**—*स्त्री*. सोनें किंवा चांदी ओतण्याचा सांचा; नळी.

**परचअि***––*स्त्री*.परिचय; ओळख.

**परचत***–*स्त्री*. परिचय; ओळख *वि*. ओळखीचा; परिचित.

**परचना**–*क्रि.अ*. १ अधिक परिचय होणें. २ चटक लागणें; सोकावणें.

**परचा** — *पु*. [ फा. ] १ पेपर; प्रश्नपत्र. २ चिठ्ठी; पत्र. ३ कागदाचा तुकडा.

**परचाना**––*क्रि. स*. १ सोकावून ठेवणें. २ अतिपरिचय ठेवणें; स्नेहसंबंध जोडणें.

**परचार***—*पु*. प्रचार.

**परचून**—*पु*. शिधा (डाळ, तांदूळ, पीठ अि. ). **परचूनी**–*पु*. वाणी ( डाळ, तांदूळ अि. विकणारा ).

**परछती**––*स्त्री*. १ माळा; (सामान ठेवण्याचा ). २ गवताचें छप्पर.

**परछन**––*स्त्री*. लग्नाकरितां वधूगृहाजवळ आल्यावर नवऱ्या मुलास ओवाळतात ती रीत.

**परछांयीं**—*स्त्री*. छाया; पडछाया; प्रतिबिंब. [ मडकें.

**परछी**––*स्त्री*. दुधाचें किंवा दह्याचें

**परजन–परिजन*** *पु*. १ परिवार. २. सेवक; नोकर.

**परजना***––*क्रि.अ*. १ जळणें. २ रागावणें; कुढणें. ३ द्वेष करणें.

**परजा**––*स्त्री*. प्रजा; जनता.

**परजाय*** — १ पर्याय; प्रकार. २ क्रम; परंपरा. ३ प्रसंग; ओघ.

**परत, पर्त**—*स्त्री*. १ थर; लेप. २ घडी. ३ पापुद्रा.

**परतच्छ***–– *वि*. प्रत्यक्ष.

**परतल**––*पु*. गोणी. [ 'पडताल'

**परतार–परताल** — *स्त्री*. पाहा

**परतिग्या**––*स्त्री*. प्रतिज्ञा; पण.

**परती**—स्त्री· पडीत जमीन.

**परतीत***—स्त्री· १ प्रतीति. २ विश्वास. ३ प्रसन्नता.

**परतोख***—पु· [ दे. ] अुदाहरण; प्रत्यक्ष प्रमाण. [२ प्रतिबिंब.

**परतौ***—पु· [ फा. ] १ किरण.

**परथन** पु· पिठी (पोळी लाटतांना अुपयोगांत आणावयाचें पीठ ).

**परदा, पर्दा**—पु· [फा.] १ पडदा. २ आडोसा. ३ पडद्याची पद्धत. ४ आडोशाची भिंत.

**परदाज़**-पु· [फा.] १ सजावट. २ चित्राच्या भोंवतीची नक्षी.

**परदादा**-पु· [ सं·+फा. ] पणजोबा ( वडिलांचे आजोबा ).

**परदानशीन**—वि· [ सं· + फा. ] पडदानशीन; पडद्यांत असलेली ( स्त्री ).

**परदापोशी**—स्त्री· [ सं· + फा. ] अेखाद्याचें रहस्य किंवा दोष अुघड-कीस न आणणें; दोषांची सारवा-सारव.

**परदेश-स**— पु· परदेश.

**परनाना**-पु· आअीचे आजोबा; पणजोबा. [नमस्कार.

**परनाम-नौत***— पु· प्रणाम;

**परनाला**—पु· १ मोरी; गटार. २ पन्हळ.

**परपंच***-पु· १ प्रपंच; संसार. २ विस्तार. ३ ढोंग; कपट.

**परपंची***-वि· १ भानगड, कलह अुत्पन्न करणारा. २धूर्त; फसव्या.

**परपट**—पु· सपाट जमीन.

**परपराना** —क्रि·अ· [ दे. ] चुण-चुणणें; आग होणें.

**परपार**-पु· पैल तीर.

**परवल***-वि· प्रबळ.

**परबसताओ***— स्त्री· परवशता; पराधीनता; पारतंत्र्य.

**परबाल**-पु· पडकेस.

**परबीन***-वि· प्रवीण.

**परबेस***-पु· प्रवेश.

**परबोध**-पु· १ प्रबोध; जागृति. २ शिकवण; अुपदेश. ३ सात्वन.

**परबोधना***-क्रि·स· १ जागें करणें. २ अुपदेश करणें. ३ सांत्वन करणें.

**परभात***-पु· प्रभात; पहांट.

**परभाव**-पु· प्रभाव; वजन.

**परमहंस**-पु· १ संन्यासी; योगी. २ परमात्मा.

**परमा**-स्त्री· शोभा; कांति.

**परमान***-पु· १ प्रमाण; दाखला. २ खरी गोष्ट. ३ अवधि. ४ सीमा; हद्द.

**परमारथ***-पु· परमार्थ; मोक्ष.

**परयंक, पर्यंक**-पु· पलंग.

**परलअु-लय-लै***— स्त्री प्रलय.
**परला**—*वि.* पलीकडचा; दुसऱ्या बाजूचा. ( मु. ) **परले दर्जेका-परले सिरेका**—अत्यंत; पराकाष्ठेचा.
**परलोक**-*पु.* १ स्वर्ग. २ दुसरा लोक किंवा जन्म. ( मु. ) **परलोक सिधारना**-मरण पावणें.
**परवरदिगार**-*पु.* [फा.] १ अीश्वर. २ पालन करणारा.
**परवरिश**-*स्त्री.* [फा.] पालनपोषण.
**परवल, पर्वल**-*पु.* तोंडल्यासारखी फळभाजी. २ खुणेचा शब्द.
**परवश-परवश्य**-*वि.* पराधीन; परतंत्र.
**परवा***-*स्त्री.* प्रतिपदा.
**परवा-वाह**—*स्त्री.* [फा.] १ पर्वा; काळजी. २ लक्ष्य; नजर. ३ आश्रय.
**परवान**.-*पु.* [ फा. ] १ परवाना; परवानगी. २ पतंग ( किडा )
**परवाल***— *पु.* १ प्रवाळ; पोवळें; २ कोवळें पान. ३ तंबोरा, वीणा अि. चा दांडा.
**परवी**—*स्त्री.* पर्वकाल.
**परवीन**—*पु.* [ फा ] १ कृत्तिका नक्षत्र २ झुमका; झूल. [ खळें.
**परवेख***-*पु.* चंद्राभोंवतीं असणारें
**परवेश*** —*पु.* प्रवेश.
**परश**—*पु.* परीस.
**परसंसा***—*स्त्री.* प्रशंसा; स्तुति.
**परस***—*पु.* स्पर्श.
**परसन**-*पु.* स्पर्श.
**परसन-न्न***—*वि.* प्रसन्न.
**परसना*** —*क्रि. स.* स्पर्श करणें.
**परसना**—*क्रि. स.* जेवण वाढणें.
**परसपखान**—*पु.* परीस.
**परसा**—*पु.* अेका माणसास पुरेल अितकें अन्न.
**परसाल**-अव्य [सं.+फा.] गुदस्ता किंवा आगामी ( वर्ष ).
**परसिद्ध***—*वि.* प्रसिद्ध.
**परसु**—*पु.* परशु.
**परसूत***—*पु.* प्रसूत.
**परसेद***—*पु.* स्वेद; घाम.
**परसों**—अव्य. परवां ( दिवस ).
**परसौंहाँ**—*वि.* स्पर्श करणारा; शिवणारा. [ धार्जिणा.
**परस्त**-*वि.* [ फा. ] पूजा करणारा.
**परस्तिश**-*स्त्री.* [फा.] पूजाअर्चा.
**परस्ती**—*स्त्री.* [फा] १ पूजा. २ धार्जिणेपणा.
**परहेज़**—*पु.* [ फा. ] १ पथ्य. २ संयम. **परहेज़गार**—*पु.* १ पथ्यानें वागणारा. २ संयमी.
**परहेलना***—*क्रि. स.* अवहेलना करणें; तिरस्कार करणें.

**परॉंठा-परॉंवठा**--पु· मोठी पुरी; पराेठा.

**पराग**-पु· फुलांतील कण; पुष्परज.

**परागना***—क्रि.अ. अनुरक्त होणें; प्रसन्न होणें.

**पराधीन**-वि· परतंत्र; गुलाम.

**परान***--पु· प्राण.

**पराना*** --क्रि.अ· पळणें.

**पराया**—वि· दुसऱ्याचा; परका.

**परावन**--पु· पलायन (पुष्कळ लोकांचें).

**परावन**--पु· पर्वकाळ.

**परास्त**—वि· पराजित.

**परिंदा**—पु· [फा. ] पक्षी.

**परिकर**—पु· १ कटिबंधन; कमरबंद. कमरेभोंवतालीं गुंडाळावयाचें अेक वस्त्र. २ विस्तार. ३ पलंग. ४ समारंभ.

**परिकरमा***—स्त्री·. परिक्रमा.

**परिचय**— पु· ओळख.

**परिचर्या**—स्त्री· सेवा-शुश्रूषा.

**परिचायक**—वि· ओळख करून देणारा; सूचक.

**परिचारना***–क्रि.स· सेवा करणें.

**परिचारिका**-स्त्री· सेविका; दासी.

**परिच्छन्न**-वि·१परिवेष्टित. २झांकलेला; आच्छादित. ३ शुद्ध; स्वच्छ.

**परिच्छेद**—पु· पॅरिग्राफ; प्रकरण; अध्याय.

**परिजन**--पु· १ परिवार; कुटुंब; [स्वजन. २ सेवक.

**परिणति**-स्त्री· १ फळ; परिणाम. २ परिपाक; पुष्टि.

**परिणीता**--स्त्री· विवाहित स्त्री.

**परिताप**-पु· १ अुष्णता; आंच. २ दुःख; क्लेश; पीडा. ३ पश्चात्ताप.

**परितोष**--पु· तृप्ति; संतोष.

**परिधि**--स्त्री· परिघ; घेरा.

**परिपाटी**--स्त्री· १ परिपाठ; क्रम २ पद्धत; रीत. ३ शैली; प्रणालि.

**परिपूरन**--वि· परिपूर्ण; भरलेला.

**परिप्लुत**-वि· बुडालेला; भिजलेला.

**परिभाषा**-स्त्री· १ व्याख्या. २ परिभाषा (शास्त्रीय शब्दाची).

**परिभूत**—वि· १ पराभूत. २ अपमानित.

**परिमल**--पु· १ सुगंध; सुवास. २ [मैथुन; संभोग.

**परिया**-पु· [तमिळ] दक्षिण हिंदुस्थानांतील अेक अस्पृश्य जात.

**परिलेख**-पु·१ आराखडा; स्केच. २ चित्र; तसबीर. ३ कुंचली (चित्रें काढण्याची). ४ अुल्लेख; वर्णन.

**परिवर्तन**-पु· फरक; बदल.

**परिवर्तित**-वि· बदललेला; सुधारलेला.

**परिवर्द्धित**-वि· वाढविलेला; भर घातलेला.

**परिवा**–स्त्री· पाडवा; प्रतिपदा.

**परिवाद**–पु· निंदा; टीका.

**परिवादी**–वि· निंदक.

**परिवार**–पु· १ कुटुंब. २ कुळ; वंश.

**परिवास**–पु· १ मुक्काम. २ घर. ३ सुगंध.

**परिवृत्त**–वि· वेष्टिलेला; झांकलेला.

**परिव्राजक**–पु· संन्यासी; यति.

**परिषद्**–स्त्री· सभा; सम्मेलन; विद्वत्सभा.

**परिस्तान**–पु· [फा.] अप्सरांचें राहण्याचें स्थान; पऱ्यांचें स्थान.

**परिहरना***–क्रि· स· सोडणें; त्याग करणें. **परिहरि**–सोडून.

**परीक्षण**—पु· १ निरीक्षण; तपासणी. २ परीक्षा.

**परीज़ाद्**–वि· [फा.] अत्यंत सुंदर.

**परे**–अव्य. १ पलीकडे. २ वेगळा; अलग. ३ याहिपेक्षां. ४ नंतर.

**परेअी**–स्त्री· पारवा ( मादी ).

**परेखना***–क्रि· स· पारख करणें; परीक्षा करणें.

**परेखा**·पु· परीक्षा.

**परेग**–स्त्री·[अिं.] १ कुसळ. २ खुंटी.

**परेता**–पु·पतंगाचा रीळ. [२कबूतर.

**परेवा**–पु· १ पारवा; पंडूक पक्षी.

**परेशान**–वि· [ फा. ] त्रस्त; कंटाळलेला; जिकीरीस आलेला. **परेशानी**–स्त्री· १ त्रास; जिकिर; दगदग. २ काळजी; चिंता.

**परोल**–पु· [ अिं. ] सैन्यांतील पाहरेकऱ्यांशीं बोलण्याचा सांकेतिक शब्द; परवल.

**परोसना**–क्रि· स· जेवण वाढणें.

**परोहन**–पु· वाहन.

**परोहा**–पु· [ दे.] मोट. [अंत.

**पर्यवसान**-पु·१परिणाम. २समाप्ति;

**पर्याप्त**–वि· पुरेसें.

**पर्यायवाची** – ·वि· अेकच अर्थ दाखविणारा ( शब्द ).

**पर्वत**–पु·पर्वत; डोंगर. [हिंस्र पशु.

**पलंग**–पु· [ फा. ] १ वाघ. २

**पलंग**–पु· पलंग. [त्यावरील चादर.

**पलंगपोश**–पु· [सं·+फा.] बिछा-

**पलक**–स्त्री· १ पापणी. २ निमिष; क्षण. (मु.) **किसी के लिये पलक बिछाना**–प्रेमपूर्वक स्वागत करणें. **पलक से पलक न लगना**–१ सारखें पाहत राहणें. २ झोंप न येणें. [दानशूर; अुदार.

**पलक-दरिया**–वि· [ सं·+फा. ]

**पलका***–पु· पलंग. [ विभाग.

**पलटन**–स्त्री· [अिं.] पलटण; सैन्य-

**पलटना**–क्रि· अ· १ अुपडें होणें; अुलटें होणें. २ पालटणें.

**पलटा**–पु· १ अुलटण्याची क्रिया;

अुपडें करणें. २ बदल. ३ मोबदला. फळ. ५ गाण्यांतील अेक गिरकी; तान. (मु.) **पलटा खाना**–परिस्थिति बदलणें.

**पलटनियाँ**–*स्त्री.* [अिं.] पलटणींतील शिपाअी; सैनिक. [पालटाविणें.

**पलटाना**–*क्रि. स.* अुलटविणें;

**पलटे**–*क्रि. वि.* अैवजीं; बद्दल.

**पलडा**–*पु.* तराजूचें पारडें.

**पलथी**–*स्त्री.* मांडी घालून बसण्याची पद्धत; मांडी.

**पलना**–*क्रि. अ.* १ पालनपोषण होणें; वाढणें; लहानाचें मोठें होणें. २ खाअून पिअून तयार होणें.

**पलनाना, पलानना***–*क्रि. स.* घोड्यावर जीन घालून स्वारीसाठीं तयार करणें. [करविणें.

**पलवाना***–*क्रि. स.* पालनपोषण

**पलस्तर**–*पु.* [अिं.] १ प्लॅस्टर. गिलावा. २ लेप.

**पलान**–*पु.* १ जीन. २ माकण.

**पलानी**–*स्त्री.* छप्पर.

**पलायक**–*पु.* पळपुट्या. [किंवा पान.

**पलाश-स**–*पु.* पळसाचें झाड

**पलाशी**—*वि.* मांसाहारी.

**पलीता**–*पु.* [फा.] काकडा; पलिता.

**पलीद**–*वि.* [फा.] १ घाणेरडा; अपवित्र. २ नीच; दुष्ट.

**पलुआ**–*वि.* पाळीव; पाळलेला.

**पलुहाना***–*क्रि. स.* टवटवीत करणें.

**पलेडना***–*क्रि. स.* ढकलणें; धक्का देणें. [लाटतांना लागणारी ).

**पलेथन-पलोथन**–*पु.* पिठी (पोळ्या

**पलोटना**–*क्रि. स.* १ पाय चुरणें; पाय दाबणें. २ अुलथणें; अुपडें करणें. [असलेलें.

**पल्लवित**–*वि.* हिरवेंगार; पालवी

**पल्ला**–*क्रि. वि.* लांब; दूर. *पु.* लांबी.

**पल्ला**–*पु.* [?] वस्त्राचें टोंक (मु.) **पल्ला छूटना**–कटकट मिटणें. **पल्ला पसारना**–याचना करणें. **पल्ले पड़ना**–गळीं पडणें. **पल्ले बाँधना**–१ ताब्यांत देणें; स्वाधीन करणें. २ गळीं बांधणें.

**पल्ला**–*पु.* १ दाराची फळी; झडप; कवाड. २ पल्ला; तीन मणांचें माप, वजन.

**पल्ला**–*पु.* तराजूचें पारडें.

**पल्ला**–*पु.* कात्रीचें पातें.

**पल्ली**–*स्त्री.* लहान गांव.

**पल्लेदार**—*पु.* [सं. + फा.] १ धान्याचीं पोतीं वाहणारा हमाल. २ धान्य मोजणारा. **पल्लेदारी**-*स्त्री.* धान्य मोजण्याचें किंवा वाहण्याचें काम. [पोतें; गोणपाट.

**पल्लौ***—*पु.* १ पल्लव; पालवी. २

**पवनी**—*स्त्री.* बलुतेदार.
**पवाअी**—*स्त्री.* १ अेका पायांतला जोडा. २ जात्याची अेक तळी.
**पवित्र**–*वि.* शुद्ध; चांगला.
**पशम–पश्म**–*स्त्री.* [फा.] १ मअू व अुत्तम प्रतीची लोंकर. २ तुच्छ वस्तु. **पशमीना, पश्मीना**– *पु.* लोंकर; लोंकरीचें कापड.
**पशु**–*पु.* जनावर; प्राणी.
**पश्चात्ताप**–*पु.* पश्चात्ताप.
**पश्चिम**–*पु.* पश्चिम दिशा. [भाषा.
**पश्तो**–*स्त्री.* [दे.] सरहद्द प्रांतांतील
**पश्मीना**–*पु.* पाहा ' पशम.'
**पश्शा**–*पु.* [फा.] मच्छर.
**पषारना***-*क्रि.स.* धुणें; स्वच्छ करणें.
**पसंद**– *वि.* [फा.] पसंत; अनुकूल; मान्य. *स्त्री.* अभिरुचि; पसंती; मान्यता. **पसंदीदा**--*वि.* पसंतीचा; निवड केलेला.
**पसपा**–*वि.* [फा.] माघार घेणारा.
**पसरना**–*क्रि. अ.* पसरणें; विस्तार पावणें. [वगैरेंच्या दुकानांचा बाजार.
**पसरहट्टा**— *पु.* गंधी, मसालेवाले
**पसराना**–*क्रि. स.* पसरविणें.
**पसरौंहाँ*** -*वि.* विस्तार पावणारा फैलणारा.
**पसली**–*स्त्री.* बरगडी; फांसळी. (मु.) **पसली फडकना** अथवा **फडक अुठना**–मन अुत्साहित होणें.
**पसाअु***-*पु.* अनुग्रह; कृपा.
**पसाना**–*क्रि. स.* १ भाताची पेज काढणें. २ घाम काढणें.
**पसार***–*पु.* १ प्रसार; फैलाव. २ लांबीरुंदी; विस्तार.
**पसारना**–*क्रि.स.* पसरणें; फैलावणें.
**पसाव**–*पु.* पेज. [ २ दया येणें.
**पसीजना**—*क्रि.अ.* १ घाम सुटणें.
**पसीना**—*पु.* घाम; स्वेद.
**पसु**—*पु.* पाहा ' पशु '.
**पसेअु व***–*पु.* १ घाम. २ स्राव.
**पसोपेश**–*पु.* [फा.] १ बुचकळा, घालमेल २ हानि; लाभ.
**पस्त** -*वि.* [फा.]१ थकला भागलेला. २ पराभव पावलेला. (यौ.) **पस्त हिम्मत**– *वि.* १ भित्रा. २ धीर खचलेला. [२ नीचता.
**पस्ती**–*स्त्री.* [फा.]१ पतन; अधःपात.
**पहँ***—*अव्य.* समीप; जवळ.
**पहँसुल**—*स्त्री.* विळी.
**पहचान, पहिचान**–*स्त्री.* १ ओळख; परिचय. २ पारख; परीक्षा. ३ लक्षण; चिन्ह.
**पहचानना** - *क्रि. स.* १ ओळखणें; जाणणें. २ परिचय होणें. ३ पारखणें.

**पहनना,**–*क्रि. स.* परिधान करणें; नेसणें.

**पहनवाना-नाना**–*क्रि. स.* नेसविणें. पांघरविणें. **पहनाओ**—*स्त्री.* वस्त्र परिधान करण्याची क्रिया.

**पहनावा**–*पु.* पोशाख; पेहेराव.

**पहपटबाज़**—*पु.* [*सं.* + फा.] १ खोडसाळ; भांडखोर. २ ठग; फसव्या.

**पहर**–*स्त्री.* १ प्रहर. २ वेळ.

**पहरा**–*पु.* पहारा; रखवाली. **पहरी**–पहारेकरी; रक्षक.

**पहरावनी**–*स्त्री.* अहेर.

**पहरुआ, पहरू, पहरेदार**—*पु.* पहारेकरी; चौकीदार.

**पहल**–*पु.* [फा.] १ बाजू; अंग. २ जुना कापूस. ३ घडी.

**पहलदार**–*वि.* [फा.] पैलूदार.

**पहलवान**–*पु.* [फा.] १ पहिलवान्; कुस्ती खेळणारा. २ बलवान् माणूस.

**पहला**–*वि.* पहिला; प्रथम; आधींचा.

**पहलू**–*पु.* [फा.] १ अंग; बाजू; पैलू. २ कूस; बगल. ३ दृष्टिकोन.

**पहलू-तिही**–*स्त्री.* [फा.] अुपेक्षा; दुर्लक्ष.

**पहले**–*अव्य.* १ आरंभीं; पूर्वीं. २ पुढें; नंतर. (यौ.) **पहले पहल**–पहिल्या प्रथम.

**पहलौठा**–*वि.* प्रथमप्रसव (मुलगा). **पहलौठी**–*स्त्री.* पहिलटकरीण.

**पहाड-र***—*पु.* १ डोंगर; पर्वत. २ मोठा अुंच ढीग. **पहाडी**–*वि.* डोंगराळ. *स्त्री.* टेकडी.

**पहाडा**–*पु.* पाढा.

**पहिनना-पहिरना**—*क्रि. स.* पाहा ' पहनना '

**पहिया**–*पु.* चाक. [ प्रथमप्रसूता.

**पहिला**–*वि.* १ पहिला; प्रथम. २

**पहुँच**–*स्त्री.* १ पोहोंच. २ विस्तार; फैलाव. ३ प्रवेश; शिरकाव.

**पहुँचना**—*क्रि. अ.* १ पोहोंचणें. २ पसरणें. ३ शिरणें. ४ समजणें; जाणणें.

**पहुँचा**–*पु.* मनगट.

**पहुँचाना**–*क्रि. स.* पोहोंचविणें.

**पहुँची**–*स्त्री.* १ पोंची. २ दस्ताना.

**पहुनाओ**–*स्त्री.* पाहुणचार; आदर-सत्कार.

**पहेली**–*स्त्री.* कोडें; कूट प्रश्न. (मु) **पहेली बुझाना**–१ कोडें घालणें. २ आडवळणानें आपल्या स्वार्थाची गोष्ट काढणें.

**पाँ, पाँअि–अु**–*पु.* पाय. [तील बाग.

**पाँअिबाग**–*पु.* [फा.] जनानखान्यां-

**पाँक**–*पु.* चिखल; गाळ.

**पाँख**–*पु.* पंख.

**पाँगा**–पु. समुद्राचें मीठ.
**पाँच**–वि. पांच. (मु.) **पाँचों अँगुलियाँ घी में होना**—सर्व बाजूंनीं नफाच नफा असणें; नशीब फळफळणें. **पाँचों सवारों में नाम लिखाना**–श्रेष्ठ व्यक्तींमध्यें स्वतःची गणना करणें.
**पाँचैं**—पंचमी (तिथि).
**पाँजना**—क्रि. स. पितळ, तांबें अित्यादि धातूंच्या वस्तूंना जोड देणें; डाग देणें.
**पाँजर**–पु. १ कूस; कुशी. २ बरगडी. ३ पिंजरा. [खर्डा; आराखडा
**पांडुलिपि**–स्त्री. हस्तलिखित; कच्चा
**पाँत पाँति**–स्त्री. १ रांग; ओळ. २ समूह. ३ पंगत (जेवणाची).
**पाँयँ, पाअि-अुँ***–पु. पाय; चरण.
**पाँयँता**–पु. पायथें (अुसें व पायथें).
**पाँव**—पु. पाय. (मु.) **पाँव अुखडना**–पराभूत होणें; भिअून पळून जाणें. **पाँव अुठाना**–भरभर चालणें. **पाँव ज़मीनपर न ठहरना**–१ अत्यंत आनंद होणें. २ गर्व होणें. **पाँव डगमगाना**–भयभीत होणें. **पाँवतलेसे मिट्टी खिसक जाना**—घाबरणें. **पाँव धो धोकर पीना**—अत्यंत श्रद्धा-भक्ति करणें. **पाँव पकडना**–पाय धरणें; शरण जाणें. **पाँव बढाना**–भरभर चालणें. **पाँव भारी होना**—गर्भवती असणें; गर्भ राहणें. **पाँव लगना**–प्रणाम करणें.
**पाँवड़–डा**–पु. पायघडया.
**पाँवर**—वि. पतित; नीच.
**पाँवरी**·स्त्री. १ पायरी. २ जोडा; पादत्राण. [कीची जागा. ३ दालन.
**पाँवरी**—स्त्री. १ देवडी. २ बैठ-
**पाँस**—स्त्री. खत (पिकासाठीं).
**पाँसा**–पु. फांसा (सोंगट्या अित्यादि खेळांतील).
**पाँही**—क्रि. वि. जवळ; समीप.
**पा**—पु. [फा.] पाय.
**पाअिक***—पु. दूत.
**पाअितरी***—स्त्री. पायथें.
**पाअी**—स्त्री. १ पै (नाणें). २ पूर्णविरामाचें चिन्ह (अुभी रेघ).
**पाअुडर**–पु. [अिं.] पावडर; चूर्ण.
**पाक**—वि. [फा.] १ स्वच्छ; निर्मळ. २ पवित्र; शुद्ध. ३ निर्दोष; निरपराधी. (मु.) **झगडा पाक करना**—भांडण मिटविणें.
**पाकदामन**–वि. [फा.] पतिव्रता; सती. **पाकदामनी**–स्त्री. पातिव्रत्य; शील.
**पाकिट**–स्त्री. [अिं.] खिसा; पॉकेट.
**पाकी**—स्त्री. [फा.] पावित्र्य;

शुद्धता. **पाकीज़गी**—*स्त्री*. पवित्रता. **पाकीज़ा**—*वि*. १ शुद्ध; स्वच्छ. २ सुंदर. ३ निर्दोष.

**पाखंड**—*पु*. १ ढोंग; फसवणूक २ वेदाविरुद्ध आचरण. **पाखंडी**—*वि*. पाखंडी; ढोंगी; फसव्या.

**पाख**—*पु*. पक्ष; पंधरवडा.

**पाखर**—*स्त्री*. हत्ती घोडे अि. वर घालावयाची लोखंडी झूल.

**पाखाना**—*पु*. [ फा. ] १ संडास; शौचकूप. २ विष्ठा; मैला.

**पाग**-*स्त्री*. पगडी; पागोटें. [पदार्थ.

**पाग**—*पु*. १ पाक. २ पाकविलेला

**पागना**—*क्रि. स*. पाकविणें; पाकांत घालणें. *क्रि. अ*. अनुरक्त होणें.

**पागल**—*वि*. [ ? ] वेडा; विक्षिप्त. २ मूर्ख; बेअकली. **पागलपन**—*पु*. १ वेड. २ मूर्खपणा. ३ विक्षिप्तपणा.

**पागलखाना**—*पु*. [ ? + फा. ] वेडयांचें अिस्पितळ.

**पागुर**—*पु*. रवंथ.

**पाचक**—*पु*. आचारी; स्वयंपाकी. **पाचिका**—*स्त्री*. स्वयंपाकीण.

**पाचक**—*पु*. पचविण्यास मदत करणारें ( औषध, पदार्थ वगैरे ).

**पाछ**-*स्त्री*. चीर; हलका घाव.

**पाछना***—*क्रि. स*. चीर पाडणें; हलक्या हातानें कापणें.

**पाछल-छिला**—*वि*. १ मागचा; पाठीमागील. २ पूर्वाचा.

**पाछा***—*पु*. पाठीमागचा भाग.

**पाछी-छे***—*क्रि. वि*. १ मागें; पाठीमागें. २ नंतर. [ जमा.

**पाजामा**—*पु*. [ फा. ] विजार; पाय-

**पाज़ेब**—*स्त्री*. [ फा. ] तोरडी; नूपुर.

**पाट**—*पु*. १ रेशीम; ताग; कापड. २ सिंहासन; राजगादी. ३ जात्याचें पाळें. ४ पाट.

**पाटन**—*स्त्री*. छत; पाटणी.

**पाटना**—*क्रि. स*. चोपणें; सपाट करणें ( जमीन ).

**पाटा**—*पु*. १ पाट. २ रेशीम. ३ रेशमाचा किडा. ४ सिंहासन. ५ लांबी रुंदी. ६ जात्याची तळी.

**पाटी**—*स्त्री*. १ परिपाठ; पद्धत. २ रांग; ओळ.

**पाटी**—*स्त्री*. १ स्लेट-पाटी. २ डोक्यावरील भांगाचे दोन्हीकडील भाग ३ बाजेचें अुभें लांकूड. ( मु. ) **पाटी पढ़ना**- १ धडा वाचणें; शिक्षण घेणें.

**पाठ**—*पु*. १ धडा; पाठ. २ वाचन. ३ अध्ययन ४ परिच्छेद; अध्याय. (मु.) **पाठ पढाना**—आपल्या फायद्यासाठीं दुसऱ्याला बहकाविणें; फुसलावणें.

**पाठक**—पु. वाचक.
**पाठशाला**—स्त्री. शाळा.
**पाठांतर**-पु. पाठभेद.
**पाठा**—वि. १ तरणाताठा; धष्टपुष्ट. २ पोळ; वळू. ३ रेडा. ४ बकरा.
**पाठालय**—पु. पाठशाळा.
**पाठी**—पु. पाठ करणारा; वाचक.
**पाड**-पु. १ धोतराचा कांठ. २ मचान;माळा. ३ विहिरीच्या तोंडावरील जाळी. ४ फांशीचा तक्ता.
**पाडा**-पु. मोहल्ला; पेठ; आळी.
**पात**—पु. पान. [पायमोजा.
**पाताबा, पायताबा**-पु. [फा.]
**पाति-ती***-स्त्री. १ वृक्षाचें पान. २ पत्र; चिट्ठी. [२ लिहिणें.
**पाथना**-क्रि.स. १ थापणें; थापटणें.
**पाथेय**-पु.१ शिदोरी. २ प्रवासखर्च.
**पाथोज**-पु. कमळ.
**पादुका**-स्त्री.पादुका; खडाव.
**पादाश**-स्त्री. [फा.] परिणाम; शेवट (विशेषतः वाईट कामाचा).
**पाधा**-पु. १ अध्यापक; आचार्य. २ पंडित; विद्वान्. ३ पुरोहित; अुपाध्याय.
**पान**-पु. १ विडयाचें पान; विडा, पानपट्टी. २ पिणें; पेय. ३ मद्य. ४ पेला. (मु.) **पान देना**-विडा देणें. **पान लगाना**-विडा तयार करणें. (यौ.) **पानफूल**-अल्पस्वल्प भेट अथवा मोबदला.
**पानगोष्ठी**-स्त्री. दारू पिण्यासाठीं अेकत्र जमलेली मंडळी.
**पानडी**—स्त्री. पाच; अेक सुगंधी पानांची वनस्पति. [डबा.
**पानदान**--पु. [सं.+फा.] पानांचा
**पाना**—क्रि. स. १ मिळविणें; प्राप्त करणें. २ भोगणें. ३ पत्ता काढणें; माहिती मिळविणें. ४ परत मिळणें; सांपडणें.
**पानागार**—पु. दारूचा गुत्ता.
**पानि***--पु. पाणि; हात.
**पानिप***—पु. कांति; तेज.
**पानी**-पु. १ पाणी; जल. २ लाळ. ३ पाअूस. ४ द्रव पदार्थ. ५ अर्क. ६ शस्त्रावरील पाणी. ७ कांति; चमक; तेज. ८ प्रतिष्ठा; मान; अब्रू. ९ मर्दुमकी. १० पाणचट पदार्थ. ११ खेप; पाळी. १२ हवापाणी. १३ कल्हअी, मुलामा. (मु.) **पानीका बतासा** अथवा **बुलबुला** — नश्वर, क्षणभंगुर वस्तु. **पानीकी तरह बहाना**-- वाटेल तसा खर्च करणें. **पानी न माँगना**--तत्काळ मरणें. **पानी पानी होना** — अत्यंत शरमिंदा होणें. **पानी पिकर कोसना**--

नेहमीं वाईट चिंतणें; शिव्याशाप देणें. **पानी फिरना**--आशाभंग होणें; नष्ट होणें. **पानी फेरना** अथवा **फेर देना**--१ आशाभंग करणें. २ नष्ट करणें. (**मुँहमें**) **पानी भर आना** -- तोंडाला पाणी सुटणें. **पानी भरना**-- अधीनता स्वीकारणें; फिक्कें पडणें **पानीमें आग लगाना**-१ जेथें अशक्य असेल तेथेंहि भांडण लावून देणें. २अशक्य गोष्ट करून दाखविणें. **पानी रखना**--ब्रीद सांभाळणें. **पानी लगना**-हवा-पाणी बाधणें.

**पानीदार** -- *वि.* [सं. + फा.] १ पाणीदार; चमकदार २अब्रूदार. ३ साहसी.

**पानीफल**-पु.शिंगाडा [पाय-पुसणें.

**पापोश**-[फा.] १ जोडा. २पायपुसें;

**पाबंद** --*वि.* [फा.] १ परतंत्र; पराधीन. २ नियमित वागणारा. **पाबंदी**-*स्त्री.*बंधन. [वस्त्र. २अुपरणें.

**पामरी**--*स्त्री.* १ पांघरण्याचें रेशमी

**पामाल** --*वि.* [फा.] १ पायाखालीं तुडविलेला. २ दुर्दशाग्रस्त.

**पायँ**-पु. पाहा 'पाँव'[ **पायँती**-*स्त्री.*

**पायँता**--पु. पायथें; पायगत.

**पायंदाज़**--पु. [फा.] पाय-पुसणें;

**पायक**-पु. १ बातमी पोहोंचविणारा; निरोप्या. २ पायदळांतील शिपाअी. ३ सेवक.

**पायताबा**-पु. [फा.] पायमोजा.

**पायदार**--*वि.* [फा.] मजबूत; टिकाअू.

**पायल**--*स्त्री.* १ तोरडी; नूपुर; २ जलद चालणारी हत्तीण. ३ पायाळू.

**पाया**--पु.१ खुर (पलंग, बाज अि. चा पाय) २खांब. ३जिना; शिडी. ४ आधार.

**पायाब**--*वि.* [फा.] अुथळ पाणी.

**पार**--पु. १ तीर. २ समोरील बाजू. ३ शेवट. ४ पैलतीर. (यौ.) **आरपार**-या किनाऱ्यापासून त्या किनाऱ्यापर्यंत; या टोंकापासून त्या टोंकापर्यंत. (मु.) **पार अुतरना**-- सफलता प्राप्त करणें. **पार करना** --पूर्ण करणें; पैलतीरास जाणें; ओलांडणें. **पार पाना** -- पुरून अुरणें. **पार लगाना**--पूर्ण करणें; पैलतीरास नेणें. **पार होना** यशस्वी होणें; पलीकडे जाणें.

**पार**-अव्य. पलीकडे;लांब. [पारखी.

**पारख***-*स्त्री.* पारख; परीक्षा पु..

**पारखी**- पु. पारख करणारा.

**पारचा**-पु. [फा.] १ तुकडा (विशेषतः कापड, कागद वगैरेंचा). २ वस्त्र; कपडा. ३ अेक प्रकारचें

रेशमी कापड. ४ पेहराव; पोशाख.
**पारद्**–पु· पारा.
**पारदर्शी**—वि·, दूरदर्शी; चतुर; बुद्धिमान्; ज्ञानी.
**पारधी**–पु· शिकारी, व्याध.
**पारना**–क्रि· स· १ पाडणें; टाकणें. २ निजविणें; आडवें करणें. ३ चीत करणें. ४ सांच्यांत ओतणें.
**पारस**–पु· परीस.
**पारस**–पु· वाढप. [२ सदाचारी.
**पारसा**–वि· [ फा. ] १ पापभीरु.
**पारसाल**–क्रि· वि· [ सं· + फा. ] गत वर्षी.
**पारा**–पु· पारा. ( मु. ) **पारा चढ जाना**–खूप राग येणें. **पारा पिलाना**–अत्यंत जड करणें. [भेट.
**पारा**–पु· [फा.] १ तुकडा. २ नजर;
**पारावार**–पु· १ दोन्ही बाजूंचे किनारे; सीमा. २ समुद्र. ३ आरपार.
**पारि***–स्त्री· १ सीमा; हद्द. २ दिशा; बाजू. ३ तळ्याचा किनारा, तीर.
**पारिख***–स्त्री· पारख; परीक्षा. पु· पारखी; पारख करणारा.
**पारितोषिक**–पु· अिनाम; बक्षिस.
**पारिपार्श्विक**–पु· १ सेवक; दास. २ सूत्रधार.
**पारी***–स्त्री· पाळी. [ डोंगरी.
**पार्वत्य**–वि· पर्वतासंबंधी; डोंगराळ;
**पाल**–पु· पालनकर्ता; पालक.
**पाल**–स्त्री· आढी (फळें पिकण्यासाठीं पानें वगैरे घालतात ).
**पाल**–पु· १ शीड. २ चांदणी; पाल. ३ गाडी किंवा पालखीवरचें आच्छादन.
**पाल**–पु· धरण; बांध; बंधारा.
**पालक**—पु· १ अेक प्रकारची पालेभाजी. २ पालन करणारा. ३ दत्तक घेतलेला मुलगा.
**पालकी**–स्त्री· पालखी; मेणा. [भाजी.
**पालकी**–स्त्री· अेकप्रकारची पाले-
**पालतू, पालू**– वि· पाळीव; माणसाळलेला ( पशु; पक्षी ).
**पालना**–पु· पाळणा; झोंपाळा.
**पालना**–क्रि· स· पालन करणें; पाळणें; बाळगणें. ( मु. ) **झगडे पालना**–विकतचें श्राद्ध घेणें.
**पाला**–पु· १ दंव. २ बर्फ. ३ कडाक्याची थंडी. ( मु. ) **पाला मार जाना**–खार पडणें.
**पाला**–पु· १ व्यावहारिक संबंध. २ मुख्य स्थान. ३ धान्याचें कोठार. ४ आखाडा. ( मु. ) **( किसी से ) पाला पडना ( किसी के ) पाले पडना**–ताब्यांत जाणें; वश होणें.
**पालागन**–पु· नमस्कार ( कमी

दर्जाच्या माणसानें वरिष्ठाला करावयाचा ).

**पालान**–पु. [फा.] घामोळें [घोड्याच्या पाठीवर घालावयाचा कपडा, ज्यावर नंतर जीन घालतात ). [साळलेला.

**पालित**—वि. पाळलेला; माण·

**पालिश**–पु. [अि.] पॉलिश.

**पाली**–वि. पालक; संरक्षक.

**पावँ**–पु. पाय. (मु.) **पावँ तले की मिट्टी निकल जाना**–स्तिमित होणें; थक्क होणें (भयानक गोष्ट अैकून). **पावँ न होना**–टिकाव धरण्याची शक्ति नसणें. **धरती पर पावँ न रखना**–गर्वानें फुगणें; स्वर्ग दोन बोटें अुरणें. **पावँ भारी होना**–गरोदर असणें. पाहा 'पाँव.'

**पावँडा**–पु. पायघड्या.

**पावँडी**–स्त्री· पादत्राण; पायतान.

**पाँवर**—वि. १ पामर; तुच्छ. २ मूर्ख; निर्बुद्ध.

**पावक**–पु. १ अग्नि. २ सदाचार. ३ सूर्य. ४ वरुण. वि. शुद्ध अथवा पवित्र करणारा.

**पावन**–वि. पवित्र; पुनीत; शुद्ध; पवित्र करणारा.

**पावदान**–पु. पायंडी; पायरी ( अुंच ठिकाणीं चढण्यासाठीं असलेली ).

**पावना***—क्रि. स. १ मिळविणें; प्राप्त करणें. २ जाणणें; समजून घेणें. ३ जेवणें. पु. येणें ( कर्ज ).

**पावस**–स्त्री· पावसाळा; वर्षाॠतु.

**पाश**—पु. १ बंधन. २ जाळें.

**पाश**—पु. [फा.] १ फाटणें; विदीर्ण होणें. २ तुकडा.

**पाशविक**—वि. पशूसंबंधीं; पशूसारखा; भयंकर.

**पाषंड**-पु. पाहा 'पाखंड' [कठोर.

**पाषाण**–पु. दगड; फत्तर. वि. क्रूर;

**पासंग**—पु. पासंग; तराजूचीं पारडीं समान करण्यासाठीं वापरावयाचें वजन. (मु.) **पासंग बराबर**–अल्प; तुच्छ.

**पास**—पु. १ सामीप्य. २ बाजू; बगल. ३ ताबा.

**पास**—अव्य. जवळ; समीप. (यौ.) **आसपास**–१ सभोंवतीं; आसमंतात. २ अदमासें; सुमारें. (मु.) **पास न फटकना**–जवळ न फिरकणें.

**पास**–पु. [फा.] १ विवेक; विचार. २ तरफदारी; पक्षपात. ३ पालनपोषण. ४ चौकी; पहारा.

**पासनी**—स्त्री· अुष्टावण.

**पासपोर्ट**—पु. [अिं.] परवाना.

**पासबाँ-बान**—पु. [फा.] रक्षक; पहारेकरी.

**पासा**—पु. १ फांसा. २ सोंगट्यांचा खेळ. (मु.) **किसी का पासा पडना**-भाग्योदय होणें. **पासा पलटना**-भाग्य उलटणें; नशीब फिरणें.

**पासी**—पु. १ फांसेपारधी. २ घोड्याचे मागचे पाय बांधण्याची दोरी. [ जवळ.

**पाहँ-हिं-हीं***—अव्य. समीप;

**पाहन***—पु. पाषाण; दगड.

**पाहरू***—पु. पहारेकरी.

**पाहा*** – पु. शेतांतील पायवाट.

**पाहुना** – पु. पाहुणा; अतिथि. २ जांवई; जामात. **पाहुनी**–स्त्री. १ अतिथि स्त्री. २ पाहुणचार; आदरातिथ्य.

**पाहुर**—पु. नजर; भेट.

**पिंजड़ा-रा**—पु. सांपळा; पिंजरा.

**पिंजरापोल**—पु. पांजरपोळ.

**पिंड**—पु. १ शरीर. २ गोळा; ढीग. ३ पिंड. (श्राद्धांतील). (मु.) **पिंड छूटना**—कटकट टळणें. **पिंड छोडना**–त्रास न देणें; पाठ सोडणें.

**पिंड्ली**—स्त्री. पोटरी.

**पिंडारी**–पु. [दे.] पेंढारी; लुटारू.

**पिंडी**–स्त्री. १ लहान पिंड; गोळी. २ पिठाची गोळी. ३ पेंडखजूर.

**पिअरी**–स्त्री. विवाहाचे वेळीं वरास अथवा वधूस नेसविण्याचें पिवळें वस्त्र.

**पिउ***—पु. पति. [ धरणें.

**पिकेटिंग**–स्त्री. [अं.] निरोधन;

**पिघलना**—क्रि. अ. १ वितळणें; पातळ होणें. २ द्रवणें; पाझर फुटणें; दया येणें.

**पिघलाना**–क्रि. स. १ वितळविणें. २ दुसऱ्याच्या मनांत दया उत्पन्न करणें.

**पिचकना**–क्रि.स. पिचणें; दबणें.

**पिचका-पिचक्का**— पु. **पिचकारी**–स्त्री. पिचकारी.

**पिच्छल**—पु. १ आकाशवेल. २ शिसवीचें लांकूड. वि. गुळगुळीत; चिकणा. [ पाठीमागें राहणें.

**पिछडना**–क्रि. अ. मागें पडणें;

**पिछडा**–वि. मागासलेला.

**पिछलगा-गुआ-ग्गू**—पु. पाठीमागून जाणारा; अनुचर. **पिछलगी**–स्त्री. अनुगमन करणारी; अनुयायी होणारी.

**पिछला**—वि. १. पाठीमागचा; मागील. २ नंतरचा. ३ शेवटचा. ४ होऊन गेलेला; जुना. (मु.)

**पिछला पहर**–तिसरा प्रहर. **पिछली रात**–मध्यरात्रीनंतरची वेळ. [ भाग; परसूं.
**पिछवाडा**—पु. घराचा मागील
**पिछाडी**–स्त्री. १ मागील भाग २ घोड्याचे मागील पाय बांधण्याच्या दोऱ्या; पायबंद.
**पिछानना***–क्रि. स. ओळखणें.
**पिछौरा***–पु. उपरणें.
**पिटंत**–स्त्री. मार; चोप.
**पिटना**–क्रि. अ. १ मार खाणें. २ वाजणें. पु. चोपणी; जमीन चोपण्याचें साधन.
**पिटवाना**–क्रि. स. मारविणें.
**पिटाअी**–स्त्री. १ चोप; मार. २ जमीन चोपण्याची मजुरी.
**पिटारा**–पु. पेटारा; करंडी.
**पिट्ठू**–पु.१ अनुयायी. २साहाय्यक; मदतगार.
**पिठौरी**–स्त्री. १ पाटवडी. २भजें.
**पितर**–पु. मृत पूर्वज.
**पिता**-पु. बाप; पिता.
**पितामह**–पु. आजोबा;बापाचा बाप.
**पितु***–पु. पिता. [ साहस.
**पित्ता**–पु. १ पित्ताशय. २ हिंमत;
**पित्ती**–अंगावर पुरळ अुठतो तो रोग; पित्ता.
**पिद्डी, पिद्दी**—स्त्री. [ अनु. ] १ भोरडी (पक्षीविशेष). २तुच्छ वस्तु.
**पिधान**–पु. १ आवरण; पडदा. २ झाकण. ३ म्यान. ४ दार.
**पिनक**–स्त्री. पाहा 'पीनक'.
**पिनकना**–क्रि. अ. १ अफूनें गुंगून डुकल्या येणें. २ पेंगणें;डुकली येणें.
**पिनपिनाना**—क्रि. अ. [ अनु. ] किरकिरणें, चिरचिरणें. **पिनपिन**–स्त्री. किरकिर; चिरचिर.
**पिनहाँ**–वि. [ फा.] गुप्त; लपलेला.
**पिय-या***–पु. पति.
**पियक्कड**–पु. पिणारा; दारुडा.
**पियराना***–क्रि. अ. निस्तेज होणें; फिकट पडणें. [ पणा.
**पियराअी, पिराअी**—स्त्री. पिवळे-
**पियादा**–पु. प्यादा; पायदळ सैनिक.
**पियूख***–पु. पीयूष; अमृत.
**पिरकी**–स्त्री. बारीक फोड;पुटकुळी.
**पिरथी***-स्त्री. पृथ्वी.
**पिराना***—क्रि. अ. ठसठसणें; ठणकणें.
**पिरीतम***–पु. प्रियतम; पति.
**पिरीता***—वि. प्रिय; आवडता.
**पिरोज**–पु. [ फा. ] वाटी; ताटली.
**पिरोजन**–पु. [ दे. ] कान टोंचण्याची चाल.
**पिरोजा**–पु. [फा.] अेक प्रकारचा हिरवा, निळा दगड.

**पिरोना**–*क्रि. स.* ओंवणें; गुंफणें.

**पिलअी**—*स्त्री.* प्लीहा.

**पिलना**—*क्रि. अ.* १ ढासळणें; कोसळणें. २ तेलाच्या घाणींतून गाळून निघणें. ३ आग्रह धरणें; हेका धरणें.

**पिलना**–*क्रि. अ.* १ मन घालणें; लक्ष देणें. २ पिळून निघणें.

**पिलपिलाना**–*क्रि. स.* [ अनु. ] मअू करणें; बिलबिलीत करणें. **पिलपिला**–*वि.* बिलबिलीत; मअू.

**पिलवाना, पिलाना**–*क्रि. स.* पाजणें; प्यावयास देणें.

**पिलआ**—*पु.* [दे.] कुत्र्याचें पिल्लूं.

**पिल्लू**—*पु.* अळी.

**पिसनहारी**—*स्त्री.* दळण करून निर्वाह करणारी स्त्री.

**पिसना***—*क्रि. अ.* १ पीठ होणें; चूर्ण होणें. २ चिरडणें ३ थकणें.

**पिसर**–*पु.* [फा.] पुत्र; मुलगा.

**पिसवाना**–*क्रि. स.* दळून घेणें.

**पिसाअी**–*स्त्री.* १ दळण. २ दळण्याची मजुरी. ३ अतिशय श्रम.

**पिसुन***–*पु.* १ कपटी. २ चुगलखोर.

**पिस्सू**—*पु.* पिसू.

**पिस्ताँ**–*स्त्री.* [फा.] १ स्तन. २ छाती.

**पिस्ता**–*पु.* [फा.] पिस्ते. **पिस्तअी**-*वि.* पिस्त्याच्या रंगाचा.

**पिहकना**–*क्रि. अ.* [अनु.] कोकिळ, चातक अि. पक्ष्यांचें कूजन करणें.

**पींजर-रा***–*पु.* पिंजरा.

**पी***–*पु.* पति.

**पीक**–*स्त्री.* पिंक; पिचकारी. [तस्त.

**पीकदान**–*पु.* [सं.+फा.] पीकदाणी;

**पीछा**–*पु.* १ पाठलाग. २ मागील भाग. ३ कांहीं घटनेच्या नंतरची वेळ.

**पीछू**–*क्रि. वि.* मागें; मागच्या बाजूस.

**पीछे**–*अव्य.* १ पाठीमागून. २ मागें. ३ नंतर; अुपरान्त. ४ शेवटीं. ५. परोक्ष; गैरहजेरींत.

**पीटना**–*क्रि. स.* १ मार देणें; चोप देणें. २ चोपणें; सपाट करणें. ३ ठोकणें; चपटें करणें.

**पीठ–ठि**—*स्त्री.* १ पाट. २ सिंहासन. ३ आसन. ४ वेदी.

**पीठ**—*स्त्री.* पाट. ( मु. ) **पीठ दिखाकर जाना**–स्नेहसंबंध तोडून जाणें. **पीठ देना**–१ निरोप घेणें. २ विमुख होणें; पाठ फिरविणें. ३ पाठ दाखविणें; पळून जाणें. ४ आराम करणें. **पीठ पर होना**–पाठीराखा होणें.

**पीठी**–*स्त्री.* वाटलेली डाळ.

**पीडुरी***–*स्त्री.* पोटरी.

**पीढा**–*पु.* पाट.

**पीढी**—*स्त्री.* १ पिढी; कुलपरंपरा. २ लहान पाट.
**पीतक**—*पु.* १ केशर. २ पिंवळें चंदन. ३ मध.
**पीतपुष्प**—*पु.* कण्हेर.
**पीन**-*वि.* १ जाड; स्थूल. २ संपन्न.
**पीनक**—*स्त्री.* [दे.] १ अफूची गुंगी. २ झोंपेची डुकली.
**पीना**—*क्रि.स.* १ पिणें; पान करणें. २ सहन करणें; राग गिळणें. ३ पिणें (दारू, विडी अि.). ४ शोषून घेणें. (मु.) **पी जाना**—राग गिळणें; सहन करणें.
**पीप**—*स्त्री.* पूं (फोडांतील).
**पीपर-ल**—*पु.* पिंपळाचें झाड.
**पीपर-ल**—*स्त्री.* पिंपळी (औषधी वनस्पति).
**पीपा**—*पु.* (?) पीप.
**पीयर**-*वि.* पिवळा.
**पीय-या***—*पु.* पति; भर्ता.
**पीयूष**-*पु.* १ अमृत. २ दूध.
**पीर-रा**—*स्त्री.* पीडा; दुःख.
**पीरी**—*स्त्री.* [फा.] १ म्हातारपण; वृद्धत्व. २ बुवाबाजी. ३ ठेका; मक्ता. ४ हुकमत; सत्ता.
**पील**-*पु.* [फा.] १ हत्ती. २ बुद्धिबळांतील मोहरा-हत्ती किंवा अुंट.
**पीलपाँव**-*पु.* [फा.] हत्तीरोग.
**पीलवान**-*पु.* [फा.] माहूत.
**पीला**—*वि.* १ पिवळा. २ निस्तेज. *पु.* पिवळा किंवा सोनेरी रंग.
**पीलापन**-*पु.* पिवळेपणा.
**पीलिया**-*पु.* पांडुरोग. [फळ.
**पीलु**—*पु.* अेक प्रकारचें औषधी
**पीसना**-*क्रि.स.* १ दळणें. २ वांटणें. ३ भरडणें. ४ भुकटी करणें. ५ अत्यंत परिश्रम करणें.
**पीहर**-*पु.* माहेर.
**पुँछार***-*पु.* मोर; मयूर.
**पुंजी, पूँजी**—*स्त्री.* संचित धन.
**पुंस***—*पु.* पुरुष.
**पुंसवन***-*पु.* १ दूध. २ पुंस्त्वसंबंधी संस्कार. (गर्भधारणा झाल्यानंतर तीन महिन्यांनीं करावयाचा)
**पुआ**-*पु.* मालपुआ; पाकांतील पुरी.
**पुआल**-*पु.* पाहा 'पयाल'.
**पुकार**-*स्त्री.* १ हांक; आरोळी. २ करुण हांक; धांवा.
**पुकारना**-*क्रि. स.* १ हांक मारणें. २ ध्यास घेणें. ३ मदतीसाठीं ओरडणें; धांवा करणें.
**पुक्कस**-*पु.* चांडाळ; अधम; डोंब.
**पुख***-*पु.* पुष्प; फूल.
**पुख़्ता**-*वि.* [फा.] दृढ; मजबूत.
**पुचकार**-*स्त्री.* १ चुचकार. २ चुंबतांना होणारा आवाज.

**पुचकारना**–*क्रि. अ.* [अनु.] चुचकारणें.

**पुचारा**–*पु.* [ अनु. ] १ सफेरी; चुना देण्याचें काम. २ रंग देण्याचा कुंचा. ३ आनंद देणारी गोष्ट. ४ खुशामत. ५ उत्साह देणारे शब्द.

**पुच्छल**–*वि.* शेंपूट असलेला. (यौ.) **पुच्छल तारा**–धूमकेतु.

**पुच्छत्तर**–*पु.* विचारपूस करणारा; परमार्श घेणारा.

**पुछल्ला**–*पु.* १ लांब शेंपूट. २ कच्छपीं लागलेला माणूस.

**पुछार***–*पु.* पाहा 'पुच्छत्तर'.

**पुजना**–*क्रि. अ.* १ पूजिलें जाणें. २ आदर होणें.

**पुजवाना पुजाना**–*क्रि. स.* १ पूजा करविणें. २ स्वतःचा बडेजाव करविणें. ३ पैसे अुकळणें.

**पुजाअी**–*स्त्री.* पूजन. [करणें.

**पुजाना**–*क्रि. स.* पूर्ण करणें; सफल

**पुजापा**–*पु.* पूजासाहित्य.

**पुजैया***–*पु.* पुजारी.

**पुट**–*पु.* आच्छादन.

**पुट**–*पु.* [ अनु. ] १ लेप; पुट. २ वस्त्राला रंग देण्यासाठीं बुडविण्याची क्रिया.

**पुटकी**–*स्त्री.* [ अनु. ] पदार्थ घट्ट करण्याकरितां पेरलेलें पीठ.

**पुटकी**–*स्त्री.* लहानसें गाठोडें; बोचकें.

**पुटास**–*पु.* [अिं.] पोटॅशियम परमँगनेट. [ठेवण्याजोगी रिकामी जागा.

**पुटी**–१ लहान द्रोण; वाटी. २ वस्तु

**पुटीन**–*पु.* [अिं.] लांबी; लुकण.

**पुठवार**–*क्रि. वि.* बाजूस; बगलेस.

**पुठवाल**–*पु.* मदतनीस; पाठीराखा.

**पुडिया**–*स्त्री.* पुडी.

**पुण्य**–*पु.* पुण्य. *वि.* पवित्र.

**पुतरा**–*पु.* बाहुला.

**पुतरिका, पुतरी-ली**–*स्त्री.* १ बाहुली. २ डोळ्यातील बाहुली. ३ कापड विणण्याचा माग. (मु) **पुतली फिर जाना**–डोळे फिरणें (मरणसमयीं).

**पुतला**–*पु.* बाहुला; पुतळा (खेळांतील). (मु.) **किसी का पुतला बाँधना**–अेखाद्याची बदनामी करणें. **पुतलीघर**=*पु.* कापडाची गिरणी. [काम किंवा मजुरी.

**पुताअी**–*स्त्री.* लिंपण्याचें, रंग देण्याचें

**पुत्त***–*पु.* पुत्र; मुलगा.

**पुत्रवधू**–*स्त्री.* सून. [विधवा स्त्री.

**पुनर्भू**—*स्त्री.* पुनर्विवाह केलेली

**पुनश्च**–*क्रि. वि.* १ पुनः; २ ताजाकलम (पत्रांतील).

**पुनि***–*क्रि. वि.* फिरून; पुनःपुन्हां.

**पुनी***–*पु.* पुण्यात्मा.

**पीढी**—स्त्री. १ पिढी; कुलपरंपरा. २ लहान पाट.
**पीतक**—पु. १ केशर. २ पिंवळें चंदन. ३ मद्य.
**पीतपुष्प**—पु. कण्हेर.
**पीन**-वि. १ जाड; स्थूल. २ संपन्न.
**पीनक**—स्त्री. [दे.] १ अफूची गुंगी. २ झोंपेची डुकली.
**पीना**—क्रि.स. १ पिणें; पान करणें. २ सहन करणें; राग गिळणें. ३ पिणें (दारू, विडी इ.). ४ शोषून घेणें. (मु.) **पी जाना**—राग गिळणें; सहन करणें.
**पीप**—स्त्री. पूं (फोडांतील).
**पीपर-ल**—पु. पिंपळाचें झाड.
**पीपर-ल**—स्त्री. पिंपळी (औषधी वनस्पति).
**पीपा**—पु. (१) पीप.
**पीयर**-वि. पिवळा.
**पीय-या***—पु. पति; भर्ता.
**पीयूष**-पु. १ अमृत. २ दूध.
**पीर-रा**—स्त्री. पीडा; दुःख.
**पीरी**—स्त्री. [फा.] १ म्हातारपण; वृद्धत्व. २ बुवाबाजी. ३ ठेका; मक्ता. ४ हुकमत; सत्ता.
**पील**-पु. [फा.] १ हत्ती. २ बुद्धिबळांतील मोहरा-हत्ती किंवा उंट.
**पीलपाँव**-पु. [फा.] हत्तीरोग.
**पीलवान**-पु. [फा.] माहूत.
**पीला**—वि. १ पिवळा. २ निस्तेज. पु. पिवळा किंवा सोनेरी रंग. **पीलापन**-पु. पिवळेपणा.
**पीलिया**-पु. पांडुरोग.
**पीलु**—पु. एक प्रकारचें औषधी [फळ.
**पीसना**-क्रि.स. १ दळणें. २ वांटणें. ३ भरडणें. ४ भुकटी करणें. ५ अत्यंत परिश्रम करणें.
**पीहर**-पु. माहेर.
**पुँछार***-पु. मोर; मयूर.
**पुंजी, पूँजी**—स्त्री. संचित धन.
**पुंस***—पु. पुरुष.
**पुंसवन***-पु. १ दूध. २ पुंस्त्वसंबंधीं संस्कार. (गर्भधारणा झाल्यानंतर तीन महिन्यांनीं करावयाचा)
**पुआ**-पु. मालपुआ; पाकांतील पुरी.
**पुआल**-पु. पाहा 'पयाल'.
**पुकार**-स्त्री. १ हांक; आरोळी. २ करुण हांक; धांवा.
**पुकारना**-क्रि. स. १ हांक मारणें. २ ध्यास घेणें. ३ मदतीसाठीं ओरडणें; धांवा करणें.
**पुक्कस**-पु. चांडाळ; अधम; डोंब.
**पुख***-पु. पुष्य; फूल.
**पुख़्ता**-वि. [फा.] दृढ; मजबूत.
**पुचकार**-स्त्री. १ चुचकार. २ चुंबतांना होणारा आवाज.

**पुचकारना**–*क्रि. अ.* [अनु.] चुचकारणें.

**पुचारा**–*पु.* [ अनु. ] १ सफेदी; चुना देण्याचें काम. २ रंग देण्याचा कुंचा. ३ आनंद देणारी गोष्ट. ४ खुशामत. ५ अुत्साह देणारे शब्द.

**पुच्छल**–*वि.* शेंपूट असलेला. (यौ.) **पुच्छल तारा**–धूमकेतु.

**पुच्छत्तर**–*पु.* विचारपूस करणारा; परमार्श घेणारा.

**पुछल्ला**-*पु.* १ लांब शेंपूट. २ कच्छपीं लागलेला माणूस.

**पुछार***–*पु.* पाहा 'पुच्छत्तर'.

**पुजना**–*क्रि. अ.* १ पूजिलें जाणें. २ आदर होणें.

**पुजवाना पुजाना**–*क्रि. स.* १ पूजा करविणें. २ स्वतःचा बडेजाव करविणें. ३ पैसे अुकळणें.

**पुजाअी**–*स्त्री.* पूजन. [ करणें.

**पुजाना**–*क्रि. स.* पूर्ण करणें; सफल

**पुजापा**–*पु.* पूजासाहित्य.

**पुजैया***–*पु.* पुजारी.

**पुट**–*पु.* आच्छादन.

**पुट**–*पु.* [ अनु. ] १ लेप; पुट. २ वस्त्राला रंग देण्यासाठीं बुडविण्याची क्रिया.

**पुटकी**–*स्त्री.* [ अनु. ] पदार्थ घट्ट करण्याकरितां पेरलेलें पीठ.

**पुटकी**–*स्त्री.* लहानसें गाठोडें; बोचकें.

**पुटास**–*पु.*[अिं.] पोटॅशियम परमँगनेट. [ठेवण्याजोगी रिकामी जागा.

**पुटी**–१ लहान द्रोण; वाटी. २ वस्तु

**पुटीन**–*पु.* [अिं.] लांबी; लुकण.

**पुठवार**–*क्रि. वि.* बाजूस; बगलेस.

**पुठवाल**–*पु.* मदतनीस; पाठीराखा.

**पुडिया**–*स्त्री.* पुडी.

**पुण्य**–*पु.* पुण्य. *वि.* पवित्र.

**पुतरा**–*पु.* बाहुला.

**पुतरिका, पुतरी-ली**-*स्त्री.* १ बाहुली. २ डोळ्यातील बाहुली. ३ कापड विणण्याचा माग. (मु) **पुतली फिर जाना**–डोळे फिरणें ( मरणसमयीं ).

**पुतला**–*पु.* बाहुला; पुतळा (खेळांतील ). ( मु. ) **किसी का पुतला बाँधना**–अेखाद्याची बदनामी करणें. **पुतलीघर**=*पु.* कापडाची गिरणी. [काम किंवा मजुरी.

**पुताअी**–*स्त्री.* लिंपण्याचें, रंग देण्याचें

**पुत्त***–*पु.* पुत्र; मुलगा.

**पुत्रवधू**–*स्त्री.* सून. [विधवा स्त्री.

**पुनर्भू**—*स्त्री.* पुनर्विवाह केलेली

**पुनश्च**–*क्रि. वि.* १ पुनः; २ ताजाकलम ( पत्रांतील ).

**पुनि***–*क्रि. वि.* फिरून; पुनःपुन्हां.

**पुनी***–*पु.* पुण्यात्मा.

पुनी*–स्त्री· पूर्णिमा; पौर्णिमा.
पुनी*–क्रि· वि· पुन्हां.
पुनीत–वि· पवित्र; शुद्ध.
पुन्यासिलोक*–वि· पुण्यश्लोक.
पुर–वि· पूर्ण; भरलेला.
पुर–पु· १ नगर; शहर. २ घर. ३ नक्षत्र. ४ देह. [प्रभाव-पूर्ण.
पुरअसर– वि· [फा. + अ· ]
पुरअिन*–स्त्री· १ कमळाचें पान २ कमळ.
पुरखा–पु· १ पूर्वज. २ कुटुंबांतील मोठा पुरुष. ( मु. ) पुरखे तर जाना–पूर्वजांना अुत्तम गति प्राप्त होणें. [ ३ प्रेरणा. ४ समर्थन.
पुरचक-स्त्री· १ चुचकारणें. २ अुत्साह.
पुरज़ा–पु· [ फा. ] १ चिठी. २ तुकडा; कात्रण. ३ अवयव; अंग. ( मु. ) चलता पुरज़ा– तरतरीत माणूस; चलाख. [जोरदार.
पुरजोश–वि· [ फा. ] आवेशपूर्ण;
पुरट*—पु· सुवर्ण; सोनें.
पुरवला–वि· १ पूर्वीचा; जुना. २ पूर्वजन्मींचा. [णारा; पौर्वात्य.
पुरबिया–पूर्वेकडील देशांत राह-
पुरवट–पु· मोट.
पुरवना*–क्रि· स· पूर्ण करणें; शेवटास नेणें; संपविणें.
पुरवा–पु· मातीचें लहान भांडें.
पुरवा–पु· लहान गांव.
पुरवा–पु· पूर्वेकडून येणारे वारे.
पुरवाअी–वैया– स्त्री· पूर्वेकडून येणारे वारे. [किंवा खोलीचें माप).
पुरसा–पु· अेक पुरुष (अुंचीचें
पुरसा–पु· [फा.] दारावर जाणें. (मृताचे नातलगांच्या सांत्वनार्थ).
पुरसिश–स्त्री· [फा.] विचारपूस.
पुरसी–स्त्री· पूसतपास, विचारणा.
पुरस्कार–पु· १ अिनाम; बक्षीस. २ आदर; सन्मान. ३ स्वीकार.
पुरा–अव्य. पूर्वी; प्राचीन काळीं.
पुरा–पु· गांव; वस्ती.
पुरातत्त्व—पु· अितिहास संशोधन.
पुरातत्त्ववेत्ता— पु· अितिहास संशोधक.
पुरातन—वि· प्राचीन; जुना. पु· विष्णु; पुराण पुरुष.
पुरातन-प्रेमी–पु· सनातनी.
पुराना–वि· १ प्राचीन. २ जुना; जीर्ण. ( मु. ) पुराना खुर्राट– १ म्हातारा. २ पुष्कळ पावसाळे पाहिलेला; अनुभवी. पुराना घाघ–पक्का धूर्त.
पुराना–क्रि· स· १ पूर्ण करविणें. २ पूजा करविणें. ३ अनुसरण करणें.
पुरारि–पु· शंकर.
पुरावृत्त–पु· प्राचीन अितिहास.

**पुरुख***–पु. पुरुष.
**पुरुषारथ***–पु. पुरुषार्थ.
**पुरुहूत**–पु. अिंद्र. [भटजी; भिक्षुक.
**पुरोहित**–पु. यज्ञ वगैरे करविणारा;
**पुल**–पु. [फा.] पूल; सेतु.
**पुलक**–पु. १ रोमांच. २ अेक रत्न.
**पुलकाअी***–स्त्री. प्रफुल्लता; आनंद.
**पुलकित**–वि. रोमांचित.
**पुलटिस**-स्त्री. [अिं.] पोटीस.
**पुलपुला**–वि. [अनु.] बिलबिलीत; मअू [दाबणें; कुसकरणें.
**पुलपुलाना**–क्रि. स. [अनु.]
**पुलाव**–पु. पुलाव ( मांस घालून केलेला भात ).
**पुलिंदा**–पु. बेंडोळें; बंडल.
**पुलिन**–पु. १ तट; किनारा.
**पुलिया**–स्त्री. [?] पडकी झोपडी; खिंडार. [(समुदायवाचक नाम)
**पुलिस**–पु. [अिं.] पोलिस. स्त्री.
**पुल्लिग**–पु. पुल्लिंग; पुंलिंग.
**पुश्त**–स्त्री. [फा.] १ पाठ; पृष्ठभाग. २ पिढी. (मु.) **पुश्त दर पुश्त** वंशपरंपरा. **पुश्तहा पुश्त**-कित्येक पिढ्यांपर्यंत. **पुश्तनामा**–पु. वंशावळ. **पुश्तैनी**–वि. पिढीजात; वंशपरंपरागत.
**पुश्तक**-पु. [फा.] दुगाणी. [२पुढा.
**पुश्ता**–पु. [फा.] १ बंधारा; बांध.
**पुश्ती**–स्त्री. [फा.] १ टेकण; टेकू; आधार. २ पुष्टिपत्र. ३ तक्क्या.
**पुश्तैनी**–वि. पाहा ‘पुश्त’.
**पुष्टअी**–स्त्री. पौष्टिक; शक्तिवर्धक औषध. [कामदेव.
**पुष्पधनुर्धर-पुष्पधन्वा**–पु. मदन;
**पुष्पित**–वि. विकसित; अुमलेला.
**पुसाना***–क्रि. अ. १ शोभणें; योग्य दिसणें. २ परवडणें.
**पुस्तक**-स्त्री. पुस्तक. [आकाराचें.
**पुस्तकाकार**– वि. पुस्तकाच्या
**पुस्तकालय**–पु. ग्रंथालय.
**पुहकर**–पु. पुष्करिणी; तलाव.
**पुहप-पुहुप**–पु. फूल; पुष्प.
**पुहुमी***–स्त्री. पृथ्वी.
**पुहुरेनु**-पु. पुष्प-पराग.
**पूँछ**–स्त्री. शेपूट.
**पूँछना**–क्रि. स. विचारणें; पुसणें.
**पूँजी**–स्त्री. १ भांडवल. २ संचित धन; संपत्ति. ३ धन; पैसा. (यौ.) **पूँजीपति**– भांडवलदार.
**पूँजीदार**–पु. [सं.+फा.] भांडवलदार.
**पूँजीवाद**–पु. भांडवलशाही.
**पूँठ, पूठि***–स्त्री. पाठ.
**पूआ**–पु. मालपुवा; पाकवलेली पुरी.
**पूच**-वि. [फा.] १ रिकामा; रिक्त. २ व्यर्थ; फाजील. ३ तुच्छ.

४ नीच; हलकट.

**पूछ**–*स्त्री*. १ विचारपूस. २ आदर; मान. ३ शोध; तपास. **पूछताछ, पूछपाछ** – *स्त्री*. विचारपूस; पूसतपास.

**पूछना**—*क्रि. स*. १ विचारणें; प्रश्न करणें. २ शोध करणें; तपास काढणें. समाचार घेणें. ४ आदर किंवा सन्मान करणें.

**पूछरी***–*स्त्री*. शेपूट.

**पूजना**–*क्रि. स*. १ आराधना करणें. २ आदरसत्कार करणें; लांच देणें.

**पूजना**–*क्रि. स*. १ पूर्ण होणें; भरणें. २ समाप्त होणें.

**पूजनीय**––*वि*. पूज्य; आदरणीय.

**पूजा**–*स्त्री*. पूजा; आराधना. (यौ.) **पूजापाठ**–पूजाअर्चा.

**पूडी**–*स्त्री*. पुरी.

**पूत**–*वि*. पवित्र; शुद्ध.

**पूत**–*पु*. पुत्र; मुलगा.

**पूतना**—*स्त्री*. पूतना (श्रीकृष्णाला मारण्यासाठी कंसानें पाठविलेली राक्षसी.) [ २ दुर्गंधि.

**पूति**–*स्त्री*. १ पवित्रता; शुद्धता.

**पून***—*पु*. पुण्य.

**पूनी**–*स्त्री*. पेळू.

**पनो***–*स्त्री*.पूर्णिमा. [(पूरण अि).

**पूर**–*पु*. १पूर्णत्व. २भरावयाचे पदार्थ

**पूरक**–*वि*. पूर्ण करणारा.

**पूरन***–*वि*. पूर्ण.

**पूरनपरब***–*पु*. पूर्णिमा.

**पूरनपुरी**–*स्त्री*. पुरणपोळी.

**पूरब**—*पु*. पूर्व. **पूरबी**–*वि*. पूर्वेकडील; पौर्वात्य. [ पूर्वजन्मींचा.

**पूरबला**–*वि*. १ प्राचीन; जुना. २

**पूरा**––*वि. पु*. १ पूर्ण; भरलेला. २ संपूर्ण; समस्त; सगळा. (मु.) **गाँठका पूरा**–श्रीमंत. **बातका पूरा**–दृढ निश्चयी; पक्का; मजबूत.

**पूरी**–*स्त्री*. १ पुरी. २ मृदंग, ढोल वगैरेंवर बसविलेला कातड्याचा तुकडा.

**पूर्वकालिक क्रिया**–*स्त्री*. अून प्रत्ययान्त धातु साधित अव्यय. (करके= करून)

**पूर्वज**–*पु*. पूर्वपुरुष.

**पूर्वाअी**—*वि*. पूर्व दिशेचा.

**पूळा**–*पु*. पेंढी.

**पूस**–*पु*. पौष महिना.

**पृथक्**–*वि*. वेगळा; अलग. *क्रि. वि*- स्वतंत्रपणें; अलगपणें.

**पेंडुकी** —*स्त्री*. १ पारवा. २ सोनाराची फुंकणी.

**पेंदा**–*पु*. बूड; तळभाग. [ वेतन.

**पेंशन**–*स्त्री*. [अि.] पेन्शन; निवृत्ति-

**पेखक**–*पु*. प्रेक्षक.

**पेखना***–*क्रि. स.* १ पाहणें; अवलोकन करणें. २ पारख करणें.

**पेच**–*पु.* [ फा. ] १ पेंच; फिरकी. २ डावपेंच. ३ कोडें; कूट प्रश्न. ४ विवंचना. ५ यंत्र. ६ कुस्तीचा डाव. ७ स्क्रू. ८ युक्ति; अुपाय. ९ शिरपेंच; तुरा.

**पेचक**—*स्त्री.* [ फा. ] सुताची गुंडी.

**पेचकश** *पु.* [ फा. ] स्क्रूड्रायव्हर; बूच काढण्याचा स्क्रू. [ द्वेष.

**पेचताब**—*पु.* [ फा. ] अढी; राग;

**पेचवान**—*पु.* [ फा. ] हुक्क्याची लांब नळी.

**पेचिश**–*स्त्री.* [फा.] मुरडा; पोटांत येणारी कळ.

**पेचीदा–ला**–*वि.* [ फा. ] १ पेंचदार. २ बिकट; कठिण.

**पेज**— *पु.* [ अिं. ] पृष्ठ; पान ( पुस्तकाचें ).

**पेट**–*पु.* पोट. ( मु. ) **पेट काटना**–पोटाला चिमटा घेणें. **पेट का पानी न पचना**–पोटांत न राहणें ( गुप्त गोष्ट ). **पेटका हलका**–हलक्या मनाचा. **पेट की बात**–रहस्य. **पेट चलना**–जुलाब होणें. **पेट जलना**-अतिशय भूक लागणें. **पेट पालना**–जीवन-निर्वाह करणें. **पेट फूलना**– १ अेखाद्या गोष्टीसाठीं अतिशय अुत्सुक होणें. २ पोट फुगणें. **पेट मारकर मर जाना**–आत्मनाश करणें. **पेट में दाढी होना**–लहानपणापासून चतुर असणें.



**पेटक**–*पु.* १ पेटारा. २ ढेर; समूह.

**पेटागि***–*स्त्री.* जठराग्नि; भूक.

**पेटार्थी–र्थू**–*वि.* पोटभरू; पोटार्थी.

**पेटी**–*स्त्री.* १ कमरपट्टा; २ धोपटी.

**पेटू**–*वि.* अधाशी.

**पेठा**–*पु.* [ दे. ] १ कोहळा. २ कोहळ्याची वडी ( मिठाअी ).

**पेड**–*पु.* झाड; वृक्ष. [ धड; शरीर.

**पेडी**–*स्त्री.* १ झाडाचें खोड. २

**पेडू**–*पु.* १ ओटीपोट. २ गर्भाशय.

**पेम***–*पु.* प्रेम; प्रीति.

**पेरना**–*क्रि. स.* १ पिळणें; रस, तेल काढणें. २ सतावणें; त्रास देणें. ३ अेखाद्या कामाला वेळ लावणें.

**पेरना**–*क्रि. स.* १ प्रेरणा करणें. २ पाठविणें.

**पेलना**–*क्रि. स.* १ आंत दाबणें; घुसडणें. २ धक्का देणें; ढकलणें. ३ जबरदस्ती करणें. ( मु. ) **डंड पेलना**–व्यायामासाठीं जोर काढणें. [ सोडणें.

**पेलना**–*क्रि.स.* प्रवृत्त करणें; अंगावर

**पेश**–*पु.* [ फा. ] १ पुढचा

पुढची बाजू २ फारशीमधील अुकाराचें चिन्ह. *क्रि· वि·* पुढें; समोर. (मु.) **पेश आना**–१ पुढें येणें. २ व्यवहार करणें; वागणें. **पेश करना**–१ पुढें करणें; समोर आणणें. २ नजराणा देणें; भेट देणें. **पेश जाना** अथवा **चलना**–अधिकार चालणें.

**पेश–कद्‌मी**–*स्त्री·* [फा.] १ पुढाकार; नेतृत्व. २ आक्रमण.

**पेश–कब्ज़**–*स्त्री·* [फा.] कट्यार.

**पेश–कश**–*स्त्री·* [फा.] १ नजराणा. २ सूचना (प्रपोझल).

**पेशकार**–*पु·* [फा.] शिरस्तेदार; न्यायाधीशापुढें कागद ठेवणारा कारकून; मुतालिक.

**पेशखेमा**– *पु·* [फा.] १ सैन्याचें सामान; सरंजाम. २ सैन्याची आघाडी.

**पेशगी**—*स्त्री·* [फा.] तसलमात; कांहीं कामासाठीं अगाअू दिलेली रक्कम. [कथन.

**पेश–गोअी**–*स्त्री·* [फा.] भविष्य-

**पेशतर**—*क्रि· वि·* [फा.] पूर्वी; अगोदर.

**पेशबंदी**–*स्त्री·* [फा.] पूर्वतयारी; अगोदर केलेला बंदोबस्त किंवा बचावाची युक्ति.

**पेशराज**–*पु·* [फा.+सं.] १ दगड वाहणारा मजूर. २ गवंडी

**पेशरौ**—*पु·* [फा.] अग्रगामी; मार्गदर्शक.

**पेशवा**–*पु·* [फा.] नेता; पुढारी.

**पेशवाअी**—*स्त्री·* १ सामोरें जाणें. २ पेशव्यांचा किताब. ३ पेशव्यांचा शासनकाल. [तिणीचा झगा.

**पेशवाज़**—*स्त्री·* [फा.] कलावं-

**पेशा**–*पु·* [फा.] धंदा, व्यवसाय.

**पेशानी**—*स्त्री·* [फा.] १ कपाळ. २ भाग्य; नशीब.

**पेशाब**—*पु·* [फा.] मूत्र; लघवी.

**पेशाबखाना**—*पु·* मुतारी.

**पेशावर**—*पु·* [फा.] व्यापारी. *वि·* धंदेवाअीक.

**पेशी**–*स्त्री·* [फा.] १ खटल्याची सुनावणी. २ पुढें मांडणें; ठेवणें.

**पेशी**— *स्त्री·* १ वज्र. २ म्यान. ३ गर्भाची वार.

**पेशीनगोअी**- *स्त्री·* पाहा 'पेश गोअी'

**पेश्तर**—*क्रि· वि·* [फा.] पूर्वी; अगोदर; प्रथम.

**पेशोवर**—*वि·* पाहा 'पेशावर'.

**पैंजनी**- *स्त्री·* [सं.+अनु.] पैंजण.

**पैंठ**–*स्त्री·* १ बाजारपेठ. २ दुकान. ३ बाजाराचा दिवस. ४ दुसऱ्यांदां पाठविलेली हुंडी.

**पैंडा**–पु॰ १ मार्ग; रस्ता. २ तबेला. ३ प्रणाली; पद्धत. (मु.) **पैंडे पडना**–हात धुवून पाठीस लागणें;
**पैंत***—स्त्री॰ पैज; शर्यत.
**पैंतरा**–पु॰ पवित्रा; पोझ. (यौ.) **पैंतरेबाजी**—डावपेंच.
**पैंती**—स्त्री॰ पवित्रक.
**पैंयाँ***—स्त्री॰ पाय; चरण
**पैंसठ**—वि॰ पासष्ट.
**पै***–अव्य. १ पण; परंतु. २ अवश्य; जरूर. ३ नंतर. (यौ.) **जो पै**–जर. **तो पै**—तर मग; अशा स्थितींत. [निकट. २ बाजूस; कडे.
**पै**—अव्य. १ जवळ; समीप;
**पै**—अव्य. १ तृतीयेचा प्रत्यय. २ वर; वरती.
**पैकर**—पु॰ [फा.]१ शरीर.२ चित्र.
**पैकरमा***—स्त्री॰ प्रदक्षिणा.
**पैकार**–पु॰ [फा.] लहान व्यापारी; किरकोळ मालाचा व्यापारी.
**पैखाना**–पु॰ [फा.]संडास; शौचकूप.
**पैग**—पु॰ कदम; पाऊल.
**पैग़ाम**–पु॰ [फा.] संदेश; निरोप.
**पैजामा**—पु॰ [फा.] विजार.
**पैज़ार**—स्त्री॰ [फा.] जोडा; पादत्राण. (यौ.) **जूती पैज़ार**–जोडाजोडी; जोड्यानें मारामारी.
**पैठ**—स्त्री॰ प्रवेश; शिरकाव.
**पैठना**—क्रि.अ॰ शिरणें; प्रवेश करणें.
**पैठाना**—क्रि॰ स॰ घेऊन जाणें; प्रवेश करविणें. [प्रवेशद्वार.
**पैठार***—पु॰ १ प्रवेश. २ फाटक;
**पैडी**—स्त्री॰ १ पायरी; वर चढतांना पाय ठेवण्यासाठीं केलेली पायरी. २ मोटेचा रस्ता; धाव. ३ थारोळें.
**पैतरा**—पु॰ १ पवित्रा; उभें राहण्याची विशिष्ट स्थिति. २ पावलाचें चिह्न. (मु.) **पैतरा बदलना**–पवित्रा बदलणें.
**पैताना**–पु॰ पायथें; पायाकडील बाजू.
**पै-दर-पै**—क्रि॰ वि॰ [फा.] १ क्रमवार. २ लागोपाठ.
**पैदल**—वि॰ पायीं चालणारा. पु॰ १ पायदळांतील शिपाई. २ प्यादें क्रि॰ वि॰ पायीं पायीं.
**पैदा**—वि॰ [फा.] १ उत्पन्न झालेला. २ प्राप्त; मिळालेला. (मु.) **पैदा होना**–उद्भवणें.
**पैदाइश**—स्त्री॰ [फा.] उपज; उत्पत्ति. **पैदाइशी**–वि॰ १ जन्मतः; जन्मापासूनचा. २ स्वाभाविक. [उत्पन्न.
**पैदावार**–स्त्री॰[फा.] पीक; शेतांतील

**पैना**—*वि.* तीक्ष्ण धारेचा. *पु.* बैल हांकण्याची लहान काठी. [ करणें.
**पैनाना**–*क्रि. स.* धार लावणें; तीक्ष्ण
**पैमाअिश**–*स्त्री.*[फा.] मोजणी;माप.
**पैमाना**—*पु.* [ फा. ] माप; मापण्याचें साधन.
**पैमाल***–*वि.* [ फा. ] पददलित; पायाखालीं चिरडलेला.
**पैया**—*पु.* १ निःसत्व धान्य. २ हीनदीन व्यक्ति. [ पदचिह्न.
**पैर**—*पु.* १ पाय. २ पाअूल. ३
**पैर**–*पु.* खळें; कापणीनंतर शेतांत धान्य रचून ठेवतात ती जागा.
**पैरना**—*क्रि. अ.* पोहणें.
**पैरवी**—*स्त्री.* [ फा. ] १ कोर्टांत खटल्याची मांडणी; समर्थन. २ अनुगमन; मागोमाग जाणें. ३ शिफारस. **पैरवीकार, पैरोकार** –*पु.* खटल्याची मांडणी करणारा.
**पैरा**—*पु.* १ पायगुण. २ पायांत घालण्याचें कडें. ३ तात्पुरता जिना.
**पैराअी**–*स्त्री.* पोहणें. **पैराक**–*पु.* पोहणारा.
**पैराव**–*पु.* डोह; अथांग पाणी.
**पैराहन**—*पु.* [ फा. ] पैरण; लांब सदरा. ९ बटनांचा लांब कोट.
**पैरो**–*पु.* [ फा. ]अनुयायी; शिष्य.
**पैवंद**—*पु.* [ फा. ] १ ठिगळ; २ लिखाणाची पुरवणी. ३ झाडाचें कलम. **पैवंदी**–*वि.* १ कलम लावून तयार झालेला; कलमी. २ जारज; अकुलीन. [प्रकारचें फळ.
**पैवंदी**–*पु.* [ फा. ] सताळू; अेक
**पैवस्त**—*वि.* [फा.] व्यापणारा; मिळून गेलेला.
**पैशाचिक**—*वि.* पिशाचासंबंधीं; भुताचें; भयंकर; राक्षसी. [प्रयत्न.
**पैसरा**–*पु.* १ बखेडा; झंझट. २
**पैसा**–*पु.* १ पैसा. २ संपत्ति.
**पैसेंजर**- *पु.* [अिं.] अुतारू.
**पोंकना**—*क्रि. स.* [ अनु. ] १ जुलाब होणें. २ अत्यंत भयभीत होणें; घाबरणें. *पु.* जनावरांना हगवण लागते तो रोग.
**पोंका**–*पु.* [ दे. ] फुलपांखरू.
**पोंगा**–*पु.* १ बांबूची नळी. २ टिनचें नळकांडें ( कागदपत्र ठेवण्याचें ). *वि.* १ पोकळ. २ मूर्ख; बुद्धिहीन.
**पोंछना**–*क्रि. स.* १ पुसणें; कोरडें करणें. २ झटकणें; साफ करणें. *पु.* अंग पुसण्याचा टॉवेल; रुमाल. **पोंछनी**–*स्त्री.*
**पोआ**–*पु.* सापाचें पिल्लूं. [पालेभाजी.
**पोअी**–*स्त्री.* [ दे. ] अेक पावसाळी
**पोखना***-*क्रि.स.* पालनपोषण करणें.
**पोखरा**–*पु.* तळें; लहान तलाव.

**पोच**–*वि.* [फा.] १ तुच्छ; क्षुद्र. २ अशक्त; क्षीण. **पोची***–*स्त्री.* नीचता; हलकटपणा.

**पोटना***–*क्रि. स.* गोळा १ करणें; जमा करणें. २ वश करणें; भुरळ पाडणें.

**पोटली**·*स्त्री.*·पुरचुंडी; लहान गाठोडें.

**पोढा**–*पु.* १ धष्टपुष्ट; दृढ; मजबूत. २ कठिण; कठोर. (मु.) **जी पोढा करना**–मन दगडासारखें करणें; मन कठोर करणें.

**पोढाओ**–*स्त्री.* दृढता; सामर्थ्य.

**पोत**–*पु.* १ पक्ष्याचें अगर गुराचें पिल्लूं. २ रोपटें. ३ नाव; जहाज. ४ पोत; वीण (कापडाची).

**पोत**–*स्त्री.* कांचमणि.

**पोत**–*पु.* प्रवृत्ति; स्वभाव.

**पोत**–*पु.* [फा.] जमिनीचा महसूल.

**पोतडा**—*पु.* दुपटें.

**पोतदार**–*पु.* [फा.] खजिनदार.

**पोतना**–*क्रि. स.* १ लिंपणें; सारवणें. २ चोपडणें; माखणें.

**पोता**–*पु.* नातू; मुलाचा मुलगा. **पोती**–*स्त्री.* नात; मुलाची मुलगी.

**पोता**—*पु.* [फा.] १ अंडकोष; वृषण. २ जमिनीचा महसूल. [कुंचा.

**पोता**–*पु.* १ पोतेरें. २ रंगदेण्याचा

**पोथा**–*पु.* १ मोठी पोथी (व्यंगार्थी). २ कागदाचा मोठा गठ्ठा; भारूड.

**पोथी**—*स्त्री.* पोथी; पुस्तक.

**पोना**— *क्रि. स.* थापटणें किंवा बनविणें. (भाकरी)

**पोना**-*क्रि. स.* गुंफणें; ओवणें.

**पोपला**–*वि.* [अनु.] १ चेपटलेला; चिपटा झालेला. २ बोचरा; बोथरा.

**पोपलाना**– *क्रि. अ.* तोंडाचें बोळकें होणें; दांत पडून बोथरें होणें.

**पोपली**–*स्त्री.* [अनु.] पुंगी; पिंगाणी (आंब्याची).

**पोया**— *पु.* १ सापाचें पिल्लूं. २ वृक्षाचें रोप. ३ मूल.

**पोर**—*स्त्री.* १ पेरें; कांडें. २ जोड; सांधा. (दोन पेऱ्यांतील सांधा). ३ पाठीचा कणा.

**पोल**–*पु.* १ पोकळी; अवकाश. २ पोकळपणा. **पोल खुलना**–रहस्य फुटणें; बेंड फुटणें. [अंगण.

**पोल**– *पु.* १ फाटक; प्रवेशद्वार. २

**पोला**–*वि.* १ पोकळ. २ निःसत्त्व; कुचकामाचा.

**पोशाक**–*स्त्री.* [फा.] पोशाख.

**पोशिश**—*स्त्री.* [फा.] पोशाख; पेहराव.

**पोशीदा**–*वि.* [फा.] गुप्त.

**पोशीदगी**–*स्त्री.* गोप्य; रहस्य.

**पोषण**—*पु.* पोसणें; वाढविणें.

**पोसना**–क्रि.स. पोसणें; पालन करणें.

**पोस्त**–स्त्री. [फा.] १ कातडें. २ टरफल. ३ अफूचें झाड.

**पोस्ता**–पु. [फा.] अफूचें झाड. **पोस्ते का दाना**–खसखस.

**पोस्ती**–पु. [फा.] १ अफूचें फळ वाटून नशा करणारा माणूस. २ आळशी मनुष्य.

**पोस्तीन**—पु. [फा.] फरदार कोट.

**पोहना**–क्रि. स. १ ओवणें; गुंफणें. २ टोंचणें; भोंक पाडणें. ३ लिंपणें. ४ खुपसणें; ठोसणें. ५ वाटणें; घोटणें.

**पोंडा**—पु. जाड ऊंस.

**पौ**–स्त्री. किरण; ज्योति. (मु) **पौ फटना**-दिवस अुगवणें; अुजाडणें.

**पौ**–स्त्री. पाणपोअी.

**पौ**–स्त्री. दान (सोंगट्याचें) (मु) **पौ बारह होना**—१ जिंकण्याचा डाव पडणें. २ फायद्याची संधि मिळणें. [शेराचें भांडें.

**पौआ–वा**–पु. १ पावशेर. २ पाव

**पौढना**–क्रि. अ. डोलणें.

**पौढना**–क्रि.अ. निजणें; आडवें होणें.

**पौढाना**–क्रि.स. निजाविणें; थोपटणें.

**पौद**—स्त्री. रोप; रोपटें.

**पौदा, पौधा**–पु. रोप; रोपटें. २ कोवळें झाड; क्षुप.

**पौन**—पु. १ पवन; वारा. २ प्राण; जीव. भूत; प्रेत. [भाग.

**पौन**—वि. पाअूण; तीन चतुर्थांश

**पौना**—पु. पाअूणकीचा पाढा.

**पौनी**—स्त्री. लग्नकार्यांत अिनाम घेणारे न्हावी, धोबी अि.

**पौर, पौरि–री**–स्त्री. १ देवडी. २ दार. ३ पायरी. ४ खडावा; पादुका.

**पौरा**—पु. पायगुण.

**पौरुष**—पु. १ पुरुषत्व; पुरुषार्थ. २ सामर्थ्य; पराक्रम.

**पौलाद**—पु. [फा.] पोलाद.

**पौष्टिक**–वि. पुष्टिकारक; सामर्थ्य-कारी; बलवर्धक.

**पौसरा–ला**—पु. पाणपोअी.

**पौहारी**—पु. दुग्धाहारी.

**प्याअू**—पु. पाणपोअी.

**प्याज़**—पु.; स्त्री. [फा.] कांदा.

**प्याज़ी**—वि. [फा.] फिकट गुलाबी (रंग).

**प्यार**—पु. प्रेम; स्नेह.

**प्यारा**—वि. प्रिय; आवडता.

**प्याला**—पु. [फा.] पेला.

**प्यास**—स्त्री १ पिपासा; तहान. २ तीव्र अिच्छा; कामना. **प्यासा**–वि. तहानेलेला.

**प्यो***–पु. पति; भर्ता; स्वामी.

**प्योसर**—पु. खरवस.

**प्योसार**–पु. माहेर.
**प्यौर**—पु. प्रियतम; पति.
**प्रकांड**—वि. मोठा; विस्तृत.
**प्रकाश**—पु. प्रकाश; अुजेड.
**प्रकीर्ण**—वि. विस्तृत.
**प्रकृति**–स्त्री. १ निसर्ग. २ स्वभाव.
**प्रकोप**–पु. १ कंप; हुडहुडी. २ प्रकोप.
**प्रकोष्ठ**–पु. १ मोठें अंगण. २ दालन. ३ मुख्य दरवाजाजवळची खोली. ४ हाताचें मनगट.
**प्रगट**–वि. प्रकट; जाहीर; व्यक्त.
**प्रगति**–स्त्री. प्रगति; पुढें जाणें. (यौ.) **प्रगतिशील**–पुरोगामी.
**प्रचार**—पु. प्रचार; प्रसार.
**प्रजंत***—अव्य. पर्यंत.
**प्रजरना***–क्रि. अ. जळणें.
**प्रजा**—स्त्री. प्रजा; जनता.
**प्रजातंत्र**-स्त्री. लोकसत्ता; लोकशाही. (यौ.) **प्रजातंत्रवाद**–लोकशाही.
**प्रण**—पु. पण; प्रतिज्ञा.
**प्रणाम**—पु. नमस्कार.
**प्रणिधि**—पु. गुप्त हेर; दूत.
**प्रणोदित**–वि. प्रेरित; प्रेरणा देण्यांत आलेला.
**प्रताप**—पु. १ तेज. २ अैश्वर्य. ३ पराक्रम.
**प्रतारणा**—स्त्री. फसवणूक.
**प्रतिच्छाया**—स्त्री. प्रतिबिंब.
**प्रतिदान**—पु. १ दानाची परत फेड. २ मोबदला. ३ देवाण घेवाण.
**प्रतिनिधि**—पु. प्रतिनिधि.
**प्रतिपार-ल***— पु. पालनपोषण करणारा.
**प्रतिपालित**–वि. पाळलेला; बाळगलेला.
**प्रतिबिंबवाद**—पु. गूढवाद.
**प्रतिभू**—पु. जामीन राहणारा.
**प्रतियोगिता**—स्त्री. १ चढाओढ. २ विरोध. ३ साहाय्यक.
**प्रतियोगी**—पु. १ विरोधी; शत्रु. २ साहाय्यक.
**प्रतिलिपि**—स्त्री. नक्कल.
**प्रतिवाद**—पु. १ खंडन; विरोध. २ वादविवाद.
**प्रतिशोध**—पु. सूड; बदला.
**प्रतिषेध**—पु. १ निषेध; मनाअी. २ खंडन. ३ किल्ल्याचें फाटक.
**प्रतीक**–पु. चिह्न; प्रतिमा; प्रतिरूप.
**प्रतोद**–पु. चाबूक.
**प्रतोली**—स्त्री. १ रुंद सडक. २ बोळ; गल्ली.
**प्रत्यंचा**–स्त्री. धनुष्याची दोरी किंवा तांत.
**प्रत्यक्ष**—वि. दृष्टीसमोर; स्पष्ट.
**प्रत्युत**—अव्य. अुलट; अितकेंच नव्हे तर.
**प्रदान**—पु. देणें; दान; भेट.
**प्रधान**—वि. मुख्य; प्रमुख.
**प्रधानता**—स्त्री. प्राधान्य; प्रामुख्य.
**प्रनत**—वि. प्रणत; नम्र; दीन.

**प्रपंच**–पु. १ ढोंग; अवडंबर; जंजाल. २ विस्तार. ३ जग; सृष्टि.
**प्रपात**—पु. १ धबधबा. २ डोंगराचा कडा. [योजना; व्यवस्था.
**प्रबंध**–पु. १ निबंध; लेख. २ अुपाय;
**प्रबल**—वि. प्रबळ; जोरदार.
**प्रबोधना***—क्रि. स. १ झोंपेंतून जागें करणें. २ सचेत करणें. ३ शिकविणें; समजाविणें
**प्रभंजन**—पु. १ वादळ; वावटळ. २ नाश. ३ विध्वंस.
**प्रभूत**—वि. अुत्पन्न; अुद्भूत.
**प्रमत्त**—वि. वेडा; मत्त; अुन्मत्त.
**प्रमाण**—पु. १ पुरावा. २ प्रमाण.
**प्रमाण-पत्र**–पु. सनद; सर्टिफिकेट; दाखला.
**प्रमाणित**—वि. शाबित; सिद्ध; खरा; विश्वसनीय.
**प्रमाद्**—पु. चूक; अपराध.
**प्रमानना***-क्रि. स. १ प्रमाण मानणें. २ सिद्ध करणें.
**प्रमित**—वि. थोडें; अल्प.
**प्रमोद्**—पु. आनंद.
**प्रयंक***—पु. १ पर्यंक; पलंग. २ अेक प्रकारचें आसन.
**प्रयंत***–अव्य. पर्यंत. [धडपडणारा.
**प्रयत्नशील**–वि. प्रयत्न करणारा;
**प्रयास**—पु. प्रयत्न; धडपड.
**प्रयुक्त**—पु. समावेश केलेला; सम्मीलित.
**प्रयोग**–पु. प्रयोग; अुपयोग; वापर.
**प्रयोजन**—पु. १ हेतु; अुद्देश. २ अर्थ; आशय; तात्पर्य.
**प्ररोहण**-पु. १ आरोहण. २ अुगवणें.
**प्रलंबन**—पु. आधार.
**प्रलय**—पु. प्रलय; विनाश; अंत.
**प्रलेप**—पु. लेप; पोटीस.
**प्रलोभ-प्रलोभन**–पु. लालूच; लोभ.
**प्रवंचना**—स्त्री. फसवणूक.
**प्रवास**—पु. परदेशवास. **प्रवासी**–वि. परदेशवासी; विदेशी.
**प्रवाहित**—वि. वाहणारा.
**प्रवीर**—वि. शूर; योद्धा.
**प्रवेशिका**—स्त्री. दाखला.
**प्रव्रज्या**—स्त्री. संन्यास.
**प्रशंस***—स्त्री. प्रशंसा.
**प्रशंसक**–पु. खुशामत करणारा. स्तुतिपाठक.
**प्रशस्ति**—स्त्री. १ शिफारस. २ स्तुति; प्रशंसा. **प्रशस्तिपाठ**–यशोगान; गुणगान. [डाहाळी.
**प्रशाखा**–स्त्री. लहान फांदी;
**प्रश्न**—पु. प्रश्न.
**प्रसंग**–पु. १ संबंध; मेळ; मिलाफ. २ संदर्भ; संगति. ३ विषय; गोष्ट. ४ योग्य वेळ; संधि. ५ कारण;

हेतु. ६ प्रकरण; विषयानुक्रम. ७ अर्थविस्तार.

**प्रसन्न**—*वि.* आनंदित; खुश.

**प्रसव**—*पु.* १ जन्म; २ संतान.

**प्रसाद्**-*पु.* १ प्रसाद. २ कृपा; दया.

**प्रसार**—*पु.* प्रसार. **प्रसारित**—*वि.* पसरविलेला; ध्वनिक्षेपित केलेला.

**प्रसून**—*पु.* १ फूल. २ फळ.

**प्रसेक**—*पु.* सिंचन; सडा.

**प्रस्वेद्**——*पु.* घाम; स्वेद.

**प्रस्तर**—*पु.* १ दगड. २ थर.

**प्रस्ताव**—*पु.* ठराव.

**प्रस्तुत**—*वि.* १ हजर; उपस्थित. २ सांगितलेला; उक्त. ३ तयार; सिद्ध.

**प्रस्थान**-*पु.* गमन; यात्रा; रवानगी.

**प्रस्वेद्**—*पु.* घाम. [घड्याळजी.

**प्रहरी**—*पु.* १ पहारेकरी. २

**प्रांजल**—*वि.* सरळ; समान.

**प्राकृतिक**-*वि.* नैसर्गिक; स्वाभाविक.

**प्राण**—*पु.* प्राण.

**प्रायद्वीप**—*पु.* द्वीपकल्प.

**प्रार्थनापत्र**—*पु.* विनंती-पत्र; अर्ज.

**प्रार्थी**—*वि.* प्रार्थना करणारा; निवेदन करणारा.

**प्रियतम**—*पु.* पति; स्वामी. *वि.* आवडता; प्रिय.

**प्रीत**—*वि.* प्रीतियुक्त *स्त्री.* प्रीति.

**प्रीतम**—*पु.* प्रियतम; प्रियकर.

**प्रीतिभोज**—*पु.* मेजवानी;जेवणावळ.

**प्रेक्षागृह**-*पु.* नाटकगृह. [प्रेमळ.

**प्रेम**—*पु.* प्रेम; प्रीति. **प्रेमल**—*वि.*

**प्रेमी**—*पु.* प्रेम करणारा.

**प्रेरक**-*वि.*प्रेरणा देणारा;पाठविणारा.

**प्रेषक**—*पु.*पाठविणारा. [२ लपलेला.

**प्रोत**—*वि.* १ खूप मिसळलेला;

**प्लेग**—*पु.* [ इं. ] प्लेगचा रोग.

**प्लेटफॉर्म**—*पु.* [ इं ] फलाट; प्लॅटफॉर्म.

## फ

**फंका***—*पु.*[अनु.] फक्की. [फक्की.

**फंकी**-*स्त्री.* १फांकण्याचें औषध. २

**फंग, फग**—*पु.* फांस; बंधन.

**फंद्**—*पु.* १ बंधन. २ फांस; जाळें. (यौ.) **फँदवार**-*वि.*जाळें पसरणारा माणूस; पारधी.

**फंदना**—*क्रि. अ.* फशीं पडणें; जाळयांत अडकणें.

**फंदा**—*पु.* जाळें; पाश. (मु.) **फंदा लगाना**—जाळें पसरणें.

**फंदाना**—*क्रि. स.* जाळयांत अडकविणें; फसविणें; गुंतविणें.

**फँसना**–*वि. अ.* अडकणें· गुंतणें; जाळयांत सापडणें.

**फँसाना**–*क्रि. स.* अडकविणें; जाळयांत पकडणें; फसविणें.

**फँसीहारा**–*वि.* जाळयांत पकडणारा.

**फक्क**–*वि.* १ पांढरा; स्वच्छ. २ फिकट. (मु.) **रंग फक्क हो जाना** अथवा **पड जाना**–घाबरणें; चेहरा फटफटीत पडणें.

**फक**–*वि.* [*अ.*] भीतीमुळें ज्याचा चेहरा फिका झाला आहे असा.

**फकत**–*क्रि. वि.* [*अ.*] फक्त; केवळ; मात्र.

**फ़क़ीर**–*पु.* [*अ.*] फकीर; साधु; भिक्षुक. **फ़क़ीरी**–*स्त्री.* निर्धनता; त्याग.

**फक्कड**–*वि.* १ मस्त; बेपर्वा. २ दरिद्री. [२ फसवेगिरी.

**फक्किका**–*स्त्री.* १ कूटप्रश्न; कोडें.

**फक्र**–*पु.* [*अ.*] १ दैन्य; दारिद्र्य. २ साधुत्व; फकिरी. ३ अल्पसंतोषीपणा; अधिक हांव नसणें.

**फख़र, फख्र**–*पु.* [*अ.*] १ गौरव; अभिमान; गर्व. २ अभिमानास्पद गोष्ट.

**फगुआ**–*पु.* १ होळी; शिमगा. २ फाल्गुन महिन्यांतील लोकांचा अुल्हास. ३ फाल्गुन महिन्यांत गाअिलें जाणारें अश्लील गीत. (मु.) **फगुआ खेलना** अथवा **मनाना**–होळीच्या अुत्सवांत रंग, गुलाल अुधळणें.

**फगुनाहट**–*स्त्री.* फाल्गुनांत वाहणारा सोसाट्याचा वारा.

**फजर**–*स्त्री.* [*अ.*] सकाळ; पहांट.

**फज़्ल**–*पु.* [*अ.*] १ कृपा; दया; अनुग्रह. २ आधिक्य; वैपुल्य.

**फ़ज़ा**–*स्त्री.* पाहा ' फ़िज़ा '

**फजीलत**–*स्त्री.* [*अ.*] १ श्रेष्ठत्व; मोठेपणा. २ चांगुलपणा; सद्वर्तन. (मु.) **फजीलत की पगडी बाँधना**–विद्वत्ता किंवा श्रेष्ठता संपादन करणें.

**फज़ीहत**–*स्त्री.* [*अ.*] १ फजिती; बदनामी. २ दुर्दशा.

**फ़ज़ूल**–*वि.* [*अ.*] १ व्यर्थ; कुचकामाचा; निरर्थक. २ जरुरीपेक्षां अधिक; अतिरिक्त. **फ़ज़ूलखर्च**–*वि.* अुधळया; अपव्ययी.

**फ़ज्ल**–*पु.* पाहा ' फ़ज़्ल '.

**फटक**–*पु.* स्फटिक. [ ताबडतोब.

**फटक**—*क्रि. वि.* [*अनु.*] झटकन्;

**फटकन**–*स्त्री.* धान्य पाखडल्यावर बाहेर पडतो तो भुसा कोंडा.

**फटकना**–*क्रि. स.* [अनु.] १ आपटणें; झटकणें. २ हातपाय आपटणें. ३ धान्य पाखडणें.

**फटकना**—*क्रि. अ.* [अनु.] १ जाणें; पोहोंचणें. २ अलग होणें; दूर होणें. ३ तडफडणें; हातपाय आपटणें. ४ श्रम करणें.

**फटकार**—*स्त्री.* धिक्कार; झिडकार; धुडकावणी.

**फटकारना**—*क्रि. स.* [अनु.] १ धिक्कारणें. २ दरडावणें; फटकारणें ३ कपडे जोरानें आपटून धुणें. ४ झिडकारणें.

**फटना**—*क्रि. अ.* १ फाटणें. २ दुभंगणें. ३ पृथक् होणें; वेगळें होणें. ४ नासणें (दूध अि.).

**फटफटाना**—*क्रि. स.* [अनु.] १ व्यर्थ बडबड करणें. २ हातपाय आपटणें.

**फटा**—*पु.* भेग; फट. *वि.* फाटलेला; जीर्ण; फाटका. (यौ.) **फटा-पुराना**—फाटकातुटका. [दगड.

**फटिक**—*पु.* १ स्फटिक २ संगमरवरी

**फटेहाल**—*वि.* [दे.+अ.] गरीब; दरिद्री.

**फट्टा**—*पु.* भेग; चीर; फट.

**फड**—*पु.* १ जुगारांत लावलेला डाव. २ जुगाराचा अड्डा. ३ पक्ष; दल. ४ दुकानाची खरेदीविक्रीची जागा.

**फडकना**—*क्रि. अ.* [अनु.] १ फड-कणें; अुडणें. २ स्फुरणें; फुरफुरणें.

**फडकाना**—*क्रि. अ.* [अनु.] फड-कविणें; हलविणें.

**फडबाज़**—*पु.* [सं.+फा.] जुगार खेळविणारा; दुसऱ्यांना जुगार खेळावयास लावणारा.

**फतवा**—*पु.* [अ.] मुसलमानी धर्मशास्त्राप्रमाणें अेखाद्या कृत्याबद्दल मौलवीनें दिलेला निर्णय; धर्माज्ञा.

**फतह, फतेह**—*स्त्री.* [अ.] १ विजय. २ सफलता. [विजय-पत्र.

**फतह–नामा**—*पु.* [अ. + फा]

**फतिंगा**—*पु.* पतंग (किडा).

**फतूर**—*पु.* [अ.] १ विकार; बिघाड. २ नुकसान; हानि. ३ बाधा; विघ्न. ४ अुपद्रव. **फतूरिया**—*वि.* अुपद्रवी; विघ्नसंतोषी.

**फतूह**—*स्त्री.* [अ.] १ विजय. २ लढाअी किंवा लूट यांमध्यें मिळालेलें धन. [सदरा.

**फतूही**—*स्त्री.* [अ.] बिनबाह्यांचा

**फदकना**—*क्रि. अ.* [अनु] १ फद-फद आवाज करणें. २ टुण टुण अुड्या मारणें.

**फन**—*पु.* [अ.] १ हुन्नर; कला; हस्तकौशल्य. २ गुण; वैशिष्ट्य. ३ विद्या.

**फन**—*पु.* सापाची फणा.

**फना**–स्त्री· [अ.] नायनाट; निःपात.

**फनि-नी, फनिंग, फनिंद्***—पु· फणींद्र; नाग. [कंदील. २ झुंबर.

**फनूस, फानूस**–पु· [फा.] १

**फन्नी**–स्त्री· पाचर.

**फफूँदी**–स्त्री· बुरशा.

**फफोला**–पु· फोड (पोळल्यामुळें आलेला). (मु.) **दिल के फफोले फोड़ना**—क्रोध प्रकट करणें.

**फवती**—स्त्री· १ अुपहास. २ समयानुकूलता. ३ टोमणा. (मु.) **फवती अुडाना**–टिंगल करणें.

**फबना**–क्रि· अ· १ शोभा देणें. २ खुलणें. **फबन**–स्त्री· शोभा; कांति. **फबीला**–वि· सुंदर; शोभायमान.

**फबाना**–क्रि· स· शोभिवंत करणें; सजविणें.

**फबि***–स्त्री· शोभा; सौंदर्य.

**फर**–पु· [?] १ सामना; समोरा· समोर येणें. २ कुस्तींतील डावपेंच. ३ युद्धक्षेत्र; सामन्याची जागा. ४ बिछाना.

**फरक**–पु· १ फडफड. २ पाहा 'फ. र्क.' [अुचंबळून येणें.

**फरकना**–क्रि· अ· १ फडफडणें २

**फरका**–पु· गवताचें छप्पर.

**फरकाना**–क्रि· स· फडकाविणें; हलविणें.

**फरज़ंद**–पु· [फा.] १ चिरंजीव; पुत्र. २ संतान.

**फरज़ी**–पु· [फा.] वजीर (बुद्धि. बळांतील). *वि·* नकली; बनावटी.

**फरद**–स्त्री· [अ.] यादी; सूचि. *वि·* अनुपम.

**फरना***–क्रि· अ· फळ येणें.

**फरफंद**—पु· [फा.] १ डावपेंच; फसवेगिरी. २ नखरा; हावभाव.

**फरफर**—पु· [अनु.] भरकन् अुडण्याचा आवाज.

**फरमा**–पु· [अिं.] जोडा बनविण्याचा लांकडी सांचा.

**फरमा**–पु· [अिं.] छापलेला फॉर्म.

**फरमाअिश**—स्त्री· [फा.] आर्डर; आज्ञा; मागणी; सूचना. **फरमाअिशी**–वि· मुद्दाम सांगून तयार करविलेला; आर्डर देअून बनविलेला.

**फरमान**–पु· आज्ञा; फर्मान; हुकूम.

**फरमाना**–क्रि·स· [फा.] १ आज्ञा देणें; हुकूम करणें. २ म्हणणें; सांगणें (आदरार्थी).

**फरमारवाँ**—पु· [फा.] शासक; राजा. २ फर्मान काढणारा.

**फरवरी**–पु·[अिं.] फेब्रुवारी महिना.

**फरवी**—स्त्री· चुरमुरे; लाह्या.

**फरश**–पु·[अ.] १ बैठक; बिछाअीत. २· सपाट जमीन. ३ फरशी.

**फरशी**–स्त्री·[फा.] गुडगुडी; हुक्का.

**फरसा**—पु· १ खोरें; फावडें; २ फरस; कुऱ्हाड.

**फरहद**–पु· देवदार.

**फरहरना**–क्रि· अ· [ अनु.] फड-फडणें; फडकणें.

**फरहरा**–पु·[ अनु. ] पताका; झेंडा.

**फरहाद**—पु· [फा.] शीरीन नामक राजकन्येवर प्रेम करणारा अिराणचा अेक प्रसिद्ध शिल्पकार.

**फराक-ख़**—पु· [फा.] लांबरुंद जागा; मैदान. वि· विस्तृत; लांबरुंद (यौ.). **फराख़दिल**–वि· विशाल अंत:करणाचा; अुदार. **फराख़ी**–स्त्री· १ लांबीरुंदी, विस्तार. २ संपन्नता.

**फरागत**–स्त्री· [अ.] १ मुक्तता; सुटका. २ निश्चिंती; स्वस्थता. ३ मलत्याग.

**फरामोश**—वि· [फा.] विसर-लेला; विस्मृत. (मु.) **फरामोश करना**–विसरणें. [पु· पळ.

**फरार**–वि·[अ.] पळालेला. फरारी.

**फरासीस**—पु· [फा.] १ फ्रान्स देश. २ फ्रेंच माणूस. **फरा-सीसी**–वि· १ फ्रान्स देशाचा रहिवासी. २ फ्रेंच.

**फरियाद, फिरियाद**–स्त्री· [फा.] १ तक्रार; गाऱ्हाणें. २ मदतीकरितां हांक. ३ फिर्याद. ४ विनंती; प्रार्थना. **फरियादी**–वि· १ तक्रार करणारा; फिर्याद करणारा. २ मदतीकरितां प्रार्थना करणारा.

**फरियाना**—क्रि· स· १ निवडणें; नीट करणें (धान्य). २ निकाल करणें; निवाडा देणें. क्रि· अ· १ ठरणें. २ वेगळें होणें.

**फ़रिश्ता**–पु· [फा.] देवदूत.

**फरी**—स्त्री· [अ.] १ लहान ढाल. २ गाडीचा आंस. ३ नांगराचा फाळ.

**फ़रीक़**–पु· [अ.] १ विवेकी; विचारी. २ समूह; झुंड. ३ वादी किंवा प्रतिवादी पक्ष ४ प्रतिपक्षी; विरोधी. (यौ.) **फ़रीक़सानी**–प्रतिवादी.

**फरुहा**—स्त्री· चुरमुरे.

**फरुही**–स्त्री· लहान फावडें.

**फरेफ्ता**–वि· [फा.] १ आसक्त; मोहित. २ फसणारा; फसवणूक झालेला.

**फरेब**—पु· [फा.] कपट; लबाडी; फसवणूक. २ धूर्तता. **फरेबी**–वि· कपटी; अप्रामाणिक; लुच्चा.

**फरोख्त**–स्त्री· [फा.] विक्री; विक्रय.

**फरोग**—पु· [फा.] १ ज्योति;

प्रकाश. २ आभा; कांति. ३ अुत्कर्ष; अुन्नति.

**फरो-गुजाश्त**—*स्त्री.* [ फा. ] १ अुपेक्षा; दुर्लक्ष. २ टाळाटाळ. ३ चूक.

**फरोश**—*पु.* [ फा. ] विक्रेता; विक्री करणारा. **फरोशी**—*स्त्री.* विक्री; विक्रय.

**फ़र्क़**—*पु.* [अ.] फरक; भेद; अंतर.

**फर्जंद**—*पु.* पाहा 'फरजंद'.

**फर्ज़**—*पु.* [अ.] कर्तव्य. *वि.* गृहीत; मानलेलें. (मु.) **फर्ज करना**—गृहीत धरणें; मानणें.

**फर्ज़ी**—*वि.* [ अ. ] १ कल्पित. २ नाममात्र. ३ बनावटी; नकली.

**फर्द**—*स्त्री.* [ अ. ] १ धोतर किंवा वस्त्राचें अेक पान. २ पदर. ३ यादी; फर्द. *वि.* अेकटा; अेकाकी.

**फर्राटा**—*पु.* [ अनु. ] १ वेग. २ चपलता.

**फर्राश**—*पु.* [ अ. ] १ बैठक साफ करणारा व घालणारा नोकर. २ नोकर.

**फ़र्श**—*पु.* पाहा 'फरश'.

**फलंक***—*पु.* अुडी.

**फल**—*पु.* १ फळ. २ परिणाम; निकाल. ३ गुण; प्रभाव. ४ नांगराचा फाळ.

**फलक**—*पु.* १ फळा. २ चादर. ३ पान; पृष्ठ. ४ तळहात.

**फ़लक**—*पु.* [ अ. ] आकाश.

**फलकना**—*क्रि. अ.* [ अनु. ]फडकणें; फडफडणें.

**फलका**—*पु.* फोड. [ स्वरूप.

**फलत**—अव्य. यासाठीं; परिणाम-

**फलदान**—*पु.* साखरपुड्याचा विधि; वाङ्निश्चय.

**फलाँ**—*वि.* [अ.] फलाणा; अमका.

**फलाँग**—*स्त्री.* अुडी.

**फलाँगना**—*क्रि. अ.* अुडी मारणें.

**फलातूँ**—*पु.* [ग्री.] ग्रीक तत्त्ववेत्ता प्लेटो.

**फलाना**—*वि.* पाहा 'फलाँ'.

**फलालीन, फलालेन**—*पु.* [अिं.] लोंकरीचें कापड; फ्लॅनेल.

**फलित**—*वि.* १ संपन्न; परिपूर्ण. २ पिकलेला.

**फली**—*स्त्री.* शेंग.

**फलीता**—*पु.* [ अ. ] पलिता.

**फल्हार**—*पु.* फलाहार; फराळ.

**फसल, फस्ल**—*स्त्री.* [अ.] १ ऋतु; मोसम. २ हंगाम. ३ धान्य; पीक. **फसली**—*वि.* हंगामी.

**फलदा**—*पु.* टपोरें जांभूळ.

**फव्वारा**—*पु.* [अ.] कारंजें; फवारा.

**फसली सन्**—*पु.* [फा.] अकबरानें हिंदुस्थानांत सुरू केलेला अेक शक.

**फसाद**--पु. [ अ. ] १ बिघाड; विकार. २ दंगा; तंटा; बखेडा. ३ अुपद्रव; गडबड. **फसादी**-वि. अुपद्रवी; भांडखोर.

**फसाहत**--स्त्री. [अ.] विषयाचें सुंदर वर्णन. २ वक्तृत्वशक्ति.

**फसील**--स्त्री. [ अ. ] शहराभोंवतालचा कोट.

**फसीह**-वि. [अ.] १ वक्तृत्वशक्ति असलेला (वक्ता) २ अस्खलित.

**फसूँ**--पु. [अ.] जादूटोणा; मंत्र.

**फसूँगर**--वि. मांत्रिक.

**फस्द**--स्त्री. [ अ. ] दूषित रक्त काढून टाकण्यासाठीं रक्तवाहिनी कापण्याची क्रिया.

**फह्म**--स्त्री. [ अ. ] १ ज्ञान. २ ग्रहणशक्ति; धारणाशक्ति. ३ बुद्धि. ४ समजूत. [ फडणें.

**फहरना**--क्रि. अ. फडकणें; फड-

**फहराना**--क्रि. स. फडकविणें.

**फहश**--वि. [अ.] अश्लील.

**फाँक**--स्त्री. [ अ. ] फाक; फोड; तुकडा.

**फाँकना**--क्रि. स. फांकणें; फक्की मारून खाणें. (मु) **धूल फाँकना**-विपत्ति भोगणें

**फँाद**-स्त्री. अुडी.

**फँाद**-स्त्री. फांस; जाळें.

**फाँदना**--क्रि. अ. अुडी मारणें; कुदणें. क्रि. स. ओलांडणें. [विणें.

**फाँदना**-क्रि. स. जाळ्यांत अडक-

**फाँस**-स्त्री. १ पाश; बंधन. २ जाळें.

**फाँसना**--क्रि. स. १ जाळ्यांत अडकविणें. २ फशीं पाडणें; फसवून आपली हुकमत चालविणें.

**फाँसी**--स्त्री. १ फांशी. २ जाळें; फांस. (मु.) **फाँसी चढना**--फांशी जाणें. [ २ अुपासमार.

**फाका**--पु. [अ.]१ अुपास; लंघन.

**फाका-कश**-वि. [ अ. + फा. ] १ निर्धन; कंगाल. २ अुपासमार होत असलेला. **फाकाकशी**-स्त्री. अुपासमार; अुपवास.

**फाकामस्त, फाकेमस्त**-वि. [ अ. + फा. ] अुपाशी असून देखील बेपर्वा असणारा; मस्त.

**फाखता, फाख्ता**-स्त्री. [ अ. ] पारवा; होला.

**फाग**-पु. होळीचा सण; शिमगा.

**फागन-गुन**-पु. फाल्गुन महिना.

**फाज़िल**-वि. [ अ. ] १ विद्वान; पंडित. २ जरुरीपेक्षां अधिक; फाजील.

**फाडना**--क्रि. स. १ फाडणें; २ कापणें. ३ नासविणें ( दूध ).

**फ़ातिहा**–पु. [ अ. ] १ मुसलमानांची प्रार्थना. २ मृत माणसाचे नांवानें दिलेलें दान. [ नश्वर.
**फ़ानी** वि. [ अ. ] नाश पावणारा;
**फाबना**-क्रि.अ. शोभणें;सुंदर दिसणें.
**फ़ायदा**–पु. [ अ. ] नफा; लाभ.
**फायदेमंद**–वि. [ अ. + फा. ] फायदेशीर; लाभदायक.
**फ़ारख़ती**–स्त्री. [ अ. ] कर्जमुक्त झाल्याबद्दलची पावती; ऋणविमोचनपत्र.
**फ़ारस**–पु. [ फा. ] अिराण देश.
**फ़ारसी**–स्त्री. [फा.] फारशी भाषा.
**फ़ारिग़**–वि. [ अ. ] काम करून मोकळा झालेला; मुक्त; स्वतंत्र.
**फाल**–स्त्री. १ नांगराचा फाळ. २ ढलपा. [ ज्योतिष.
**फ़ाल**–स्त्री. [ अ. ] शकुनविद्या;
**फालतू**–वि. १ निरर्थक. २ जरूरीपेक्षां अधिक. [ तांबड्या रंगाचा.
**फ़ालसअी**–वि. [ फा. ] निळसर
**फ़ालसा**–पु. [ फा. ] पिंपरीच्या फळासारखें आंबट फळ ( ज्याचें अुन्हाळयांत सरबत करतात ).
**फ़ालिज**–पु. [ अ. ] पक्षाघात; अर्धांगवायु. [अुपवन;बाग;वाटिका.
**फ़ालीज़**–स्त्री. [ फा ] १ शेत. २
**फ़ालूदा**–पु. [फा.] शेवयांची खीर.
**फावडा**–पु.फावडें. [अुघड झालेला.
**फ़ाश**–वि. [ फा. ] स्पष्ट; प्रकट;
**फ़ासला**–पु. [ अ. ] अंतर; लांबी.
**फ़ासिद**–वि. [ अ. ] १ भांडखोर. २ चिडलेला. ३ दुष्ट; पाजी.
**फ़ासिल**–वि.[अ.] विभक्त करणारा.
**फाहा**–पु. फाया; औषध, अत्तर किंवा तेल अि. चा बोळा.
**फ़ाहिशा**-स्त्री. [ अ. ] छिनाल; कुलटा; वाअीट आचरणाची स्त्री.
**फ़िकरा**–पु. [ अ. ] १ वाक्य. २ व्यंग; व्याजोक्ति. ३ थाप.
**फ़िकरेबाज़**—वि. [ अ. + फा. ] १ थापेबाज. २ व्यंगी; अुपरोधिक बोलणारा.
**फिकैत**–पु. फरीगदगा खेळणारा.
**फ़िक्र**–स्त्री.[अ.]१ चिंता; काळजी. २ लक्ष; ध्यान. ३ अुपाय; युक्ति.
**फ़िक्रमंद**–वि. [ अ.+फा. ] चिंताग्रस्त; काळजींत असलेला.
**फिचकुर**—पु. मूर्च्छा आली असतां तोंडांतून येणारा फेस.
**फ़िज़ा**--स्त्री. [ अ. ] १ मोकळें मैदान. २ वातावरण. ३ शोभा.
**फ़िज़ूल**–वि. पाहा. ‘ फजूल. ’
**फिटकार**–स्त्री. [अनु.]१ झिडकार; तिरस्कार. २ शिव्याशाप.
**फिटकिरी**–स्त्री. तुरटी.

**फिटन**—*स्त्री*. [अ.] बग्गी; व्हिक्टो-रिया; चार चाकांची खुली गाडी.

**फिट्टा**—*वि*. [अनु.] अपमानित; धिक्कारलेला; तिरस्कृत.

**फितना**—*पु*. [अ.] १ भांडणतंटा. २ दंगा. ३ पाप.

**फितर**—*पु*. [अ.] दिवसभर अुप-वास करून संध्याकाळीं अुपवास (रोजा) सोडणें.

**फितरत**—*स्त्री*. [अ.] १ स्वभाव. २ हुशारी; बुद्धिमत्ता. ३ धूर्तपणा. ४ निसर्ग; सृष्टि.

**फितूर**—*पु*. [अ.] १ विकार; बिघाड. २ तंटा; बखेडा; अुपद्रव.

**फिद्वी**—*वि*. [अ.] नम्र सेवक; स्वामिभक्त; आज्ञाधारक.

**फिदा**—*वि*. [अ.] १ आसक्त; अनुरक्त. २ अेखाद्यासाठीं प्राण देण्यास तयार असलेला. **फिदाअी** *पु*. फिदा झालेला माणूस.

**फिरंग**—*पु*. [फा.] १ फ्रान्स देश. २ गोऱ्यांचा देश. ३ गरमी (रोग).

**फिरंगिस्तान**—*पु*. [फा.] युरोप.

**फिरंगी**—*पु*. [फा.] युरोपियन; गोरा.

**फिरंट**—*वि*. फितूर झालेला; अुलटलेला.

**फिर**—*क्रि. वि*. पुन्हां; फिरून अेकदां. २ पुढें केव्हांतरी; भवि-ष्यकाळीं. ३ त्या वेळीं; तेव्हां. (यौ.) **फिर फिर**-वारंवार; फिरून-फिरून. **फिर भी**—तरीहि; तरी-देखील.

**फिरका**—*पु*. [अ.] १ जात. २ टोळी; गट. ३ पंथ; संप्रदाय. (यौ.) **फिरकेवाराना**—जातीय; सांप्रदायिक.

**फिरकी**—*स्त्री*. भिंगरी; फिरकी.

**फिरता**—*पु*. अस्वीकार. *वि*. स्वीकार न करतां परत पाठविलेला.

**फिरदौस**—*पु*. [अ.] १ बाग. २ स्वर्ग.

**फिरना**—*क्रि. वि*. १ अिकडेतिकडे फिरणें; हिंडणें. २ फिरावयास जाणें. ३ परतणें. ४ वळणें. ५ अुलटें किंवा विपरीत होणें; फिरणें. ६ वांकडें होणें. (मु.) **जी फिरना**—विरक्त होणें. **सिर फिरना**—डोकें फिरणें; बुद्धि भ्रष्ट होणें.

**फिरनी, फीरनी**—*स्त्री*. [फा.] तांदुळाची खीर.

**फिराक**—*पु*. [अ.] १ वियोग. २ चिंता; काळजी. ३ शोध. ४ विचार.

**फिराग**—*पु*. [अ.] १ मुक्ति. सुटका. २ सवड; फुरसत. ३ आनंद; खुशी. ४ संतोष. ५ अधिकता.

**फिराना**—*क्रि. स*. १ अेकीकडून

दुसरीकडे चालविणें; फिरविणें. २ परतविणें. ३ वळविणें.

**फिरार**- पु [अ.] पलायन.

**फिरासत**-स्त्री. [अ.] बुद्धिमत्ता.

**फिल्-जुमला**—क्रि. वि. [अ.] १ तात्पर्य; थोडक्यांत. २ असेंच.

**फिल्-हाल**—क्रि. वि. [अ.] या वेळीं; सध्यां. [पोटरी.

**फिल्ली**—स्त्री. [दे.] पिंडरी;

**फिस**—वि. [अनु.] ऑफस. (मु.) **टायँ टायँ फिस**-ऑफस.

**फिसड्डी**—वि. [अनु.] कामांत नेहमीं मागें पडणारा. [प्रमाद.

**फिसलन**-स्त्री. १ घसरडें. २ चूक;

**फिसलना**—क्रि. अ. १ घसरणें. २प्रवृत्त होणें; वळणें (वाअीटाकडे).

**फिहरिस्त, फेहरिस्त**-स्त्री. [फा.] सूची; यादी. [मोबदला.

**फी**-अव्य. [अ.] प्रत्येक. स्त्री. [अिं]

**फीका**—वि. १ नीरस; बेचव. २ फिक्कट; मळलेला. ३ निस्तेज.

**फीता**—पु. [फा.] कपडयाची पट्टी; फीत.

**फीरोज़ा**-पु. [फा.] नीलमणी.

**फीरोज़ी**-वि. [फा.] हिरवी झांक असलेला निळा; निळसर हिरवा.

**फील**-पु. [फा.] हत्ती. **फ़ीलखाना**-पु. गजशाळा. **फ़ीलवान**—पु. माहूत. **फ़ीलपा**-पु. हत्तीरोग.

**फीलपाया**-पु. [फा.] खांब; स्तंभ.

**फीली**-स्त्री. पिंडरी; पोटरी.

**फीसदी**—क्रि. वि. [अ. + फा.] दरशेंकडा.

**फुँकना, फुकना**—क्रि. अ. [अनु.] १ फुंकलें जाणें. २ जळणें; राख होणें. ३ नष्ट होणें.

**फुँकनी**—स्त्री. [अनु.] १ फुंकणी. २ लोहाराचा भाता.

**फुँकरना**—क्रि. अ. १ फूं फूं करणें. २ फूत्कार सोडणें.

**फुँकवाना, फुँकाना**—क्रि. स. [अनु.] फुंकाविणें; फुंकण्याचें काम दुसऱ्याकडून करविणें.

**फुँदना**—पु. गोंडा. **फुँदिया**-स्त्री.

**फुँसी**—स्त्री. [अनु.] पुटकुळी; लहानसा फोड.

**फुकन**—पु. [अनु.] फुगा.

**फुट**—वि. १ अेकटा; अेकाकी. २ विजोड. ३ अलग; वेगळा.

**फुट**-पु. [अिं.] बारा अिंचांचें माप.

**फुटकर-ल**—वि. १ अेकटा. २ वेगळा. ३ थोडाथोडा. ४ फुटकळ; किरकोळ.

**फुटक**—पु. फोड.

**फुटहरा**—पु. फुटाणा.

**फुदकना**–क्रि. अ. [अनु.] १ उडी मारणें; कुदणें. २ नाचणें, बागडणें.
**फुदगी**–स्त्री. [अनु.]लहान चिमणी.
**फुनगी**–स्त्री. अंकुर; कोंब.
**फुफंदी**—स्त्री. विजार किंवा लेहेंग्याची नाडी.
**फुफकार्**–पु. फूत्कार.
**फुफकाना-कारना**–क्रि.अ. [अनु.] फूत्कार टाकणें.
**फुफी, फुफू***–स्त्री.[अनु.] आत्या.
**फुफेरा**—वि. [अनु.] आते भाऊ, बहीण इ.
**फुर***—वि. सत्य; खरें.
**फुर**—स्त्री. फडफड.
**फुरती**–स्त्री. चपलता; जलदपणा. **फुरतीला**-वि.१ चपळ.२ चलाख.
**फुरफुराना**–क्रि. अ. [अनु-] 'फुर फुर' असा आवाज होणें. **फुरफुरी**–स्त्री. फडफड असा आवाज.
**फुरसत**–स्त्री. [अ.] १ सवड; वेळ. २ निवृत्ति. ३ आराम.
**फुरहरी–फुरेरी**—स्त्री. [अनु.] १ कांपरें; कंप; रोमांच. २ फडफड. ३ अत्तराचा किंवा औषधाचा बोळा; फाया.
**फुलका**—पु. १ फोड. २ लहान पातळ चपाती. **फुलकी**–स्त्री.
**फुलझड़ी**–स्त्री. १ फुलबाजी. २ फुसकली.
**फुलवर**—पु. रेशमी वेलबुट्टीदार [कापड.
**फुलवाअी–वारी**—स्त्री. १ बागबगीचा; अुद्यान. २ कागदाची बाग (वरातीचे वेळीं).
**फुलवार**- वि. प्रसन्न; प्रफुल्लित.
**फुलहारा**—पु. माळी.
**फुलाना**—क्रि. स. १ फुगविणें. २ पुलकित किंवा आनंदित करणें. ३ फुलांनीं सजावणें. (मु.) **मुँह फुलाना**–रुसणें; तोंड फुगविणें.
**फुलाव**—पु. सूज; फुगणें.
**फुलेल**—पु. सुगंधी तेल.
**फुलौरी**—स्त्री. भजें; बोंड.
**फुसफुसा**–वि. [अनु.] १ भुसभुशीत; ढिसूळ; पोंचट.
**फुसफुसाना**—क्रि. स. [अनु.] हलक्या किंवा दबलेल्या आवाजांत बोलणें.
**फुसलाना**–क्रि. स. १ फूस लावणें; भुरळ पाडणें. २ बहकावणें.
**फुसलावा**–पु. फूस; भुरळ.
**फुहार, फुही**–स्त्री. १ पावसाची झिमझिम. २ थेंब. [फवारा.
**फुहारा, फौआरा**—पु. कारंजें;
**फूँक**–स्त्री. [अनु.] १ फुंकर. २ श्वास. [मु.] **फूँक निकल**

**जाना**–प्राण निघून जाणें; मरणें. (यौ.) **झाड फूँक**–मंत्रतंत्राचा अुपचार.

**फूँकना**–*क्रि. स.* [अनु.] १ फुंकणें. २ फुंकर मारणें. ३ तोंडानें वाजविणें (सनअी, शंख अि.). ४ आग लावणें. ५ अुधळपट्टी करणें. ६ मंत्र घालणें.

**फूँका**—*पु.* १ दूध काढण्यासाठीं गाअीच्या जननेंद्रियांत घालावयाची फुंकणी. २ फोड.

**फूँदा**–*पु.* १ गोंडा. २ नाडी.

**फूआ**–*पु.* [अनु.] आत्याचा नवरा.

**फूट**–*स्त्री.* १ फाटाफूट; मतभेद. २ मोठी काकडी.

**फूटना**-*क्रि.अ.* १ फुटणें. २ अलग होणें; तुटणें. ३ अंकुर, शाखा फुटणें. ४ फुटून निघणें. ५ अुमलणें; विकसणें. ६ तोंडांतून शब्द बाहेर निघणें. ७ सांधे दुखणें. (मु.) **फूट फूटकर रोना**–ओक्साबोक्शीं रडणें.

**फूफा**–*पु.* पाहा ‘ फुआ ’.

**फूफी, फूफे**–*स्त्री.* [ अनु ] आत्या.

**फूल**–*पु.* पुष्प; फूल. (मु.) **फूल झडना**–गोड गोड बोलणें. **फूल सूँघकर रहना**–कमी खाणें.

**फूल**-*स्त्री.* १ अुत्साह; अुमंग. २ आनंद; प्रसन्नता. *पु.* मृताच्या अस्थी.

**फूलगोभी**–*स्त्री.* फूलकोबी.

**फूलदान**–*पु.* फ्लॉवरपॉट.

**फूलना**–*क्रि. अ.* १ फुलणें; विकसणें. २ गर्वानें फुगणें. ३ सुजणें. ४ लठ्ठ, स्थूल होणें. ५ आनंदित अुल्हसित होणें. ६ रुसणें; रागावणें. (मु.) **फूलना फलना**–१ प्रगति होणें. २ सुखी होणें (शुभचिंतन). **फूले अंग न समाना**–अत्यंत आनंदित होणें. [ फूल.

**फूली**–*स्त्री.* मोतीबिंदु, डोळ्यांतील.

**फूस**–*पु.* वाळलेलें गवत.

**फूहड**–*वि.* १ मूर्ख; अडाणी. २ बेढब. **फूहडपन**–*पु.* अडाणीपण; मूर्खता.

**फूही**–*स्त्री.* पाहा ‘ फुहार ’.

**फेंकना**–*क्रि.स.* १ फेंकणें. २ टाकणें; विसरणें. ३ अव्यवस्थित खर्च करणें.

**फेंकरना***–*क्रि.अ.* [अनु.] ओक्साबोक्शीं रडणें.

**फेंट**-*स्त्री.* १ कंबरेचा वेर. २ धोतराचा कंबरेभोंवतीं गुंडाळलेला सोगा. ३ लहान पागोटें.

**फेंट कसना** अथवा **बाँधना**–कंबर बांधणें.

**फेंटना**—*क्रि. स.* फेणणें; घोटणें.

**फेंटा**–*पु.* लहान पागोटें; फेटा.

**फेण, फेन**—*पु.* फेस.

**फेनिल**–*वि.* फेंस असलेला; फसफसणारा.
**फेनी**–*स्त्री.* फेणी (अेक मिटाअी).
**फेफडा**–*पु.* फुप्फुस.
**फेफडी-री**—*स्त्री.* ओंठ सुकल्यामुळें जमणारा पापुद्रा.
**फेर**–*पु.* १ फेरा; चक्कर; परिवर्तन. २ अुलथापालथ. ३ गोंधळ; बुचकळा; भ्रम; संशय. ४ अंतर; फरक. ५ भानगड; बखेडा. ६ हेलपाटा. ७ तोटा. ८ युक्ति; अुपाय. (यौ.) **हेरफेर**–देवघेव. (मु.) **फेर में पडना**–घोटाळ्यांत पडणें.
**फेर***–अव्य. पुन्हां.
**फेरना**–*क्रि. स.* १ फिरविणें. २ परत करणें. ३ फिरविणें (माळेचे मणी). ४ वांकविणें. (मु.) **पानी फेरना**–नष्ट करणें.
**फेरवट**–*स्त्री.* १ चक्कर. २ पेंच.
**फेल**-*पु.* [ *अ.* ] १ कार्य; कर्म. २ दुष्कर्म.
**फेल**–*वि.* [ अिं. ] नापास.
**फैकनैत**–*पु.* [ ? ] डाव; पेंच.
**फैज**–*पु.*[*अ.*] १ परोपकार. २ लाभ; फायदा. ३ कृपा; दया.
**फैन्सी**–*वि.* [ अिं. ] फॅशनेबल; छानछोकीचा.
**फैयाज***–*वि.* [ *अ.* ] दाता; अुदार; थोर. **फैयाजी**–*स्त्री.* १ दातृत्व. २ अुदारपणा.
**फैलना**–*क्रि. अ.* १ पसरणें. २ स्थूल होणें. ३ वाढणें. ४ विखुरणें. ५ महशूर होणें; प्रसिद्धि पावणें. ६ आग्रह धरणें.
**फैलसूफ**–*पु.* [ फा. ] १ विद्वान्. २ धूर्त; लबाड. ३ अपव्ययी; अुधळ्या. **फैलसूफी**-*स्त्री.* १ धूर्तता. २ अुधळेपणा. ३ तत्त्वज्ञान.
**फैलाना**-*क्रि. स.* १ पसरणें; विस्तृत करणें. २ वाढविणें. ३ विखुरणें. ४ प्रचलित करणें. ५ प्रसिद्धी करणें. (मु.) **हाथ फैलाना**–हात पसरणें ( भिक्षेसाठीं ).
**फैलाव**–*पु.* विस्तार.
**फैसल**–*पु.* [*अ.*] १ निर्णय देणारा; न्यायाधीश. २ निर्णय; निकाल.
**फैसला**—*पु.* [ *अ.* ] निर्णय; निकाल ( कोर्टाचा ). [ हुकूमशहा.
**फैसिस्ट**–*वि.* [ अिं. ] फॅसिस्ट;
**फोंक**-*पु.* बाणाच्या मागची बाजू. ( ज्यांत पंख लावतात ).
**फोक**—*पु.* १ सांका; गाळ. २ नीरस, बेचव पदार्थ. ३ चोथा.
**फोकट**–*वि.* १ फुकट; मोफत. २ निःसार; व्यर्थ. **फोकट में**—फुकटांत.

**फोडना**–*क्रि.स.* १ फोडणें; तोडणें. २ फूट पाडणें; तोडणें. ३ दुसऱ्या पक्षांतून आपल्या पक्षांत आणणें.
**फोडा**–*पु.* फोड; व्रग. **फौडिया**–*स्त्री.* लहान फोड. [२ अंडकोष.
**फ़ोता**–*पु.* [ फा. ] १ पिशवी; थैली.
**फ़ोतेदार**—*पु.* [ फा. ] खजीनदार; कोशाध्यक्ष.
**फ़ौक**–*वि.* [ अ. ] अुच्च; श्रेष्ठ; *पु.* श्रेष्ठता. **फ़ौक़ियत**–*स्त्री.* श्रेष्ठता; मोठेपणा.
**फ़ौज**–*स्त्री* [ अ. ] फौज; सैन्य.
**फ़ौजकशी**–*स्त्री.* [ अ. + फा. ] सेनेचें आक्रमण; चढाओ. [सैनिक.
**फौजी**—*वि.* [ फा. ] फौजेसंबंधीं;
**फ़ौत**—*स्त्री.* [ अ. ] १ नष्ट होणें. २ मृत्यु. *वि.* मृत; मेलेला.
**फौती**–*स्त्री.* [ अ. ] मृत्यु. *वि.* मृत.
**फ़ौरन**–*क्रि. वि.* [ अ. ] झटपट; तावडतोब.
**फौलाद**–*पु.* [ फा. ] पोलाद.
**फौवारा**–*पु.* पाहा ' फव्वारा '.

## ब

**बंक**–*वि.* १ वांकडा; तिरपा; वक्र. २ पुरुषार्थी. ३ कठिण. **बंकाअी, बंकुरता**–*स्त्री.* वक्रता; वांकडेपणा.
**बंक**–*पु.* [ अिं ] बँक.
**बंकट** *वि.* वांकडातिकडा. [नळी.
**बंकनाल**–*स्त्री.* सोनाराची वांकडी
**बंग**–*पु.* वंग; बंगाल प्रदेश.
**बंगला**—*वि.* बंगालचा; बंगालसंबंधीं. *पु.* बंगाल प्रदेश. *स्त्री.* बंगाली भाषा.
**बंचक**–*पु.* धूर्त; ठग. **बंचकता, बंचकताअी**–*स्त्री.* धूर्तता.
**बंचना***–*क्रि.स.* फसविणें, ठकविणें. *स्त्री.* वंचना; फसवणूक.
**बँचवाना**–*क्रि. स.* वांचवून घेणें.
**बंछना***–*क्रि. स.* अभिलाषा धरणें.
**बंजर**—*वि.* ओसाड; नापीक. *पु.* माळरान.
**बंजारा,बनजारा**-*पु.*बंजारी; लमाण.
**बंझा**–*स्त्री.* वंध्या; वांझ.
**बँटना**–*क्रि. अ.* १ विभागलें जाणें; हिस्से पडणें. २ वांटणी होणें.
**बँटवाना, बँटाना**–*क्रि.स.* दुसऱ्याकडून वांटणी करविणें.
**बँटवारा**–*पु.*बटवडा; वांटणी;वांटप.
**बंटा**–*पु.* [ दे. ] १ वाटोळा लहान डबा. २ मोठा लोटा; घागर. ( मु. ) **बंटा ढार कर देना** — नाशकरणें; विनाश करणें.

**बँटाअी**–स्त्री. १ वांटणी; विभागणी; बटवडा. २ बटाअी.
**बँडेरी**–स्त्री. आढें ( कौलाराचें ).
**बंदगी**––स्त्री. [ फा. ] १ नमस्कार; प्रणाम. २ सेवा. ३ भक्तिपूर्वक अीश्वराची वंदना.
**बंदनवार**–पु. तोरण.
**बंदना**––क्रि. स. नमस्कार करणें. स्त्री. १ वंदन. २ स्तुति.
**बंदर**––पु. माकड; वानर. (मु.) **बंदर घुडकी** अथवा **बंदर भबकी**–पोकळ दम.
**बंदरगाह**—पु. [ फा. ] बंदर.
**बंदरिया**––स्त्री. माकडीण; वानरी.
**बंदा**–पु. [ फा. ] सेवक; दास.
**बंदिश**–स्त्री. [ फा. ] १ गांठ. २ अुपाय; योजना ३ प्रबंध; व्यवस्था. ४ षड्यंत्र. ५ दोषारोप.
**बंदी**–पु. भाट; चारण.
**बंदी**–पु. [फा.] कैदी. **बंदीखाना**–पु. तुरुंग. [ बंधमुक्त करणारा.
**बंदीछोर***—पु. [ फा. + सं. ]
**बंदूक**–स्त्री. [ अ. ] बंदूक.
**बंदूकची**–पु. [ अ. ] बंदुकवाला शिपाअी.
**बंदोबस्त**–पु. [ फा. ] १ व्यवस्था. २ शेतजमिनीची मोजणी.
**बंध**–पु. बांध; धरण.
**बंधक**–पु. गहाण ठेवलेली वस्तु; ठेव.
**बँधना**––क्रि. अ. १ बांधलें जाणें. २ कैद होणें. ३ शब्दानें, वचनानें बांधलें जाणें. ४ क्रमबद्ध होणें; चालू होणें. ५ दुरुस्त होणें. ६ प्रेमपाशांत सांपडणें किंवा मुग्ध होणें. पु. बंधन (दोर अित्यादि.)
**बँधवाना**–क्रि. स. बांधवून घेणें.
**बंधान**–पु. १ देवघेवीचा व्यवहार; परिपाठ. २ बंधारा; बांध
**बँधाना**–क्रि. स. १ धारण करविणें. २ बांधविणें.
**बंधी**–पु. बंदी.
**बंधी**––स्त्री. अुकाडा; रतीब; बंधी.
**बँधुआ**–पु. कैदी; बंदी.
**बंधेज**–पु. १ रतीब; अुकाडा; बंधी. २ प्रतिबंध; आळा; विरोध.
**बंध्या**–वि. स्त्री. वंध्या; वांझ.
**बंपुलिस**–स्त्री. [ अनु. + अिं. ] नगरपालिकेचे सार्वजनिक संडास.
**बंब**–स्त्री. [ अनु. ] १ रणभेरी; रणनाद. २ नगारा; डंका.
**बंबा**–पु. [ ? ] १ नळ; पाअिप. २ स्रोत; प्रवाह. [ वरांचें ओरडणें.
**बँबाना**—क्रि. अ. [ अनु. ] जना-
**बंस**–पु. बांबू.
**बंसकार**–पु. बांसरी; मुरली.
**बंसी**–स्त्री. १ बांसरी; मुरली. २

मासे धरण्याचा गळ. **बंसीधर**-पु. श्रीकृष्ण.
**बंसीवट**-पु. वृंदावनांतील अेक वट-वृक्ष. या वडाखालीं श्रीकृष्ण बांसरी वाजवीत असे.
**बँसोड-र**-पु. बांबूच्या कामट्यांच्या टोपल्या वगैरे बनविणारा; बुरुड.
**बँहगी**-*स्त्री*. कावड.
**बअुर, बौर***-पु. आंब्याचा मोहोर.
**बअुरा**-*वि*. बावरलेला; गोंधळलेला.
**बअुराना, बौराना***—*क्रि. अ*. बावरणें; गोंधळणें.
**बक**—पु. १ बगळा. २ बकासुर.
**बकझक**-*स्त्री*. भांडण; बोलाचाली.
**बकता***-*वि*. वक्ता.
**बकना**—*क्रि. स*. बडबड करणें. **बकबक**-*स्त्री*. बडबड.
**बकमौन**-पु. बकध्यान.*वि*.कावेबाज.
**बकरना**—*क्रि. स*. १ पुटपुटणें २ स्वतः दोष सांगणें.
**बकरबकर**-*क्रि. वि*. [अनु.] टकमक; आश्चर्यचकित. [*स्त्री*.शेळी.
**बकरा**-पु. बोकड; बकरा. **बकरी**-
**बकलस-बकसुआ**-पु. [अिं.] बक्कल. [फळाचें टरफल.
**बकला**—पु. १ वृक्षाची साल २
**बकवाद-वास**—*स्त्री*. बडबड; वटवट. **बकवादी**-*वि*. बडबड्या.
**बकस, बक्स**-पु. [अिं.] १ पेटी. २ डबा. [करणें. २ क्षमा करणें.
**बकसना***-*क्रि. स*. [फा.] १ प्रदान
**बकसाना***-*क्रि. स*. [फा.] क्षमा किंवा माफी करविणें.
**बकसीस, बखसीस**-*स्त्री*. [फा.] बक्षिस; अिनाम; पारितोषिक.
**बकसुआ-वा**-पु.[अ.] बक्कल.
**बकाना**-*क्रि. स*. १ बडबड करण्यास प्रवृत्त करणें. २ पाठ करविणें.
**बकाया**-पु.[अ.]१अवशिष्ट; शिल्लक. २ बाकी (थकलेली). [स्वयंपाकी.
**बकावल**—पु. [फा.] आचारी;
**बकुचना***-*क्रि. अ*. आकसणें; संकोच पावणें. [*स्त्री*.
**बकुचा**-पु.पिशवी;पोटली.**बकुची**-
**बकुल**--पु. बकुळीचें फूल.
**बकुला, बगुला**-पु. बगळा. [म्हैस.
**बकेन-ना**-*स्त्री*. पारठी गाय किंवा
**बकैयाँ**-पु. रांगणें.
**बकोटना**--*क्रि. स*. ओरखडणें. **बकोट**-*स्त्री*. ओरखडा; बोचकारा.
**बक्कल**-पु. १ टरफल. २ साल.
**बक्काल**-पु.[अ.]भाजी किंवा धान्य विकणारा.
**बक्की**-*वि*. बडबड्या; वाचाळ.
**बक्की**-*स्त्री* [दे.] अेक प्रकारचें धान्य.

**बक्र**–पु. [अ.] १ बैल. २ गाय.
**बक्र-अीद**–स्त्री. [अ.] बकरीद (मुसलमानी सण).
**बखरा**–पु. [फा.] भाग; अंश.
**बखान**–पु. १ वर्णन; कथन. २ वाखाणणी; प्रशंसा. [प्रशंसा करणें.
**बखानना**–क्रि. स. वर्णन करणें;
**बखियाना**–क्रि. स. [फा.] टीप घालणें; मजबूत शिलाअी करणें. **बखिया**–पु. टीप; शिवण.
**बखील**–पु. वि. [अ.] कृपण; कंजूष. **बखीली**–स्त्री. कंजूषपणा; कृपणता.
**बखूबी**–क्रि. वि. [फा.] १ चांगल्या तऱ्हेनें; योग्य प्रकारें. २ पूर्ण रूपानें.
**बखेडा**–पु. १ तंटा; बखेडा. २ पेंच. ३ अवडंबर. **बखेडिया**–वि. तंटेखोर. [फैलावणें.
**बखेरना**–क्रि. स. विखुरणें;
**बख्त**–पु. [फा.] भाग्य; नशीब. **बख्तावर**–वि. भाग्यवान्; भाग्यशाली **बख्तावरी**–स्त्री. सुदैव; भाग्य.
**बख्शना**–क्रि. स. [फा.] १ क्षमा करणें; माफ करणें. २ दान करणें. ३ सोडणें. (व्रत अुपवास अि.).
**बख्शवाना**–क्रि. स. [फा.] क्षमा करविणें.
**बख्शिश**–स्त्री. [फा.] १ बक्षिस. २ अुदारता. ३ दान. ४ क्षमा.
**बगअी**–स्त्री. [दे.] गोमाशी. [चौखूर.
**बगछुट-टुट**–क्रि. वि. [दे.] बेलगाम;
**बगमेल**–पु. बरोबरी; स्पर्धा.
**बगर***–पु. १ राजवाडा. २ वाडा.
**बगरना***–क्रि. अ. विरखुणें; पसरणें. [फैलावणें.
**बगराना***–क्रि. स. विखुरणें;
**बगल**–स्त्री. [फा.] १ बगल; काख. २ बाजू. (मु.) **बगल में दबाना** अथवा **धरना**–काबूंत ठेवणें. **बगलें झांकना**–कसेंतरी निसटण्याचा प्रयत्न करणें. **बगलें बजाना**–आनंदोत्सव करणें.
**बगलबंदी**–स्त्री. [फा.] बाराबंदी.
**बगला-गुला**–पु. बगळा. (मु.) **बगला भगत**–पु. ढोंगी, कपटी.
**बगलियाना**–क्रि. अ. [फा.] बगल देअून जाणें; दूर करणें.
**बगली**–वि. [फा.] बाजूचा. स्त्री. १ शिप्याची सुअी, दोरा, कात्री वगैरे ठेवण्याची पिशवी. २ बगलेच्या ठिकाणीं लावण्याचा कापडाचा तुकडा. (मु.) **बगली-घूँसा**–आडून केलेला वार; कपटानें किंवा फसवून केलेला वार.
**बगा***-पु. [फा.] अंगरखा.
**बगाना**–क्रि. स. फिरविणें. क्रि. अ. पळणें; धांवणें.

**बगार**-पु. [दे.] गव्हाण; गाअी बांधण्याची जागा.

**बगारना**-क्रि.स. फैलावणें; विखुरणें.

**बगावत**—स्त्री. [अ.] १ बंड; राजद्रोह. २ दंगा; अुपद्रव. [बाग.

**बगिया***—स्त्री. [फा.] बगीचा;

**बगीचा**—पु. [फा.] लहान बाग.

**बगुला**-पु. बगळा.

**बगूला**—पु. वावटळ.

**बग़ैर**-अव्य. [अ.] शिवाय; खेरीज.

**बग्गी-बग्घी**—स्त्री. [अिं.] बगी; चार चाकांची घोडागाडी; व्हिक्टो-रिया.

**बघंबर**—पु. व्याघ्रचर्म. [नख.

**बघनहाँ-हियाँ, बघना***—पु. वाघ-

**बघार**—पु. फोडणी.

**बघारना**-क्रि. स. १ फोडणी देणें. २ बढाअी मारणें.

**बच***—पु. वचन; बोल.

**बचत-बचती**—१ बचत; बाकी; शिल्लक. २ लाभ. ३ रक्षण.

**बचना**—क्रि. अ. १ कष्ट किंवा विपत्तीपासून वांचणें. २ अलिप्त राहणें (वाअीट गोष्टींपासून). ३ दूर किंवा अलग राहणें. ४ अुरणें.

**बचपन**—पु. बालपण.

**बचवैया**—पु. संरक्षक.

**बचा***—पु. बालक; मुलगा.

**बचाना**—क्रि. स. १ वांचविणें; रक्षण करणें. २ खर्च होअूं न देणें. ३ लपविणें. ४ दूर ठेवणें. ५ परिणाम होअूं न देणें; अलिप्त ठेवणें.

**बच्चा**—पु. १ कोणत्याहि प्राण्याचा नुकताच जन्मलेला बच्चा; अर्भक. २ बालक; मुलगा. *वि.* अजाण. (मु.) **बच्चों का खेल**—पोरखेळ; सहज होणारें काम.

**बच्छ, बछ, बछरू**—पु. १ वासरूं. २ बालक; मुलगा.

**बच्छस***—पु. वक्षस्थल; छाती.

**बच्छल***—वि. वात्सल्यपूर्ण; प्रेमळ.

**बच्छा, बछड़ा**—पु. गोऱ्हा. **बछड़ी बछिया**—कालवड, वासरी.

**बछवा**—पु. १ गोऱ्हा. २ शिंगरूं.

**बछेडा**—पु. शिंगरूं.

**बजंत्री**—पु. वाजंत्री वाजविणारा.

**बजडा-रा**—पु. मोठी नाव.

**बजना**—क्रि. अ. १ वाजणें; आवाज होणें. २ हत्यार चालणें; गाजणें (तलवार). ३ हट्ट करणें. ४ प्रसिद्धि पावणें. **बजनियाँ, बजवैयाँ**—पु. वाजंत्री वाजविणारा.

**बजमारा**%—वि. वज्राहत; वज्रा-मुळें मारला गेलेला.

**बजर, बज्जर**—पु. वज्र.

**बज़रिया**—अव्य. मार्गानें; द्वारें.

**बजवाना**—क्रि. स. वाजवावयास, लावणें

**बजा**—वि. [फा.] उचित; ठीक. (मु ) **बजा लाना**—पूर्ण करणें; पालन करणें.

**बजागि***—स्त्री. विद्युत्.

**बज़ाज़, बज़्ज़ाज़**—पु. [अ.] कापडाचा व्यापारी. **बज़ाज़ा**—पु. कापडबाजार. **बज़ाज़ी** स्त्री. कापडाचा व्यापार.

**बजाना**—क्रि. स. १ वाजविणें; आवाज काढणें. २ अेखादी वस्तु मारणें. (मु.) **ठोकना बजाना**—तावून सुलाखून पाहणें.

**बजाय**—अव्य. [फा ] अैवजीं; बद्दल.

**बजिन्स**—वि. क्रि. वि. [फा.] जशाचा तसा; हुबेहूब. [व्यतिरिक्त

**बजुज़**—अव्य. [फा ] शिवाय;

**बझाना***—क्रि. स. जाळ्यात अडकविणें; फसविणें. **बझाव**—पु. फसवणूक.

**बट**—पु. १ अेक पक्वान्न. २ लहान वरवंटा. ३ वजन; माप. ४ दोराचा पीळ. ५ वड.

**बटअी**—स्त्री. बटेर (होला ) पक्षी.

**बटखरा**—पु. वजन; माप ( शेर अच्छेर अि. )

**बटन**—पु. [अिं.] बटन; गुंडी.

**बटन**—स्त्री. १ वीण. २ पीळ.

**बटना**—पु. अुटणें.

**बटना**—क्रि. स. सूत, दोरी अि. वळणें. [पिसलें जाणें.

**बटना**—क्रि. अ. वांटलें किंवा

**बटपरा-पार-मार**—पु. वाटमाऱ्या; डाकू; लुटारू.

**बटला**—पु. १ मोठा गुंड. २ पातेलें

**बटली-लोअी**—स्त्री. १ लहान गुंड. २ पातेलें. [जकातदार.

**बटवार**—पु. १ पहारेकरी. २

**बटवारा**—पु. वाटणी; बटवडा.

**बटा***—पु. १ गोल वस्तु. २ चेंडू. ३ गोटा; दगड. ४ प्रवासी; पाथिक.

**बटाअू**—पु. प्रवासी; पथिक (मु. ) **बटाअू होना**—चालूं लागणें.

**बटिया**—स्त्री. १ लहान वरवंटा. २ लहान गोटा.

**बटी**—स्त्री. १ गोळी. २ वडी.

**बटुआ-वा**—पु. १ बटवा. २ मोठा गुंड.

**बटेर**—स्त्री. होला ( पक्षी ).

**बटोर**—पु. जमाव; घोळका. २ वस्तूंचा ढीग. समूह.

**बटोरना**—क्रि. स. १ गोळा करणें; अेकत्र करणें. २ निवडून घेणें. जमा करणें.

**बटोही**—पु. प्रवासी; यात्रेकरू.

**बट्टा**–*पु.* १ तोटा; नुकसान. २ दलाली. ३ नाण्यांत किंवा दागिन्यात असलेली खोट.

**बट्टा**–*पु.* १ वरवंटा. २ लहान डबा.

**बट्टाढाल**–*वि.* सपाट; गुळगुळीत.

**बट्टी**–*स्त्री.* १ बत्ता; वरवंटा. २ वडी.

**बड़प्पन**–*पु.* मोठेपणा. [ गप्पीदास.

**बडबोल–ला**—*वि.* बाताड्या;

**बड़भाग–गी**—*वि.* भाग्यशाली.

**बडहल** *पु.* अेक फळ.

**बडहार**–*वि.* लग्नाची जेवणावळ.

**बड़ा**–*वि.* १ मोठा; विशाल. २ दीर्घ ३ श्रेष्ठ. **बड़ाअी**–*स्त्री.* १ मोठेपणा. २ विपुलता. ३ प्रशंसा. स्तुति. ( मु. ) **बडाअी देना**—आदर करणें. **बडाअी मारना**—शेखी मिरविणें.

**बडा दिन**–*पु.* नाताळ; ख्रिसमस.

**बडी**–*स्त्री.* वडी.

**बडीमाता**–*स्त्री.* देवी (आजार ).

**बडौना**–*पु.* स्तुति.

**बढअी**–*पु.* सुतार.

**बढना**–*क्रि. अ.* १ वाढणें; विस्तार होणें. २ मापांत अगर वजनांत अधिक होणें. ३ भरभराट, अुन्नति होणें. ४ दुकान बंद होणें. ५ विस्तव विझणें. ( मु. ) **बढकर चलना**–घमेंड करणें.

**बढनी**–*स्त्री.* केरसुणी.

**बढाना**–*क्रि. स.* १ वाढविणें; पसरविणें. २ पुढें चालू करणें. ३ स्वस्त विकणें. ४ दुकान अि. बंद करणें. ५ दिवा मालवणें. *क्रि. अ.* संपणें; समाप्त होणें.

**बढाव**–*पु.* वाढ; वृद्धि; विस्तार.

**बढावा** *पु.*– प्रोत्साहन; अुत्तेजन.

**बढिया**–*वि.* अुत्तम; अुत्कृष्ट.

**बढोतरी**–*स्त्री.* १ बढती; वृद्धि; २ प्रगति; अुन्नति.

**बतंगड–बतक्कड**–*पु.* मोठी गोष्ट. ( मु.) **बातका बतंगड करना**–राअीचा पर्वत करणें. [ २ वादविवाद.

**बतकही**–*स्त्री.* १ संभाषण; वार्तालाप.

**बतख**–*स्त्री.* बदक.

**बतचल**–*वि.* बडबड्या; वाचाळ.

**बतबढाव**–*पु.* बखेडा माजविणें.

**बतरस**–*पु.* गप्पागोष्टींतील मजा; खुमारी. [ बोलका.

**बतरौंहाँ***–*वि.* गप्पागोष्टी करणारा;

**बतलाना, बताना**–*क्रि. स.* १ सांगणें. २ सांगविणें; समजाविणें. ३ दाखविणें; दृष्टोत्पत्तीस आणणें.

**बताशा–सा**–*पु.* १ बत्तासा. २ अेक प्रकारचें दारूकाम; दारूगोळा.

**बतिया**–*स्त्री.* कोवळें फळ.

**बतिया**–*स्त्री.* १ गोष्ट. २ बोलणें.

**बतियार**–*स्त्री.* संभाषण; गोष्टी.
**बतौर**–*क्रि. वि.* [*अ.*] १ तऱ्हेनें; प्रकारें; रीतसर. २ समान; सदृश.
**बत्ती**–*स्त्री.* १ वात. २ मेणबत्ती. ३ दिवा. ४ मशाल. ५ कामटी (छपराकरितां).
**बथुआ–वा**–*पु.* चोळ (भाजी).
**बद**–*स्त्री.* अुपडा; पालथा.
**बद**–*स्त्री.* बद रोग. [२ दुष्ट; नीच.
**बद**–*वि.* [फा.] १ वाअीट; खराब.
**बद–अमली**––*स्त्री.* [फा.+अ.] अनागोंदी कारभार; अंदाधुंदी.
**बदकार**–*वि.* [फा.] १ व्यभिचारी. २ दुराचारी; कुकर्मी.
**बदक़िस्मत–बदनसीब**–*वि.*[फा. +अ.] दुर्दैवी; अभागी.
**बद–गुमान**–*वि.* [फा.] ज्याच्या मनांत दुसऱ्याविषयीं गैरसमज किंवा संशय अुत्पन्न झाला आहे असा.
**बदगुमानी**—*स्त्री.* १ गैरसमज. २ दुराग्रह.
**बदचलन**–*वि.* [फा.] दुराचारी.
**बदज़बान**––*वि.* [फा.] ज्याच्या तोंडांतून शिव्या निघतात असा; कटु भाषी; असभ्य.
**बदज़ात**––*वि.* [फा.] १ पाजी; नीच; दुष्ट. २ हलक्या कुळांत जन्मलेला; अकुलीन.
**बदतर**–*वि.* [फा.] अधिक वाअीट.
**बदूदुआ**–*स्त्री.* [फा.] शाप.
**बदन**–*पु.* [अ.] शरीर; देह.
**बदन**–*पु.* तोंड.
**बदना**–*क्रि. स.* १सांगणें. २ स्वीकारणें; अैकणें. ३ निश्चित करणें; ठरविणें. ४ पैज मारणें. (मु.) **बदा होना**–नशीबीं असणें. **बदकर कोअी काम करना**–सांगून-सवरून; हटवादीपणानें.
**बदनाम**–*वि.* [फा.] ज्याची अपकीर्ति झाली आहे असा; कुप्रसिद्ध; कलंकित.
**बदबू**–*स्त्री.* [फा.] घाण; दुर्गंध.
**बदमज़गी**–*स्त्री.* [फा.] बेबनाव; परस्परविरोध [२ लुच्चा; लफंगा.
**बदमाश**–*वि.* [फा.] १ दुराचारी
**बदमिज़ाज**–*वि.* [फा,] तुसड्या; चिडखोर.
**बदरंग**–*वि.*[फा.]१वाअीट रंगाचा. २ निराळ्या रंगाचा. पु. बेरंग.
**बदर**–*पु.* बोराचें झाड व बोर.
**बदर**–*क्रि. वि.* [फा.] बाहेर.
**बदरा**–*पु.* **बदरिया**–*स्त्री.*मेघ; ढग.
**बदरौंह***––*वि.* [फा.] कुमार्गी; दुराचारी.
**बदल**–*पु.* [अ.] फरक; बदल.
**बदलना**–*क्रि. अ.* [अ.] १ बदलणें;

फरक होणें. २ अैवजीं येणें किंवा जाणें. ३ बदली होणें.

**बदलना बदलवाना**–क्रि. स.[अ.] बदलविणें; पालटून घेणें.

**बदला**—पु.[अ.] १ सूड. २ परस्पर व्यवहार. ३ अैवजीं दिलेली किंवा घेतलेली वस्तु; मोबदला. ४ परिणाम; फळ. (मु.) **बदला लेना** अथवा **चुकाना** सूड अुगवणें.

**बदली**–स्त्री· मेघांचा समूह.

**बदले**--अव्य [अ.] अैवजीं; मोबदल्यांत. [बदल.

**बदलौवल**--स्त्री· [अ.] अदला-

**बदशाकल** }
**बदसूरत** } वि· [फा.] कुरूप.

**बदस्तूर**–क्रि· वि· [फा.] जशाचा तसा; नियमानुसार.

**बदहज़मी**–स्त्री· [फा.] अपचन.

**बदहवास**- वि· [फा.] १ बेशुद्ध. २ अस्वस्थ. ३ अुद्विग्न; व्याकुळ.

**बदा**–वि· भाग्यलिखित.

**बदाबदी**-स्त्री· दोन पक्षांतील तेढ.

**बदी**–स्त्री· वद्यपक्ष; कृष्णपक्ष.

**बदौलत** -क्रि·वि·[फा.] मुळें; द्वारा.

**बध**–पु· वध; हत्या.

**बधना**–पु· मातीचें तोटीदार भांडें.

**बधना**–क्रि· स· वध करणें; हत्या करणें.

**बधाअी**--स्त्री· १ अभिनंदन. २ मंगल प्रसंगाचें गाणेंबजावणें.

**बधावा**-पु· १ नजराणा; आहेर. २ अभिनंदन. [२फांशीं देणारा; मांग.

**बधिक**--पु· १ कसाअी; खाटीक.

**बधिया**–पु· खच्ची केलेला बैल किंवा अितर जनावर. [स्त्री· ३ नवी सून.

**बधूटी**–स्त्री· १ सून. २ भाग्यवती

**बन**–पु· १ वन; जंगल. २ पाणी.

**बनक**–*स्त्री· १ सजावट. २ वेष.

**बनज**–पु· १ कमळ. २ मोती. ३ वनांतील वस्तु.

**बनजारा**–पु· वंजारी.

**बनजी***–पु·१ व्यापार. २ व्यापारी.

**बनना**--क्रि· अ· १ तयार होणें; रचलें जाणें. २ वसूल होणें; मिळणें. ३ शक्य असणें. ४ मूर्ख ठरणें; बनलें जाणें. ५ निभणें; पटणें. ६ संधि मिळणें. ७ नटणें; थाटमाट करणें. ८ यशस्वी होणें; तडीस जाणें. ९ मोठेपणाचा आव आणणें. (मु) **बना रहना**-१ जिवंत राहणें. २ अस्तित्व टिकणें. [२ शृंगार.

**बननि***–स्त्री· १ बनावट; सजावट.

**बनफ़शा**–पु· [फा.] कामपुष्प. (औषधी वनस्पति).

**बनबाहन**–पु· नौका.

**बनबिलाव**–पु· रानमांजर.

**बनरखा**—पु. १ बनरक्षक; जंगलाची रखवाली करणारा. २ पारधी.
**बनरा**-पु. १ वर; नवरा मुलगा. २ विवाहप्रसंगीचें अेक गीत.
**बनरी**-स्त्री. नवरी मुलगी.
**बनरा**-पु. वानर.
**बनरुह**-पु. १ कमळ. २ जंगलांतील झाड. [बनवून घेणें.
**बनवाना**—क्रि. स. दुसऱ्याकडून
**बनवारी**-पु. वनमाली; श्रीकृष्ण.
**बनाना**-क्रि. स. १ बनविणें; तयार करणें. २ कमविणें; मिळविणें. ३ दुरुस्ती करणें. ४ थट्टा करणें; बनविणें; फसविणें. [२ विरुद्ध.
**बनाम**-क्रि. वि. [फा.] १ नांवानें.
**बनाव**-पु. १ बनावट; रचना. २ सजावट. ३ युक्ति; अुपाय.
**बनावट**-स्त्री. घडण; रचना.
**बनावटी**-वि. कृत्रिम; नकली; दिखावटी. [गवत अि. २ वनस्पति.
**बनासपती**-स्त्री. १ भाजीपाला,
**बनि***-वि. संपूर्ण; अेकंदर.
**बनिज**-पु. १ वाणिज्य; व्यापार. २ विक्रीची वस्तु; किराणा माल.
**बनिता**-स्त्री. वनिता; स्त्री.; पत्नी; भार्या. [करणें. २ विकत घेणें.
**बनिजना**-* क्रि. स. १ व्यापार
**बनिया**—पु. व्यापारी; वाणी.
**बनियाअिन** स्त्री. वाण्याची स्त्री.
**बनियाअिन**-स्त्री. [अि.] बनियन.
**बनिस्बत**—अव्य. [फा.] पेक्षां.
**बनेठी**-स्त्री. बोथाटी.
**बनैला**-वि. जंगली; वन्य.
**बनौटी**-वि. कापशी; कापसाच्या फुलासारखा.
**बपतिस्मा**-पु. [अि;] खिस्ती धर्माची दीक्षा देणें; बातिस्मा.
**बधना**-क्रि. स. बीं पेरणें.
**बपौती**-स्त्री. पैतृक संपत्ति.
**बफारा**-पु. वाफारा देणें.
**बबर**-पु. [फा.] १ विशिष्ट जातीचा वाघ. २ सिंह.
**बबुआ**-पु. [तु.] १ लहान मुलगा किंवा जांवअी यांना प्रेमानें हांक मारण्याचें संबोधन. २ जमीनदार; श्रीमंत. [झाड.
**बबूर, बबूल**-पु. बाभूळ; बाभळीचें
**बबूला**-पु. १ वावटळ. २ बुडबुडा.
**बभूत**-स्त्री. विभूती; भस्म.
**बम**-पु. [अि.] बॉम्ब गोळा.
**बम**-पु. [अनु.] शिवोपासकांचा 'बम' 'बम' असा शब्द (मु.)
**बम बोलना** अथवा **बोल जाना**-कफल्लक होणें; शिल्लक कांहीं न अुरणें.
**बम**-पु. [?] टांगा किंवा बग्गी

वगैरेची पुढें घोडा जुंगावयाची दांडी.
**बमकना**–*क्रि. अ.* [अनु.] १ मिजास करणें; शेखी मिरविणें. २ रागावणें; संतापणें. [तंटा.
**बमचख**–*स्त्री.* [?] बाचाबाची;
**बमना***–*क्रि. स.* ओकणें.
**ब–मूजिब***–*क्रि. वि.* [फा.] अनुसार; प्रमाणें.
**बयना***–*क्रि. स.* वर्णन करणें; सांगणें. **बयन** *पु.* वचन; वाणी.
**बयना**–*क्रि. स.* पेरणें. [यौवन.
**बयस–सिरोमनि***—*पु.* तारुण्य;
**बयसु***— *पु.* वैश्य.
**बयाँ, बयान**—*पु.* [अ.] १ कथन; कैफियत. २ खबर; विवरण; वृत्तांत.
**बयाना**—*पु.* [अ.] विसार; अेखाद्या कामासाठीं आगाअू दिलेला पैसा.
**बयाबान**—*पु.* [फा.] १ वाळवंट. २ निर्जन स्थान; ओसाड जागा.
**बयार–रि***—*स्त्री.* वारा.
**बयासी**—*वि* ब्याअैंशी
**बरंडा**—*पु.* [अिं.] व्हरांडा; ओसरी.
**बर**— *पु.* १ वर; नवरा मुलगा. २ आशीर्वाद; वर.
**बर**—*पु.* बल; शक्ति.
**बर**—*पु.* वटवृक्ष.
**बर**—*पु.* रेषा; रेघ.
**बर**—*अव्य.* [फा.] वर; वरती. *वि.* १ श्रेष्ठ. २ पूर्ण. (मु.) **मुराद बर आना**–मनोरथ पूर्ण होणें.
**बरकंदाज़** —*पु.* [अ. + फा.] लाठीबंद शिपाअी.
**बरकत**—*स्त्री.* [अ.] १ विपुलता. २ लाभ; फायदा. ३ अंत; समाप्ति. ४ धन. ५ कृपा. ६ अेक (संख्या).
**बरकती**–*वि.* लाभदायक.
**बरक़रार**—*वि.* [फा.] १ अुपस्थित; हजर. २ स्थिर; कायम.
**बरख***—*पु.* वर्ष.
**बरखना*** —*क्रि. अ.* पाअूस पडणें; वृष्टि होणें. **बरखा**–*स्त्री.* १ वृष्टि; पाअूस. २ पावसाळा.
**बरखास्त**—*वि.* [फा.] १ संप-लेला; विसर्जन केलेला. २ बडतर्फ; नोकरीवरून दूर केलेला.
**बरख़िलाफ़**—*वि., क्रि.वि.* [फा.] अुलटा; प्रतिकूल; विरुद्ध.
**बरगद**—*पु.* वडाचें झाड.
**बरछा**—*पु.* भाला. **बरछैत**—*पु.* भाला फेकण्यांत पटाअीत; भाला फेंकणारा. **बरछी**—*स्त्री.* बरछी.
**बरजना***–*क्रि. अ.* मनाअी करणें. **बरजनि** – *स्त्री.* १ मनाअी. २ अडचण. ३ आडकाठी; अडथळा.

**बरजबान**—वि. [फा.] तोंडपाठ; मुखोद्गत; कंठस्थ.

**बरजोर**— वि. [सं + फा.] १ प्रबळ; जबरदस्त. २ अत्याचारी. **बरजोरी**—स्त्री. जबरदस्ती; बळजबरी. क्रि.वि. जबरदस्तीनें.

**बरजौबति***—स्त्री. सुंदर तरुण स्त्री.

**बरत**—स्त्री. १ व्रत. २ संकल्प. **बरती**—वि. व्रतवैकल्य करणारा.

**बरतन**—पु. भांडें.

**बरतना**—क्रि.अ. व्यवहार ठेवणें; वागणें; क्रि.स. अुपयोगांत आणणें; कामांत आणणें.

**बरतरफ**—वि. [फा.] १ वेगळा; बाजूचा. २ बडतर्फ; नोकरीवरून कमी केलेला. [वागणूक.

**बरताव**—पु. वर्तन; व्यवहार;

**बरदाना-धाना** क्रि. स. फळविणें (गाय, म्हैस अि.). क्रि. अ. फळणें.

**बरदाफरोश**—पु. [फा.] गुलामांचा व्यापार करणारा. **बरदाफरोशी**—स्त्री. गुलामांचा व्यापार.

**बरदार**—वि. [फा.] वाहाणारा; धारण करणारा.

**बरदाश्त**—स्त्री. [फा.] १ सहनशीलता. २ जांगड माल आणणें.

**बरदौर**—स्त्री. गोठा; गोशाळा.

**बरधा**—पु. बैल.

२८

**बरन**—पु. १ वर्ण; अक्षर. २ जात. ३ रंग. अव्य. अेवढेंच नव्हे तर; अितकेंच काय पण.

**बरनन**—पु. वर्णन.

**बरनना***-क्रि. स. वर्णन करणें.

**बरना**—क्रि. स. १ वरणें; ग्रहण करणें; लग्न करणें. २ अेखाद्या कामाकरितां कोणाची निवड करणें. ३ दान देणें.

**बरफ**—स्त्री. [फा.] बर्फ.

**बरबंड***—वि. १ प्रबळ; बलवान्. २ प्रतापशाली. ३ अुद्धट. ४ प्रखर.

**बरबस**—क्रि. वि. १ जबरदस्तीनें; बलपूर्वक २ व्यर्थ; निरर्थक.

**बरबाद**—वि. [फा.] नष्ट; अुध्वस्त.

**बरबादी**—स्त्री. नाश.

**बरम***-पु. कवच.

**बरमा**—पु. [दे.] गिरमीट; लाकडाला छेद पाडण्याचें हत्यार.

**बरमा**—पु. [?] ब्रह्मदेश. **बरमी**-पु. ब्रह्मदेशाचा निवासी. **बरमी**—स्त्री. ब्रह्मदेशाची भाषा. **बरमी**—वि. ब्रह्मदेशाचा.

**बरवट**—स्त्री. पानथरी (रोग).

**बरवा-बरवै**—पु. [दे.] १ १९ मात्रांचा अेक छंद (काव्य). २ भुवं. ३ मासे पकडण्याचा गळ.

**बरस**—पु. वर्ष; साल.

**बरसगाँठ**—*स्त्री.* वाढदिवस.

**बरसना**—*क्रि. अ.* १ पाऊस पडणें; वृष्टि होणें. २ वर्षाव होणें; भडिमार होणें. ३ झळकणें; प्रकट होणें.

**बरसात**—*स्त्री.* पावसाळा. **बरसाती**—*वि.* पावसाळी; पावसाळ्याच्या संबंधींचा. *पु.* पावसाळी कोट. रेनकोट (मु.) **बरसाती मेंढक**—अल्पजीवी परंतु जास्त गडबड करणारा.

**बरसाना**—*क्रि. स.* १ पाऊस पाडणें; वृष्टि करणें. २ वर्षाव करणें; भडिमार करणें. ३ खूप मिळविणें.

**बरसी** *स्त्री.* १ वर्षश्राद्ध. २ वाढदिवस.

**बरसौहाँ**—*वि.* १ वर्षणारा. २ वृष्टि करणारा.

**बरहम**—*वि.* [फा.] १ पेंचांत सांपडलेला; विवंचनेंत पडलेला. २ रागावलेला. ३ विखुरलेला.

**बरहा** *पु.* शेतांत पाणी देण्यासाठीं केलेला पाट.

**बरहा**—*पु.* [दे.] दगड किंवा जड वस्तु उचलण्याचा जाड दोरखंड.

**बरहा**—*पु.*. १ मोर. २ कोंबडा. **बरही**-*स्त्री.* लांडोर.

**बरही**—*स्त्री.* बारसें.

**बरा**—*पु.* वडा.

**बराक**—*पु.* १ शंकर. २ युद्ध; लढाई. *वि.* १ नीच; अधम. २ शोचनीय. ३ बापडा; गरीब.

**बराना**—*क्रि. स.* निवड करणें.

**बराना**—*क्रि. अ.* १ प्रसंग आला असतांनासुद्धां कोणतीहि गोष्ट न सांगणें; अंग चोरणें. २ जाणूनबुजून वेगळें काढणें. ३ रक्षण करणें; सांभाळणें.

**बराबर**—*वि.* [अ.] १ समान; तुल्य; बरोबरीचा. २ सपाट. *क्रि. वि.* सतत. (मु.) **बराबर करना**—संपविणें. **बराबरी**—*स्त्री.* १ बरोबरी; समानता; तुलना. २ सामना.

**बरामद**—*वि.* [फा.] १ प्रकट झालेला. २ हरविलेला किंवा चोरीस गेलेला माल परत मिळविणें. ३. आयात. *स्त्री.* मळीची जमीन.

**बरामदा**—*पु.* [फा.] १ व्हरांडा; २ पडवी ओसरी. [साठीं.

**बराय**—अव्य. [फा.] करितां;

**बरास**—*पु.* भीमसेनी कापूर.

**बराह**—*क्रि. वि.* [फा.] १ द्वारा; कडून. २ प्रमाणें; तऱ्हेनें.

**बराह**—*पु.* वराह; डुक्कर.

**बरिया***—*वि.* बलवान्; बलिष्ठ.

**बरिषा**—*स्त्री.* वृष्टि; पाऊस.

**बरी**-*वि.* [अ.] मुक्त; सुटलेला.

**बरी**—*स्त्री.* वडी.

**बरीद**—*पु.* [अ.] जासूद.

**बरीस**–पु. पाहा ' बरस '
**बरु***—अव्य. भलेहि; खुशाल; बिनहरकत.
**बरुनी**–स्त्री. पापणीचे कैंस.
**बरेंडा**–पु. १ आढें. २ कौलाराचा अुंच भाग.
**बरे***—क्रि. वि. १ बलपूर्वक. २ मोठ्या आवाजानें. [दागिना.
**बरेखी**–स्त्री. बायकांच्या हातांतील
**बरेखी**—स्त्री. १ वर किंवा वधूपरीक्षा. २ विवाहनिश्चिति.
**बरेठा**–पु. धोबी; परीट. **बरेठन**–स्त्री. परटीण.
**बरैन-बरैनि**–स्त्री. तांबोळीण; पान-पट्टीच्या दुकानावर बसणारी बाअी.
**बरोक**–पु. हुंडा, करणी अि.
**बरोठा—बरौठा**—पु. १ देवडी. २ बैठक; दिवाणखाना. ( मु. ) **बरोठे का चार**–द्वार-पूजा.
**बरोरु**–वि. स्त्री. सुंदर.
**बरोह**–स्त्री.वडाची पारंबी. [कैंस.
**बरौनी**–स्त्री. डोळ्यांच्या पापण्यांचे
**बर्क**–पु. [ अ. ] वीज. वि. चपल; चलाख. [ २ सामान; सामग्री.
**बर्ग**–पु. [ फा. ] १ झाडाचें पान.
**बर्ज**–क्रि. वि. वर्ज्य. [ काठी करणें.
**बर्जना**–क्रि.स. मनाअी करणें.आड-
**बर्तन**–पु. भांडें.
**बर्ताव**–पु. पाहा ' बरताव '
**बर्फानी**–वि. पाहा ' बर्फीला. '
**बर्फिस्तान**–पु. [ फा. ] हिमप्रदेश.
**बर्फी**—स्त्री. [ फा. ] बर्फी.
**बर्फीला**—वि. [ फा. ] बर्फाळ; बर्फ असलेला; हिमयुक्त.
**बर्बर**—पु. १ असभ्य मनुष्य. २. कुरळे कैंस. वि. १ रानटी;असभ्य. २ अुद्दट; अुच्छृंखल.
**बर्मा**–पु. [अि.] ब्रह्मदेश.
**बर्र**—पु. [ अ. ] १ अरण्य; वन. २ कोरडी जमीन.
**बर्राक़**—वि. [अ.] १ चमकणारा; २ अत्यंत शुद्ध पांढरा. ३ धूर्त.
**बर्राना**—क्रि.अ. [अनु.] १ झोपेंत बडबडणें; बरळणें. २ अद्वातद्वा बोलणें; बडबडणें.
**बर्रै**—पु. गांधील माशी.
**बर्स**—पु. [ अ. ] कोड; कुष्ठरोग.
**बलंद**—वि. [ फा. ] १ अुंच. २ श्रेष्ठ. **बलंदी**–स्त्री. १ अुच्चता. २ अभिमान; गर्व.
**बल** — पु. १ शक्ति; सामर्थ्य. २ कर्तबगारी. ३ आसरा;भरंवसा. ४ आश्रय; आधार. ५ सैन्य; फौज. ६ बाजू.
**बल**—पु १ पीळ; मुरड. २ लपेट; फेरा. ३ नागमोडी वळण. ( मु. )

बल खाना–पीळ पडणें. २ लचकणें. बल पडना – अंतर पडणें; फरक होणें. [अनामत; ॲडव्हान्स.
**बलकट**––वि. [ ? ] आगाअू;
**बलकना**––क्रि.अ. [अनु.] अुकळी फुटणें. २ जोमांत असणें.
**बलकल***-पु. वल्कल.
**बलकाना**––क्रि. स. १ अुकळणें. २ अुत्तेजन देणें. [कफ.
**बलगम, बल्गम**––पु.[अ.]श्लेष्मा;
**बलद**––पु. बैल. [भाअू–बलराम.
**बलदाअू–देव**––पु. श्रीकृष्णाचा
**बलना**––क्रि.अ. पेटणें; जळणें.
**बलबलाना**––क्रि. अ. [ अनु. ] १ अुंटाचें ओरडणें. २ बडबडणें; वटवट करणें. **बलबलहाट**–स्त्री. १अुंटाची बोली.२खोटा अहंकार.
**बलबीर***––पु.१ कृष्ण.२ मारुती.
**बलबूता**––पु. सामर्थ्य; जोर.
**बलवा**––पु. [फा.]१ दंगा; विप्लव. २ बंड; राजद्रोह. **बलवाअी**–पु. १ दंगेखोर. २ बंडखोर; राजद्रोही.
**बला**––स्त्री. [अ.] १ संकट; आपत्ति. २ दुःख; कष्ट. ३ भूतप्रेतांची बाधा. ४ रोग; व्याधि. (मु.) **बलाका**–अत्यंत; घोर.
**बलात्**––क्रि. वि. बळजबरीनें; दुराग्रहपूर्वक; जबरदस्तीनें.
**बलि**––स्त्री. १ बळी. २ कर; महसूल. ३ नैवेद्य. (मु.) **बलि चढाना**–बळी देणें; ठार मारणें. **बलि बलि जाना** –– स्वतःला ओवाळून टाकणें.
**बलिया***––वि. बळकट; बलवान्.
**बलिष्ठ**–वि. बलवान्; सामर्थ्यवान्.
**बलिहारना***–क्रि. स. अर्पण करणें,
**बलिहारी**–स्त्री. आत्मार्पण; त्याग. (मु.) **बलिहारी जाना**–आत्मार्पण करणें. **बलिहारी लेना** प्रेम व्यक्त करणें. [मिसळलेला.
**बलुआ–वा**––वि. रेताड; रेती
**बलैया**–स्त्री. [अ.] १ आपत्ति. २ कुरवंडी. (मु.) **बलैया लेना**–कुरवाळणें;'अिडपिडा टळो' करणें.
**बल्कि**–अव्य. [फा.] १ अितकेंच नव्हे तर. २ अुलट.
**बल्लम**–पु. १ सोटा; दंडा. २ भालदार किंवा चोपदाराच्या हातांतील दंड; राजदंड. ३भाला. ४वासा.
**बल्लमटेर**–पु. [अिं.] स्वयंसेवक.
**बल्लमबर्दार**––पु. [ सं. + फा. ] भालदार; चोपदार.
**बल्लरि**––स्त्री. वेली; लता.
**बल्ला**––पु. १ लाकडाचा ओंडका; खोड. २लठ्ठ सोटा. ३वल्हें. ४ बॅट (क्रिकेट).

**बल्ली**–स्त्री. १ वेली. २ छतासाठीं वापरावयाचा वांसा.
**बवंडर**–पु. १ वावटळ. २ तुफान.
**बवना***–क्रि. स. १ पेरणें. २ विखुरणें; पसरणें.
**बवाल**–पु. पाहा 'ववाल'
**बवासीर**–स्त्री. [अ.] मूळव्याध.
**बशर**–पु. [अ.] मनुष्य.
**बशर्तेकि**–अव्य. [अ. + फा.] अट ही कीं; असें झालें तर. [भरपूर.
**बस**–पु. वश; ताबा. अव्य. पुरें;
**बसना**–क्रि. अ. १ बसणें. २ वस्ती करणें; वसाहत करणें. ३ भरभराटीस येणें. ४ मुक्काम करणें. (मु.) **मन में बसना**-आठवणींत राहणें.
**बसना**–क्रि. अ. सुगंधित होणें.
**बसनि***–स्त्री. निवास; मुक्काम.
**बसवास**–पु. १ निवास. २ राहण्याची सोय.
**बसर**–पु. [फा.] निर्वाह; गुजारा.
**बसह**–पु. बैल.
**बसा**–स्त्री. [दे.] वसा; चरबी; मेद.
**बसाना**–क्रि. स. १ वस्तीकरितां जागा देणें. २ वसाहत करविणें. क्रि. अ. वसाहत करणें.
**बसिऔरा**–पु. १ शिळासप्तमी (ज्या दिवशीं स्त्रिया फक्त शिळेंच अन्न खातात). २ शिळावळ. वि. शिळें.
**बसीकत-गत**–स्त्री. १ वस्ती. २ राहणी. [जासुदाचें काम.
**बसीठ**–पु. जासूद. **बसीठी**–स्त्री.
**बसुला**–पु. वाकस (सुताराचें अेक हत्यार).
**बसेरा**–वि. वस्ती करणारा. पु. १ प्रवासी लोकांची रात्रीं मुक्काम करण्याची जागा. २पक्ष्यांचें घरटें. (मु.) **बसेरा करना**-मुक्काम करणें.
**बसेरी, बसैया***–वि. निवास करणारा.
**बसौंधी**–स्त्री. बासुंदी; रबडी.
**बस्ता**–पु. [फा.] दप्तर. वि. बांधलेला.
**बस्ती**–स्त्री. वस्ती, लोकवस्ती; निवास.
**बहँगी**–स्त्री. कावड.
**बहकना**–क्रि. अ. १ भटकणें. २ बहकणें; नादीं लागणें; ३ नशेंत चूर होणें. ४ चुकणें.
**बहकाना**–क्रि. स. बहकाविणें.
**बहन-बहिन**–स्त्री. बहीण. **बहनापा**-पु. बहिणीचें नातें.
**बहना**–क्रि. अ. १ वाहणें. २ गळणें. ३ वाहणें; बहकणें.
**बहनु***–पु. वाहन; स्वारी.
**बहनेली**–स्त्री. बहिण मानलेली स्त्री.

**बहनोअी**-पु॰ मेहुणा; बहिणीचा नवरा. [ अुपकार. २ शुभ कार्य
**बहबूदी**-स्त्री॰ [ फा. ] १ कल्याण;
**बहम**–क्रि॰ वि॰ [फा.] १ संगत; साथ. २ परंपरा. ३ पुरवठा.
**बहर**–पु॰ [अ.] समुद्र.
**बहर**-क्रि.वि॰ [फा.] करितां; साठीं.
**बहर॰हाल**–क्रि॰वि॰[फा.] कोठल्याहि स्थितींत; होअील तसें.
**बहरा**–पु॰ [फा.] १ भाग; हिस्सा. २ भाग्य; नशीब.
**बहरा**–वि॰ बहिरा.
**बहराना**–क्रि॰ स॰ [फा.] रंजविणें; दुःख विसरून जाण्यासाठीं अेखादी गोष्ट सांगणें.
**बहरी**–वि॰ [अ.] समुद्री; सागरी.
**बहलना**–क्रि॰ अ॰ [फा.] रमणें; मनरंजन होणें.
**बहलाना**-क्रि॰वि॰ रमविणें; मनोरंजन करणें. **बहलाव**–पु॰ मनोरंजन.
**बहली**–स्त्री॰ बैलगाडी.
**बहस**–स्त्री॰ [अ.] १ वादविवाद. २ युक्तिवाद; तर्क. ३ हुज्जत; झगडा.
**बहादुर**–पु॰ [फा.] वीर; योद्धा. **बहादुरी**–स्त्री॰ शौर्य.
**बहाना**–पु॰ [फा.] १ मतलब साधण्यासाठीं खोटें बोलणें. २ निमित्त; कारण; सबब. ३ बहाणा; मिष.
**बहाना**–क्रि॰ स॰ १ वाहाविणें; प्रवाहांत सोडणें. २ ओतणें. ३ अपव्यय करणें.
**बहार**–स्त्री॰ [फा.] १ वसंत ऋतु. २ मौज; आनंद. ३ जवानी. ४ रमणीयता. ५ प्रफुल्लता.
**बहाल**–वि॰ [फा.] १ कायम; स्थिर; जशाचा तसा. २ प्रसन्न; खुश. ३ चांगल्या स्थितींतला. **बहाली**–स्त्री॰ पुनर्नियुक्ति; पूर्वींचीच नेमणूक.
**बहाव**–पु॰ १ प्रवाह; धार. २ वाहतें पाणी.
**बहिक्रम***–पु॰ वय.
**बहिन**–स्त्री॰ बहीण.
**बहियाँ***–स्त्री॰ बाही.
**बहिरत***–अव्य. बाहेर.
**बहिश्त**–पु॰ [फा.] स्वर्ग. **बहिश्ती**–पु॰ स्वर्गांत राहणारा. वि॰ स्वर्गीय.
**बहिष्कार**–पु॰ टाकणें; सोडणें (मु.) **बहिष्कार करना**—बहिष्कार घालणें.
**बही**–स्त्री॰ वही. [ बाजारबुणगे.
**बहीर**—स्त्री॰ १ गर्दी; जमाव. २
**बहीर***—अव्य. बाहेर.
**बहुगुना**—पु॰ बोघणें; पातेलें.
**बहुत**—वि॰ १ पुष्कळ अधिक. २ पुरेसें; भरपूर. **बहुतेरा**–वि॰ क्रि॰

*वि.* अधिक; पुष्कळ; **बहुतेरे**–*वि.* अनेक.
**बहुतक***–*वि.* पुष्कळ.
**बहुतायत**–*स्त्री.* [दे.] विपुलता.
**बहुधा**—*क्रि. वि.* १ अनेक प्रकारें. २ बहुतेक; बहुधा.
**बहुरि**–अव्य. पुनः; यानंतर.
**बहुरूपिया**–*पु.* बहुरूपी.
**बहूँटा**—*पु.* बाजूबंद.
**बहू**—*स्त्री.* १ सून. २ पत्नी. ३ वधू; नवरी मुलगी. [वनस्पति).
**बहेडा**—*पु.* बेहडा (औषधी
**बहेतू**–*वि.* भटक्या.
**बहेलिया**–*पु.* पारधी.
**बहोर***–*पु.* परतवणें; पुनरागमन.
**बहोरि***—अव्य. पुन्हां; वारंवार.
**बाँऍं**–*क्रि. वि.* डावीकडे.
**बाँक**–*वि.* १ वांकडा. २ तिरपा.
**बाँक**—*स्त्री.* १ बाजूबंद. २ पायांत घालावयाचें चांदीचें कडें. ३ बांगडी. ४ धनुष्य. ५ सुरी. *पु.* वांकडेपणा; वक्रता.
**बाँकपन**—*पु.* १ वक्रता; वांकडेपणा. २ नखरा; नटवेपणा. ३ शोभा; सौंदर्य. [३ नखरेल; नटवा.
**बाँका**–*वि.* १ वांकडा. २ बहादुर.
**बाँकुर-रा***–*वि.* १ वांकडा; मोडलेला. २ कुशल; चतुर. ३ तीक्ष्ण.
**बाँग**–*स्त्री.* [फा.] आरोळी; ओरड. २ नमाज पढतांना मुल्लाचें मोठ्यानें ओरडणें. ३ कोंबड्याचें आरवणें. [जाळें.
**बाँगुर**—*पु.* [दे.] पक्षी धरण्याचें
**बाँचना**—*क्रि. स.* शिल्लक राहणें; उरणें.
**बाँचना**–*क्रि. स.* वाचणें.
**बाँछना***–*क्रि. स.* १ इच्छिणें; अभिलाषा करणें. २ निवडणें. **बाँछित**–*वि.* इच्छित. **बाँछी**–*वि.* इच्छुक.
**बाँझ**—*स्त्री.* वांझ; वंध्या.
**बाँटना**–*क्रि. स.* वांटणें; विभागणें. **बाँट**—*स्त्री.* वांटणी. **बाँट**–*पु.* हिस्सा, भाग; वांटा. [२ अेकटा.
**बाँडा**–*वि.* १ शेंपूट तुटलेला पशु.
**बाँदर**—*पु.* वानर; माकड.
**बाँदी**—*स्त्री.* [फा.] दासी.
**बाँदू**—*पु.* कैदी.
**बाँधना**–*क्रि. स.* १ बांधणें. २ निश्चित करणें; ठरविणें. [विचार.
**बाँधनू**–*पु.* ठरविलेली गोष्ट किंवा
**बाँधव**–*पु.* बंधु; मित्र; नातेवाअीक; (यौ.) **बंधु-बांधव**–अिष्टमित्र.
**बाँबी**–*स्त्री.* सापाचें बीळ; वारूळ.
**बाँस**–*पु.* १ बांबू. २ सव्वातीन गजांचें माप. ३ पाठीचा कणा.

(मु.) **बाँसपर चढना**–बदनामी होणें. **बाँसपर चढाना**-१ बदनामी करणें. २ अेखाद्यास चढवणें. **बाँसों अुछलना**-आनंदानें अुड्या मारणें.

**बाँसरी–ली–सुरी**–*स्त्री.* १ मुरली; बांसरी. २ कसा.

**बाँह**–*स्त्री.* १ हात; भुजा. २ भरोसा; आसरा. ३ अेक प्रकारचा व्यायाम. ४ बाही. (मु.) **बाँह गहना** किंवा **पकडना**–१ साहाय्य करणें. २ विवाह करणें. **बाँह टूटना**–निराधार होणें. [२ प्रत्यक्ष; समक्ष.

**बा**–*अव्य.* [फा.] १ सह; बरोबर.

**बा**–*पु.* पाणी. [२ संस्थापक.

**बाअिस**–*पु.* [अ.] १ कारण; सबब.

**बाअी**–*स्त्री.* त्रिदोषांपैकीं 'वात' दोष.

**बाअी**–*स्त्री.* १ कुलीन स्त्री. २ वेश्या.

**बाअीस**–*वि.* बावीस. **बाअीसी**–*स्त्री.* बाविसांचा गट.

**बाअु**–*पु.* वायु.

**बाकमाल**–*वि.* १ निपुण; हुशार; प्रवीण. २ अद्‌भुत सामर्थ्य असलेला.

**बाकर**–*पु.* [अ.] १ महापंडित; जाडा विद्वान् २ धनाढ्य माणूस.

**बाकला**–*पु.* [अ.] अेक प्रकारचा वाटाणा. [व्यवस्थितपणें.

**बाक़ायदा**––*अव्य.* नियमबद्धपणें;

**बाक़ी**–*स्त्री.* [अ.] वजाबाकी. *वि.* शिल्लक; अवशेष. *अव्य.* पण; परंतु.

**बाग़**–*पु.* [अ.] १ बाग; अुपवन; बगीचा. २ मळा.

**बागडोर**–*स्त्री.* लगाम.

**बागबान**–*पु.* [अ.+फा.] माळी. **बागबानी**–माळ्याचें काम.

**बाग़ान**–*पु.* [अ.] मळे (चहाचे, निळीचे वगैरे). [द्रोही.

**बागी**–*पु.* [अ.] बंडखोर; राज-

**बाघंबर**–*पु.* व्याघ्रांबर.

**बाघ**–*पु.* वाघ.

**बाछा**–*पु.* वासरूं; गोऱ्हा. २ मुलगा.

**बाज़**–*वि.* [अ.] १ कोणी कोणी. २ कांहीं. ३ केव्हां केव्हां. *क्रि. वि.* वंचित; रहित. (मु.) **बाज़ आना**-१ परत येणें. २ दूर राहणें. ३ वंचित होणें. **बाज़ करना** अथवा **रखना**-मना करणें. [बहिरी ससाणा-

**बाज़**–*पु.* [फा.] शिकारी पक्षी;

**बाजना**–*क्रि.अ.* १ वाजणें. २ झगडणें; तंटा करणें; लढणें-३ प्रसिद्ध होणें; बोलबाला होणें. ४ लागणें; दुखावणें.

**बाजरा**–*पु.* बाजरी; अेक धान्य.

**बाजा**––*पु.* वाद्य. (यौ.) **बाजा गाजा**–गाजावाजा; अनेक प्रकारचीं वाद्यें.

**बाज़ाता—ब्ता**—*क्रि. वि.* [ फा. ] कायदेशीररीत्या; नियमानुसार. *वि.* कायदेशीर.

**बाज़ार**—*पु.* [ फा. ] बाजार. (मु.) **बाज़ार गर्म होना**—चलती असणें; खूप कामकाज चालणें. **बाज़ारू**—बाजारी; सामान्य.

**बाजि***—*पु.* १ घोडा. २ बाण. ३ पक्षी. *वि.* गतिशील.

**बाज़िंदगी**—*स्त्री.* [ फा. ] १ खेळ; मौज. २ धूर्तपणा; चलाखी.

**बाज़िंदा**—*पु.* [ फा. ] खेळाडू.

**बाज़ी**—*स्त्री.* [ फा. ] पैज; शर्त. (मु.) **बाज़ी मारना** किंवा **बाज़ी ले जाना**—१ पैज जिंकणें. २ अग्रेसर होणें ( चढाओढींत ).

**बाज़ीगर**—*पु.* [ फा. ] जादूगार.

**बाजु**—अव्य. शिवाय.

**बाजू**—*पु.* [ फा. ] १ हात; बाहु. २ बाजूबंद. ३ बाजू. ४ पंख.

**बाट**—*पु.* १ वरवंटा. २ वजनें ( शेर, अच्छेर अि. ).

**बाट**—*पु.* १ वाट; मार्ग; रस्ता. (मु.) **बाट जोहना** अथवा **देखना**—बाट पाहणें. **बाट पडना**—मागें लागणें; त्रास देणें. **बाट मारना**—डाका घालणें.

**बाटना**—*क्रि.स.* वांटणें; चूर्ण करणें.

**बाटी**—*स्त्री.* १ वाटी. २ गोळी.

**बाटी**—*स्त्री.* गाकर; बाटी.

**बाड**—*स्त्री.* कुंपण; आडोसा.

**बाडा**—*पु.* १ वाडा; भव्य अिमारत. २ गोटा. ३ आवार.

**बाडी**—*स्त्री.* १ बाग. २ मोहल्ला.

**बाढ—ढि**—*स्त्री.* १ वाढ; अधिकता. २ पूर; भरती ( नदी ). ३ सरबत्ती ( बंदूक, तोफेची ). ( मु. ) **बाढ दगना**—तोफांची सरबत्ती होणें.

**बाढ**—*स्त्री.* तलवार किंवा शस्त्राची धार.

**बात**—*स्त्री.* १ गोष्ट; कथन; वचन. २ चर्चा; प्रसंगानें निघालेली गोष्ट. ३ माहिती; खबर. ४ वार्तालाप; संभाषण. ( मु. ) **बात अुठाना**—बोलणीं सहणें. **बात अुडा देना**—अुडवून लावणें. **बातका बतंगड करना**—क्षुल्लक गोष्ट निष्कारण वाढविणें; राअीचा पर्वत करणें. **बातकी बातमें**—हां हां म्हणतां; तावडतोब. **बात चलना या छिडना**—चर्चा निघणें. **पतेकी या मार्केकी बात**—मुद्याची गोष्ट; सुंदर कल्पना. **बात बढना**—प्रकरण विकोपास जाणें. **बात बनना**—कार्य यशस्वी होणें; जमणें. **बातें बनाना**—थापा मारणें. **बातों में आना** अथवा **आ जाना**—फसणें.

**बातचीत**–*स्त्री*. संभाषण; वार्तालाप.
**बातिन**—*पु.* [*अ.*] १ आंतील बाजू. २ अंतकरण; मन. **बातिनी**–*वि*. १ आंतला. २ मनाचा.
**बातुल**—*वि*. १ विक्षिप्त. २ वेडा.
**बातूनिया–बातूनी**–*वि*. बडबड्या.
**बाद**—*पु.* [फा.] हवा; वारा.
**बाद**—*क्रि. वि.* [*अ.*] नंतर; मागाहून. *वि*. १ वेगळा केलेला. २ शिवाय; व्यतिरिक्त.
**बाद**—*पु.* १ वादविवाद. २ तर्क. ३ पैज; शर्त. अव्य. निरर्थक; व्यर्थ.
**बादना**–*क्रि. अ.* १ बकणें. २ हुज्जत घालणें. ३ आह्वान देणें.
**बादबान**–*पु.* [फा.] जहाजाचें शीड.
**बादर***—*पु.* मेघ; ढग. [प्रसन्न.
**बादर*** –*वि*. [दे.] आनंदित;
**बादल**—*पु.* ढग; मेघ.
**बादला**–*पु.* चांदी-सोन्याची बारीक तार (जरीच्या कामासाठीं).
**बादशाह**–*पु.* [फा.] सम्राट.
**बादशाहत**–*स्त्री*. [फा.] साम्राज्य; राजवट.
**बादाम**—*पु.* [फा.] बदाम.
**बादिया–पैमा**—*पु.* [फा.] वायु-भारमापक यंत्र.
**बादी**–*वि*. [फा.] १ वातुळ; वात-कारक. २ वाताचा. स्त्री. वात.
**बादुर**—*पु.* [दे.] वटवाघूळ.
**बाधना**—*क्रि. स.* विघ्न आणणें; अडविणें.
**बाधा**–*स्त्री*. अडचण; विघ्न. [झालेला
**बाध्य**—*वि*. बांधलेला; नाइलाज
**बान**—*पु.* १ बाण; तीर. २ आतष-बाजी. ३ समुद्र किंवा नदीची मोठी लाट. [सजावट. २ संवय.
**बान–नि–बानिक**–*स्त्री*. १ वेषभूषा;
**बान, बानि, बानी**–*पु.* तेज; कांति.
**बान**—*स्त्री*. [?] दोरी.
**बानक**—*स्त्री*. [दे.] वेष. [बानगी.
**बानगी**--*स्त्री*. [दे.] नमुना;
**बाना**–*पु.* १ पोषाख; पेहराव. २ चाल; रीत. ३ बाणा.
**बाना**—*पु.* अेक हत्यार.
**बाना**–*पु.* १ बुनावट; वीण २ कप-ड्याच्या वीणेंतील आडवा धागा; बाणा. ३ पतंगाचा दोरा (मांजा).
**बाना**–*क्रि. स.* मोठें भोंक पाडणें.
**बानि–नी***–*स्त्री*. १ वाणी; वचन. २ महात्मावचन. ३ सरस्वती.
**बानिन**—*स्त्री*. वाण्याची स्त्री.
**बानी**—*पु.* बनिया; वाणी.
**बानी**--*पु.* [*अ.*] १ बनविणारा; तयार करणारा. २ मुख्य साधन. ३ नेता; प्रधान.
**बानी**–*स्त्री*. पाहा ‘बानि’

**बानैत**–पु. १ बोथाटी फिरविणारा. २ तिरंदाज. ३ योद्धा.

**बापिका***–स्त्री. मोठी विहीर.

**बापुरा**–वि. १ साधारण; तुच्छ. २ गरीब; बापुडा.

**बाब**–पु. [अ.] १ प्रकरण; परिच्छेद. २ दरवाजा.

**बाबत**–स्त्री. [फा.] १ संबंध. २ विषय. अव्य. संबंधीं; विषयीं.

**बाबी**–स्त्री. १ संन्यासिनी; योगिनी. २ लहान मुलांबद्दल प्रेमसूचक शब्द.

**बाबुल**–पु. बाप; बाबू.

**बाम**–पु. [फा.] गच्ची; छत.

**बायँ-याँ**–वि. १ डावा; वाम. २ अुलट; विरुद्ध. पु. डग्गा (डाव्या हातानें वाजवावयाचा तबला).

**बाय***–पु. वारा.

**बायकाट**–पु. [अिं.] बहिष्कार.

**बायें**–क्रि. वि. १ डावीकडे २ विरुद्ध; अुलट. (मु.) **बायें हाथका खेल**–हातचा मळ; सोपी गोष्ट.

**बारंबार**-क्रि.वि.वारंवार;पुनः पुनः.

**बार**–पु. १ द्वार. २ आश्रयस्थान. ३ दरबार.

**बार**–स्त्री. १ वेळ;समय. २ अुशीर; विलंब. ३ वेळ; खेप. (मु.) **बारबार**–पुन्हां पुन्हां.

**बार**–पु. [फा.] ओझें; बोजा.

**बारगह-गाह** स्त्री. [फा.] १ डेरा; तंबू. २ दरबार.

**बारदाना**–पु. [फा.] १ पोतें. २ सैन्याच्या खाण्यापिण्याची सामग्री; रसद.

**बारना**–क्रि. स. पेटविणें.

**बारना**–क्रि. स. १ निवारण करणें. २ मनाअी करणें.

**बारबधू**–स्त्री. वेश्या; नायकीण.

**बारबर्दार**–पु. [फा.] हमाल; मजूर. **बारबर्दारी**–स्त्री. १ हमाली, मजुरी. २ हमालाचें काम.

**बारबार**–क्रि. वि. वारंवार. पुनः [पुनः.

**बारह**–वि. बारा. **बारहखडी**–स्त्री. बाराखडी.

**बारहदरी** – स्त्री. [सं. + फा.] मोकळी हवेशीर बैठक.

**बारहबाना-नी**–वि. १ दैदीप्यमान. २ खरें (सोनें).

**बारहमासी**–वि.१ बारा महिने फुलणारें. २ बारा महिने होणारें.

**बारह-वफ़ात**–स्त्री. [फा.] महंमद पैगंबरांच्या मृत्यूपूर्वींचे बारा दिवस.

**बारहासिंगा**–पु. सांबर.

**बारहा**–क्रि. वि. [फा.] वारंवार; [नेहमीं.

**बारही**–स्त्री. बारसें.

**बारही** पु. १ बारावा दिवस (मरणानंतरचा). २ जन्मानंतरचा बारावा दिवस.
**बाराँ**-पु. [फा.] मेघ; ढग.
**बारा**-वि. बालक. पु. मुलगा.
**बारात**-स्त्री. वरात.
**बारानी**-वि. [फा.] कोरडवाहू; जिराअीत (जमीन). [रेन-कोट.
**बारानी**-पु. [फा.] पावसाळी कोट;
**बारिश**-स्त्री. [फा.] १ पाअूस; वृष्टि. २ वर्षा ऋतु. [समास; मार्जिन.
**बारी**-स्त्री. १ किनारा; तट. २
**बारी**-स्त्री. १ बाग; बगीचा; २ घर; निवास. ३ खिडकी; झरोका. ४ बंदर. पु. पत्रावळी, द्रोण अि. विकणारी जात; गुरव.
**बारी**—स्त्री. पाळी; खेप (मु.) **बारीबारी से**—पाळीपाळीनें. **बारी बंधना**—पाळी ठरणें. [तरुणी.
**बारी**--स्त्री. १ अबोध कन्या. २
**बारी**-पु. [अ.] अीश्वर.
**बारीक**-वि. [फा.] १ बारीक; पातळ. २ लहान; सूक्ष्म. ३ कौशल्यपूर्ण.
**बारीकी**-स्त्री. [फा.] १ खुबी; मख्खी. २बारीकपणा. ३सूक्ष्मपणा.
**बारू**-पु. रेती; वाळू.
**बारूत-द**-स्त्री. [तु.] दारू. (मु.) **गोला बारूद**-लढाअीची सामग्री; दारूगोळा.
**बारे**--क्रि. वि. [फा.] शेवटीं; अखेरीस. [विषयीं.
**बारेमें**-अव्य. [फा. + सं.] संबंधीं;
**बाल**-पु. केंस. (मु.) **नहाते बाल न खिसकना** किंवा **बाल बाँका न होना**-यत्किंचित्‌हि हानि किंवा कष्ट न होणें. **बाल बाल बचना**-थोडक्यांत बचावणें (संकटांतून). [बच्चा. वि. अबोध; अजाण.
**बाल**—पु. १ बालक. २ जनावरांचा
**बालखोरा**—पु. [फा.] टकल.
**बालछड**—स्त्री. [दे.] जटामांसी (अेक औषधी).
**बालटी**—स्त्री. [अं.] बादली.
**बालतोड**—पु. केसतोडा. [पेटाविणें.
**बालना**-क्रि. स. दिवा लावणें;
**बालभोग**-पु. नैवेद्य.
**बालम**-पु. १ पति. २ प्रियकर.
**बालमखीरा**-पु. काकडी.
**बाला**-वि. [फा.] वरील; वरचा. क्रि. वि. वर; वरती. (मु.) **बोलबाला रहना**-वाहवा होणें; प्रसिद्धि होणें.
**बाला**—स्त्री. १ तरुण स्त्री. २ पत्नी; भार्या. ३ स्त्री. ४ लहान मुलगी. ५ हातांत घालावयाचें कडें.

**बालाअी**–*वि.*[फा.] वरचा; वरील. *स्त्री.* मलअी; दुधावरील साय.
**बालाख़ाना**-*पु.*[फा.]बैठकीची माडी.
**बालाबाला**–*क्रि. वि* [फा.] वरवर.
**बालिग़**–*वि.* [अ.] वयांत आलेला.
**बालिश**–*स्त्री.* [फा.] तक्क्या; अुशी.
**बालिश्त**–*स्त्री.* [फा.] वीत (माप).
**बालीन**–*पु.* [फा.] अुशी.
**बालू** – *पु.* रेती; वाळू. **बालूदानी**– *स्त्री.* रेतीदाणी; वाळूदाणी.
**बालूसाही**-*स्त्री.*[फा.]अेक मिठाअी.
**बावन**–*पु.* बावन (५२).
**बावर्ची**–*पु.*[तु.] आचारी; बबर्जी.
**बावरचीख़ाना**–*पु.* [तु. + फा.] स्वयंपाकघर.
**बावरा-बावला**–*वि.* १ बावळट; अजागळ. २वेडा;वेडपट. **बावलापन**–*पु.* बावळटपणा; वेडेपणा.
**बावली**–*स्त्री.* पायविहीर; बावडी.
**बाश**–अव्य. [फा.] तथास्तु. **खुशबाश**–सुखी अैस. [रहिवासी.
**बाशिंदा**—*पु.* [फा.] निवासी;
**बास**–*पु.* वस्त्र. [वस्त्र.
**बास**–*स्त्री.* १ अग्नि. २ अेक प्रकारचें
**बास**–*स्त्री.* १निवास;वास. २.निवासस्थान; घर. ३ वास; गंध.
**बास**-*स्त्री.* वासना; अिच्छा.
**बासन**–*पु.* भांडें.
**बासर**–*पु.* दिवस. [स्थान.
**बासा**–*पु.* १ खानावळ. २ निवास-
**बासी**–*वि.* शिळेंपाकें, (मु.) **बासी कढी में अुबाल आना**–शिळया कढीस अूत येणें; म्हातारपणीं डोहाळे लागणें.
**बाहना**–*क्रि. स.* १ वाहून नेणें; ओझें नेणें. २ चालविणें (हत्यार); फेंकणें. ३ गाडी, घोडे हांकणें. ४ वाहणें (द्रव). ५ नांगरणें.
**बाहम**–*क्रि. वि.* (फा.) आपसांत; परस्पर. २ साथ; सहित.
**बाहर**–*क्रि. वि.* बाहेर. **बाहरी**– *वि.* १ बाहेरील. २ परका. ३ वरपांगी; वरवरचा.
**बाहरजामी**–*पु.* सगुणरूप.
**बाहिज***–*वि.* बाहेरील; वरवरचा.
**बाहीं**–*स्त्री.* १ बाहु. २ बाही.
**बिंजन***–*पु.* खाद्य वस्तु.
**बिंद***–*पु.*१ पाण्याचा थेंब. २ दोन भुंवयांमधील जागा. ३ टिकली.
**बिंदी**–*स्त्री.* १ अनुस्वार; बिंदु. २ टिकली. **बिंदुली**–*स्त्री.* टिकली.
**बिंधना**–*क्रि. अ.* १ भोंक पडणें. २ फसणें; अडकणें.
**बिआना**–*क्रि. अ.* विणें (पशु).
**बिकना, बिकाना**–*क्रि. अ.* विक्री होणें. (मु.) **किसी के हाथ**

**विकना**–अेखाद्याचा सेवक बनणें.
**बिकवाना**–क्रि. स. विकविणें.
**बिकसना**–क्रि. अ. १ विकसणें; फुलणें. २ प्रफुल्लित होणें.
**बिकसाना**–क्रि. स. १ विकसविणें; फुलविणें. २ प्रसन्न करणें.
**बिकाअू**–वि. विकाअू.
**विकार***—पु. १ विकार. २ रोग; पीडा. ३ दोष. ४ दुष्कृत्य. ५ दुर्वासना. [ मिळणारें धन.
**बिक्री**—स्त्री. १ विक्री. २ विकून
**बिखरना**–क्रि.अ. विखुरणें; पसरणें.
**बिखराना, बिखेरना**—क्रि. स. विखुरविणें; पसरविणें.
**बिगखना**—क्रि. अ. १ बिघडणें. २ रागावणें; संतापणें. [ कुमार्गी.
**बिगडेदिल**—पु. १ भांडखोर. २
**बिगडैल**—वि. १ तापट; संतापी. २ हट्टी; दुराग्रही. [लणें; फुलणें.
**बिगसना***–क्रि.अ. विकसणें; उम-
**बिगहा**—पु. बिघा.
**बिगाड, बिगार**-पु. १ दोष; खराबी. २ वैमनस्य; झगडा.
**बिगाडना**–क्रि. स. १ बिघडविणें. २ हानि करणें; तोटा करणें.
**बिगारी***–स्त्री. [ फा. ] १ बिगार; मजुरी न देतां घेतलेलें काम. २ निष्काळजीपणानें केलेलें काम.
**बिगास***—पु. विकास. [शिवाय.
**बिगिर***—क्रि.वि. [ अ. ] बिना;
**बिगुन***—वि. ठोंब्या; मूर्ख.
**बिगुरचिन***—स्त्री. १ बुचकळा; विवंचना. २ अडचण.
**बिगुरदा***–पु. [ दे. ] अेक प्रकारचें प्राचीन हत्यार.
**बिगोना**—क्रि. स. १ नाश करणें; बिघडविणें. २ लपविणें. ३ त्रास देणें. ४ भुलविणें. ५ कंठणें; घालवणें.
**बिचकाना**—क्रि. अ. [ अनु. ] १ चिडविणें; वेंगाडणें. २ तोंड वेडें-वाकडें करणें ( बेचव पदार्थांमुळें ).
**बिचमों**—अव्य. मध्यें; आंत.
**बिचरना**–क्रि. अ. १ फिरणें; सहल करणें. २ यात्रा; प्रवास करणें.
**बिचलना**–क्रि.अ. १ विचलित होणें. २ हिम्मत खचणें.
**बिचला**—वि. मधला.
**बिचलाना**—क्रि. स. १ विचलित करणें. २ अव्यवस्थित करणें.
**बिचवान–नी** — पु. मध्यस्थ (सलोखा घडवून आणण्यासाठीं ).
**बिचहुत**— पु. संदेह; द्विविधा मनःस्थिति.
**बिचार**—पु. विचार.
**बिचारना***—क्रि. अ. १ विचार करणें. २ विचारणें; प्रश्न करणें.

**बिचारी**-विचारी; समजूतदार. [अतर
**बिचाल**-पु. १ अलग करणें. २ फरक;
**बिचेत***—वि. मूर्छित; बेशुद्ध.
**बिच्छू**—पु. १ विंचू. २ विषारी गवत.
**बिछना**—क्रि. अ. पसरलें जाणें.
**बिछलना**—क्रि. अ. घसरणें; सरकणें.
**बिछवाना**-क्रि. स. पसरवून घेणें; आंथरविणें.
**बिछाना**—क्रि. स. १ पसरविणें; फैलाविणें ( बिछाओेत ). २ लोळवणें ( मारून ). [३ करगोटा.
**बिछुआ**-पु. १ विचवा. २ जोडवीं.
**बिछुडना**—क्रि. अ. १ वेगळें होणें; अलग होणें. २ वियोग किंवा विरह होणें. [विरह.
**बिछोडा, बिछोय-ह**—पु. वियोग;
**बिछौना**—पु. बिछाना; अंथरूण.
**बिज़न**—पु. [फा.] सरसहा कत्तल.
**बिजन***—पु. लहान पंखा.
**बिजन**—पु. अेकांत. **बिजन**—वि. अेकटा; अेकाकी.
**बिजली, बिजुरी; बिज्जु***-स्त्री. १ वीज. २ गळ्यांतला किंवा कानांतला दागिना. वि. १ चंचल; चपळ. २ चमकदार.
**बिजाती**—वि. विजाती; परजातीचा.
**बिजान***—पु. अज्ञान.
**बिजूका-खा**—पु. [दे.] पक्ष्यांना हुसकून लावण्याकरितां शेतांत टांगून ठेवतात तें मडकें; बुजगावणें.
**बिजोग***-पु. वियोग. [अशक्त.
**बिजोरा**—वि. [सं. + फा.] दुबळा;
**बिज्जुल**-पु. साल; टरफल.
**बिज्जू**- पु. [दे.] अूद; रानमांजर.
**बिझुकना**—क्रि. अ. १ भडकणें; चेतणें. २ भिणें; भयभीत होणें. ३ वांकणें; वांकडें होणें.
**बिझुकाना**—क्रि. स. भिवविणें.
**बिटिया**—स्त्री. मुलगी; बेटी.
**बिठलाना-बिठाना**—क्रि. स. बसाविणें.
**बिडर**—वि. विस्कटलेला.
**बिडर**—वि. बेडर; निर्भय.
**बिडरना**—क्रि. अ. १ अस्ताव्यस्त होणें; विस्काळित होणें. २ बुजणें; बिचकणें. ३ नष्ट होणें.
**बिडराना**—क्रि. स. १ विस्कटून टाकणें; अुधळून टाकणें. २ पळविणें.
**बिडारना**—क्रि. स. बुजविणें; पळवून लावणें.
**बिडवना***—क्रि. स. तोडणें.
**बिढता**-पु. नफा; फायदा.
**बिढवना, बिढाना**—क्रि. स. १ कमाविणें; मिळविणें. २ संचय करणें; जमविणें.
**बित, बित्त**—पु. १ धन; द्रव्य. २ सामर्थ्य. ३ अुंची; ठेवण.

**बितरना**–*क्रि. स.* वांटणें.
**बिताना**–*क्रि. स.* १ समय व्यतीत करणें; कालक्रमण करणें. २ घालविणें.
**बित्त**-*पु.* पाहा ' बित. '
**बित्ता**–*पु.* [?] अेक वीत (माप).
**बिथकना**—*क्रि. अ.* १ थकणें. २ आश्चर्यचकित होणें. ३ मोहून जाणें.
**बिथरना**–*क्रि. अ.* विखुरणें.
**बिथा***—*स्त्री.* व्यथा; दुःख.
**बिथित**–*वि.* व्यथित.
**बिदकना**–*क्रि. अ.* १ फाटणें; चिरलें जाणें. २ घायाळ होणें; जखमी होणें. ३ बुजणें.
**बिदकाना**––*क्रि. स.* १ फाडणें. २ कापणें; चिरणें. ३ जखमा करणें.
**बिदर**–*पु.* विदर्भ देश.
**बिदा**–*स्त्री.* [अ.] १ निरोप; रजा. २ प्रस्थान. **बिदाअी**–*स्त्री.* रवानगी; निरोप. [ २ नष्ट करणें.
**बिदारना**–*क्रि. स.* १ फाडणें; चिरणें.
**बिदुराना***––*क्रि. अ.* गालांतल्या गालांत हंसणें; स्मित करणें.
**बिदुरानी**–*स्त्री.* हास्य; स्मित.
**बिदून**–अव्य. [फा.] खेरीज; शिवाय.
**बिदूषना**–*क्रि. अ.* दोष लावणें; दूषण देणें.
**बिदोख***–*पु.* वैमनस्य; वैर.
**बिद्दत**–*स्त्री.* [अ.] १ बिघाड; दोष. २ त्रास; दुःख. ३ आपत्ति संकट. ४ जुलूम; अत्याचार. ५ दुर्दशा.
**बिद्रुम**–*पु.* पोवळें; पवाळ.
**बिधँसना***–*क्रि. स.* विध्वंस करणें.
**बिध***–*स्त्री.* प्रकार.
**बिधना**–*पु.* ब्रह्मदेव; विधाता.
**बिन-नि–नु***–अव्य. शिवाय; विना.
**बिनअी***–*पु.* १ नम्र. २ विनंती करणारा.
**बिनअु***––*स्त्री.* विनय; विनंती.
**बिनति–ती**–*स्त्री.* विनंती; अर्ज.
**बिनना**–*क्रि. स.* १ निवडणें २ वेंचणें.
**बिनन**–*स्त्री.* निवड; वेंचणी.
**बिनवना*** ––*क्रि. अ.* विनविणें; प्रार्थना करणें. [ नष्ट करणें.
**बिनसना***–*क्रि. अ.* नष्ट होणें. *क्रि. स.*
**बिनसाना**–*क्रि. स.* बिघडवून टाकणें; नष्ट करणें.
**बिना**–अव्य. शिवाय. [ वेंचणी.
**बिनाअी**–*स्त्री.* १ विणकाम. २ निवड;
**बिनानी***–*वि.* अज्ञानी; अजाण.
**बिनावट**–*स्त्री.* वीण.
**बिनासना**––*क्रि. स.* नाश करणें.
**बिनूठा***–*वि.* विलक्षण; चमत्कारिक.
**बिनौला**–*पु.* [?] सरकी.
**बिपच्छी**-*पु.* १ प्रतिपक्षाचा; विरोधी. २ शत्रु; वैरी.
**बिपत-द-दा***–*स्त्री.* विपत्ति; संकट.

**विपर*** -पु॰ विप्र; ब्राह्मण.
**विफर***-वि॰ निष्फळ; व्यर्थ
**विफरना***-क्रि॰ अ॰ १ बंड करणें. २ नाराज होणें; रागावणें.
**विबछना***-क्रि॰अ॰ विरोधी बनणें.
**विबरन***-वि॰ १ रंग अुडालेला. २ निस्तेज; ज्याची चेहऱ्याची कांति नाहींशी झाली आहे असा.
**बिबिस***-वि॰ विवश; लाचार; परतंत्र. क्रि॰ वि॰ निरुपायानें.
**बिबहार***-पु॰ व्यवहार. [पडणें.
**बिवाअी**-स्त्री॰ तळपायास चिरा
**बिबि***-वि॰ दोन. [विमनस्क.
**बिमन***-वि॰ १ दुःखी. २ अुदास;
**बिमोहना**-क्रि॰ स॰ मोहून टाकणें; विमोहणें.
**बिय***-वि॰ १ दोन. २ दुसरा.
**बियाधा***-पु॰ पारधी.
**बियाधि***-स्त्री॰ व्याधि; पीडा.
**बियापना***-क्रि॰ स॰ व्यापणें.
**बियाबान**-पु॰ [फा.] १ ओसाड जागा. २ जंगल. ३ वाळवंट.
**बियारी, बियालू***-पु॰ रात्रीचें जेवण; फराळ.
**बियाह**-पु॰ विवाह; लग्न.
**बिरछ-रिछ***-पु॰ वृक्ष.
**बिरछिक***-पु॰ वृश्चिक; विंचू.
**बिरतत***-पु॰ वृत्तान्त; हकीकत.

**बिरताना***-क्रि॰ स॰ वांटणें; विभाग करणें.
**बिरथा**-क्रि॰ वि॰ वृथा; व्यर्थ.
**बिरदैत**-पु॰ विख्यात योद्धा. वि॰ विख्यात.
**बिरध-रिध*** -वि॰ वृद्ध.
**बिरमना**-क्रि॰ अ॰ १ थांबणें. २ आराम करणें. [टाकणें.
**बिरमाना**-क्रि॰स॰थांबविणें. २ मोहून
**बिरला**-वि॰ विरळा; अेखादाच.
**बिरही**-पु॰ विरही. [सीनता.
**बिराग**-पु॰ वैराग्य; विरक्ति; अुदा-
**बिराजना**-क्रि॰ अ॰ १ शोभणें; विराजणें २ बसणें.
**बिरादर**-पु॰ [फा.] भाअू (अनेक); भाअूबंद. **बिरादरी**-स्त्री॰ भाअूबंद; आप्तेष्ट.
**बिरान-ना***-वि॰ [फा.] १ परका. २ अपरिचित. ३ दुसऱ्याचा.
**बिरिया**-स्त्री॰ १ वेळ; समय. २ खेप; पाळी; वेळ.
**बिरी***-स्त्री॰ १ विडा. २ विडी.
**बिरुझना**-क्रि॰ अ॰ रागावणें; संतापणें. [प्रतिज्ञा.
**बिरुद**-पु॰ १ प्रशंसा. २ ब्रीद;
**बिरुदावली**-स्त्री॰ प्रशंसा (अनेक). पदकें. [पु॰ प्रतिज्ञावाला; शूर वीर.
**बिरुदैत**-वि॰ विख्यात; प्रसिद्ध.

बिल–पु. १ बीळ; विवर. २ भुयार. ३ गुन्हा.

बिलकुल–क्रि. वि. [अ.] १ संपूर्ण; अेकंदर. २ सुरुवातीपासून शेवटपर्यंत. ३ अगदीं; बिल्कुल.

बिलखना–क्रि. अ. १ दुःखी होणें. २ विलाप करणें; आक्रोश करणें. ३ संकोच पावणें; आक्रसणें.

बिलग–वि. विलग; वेगळा. बिलग–पु. वेगळेपणा.

बिलगाना—क्रि. अ. वेगळें होणें. क्रि. स. १ वेगळें करणें. २ निवडणें.

बिलटना–क्रि. अ. अुलटणें; अुपडें होणें. [रेल्वेरसीद; इनव्हॉइस; बीजक.

बिलटी—स्त्री. पार्सल पाठविल्याची

बिलनी–स्त्री. रांजणवाडी, (डोळ्याबगील फोड). [(किडा).

बिलनी—स्त्री. भ्रमरी; कुंभारीण

बिलपना*–क्रि. अ. विलाप करणें.

बिलफेल—क्रि. वि. [अ.] सध्यां; यावेळीं.

बिलबिलाना—क्रि. अ. [अनु.] १ वळवळणें (किड्यांचें). २ आक्रोश करणें.

बिलम—पु. अुशीर; विलंब.

बिलमना–क्रि. स. १ अुशीर करणें. २ थांबणें. ३ प्रेमबद्ध होणें.

बिलमाना–क्रि. स. प्रेमामुळें अेकाद्यास जाअूं न देणें.

बिलसना—क्रि. अ. शोभणें. क्रि. स. अुपभोग घेणें.

बिललाना–क्रि. अ. पाहा 'बिलखना'.

बिलसाना*–क्रि. स. १ अुपभोग घेणें. २ अुपभोग घ्यावयास लावणें.

बिलहरा—पु. पानांचा करंडा.

बिला–अव्य. [अ.] विना; खेरीज.

बिलाअी—स्त्री. १ मांजर. २ गळ (पोहरा काढण्याचा). ३ दाराची खिटी. [२ अदृश्य होणें.

बिलाना—क्रि. अ. १ नाश पावणें.

बिलायत — स्त्री. [अ.] विलायत; परदेश.

बिलारी—स्त्री. मांजरी

बिलाव—पु. बोका; रानमांजर.

बिलासना–क्रि. स. अुपभोग घेणें.

बिलैया—स्त्री. मांजर.

बिलोडना—क्रि. स. १ घुसळणें (दूध, दही अि.). २ अस्ताव्यस्त करणें; विस्कटणें.

बिलोन–वि. १ आळणी. २ कुरूप.

बिलोना–क्रि. स. १ घुसळणें. २ मिसळणें; ढवळणें. ३ ओतणें

बिलोल—वि. चंचल. [होणें.

बिलोलना–क्रि. अ. हलणें; विचलित

बिल्ला—पु. बिल्ला; पट्टा.

**बिल्ला**—पु. बोका. **बिल्ली**—स्त्री. १ मांजर. २ दाराची खिटी.

**बिल्लौर**-पु. १ स्फटिक. २ बिलोरी आरसा. ३ स्वच्छ कांच. **बिल्लौरी**—वि. बिलोरी.

**बिवराना** —क्रि. स. केसांचा गुंता सोडविणें; गुंतावळ काढणें.

**बिसंच***–पु. १ वस्तूंची निगा न ठेवणें; निष्काळजीपणा. २ कार्यनाश. ३ भय [विषारी प्राणी.

**बिसखपरा**––पु. घोरपडीसारखा

**बिसमिल, बिस्मिल**—वि. [फा.] घायाळ; जखमी.

**बिसमिल्ला**–पु. [अ.] अीश्वराच्या नांवानें (प्रत्येक कार्यारंभीं मुसलमान लोक याचा अुच्चार करितात).

**बिसरना**–क्रि. स. विसरणें.

**बिसरात**—पु. खेंचर. [पाडणें.

**बिसराना** -क्रि. स. विसरणें; विसर

**बिसवासी***—वि. विश्वास ठेवण्यास पात्र; विश्वासू.

**बिसवासी***–वि. विश्वास ठेवण्यास अपात्र; अविश्वासू.

**बिससना***–क्रि. स. विश्वास ठेवणें.

**बिससना**—क्रि. स. १ वध करणें; मारणें. २ शरीराचे तुकडे तुकडे करणें. [विकत घेणें.

**बिसहना, बेसहना***–– क्रि. स.

**बिसात**––स्त्री. [अ.] अंथरण्याची वस्तु (चटअी, मतरंजी अि.). २ बुद्धिबळाचा किंवा सोंगट्याचा कागदी अथवा कापडी पट. ३ सामर्थ्य; दर्जा. ४ जमा; दौलत. ५ शक्ति; ताकत. ६ भांडवल.

**बिसाती**––पु. [अ.] स्टेशनरी माल विकणारा दुकानदार.

**बिसास***–– पु. विश्वास.

**बिसासी***––वि. अविश्वासू; दगाबाज; कपटी. **बिसासिन**-स्त्री.

**बिसाहना**––क्रि. स. खरेदी करणें; विकत घेणें. पु. विकत घेतलेली वस्तु; सामान. [केलेली वस्तु

**बिसाहनी**––स्त्री. सौदा; खरेदी

**बिसिख***––पु. बाण.

**बिसियर**––वि. विषारी.

**बिसूरना**––क्रि. अ. खेद करणें स्त्री. चिंता; काळजी. [स्त्री. विशेषता.

**बिसेख***–वि. विशेष. **बिसेखता**–

**बिसेखना***—क्रि. अ. १ विस्तारपूर्वक वर्णन करणें. २ निर्णय करणें.

**बिसेसर***–पु. विश्वेश्वर.

**बिस्तर**––पु. बिछाना; अंथरुण.

**बिस्तरना***-क्रि. स. विस्तार करणें; फैलावणें. क्रि. अ. फैलणें.

**बिस्तुअिया**—स्त्री. पाल.

**बिस्वा**–पु. बिध्याचा विसावा भाग. (मु.) **बीसबिस्वा**—निःसंशय; नक्की.

**बिस्वास**—पु. विश्वास.

**बिहंग, बिहग**–पु. विहंग; पक्षी.

**बिहंडना**—क्रि. स. १ तुकडे तुकडे करणें. २ नष्ट करणें.

**बिहँसना**—क्रि. अ. हंसणें.

**बिहँसाना**—क्रि. अ. १ मंदस्मित करणें. २ प्रफुल्लित होणें. ३ फुलणें; खिलणें (फूल) क्रि. स. हंसविणें; खुष करणें.

**बिहद्द***—वि. [फा.] बेहद्द; अपरिमित. [बेचैन.

**बिहवल***–वि. व्याकुळ; अस्वस्थ,

**बिहरना**—क्रि. अ. सहल करणें; फिरावयास जाणें. [होणें.

**बिहरना**–क्रि. अ. फाटणें; विदीर्ण

**बिहराना***—क्रि. स. फाडणें.

**बिहान**–पु. १ प्रभात; सकाळ. २ उद्यां.

**बिहाना***–क्रि. स. सोडणें; त्यागणें. क्रि. अ. कंठणें; व्यतीत करणें.

**बिहारना**—क्रि. अ. विहार करणें; क्रीडा करणें; खेळणें.

**बिहाल**—वि. [फा.] १ अस्वस्थ; बेचैन. २ हलाखीच्या स्थितींत असलेला.

**बिहिश्त**–पु. [फा.] स्वर्ग.

**बिही**—स्त्री. [फा.] पेरूसारखें एक फळ किंवा झाड. **बिहीदाना**–पु. अेक औषधी बीज. [विना.

**बिहीन, बिहून**–वि. विहीन; रहित;

**बिहुरना, बिहोरना***—क्रि. अ. सोडणें; त्यागणें; टाकणें.

**बींधना, बीधना***–क्रि. अ. १ अडकणें २ छेद होणें. क्रि. स. छेद करणें; वेध करणें.

**बी**—स्त्री. पाहा 'बीबी'.

**बीघा**—पु. बिघा.

**बीच**—पु. मध्यभाग. (मु.) **बीच करना**–भांडण सोडविणें; मध्यस्थी करणें. **बीच पडना**–अंतर पडणें. **बीच में पडना**–मध्यस्थी होणें. **बीच-सकता** मध्यंतर; अिंटरव्हल. अव्य. मध्यें; आंत.

**बीच**—स्त्री. लाट; तरंग.

**बीचु***—पु. १ संधि; अवसर. २ अंतर; फरक.

**बीचोबीच**–क्रि. वि. मधोमध.

**बीछना***–क्रि. स. निवडणे.

**बीछी***–स्त्री. विंचू. **बीछू**–पु. विंचू.

**बीजक**—पु. १ यादी. २ मालाची किंमत, माहिती वगैरेची यादी. ३ बीजक. ४ कबीराचा अेक पद्यसंग्रह

**बीजन***–पु. पंखा.

**बीजा**–वि. दुसरा.

**बीज़ी**–*स्त्री·* १ कोय. २ गीर.
**बीजु***–*स्त्री·* बीज.
**बीडा**–*पु·* विडा; तांबूल. (मु.) **बीडा अुठाना**–विडा अुचलणें; निश्चय करणें.
**बीडी**–*स्त्री·* १ विडी. २ विडा. ३ दांत घांसण्याची मिश्री; दांतवण.
**बीतना**–*क्रि· अ·* १ व्यतीत होणें; गुजरणें. २ दुःख कोसळणें.
**बीथित***–*वि·* व्यथित. दुःखी
**बीन**–*स्त्री·* वीणा; बीन; **बीनकार**–*पु·* बीन वाजविणारा. [डणें.
**बीनना**–*क्रि· अ·* १ वेचणें. २ निव-
**बीफै**–*पु·* गुरुवार.
**बीबी**–*स्त्री·*[फा.] १ पत्नी; बायको. २ मोठ्या घरची स्त्री. [दुष्ट.
**बीभत्स**–*वि·* १ किळसवाणें. २पापी;
**बीमा**–१ *पु·*[फा] १ विमा. २ विमा अुतरविलेलें पत्र किंवा पार्सल वगैरे.
**बीमार**–*वि·*[फा.] रोगी; आजारी. **बीमारी**–*स्त्री·* १ आजार; रोग. २वाअीट संवय. ३भानगड; बखेडा.
**बीमारदार**–*वि·* [फा.] रोग्याची सेवा शुश्रूषा करणारा. **बीमारदारी**–*स्त्री·* रोग्याची सेवाशुश्रूषा.
**बीय-या***–*पु·* बीं; बीज.
**बीय-या***–*वि·* दुसरा.
**बीरज***–*पु·* वीर्य; शक्ति.
**बीरन***–*पु·* भाअू. [साळी किडा.
**बीरबहूटी**–*स्त्री·* अेक लाल पाव-
**बीर्बी**–*स्त्री·* पाहा 'बीबी'
**बीस**–*वि·* १ वीस. २ अुत्तम; श्रेष्ठ. **बीसी**–*स्त्री·* विसाचा गट.
**बीहड**–*वि·* अुंच-सखल; खडबडीत. २ विकट; अवघड. *वि·* अलग.
**बुँदकी**–*स्त्री·* १ टिकली. २ लहान. ठिपका; डाग.
**बुंदा**–*पु·* १ कानांत घालावयाचा दागिना (बुलक, झूल, लोलक अि.). २ कपाळाची टिकली.
**बुँदिया**–*स्त्री·* १थेंब. २बुंदी(पक्वान्न).
**बुआ**–*स्त्री·* [दे.] १ आत्या. २ वडील बहिण.
**बुकचा**–*पु·*[तु] गाठोडें. **बुकची**–*स्त्री·* १ पोटळी. २ सुअी, दोरा वगैरे ठेवण्याची शिंप्याची पिशवी.
**बुकनी**–*स्त्री·* [दे.] पूड; भुकटी.
**बुकुन**–*पु·* [दे.] १ भुकटी; बुकणी. २ पाचक चूर्ण. [बुकणी.
**बुक्का**–*पु·* [दे.] अभ्रकाची पूड;
**बुखार**–*पु·* [अ.] १ ज्वर; ताप. २ वाफ. ३ शोक, क्रोध अित्यादींचा आवेग.
**बुज़**–*स्त्री·* शेळी; बकरी.
**बुज़दिल**–*वि·* [फा.] भित्रा; भेकड. **बुज़दिली**–*स्त्री·* भ्याडपणा.

**बुजुर्ग**–*वि*. [फा.] १ वडील; वृद्ध, २ श्रेष्ठ. **बुजुर्गवार**–*वि*. श्रेष्ठ; वडीलधारें. **बुजुर्गी**-*स्त्री*. वडीलकी; मोठेपणा. [मंदावणें. ३ थंड पडणें.
**बुझना**–*क्रि. अ*. [ ? ] १ विझणें. २
**बुझाना**––*क्रि. स*. १ विझविणें. २ शांत करणें. ३ समजाविणें. **बुझाअी**–*स्त्री*. विझविण्याचें काम.
**बुडबुडाना**––*क्रि. अ*. [अनु.] पुटपुटणें; कुरकुरणें.
**बुढाअी**––*स्त्री*. म्हातारपण.
**बुढाना**–*क्रि. अ*. म्हातारपण येणें; वृद्ध होणें.
**बुढापा**––*पु*. म्हातारपण.
**बुढौती**-*स्त्री*. वृद्धत्व. म्हातारपण.
**बुत**–*पु*. [फा.] १ मूर्ति; प्रतिमा. २ प्रेमिका; प्रेयसी. ३ बुभ्या. ४ मूर्ख.
**बुतपरस्त**–*पु*. [फा.] मूर्तिपूजक. **बुतपरस्ती**–*स्त्री*. मूर्तिपूजा.
**बुतकदा**––*पु*. [फा.] देऊळ. २ प्रेमिकेचें निवासस्थान.
**बुतखाना**––*पु*. [फा.] १ मंदिर. २ प्रेमिकेचें निवासस्थान. [भंजक.
**बुत-शिकन**––*वि*. [फा.] मूर्ति-
**बुत्ता**––*पु*. [दे.] १ फसवणूक; लबाडी. २ बहाणा; ढोंग; आव.
**बुद्धू**–*वि*. मूर्ख; बावळट;
**बुधि*** *स्त्री*. बुद्धि.

**बुन**–*पु*. [अ.] १ कॉफीचें बीं. २ झाडाचें मूळ.
**बुनना**–*क्रि. स*. विणणें **बुनाअी**–*स्त्री*. १ विणकाम. २ विणण्याची मजुरी. [घेणें.
**बुनवाना–बुनाना**–*क्रि. स*. विणवून
**बुनावट**-*स्त्री*. वीण.
**बुनियाद्**––*स्त्री*. [फा.] १ पाया; मूळ. २ अस्सलपणा; वास्तविकता. (यौ) **बुनियादी तालीम**– *स्त्री*. मूलोद्योगी शिक्षण.
**बुबुकना**–*क्रि. स*. [अनु.] ओक्साबोक्शीं रडणें; हंबरडा फोडणें. **बुबुकारी**-*स्त्री*. आक्रोश; हंबरडा.
**बुरकना**–*क्रि. स*. [अनु.] भुरभुरणें; हलक्या हातानें थोडी थोडी पसरणें (पूड वगैरे).
**बुरका, बुर्का**–*पु*. [अ.] बुरखा.
**बुरा**–*वि*. वाअीट; निकृष्ट. (मु.) **बुरा मानना**–१ वाअीट मानणें; राग मानणें. २ द्वेष करणें. (यौ.) **बुराभला**–१ हानिलाभ. २ शिवीगाळ.
**बुराअी**–*स्त्री*. १ वाअीटपणा. २ दोष; दुर्गुण. ३ निंदा.
**बुरादा**–*पु*. [फा.] १ लांकडाचा भुसा. २ चूर्ण; चुरा.
**बुर्का**–*पु*. पाहा 'बुरका'.

**बुर्ज**–पु. [अ.] १ बुरूज. २ घुमट.
**बुर्द**–स्त्री. [फा.] १ वरची मिळकत. २ पैज. ३ बुर्जी (बुद्धिबळांतील).
**बुलंद**–वि. [फा.] १ अुंच. २ श्रेष्ठ.
**बुलबुल**–स्त्री. [अ.] अेक पक्षी. (बुलबुल).
**बुलबुला**–पु. बुडबुडा.
**बुलाक**–स्त्री. [तु.] लोलक.
**बुलाना**–क्रि. स. १ बोलाविणें. २ हांक मारणें. ३ बोलावयास लावणें. **बुलावा**–पु. निमंत्रण; बोलावणें.
**बुलेटिन**–पु. [अि.] पत्रक.
**बुवा**—स्त्री. पाहा 'बुआ'.
**बुहारना**—क्रि. स. झाडणें; केर काढणें. **बुहारी**-स्त्री.झाडू;केरसुणी.
**बूँद**–स्त्री. थेंब; बिंदु. (मु.) **बूँदें गिरना** अथवा **पडना**–झिमझिम पाऊस पाडणें. **बूँदाबांदी**–स्त्री. पावसाची बुरबुर. [साचे थेंब.
**बूँदी**–स्त्री. १ बुंदी पक्वान्न. २ पाव-
**बू**—स्त्री. [फा.] १ वास; गंध. २ दुर्गंध; घाण. [२ मोठी बहीण.
**बूआ**—स्त्री. [दे.] १ आत्या.
**बूकना**–क्रि. सं. [दे.] १ पूड करणें. २ बोलण्यात अुसनी अैट आणणें.
**बूचड**-पु. [अि.] कसाअी; खाटीक.
**बूचडखाना**—पु. [अि. + फा.] कसाअीखाना. [विद्रूप. ३ बुच्चा.
**बूचा**-वि. १ कान कापलेला. २
**बूजना**–क्रि. स. [?] धोका देणें; फसविणें. [२ कोडें.
**बूझ**-स्त्री. १ अकल; बुद्धि; ज्ञान.
**बूझना** क्रि.स. १ जाणणें; समजणें. २ विचारणें.
**बूट**–पु. १ डहाळा (हरभऱ्याचा). २ हरभऱ्याचा दाणा; घाटा.
**बूट**—पु. [अि.] बूट (पायांत घालण्याचा).
**बूटा**–पु. १ रोपटें. २ वेलबुट्टी.
**बूटी**–स्त्री. १ वनस्पति. २ वेलबुट्टी.
**बूढा**—पु. म्हातारा; बुड्ढा.
**बूता**–पु. कुवत; शक्ति.
**बूदोबाश**–स्त्री. [फा.] राहाणी-करणी; निवास.
**बूरा**–पु. १ पिठीसाखर. २ पूड.
**बृहत्**—वि. मोठा. **बृहत्तर**–वि. अधिक मोठा.
**बेगँ**—पु. बेडूक.
**बेंच**—स्त्री. [अि.] बाक.
**बेंट-ठ**–स्त्री. [दे.] १ लांकडी मूठ. २ दस्ता.
**बेंत**–पु. १ वेत. २ वेताची छडी.
**बेंदा**—पु. १ टिळा. २ टिकली. ३ बिंदी.

**बे**–अव्य. [ फा. ] बिना; खेरीज. निषेधसूचक उपसर्ग.

**बे**–अव्य. लहानांसाठीं संबोधन;अरे.

**बेअकल**–*वि.* [फा.+अ.] बेअकली; मूर्ख.

**बेअदब**–[ फा. + अ. ] बेअदबी; मोठ्या माणसांचा मान न ठेवणारा; अशिष्ट. **बेअदबी**–*स्त्री.* असभ्यता; अमर्यादा.

**बेआब**–*वि.* [ फा. + अ. ] निस्तेज. २ तुच्छ. [नित. २ अप्रातिष्ठित.

**बेआबरू**–*वि.* [फा.+अ.] १अपमा-

**बेअिज्ज़त**–*वि.* [फा.+अ.] १ अप-मानित.अप्रतिष्ठित २ **बोअिज्जती**-*स्त्री.* अपमान; अप्रतिष्ठा.

**बेअिन्तहा**–*वि.* [फा.+अ.]अमर्याद.

**बेअीमान**–*वि.*[फा.+अ.]१ अधर्मी. २ अप्रामाणिक. **बेअीमानी**–*स्त्री.* बेअिमानी; अप्रामाणिकता.

**बे-अुज्र**–*वि.* [फा.+अ.] आक्षेप-रहित; बिनहरकत. [ अप्रतिष्ठित.

**बेकद्र**–*वि.* [फा.] अब्रू नसलेला;

**बेकरार**- *वि.*[फा.] बैचैन; अस्वस्थ.

**बेकल*** –*वि.* विकल; अस्वस्थ. **बेकली**–*स्त्री.* व्याकुळता. [निर्दोष.

**बेकसूर**–*वि.* [फा.+अ.] निरपराध;

**बेकहा**–*वि.* [फा. + सं.] दुसऱ्याचें न ऐकणारा; अुद्धट; अुच्छृंखल.

**बेकाबू**–*वि.* [फा.+अ.] १ लाचार. २ ताब्यांत नसलेला.

**बेकाम**–*वि.* [फा. + सं.] १ निरुप योगी; कुचकामाचा. २ निरुद्योगी.

**बेकार**–*वि.*[फा.] १ काम नसलेला; २ निरर्थक; व्यर्थ. ३ निष्फळ *क्रि. वि.* निरुपयोगी; व्यर्थ. **बेकारी**–*स्त्री.* बेकारी; निरुद्योगीपणा.

**बेखटके**–*क्रि. वि.* [ फा.+ अनु.] निःसंकोचपणें; बेधडक; बेलाशक.

**बेखबर**—*वि.* [फा.] १ बेफिकीर; निष्काळजी. २ भानावर नसलेला; बेहोष;बेशुद्ध.३ अजाणता; नेणता.

**बेग**–१ वेग; शीघ्रता. २ प्रवाह.

**बेगम**–*स्त्री.* [तु.] १ राणी. २ अुच्च कुळांतील स्त्री.

**बेगर**–अव्य. वेगळा; निराळा.

**बेगरज़**–*वि.* [फा.+अ.] १ तमा न बाळगणारा; बेफिकीर. २निःस्वार्थी.

**बेगाना**–*वि.* [फा.] १ परका; अप-रिचित. २ दुसऱ्याचा; परक्याचा.

**बेगार**–*स्त्री.*[फा.] बिगार; वेठ.(मु.) **बेगार टालना**–चालढकल करणें; कसें तरी काम करणें. **बेगारी**–*स्त्री.* बिगारी.

**बेगि***–*क्रि.वि.*लौकर; शीघ्र; झटपट.

**बेगुनाह**—*वि.* [ फा. ] निरपराध; निर्दोष.

**बेचना**–*क्रि. स.* विकणें. (मु.) **बेच खाना**–गमावणें; हरवणें.

**बेचाना**–*क्रि.स.* विकविणें. [गरीब.

**बेचारा**–*वि.* [फा.] बिचारा; दीन;

**बेचिराग़**–*वि.* [ फा. ] बेचिराख; उध्वस्त.

**बेजड**–*वि.* [ फा.+सं. ] निराधार; बिनबुडाचा; पाया नसलेला.

**बेज़बान**–*वि.* [फा.]१ मुका; बोलतां न येणारा. २ दीनदुबळा.

**बेजा**-*वि.*[फा.] १ अवेळीं झालेला. २ अनुचित; अयोग्य. (मु.) **जा बेजा**–योग्यायोग्य.

**बेजान**-*वि.*[फा.]१ निर्जीव मृतवत्. २ कोमेजलेला. ३ दुबळा; अशक्त.

**बेज़ाब्ता**–*वि.* [फा.+अ.] बेकायदा; नियमाविरुद्ध.

**बेज़ार**—*वि.* [ फा. ] १ नाखुष; अप्रसन्न. २ दुःखी.

**बेझा***—*पु.* लक्ष्य; निशाण.

**बेटला***–*पु.* मुलगा; पुत्र. **बेटली**–*स्त्री.* मुलगी. [ मुलगी; कन्या.

**बेटा**–*पु.* मुलगा; पुत्र. **बेटी**–*स्त्री.*

**बेठन**–*पु.* वेष्टनाचें वस्त्र; रुमाल.

**बेठिकाने**– *वि.* [ फा. + सं. ] १ स्थानभ्रष्ट. २ व्यर्थ; निरर्थक.

**बेड**—*पु.* कुंपण

**बेडा**–*पु.*१ जहाजांचा किंवा नावांचा तांडा; आरमार. (मु.) **बेडा पार करना** अथवा **लगाना**– संकटांतून पार पाडणें. *वि.* कठिण; मुश्किल.

**बेडिन–नी**—*स्त्री.* कलावंतीण.

**बेडौल**—*वि.* पाहा 'बेढंगा'

**बेढंग–गा**–*वि.* [ फा. + सं. ] १ अशिष्ट; चालरीत न जाणणारा. २ बेडौल; बेढब. ३ कुरूप.

**बेढ** – *पु.* [ ? ] नाश.

**बेढअी**—*स्त्री.* कचोरी. [गुरें वळणें.

**बेढना**–*क्रि. स.* १ कुंपण घालणें. २

**बेढब**–*वि.* १बेडौल; विजोड. २कुरूप.

**बेढा**–*पु.* १ हातांतील कडें. २ परस; परसूं.

**बेतकल्लुफ**–*वि.* [ फा. + अ. ] १ मनमोकळा. २अशिष्ट; निःसंकोची.

**बेतना**–*क्रि. अ.* माहीत होणें; कळणें.

**बेतमीज**–*वि.* [ फा.+अ. ] असभ्य; अशिष्ट; उद्धट.

**बेतरह**–-*क्रि. वि.* [ फा. + अ. ] १ अनुचित रूपानें; गैरवाजवी. २ असाधारण रीत्या. *वि.* पुष्कळ; अधिक.

**बेतरीका**—*वि.*, *क्रि.वि.* [ फा. + अ. ] अनुचित; नियमाविरुद्ध.

**बेतहाशा**–*क्रि. वि.* [ फा. + अ. ] १ अधिक वेगानें; भरधांव. २

# व

**वंकट**—*वि.* १ वांकडातिकडा. २ कपटी. ३ विकट; कठिण.
**वंकनार–वंकनाल**–*स्त्री.* सोनाराची वांकडी नळी अथवा फुंकणी.
**वंग**–*पु.* १ कथील. २ शिसें.
**वंग**—*पु.* बंगाल. [धूर्त. ३ दुष्ट.
**वंचक**–*पु.* १ फसविणारा; ठक. २
**वंचना**–*स्त्री.* फसवणूक; ठकबाजी.
**वंचित**—*वि.* फसलेला; पारखा झालेला. [२ प्रणाम. ३ पूजा.
**वंदन**–*पु.* **वंदना**–*स्त्री.* १ स्तुति.
**वंश**–*पु.* १ वंश; कुळ. २ बांबू. ३ बांसरी. [वंशज.
**वंशधर**—*पु.* कुळांत जन्मलेला;
**वंशी**–*स्त्री.* पाहा 'बंसी'. [विणारा.
**वंशीधर**—* कृष्ण; बांसरी वाज-
**वंशीवट**–*पु.* पाहा 'बंसीवट'.
**वक**–*पु.* वक; बगळा.
**वकअत**–*स्त्री.* [अ.] १ शक्तिः बल. २ अुंची. ३ पत. ४ महत्त्व.
**वकालत**—*स्त्री.* [अ.] वकीली.
**वकालतन**—*क्रि. वि.* [अ.] वकिलाकरवी. [वकीलपत्र.
**वकालतनामा**–*पु.* [अ. + फा.]
**वकील**–*पु.* [अ.] १ वकील; विधिज्ञ. २ राजदूत.

**वक्त**—*पु.* [अ.] १ वेळ. २ संधि; अवसर. ३ सवड; फ़ुरसत.
**वक्तन-फवक्तन**–*क्रि. वि.* [अ.] कधीं कधीं; अधूनमधून.
**वक्तव्य**—*पु.* १ पत्रक. २ कथन. ३ घोषणा; जाहिरनामा.
**वक्फ़**—*पु.* [अ.] धर्मार्थ दान केलेली संपत्ति.
**वक्फ़नामा** *पु.* [अ.+फा.] दानपत्र.
**वक्ष**–*पु.* छाती; अूर.
**वगैरह**–*अव्य.* [अ.] वगैरे; अित्यादि.
**वच्छ***–*पु.* वक्षःस्थळ; छाती; अूर.
**वजह**—*स्त्री.* [अ.] १ कारण. २ चेहरा; आकृति. ३ पद्धति; रीत. ४ अुत्पन्नाची बाब.
**वज़ा**—*स्त्री.* [अ.] १ बनावट; रचना. २ सजावट. ३ स्थिति. ४ प्रथा. ५ प्रसवणें; जन्म देणें. (यौ.) **वज़ा हमल**–गर्भपात.
**वज़ादार**—*वि.* [अ. + फा.] १ डौलदार; चांगल्या घडणीचा. २ आपल्या तत्त्वांप्रमाणें चालणारा.
**वज़ारत**–*स्त्री.* [अ.] १ प्रधानकी. २ मंत्रीपद. ३ मंत्र्याचें कार्यालय.
**वज़ाहत**—*क्रि.* [अ.] १ सौंदर्य. २ चेहऱ्यावरील तेज; कांति.

**वज़ीअ**–*वि.* [*अ.*] नीच; हलकट.

**वज़ीफा**—*पु.* [*अ.*] १ विद्यार्थी, विद्वान् अित्यादींना मिळणारी वृत्ति; छात्रवृत्ति. २ जप; पाठ.

**वज़ीर**–*पु.* [*अ.*] १ प्रधान मंत्री; दिवाण. २ वजीर. **वज़ीरी**–*स्त्री.* प्रधानपद; मंत्रीपद.

**वज़ीरे–आज़म**–*पु.*[*अ.*] पंतप्रधान.

**वज़ू**—*पु.* [*अ.*] नमाजापूर्वी हात-पाय धुण्याची पद्धति.

**वजूद**—*पु.* [*अ.*] १ कार्यसिद्धि. २ शरीर. ३ प्रगट होणें. ४ निश्चिती. ५ अस्तित्व.

**वज्र**-*पु.* १ अिंद्राचें शस्त्र. २ वीज. ३ हिरा. ४ भाला. *वि.* घोर; भीषण; कठोर; दारुण. (*यौ.* **वज्रपात**–वीज कोसळणें; आपत्ति येणें. **वज्रमूर्ख**-महामूर्ख.

**वडिश**–*पु.* मासे पकडण्याचा गळ

**वतन**–*पु.* [*अ.*] जन्मभूमि. **वतनी**-*वि.* देशबंधु. [मुलगा; बाळ.

**वत्स**—*पु.* १ गायीचें वासरूं. २

**वत्सर**—*पु.* वर्ष.

**वदंती**–*स्त्री.* कथा; वार्ता. (*यौ.*) **किंवदंती**-अफवा. [वचन.

**वदन**–*पु.* १ तोंड; मुख. २ कथन

**वदि, वदी**—*पु.* वद्य पक्ष.

**वध**—*पु.* खून; हत्या.

**वधक**–*पु.* १ खुनी. २ हिंसक. ३ व्याध.

**वधना**—*क्रि. स.* ठार मारणें.

**वधिक**—१ वध करणारा. २ मांग.

**वधू–वधूटी**—*स्त्री.* १ नवरी. २ बायको. ३ सून.

**वधूवंश**—*पु.* स्त्रीजाति.

**वधूत***—*पु.* दिगंबर; अवधूत.

**वन**—*पु.* जंगल; अरण्य.

**वनचर**—*पु.* जंगलांत राहणारा; वनवासी. [अुत्पन्न झालेला.

**वनज**—*पु.* १ कमळ. २ वनांत

**वनिता**—*स्त्री.* १ स्त्री. २ प्रिया.

**वफा**–*स्त्री.* [*अ.*] १ वायदा पूर्ण करणें; वचनपूर्ति. २ मुरवत. ३ निभावणें; पूर्ण करणें.

**वफात**—*स्त्री.* [*अ.*] मृत्यु.

**वफादार**—*वि.* [*अ.* + *फा.*] वचनपूर्ति करणारा; अेकनिष्ठ.

**वफादारी**—*स्त्री.* निष्ठा.

**वबा**—*स्त्री.* [*अ.*] सांथीचा रोग.

**वबाल**–*पु.* [*अ.*] १ भार; ओझें. २ संकट; आपत्ति.

**वमन**—*पु.* अुलटी; ओकारी.

**वयन**—*पु.* वचन.

**वयस्क**–*वि.* वयांत आलेला; प्रौढ.

**वरंच**—*अव्य.* १ पण; परंतु. २ अुलट; अितकेंच नव्हे तर.

**वरक**–पु. [अ.] १ पत्र. २ पुस्तकाचें पान. ३ सोन्याचांदीचा वर्ख.
**वरग़लना**—क्रि. स. [दे] १ बहकाविणें; भडकावणें. २ दिशाभूल करणें.
**वरज़िश**—स्त्री. [फा.] व्यायाम.
**वरज़िशी**—वि. व्यायामासंबंधीं.
**वरण**–पु. १ निवड; नियुक्ति. २ पूजा; सत्कार. ३ स्वीकार.
**वरद**—वि. वरदान देणारा.
**वरदी**—वि. [अ.] गुलाबी.
**वरदी**—स्त्री. [अ.] १ गणवेश. २ चौघडा; नौबत.
**वरन्**–अव्य. अुलट; परंतु; अितकेंच नव्हे तर. [२ अुलट.
**वरना**–अव्य. [फा] १ नाहींतर.
**वरम**—पु. [अ.] सूज.
**वरसा**—पु. [अ.] १ वारस; ('वारिस'चें वहु.). २ वारसा; धन.
**वरासत**—स्त्री. [अ.] १ वारसा. २ वारसा हक्कानें मिळालेली संपत्ति.
**वरीक्षा**–स्त्री. वर-परीक्षा करण्यासाठीं त्याला पाहाणें.
**वर्ग**–१ वर्ग; क्लास. २ श्रेणी; दर्जा.
**वर्ण**–पु. १ रंग. २ सौंदर्य. ३ जाति.
**वर्णन**—पु. वर्णन; सांगणें.
**वर्णसंकर**—पु. दोन भिन्न जातींपासून अुत्पन्न झालेली व्यक्ति अथवा जाति.
**वर्णित**-वि. वर्णिलेला. [२ व्यवसाय.
**वर्त्तन**–पु. १ वर्तन; वागणूक.
**वर्त्तमान**–वि. हल्लींचा; विद्यमान. पु. वर्तमान काळ.
**वर्दी**–स्त्री. पाहा 'वरदी'
**वर्म**–१ नाजुक स्थान. २ रक्षणस्थान; कवच.
**वर्गलाना**–क्रि.स. [फा] बहकाविणें; भलत्या मार्गास नेणें; फूस देणें.
**वर्बर**–वि. असभ्य; जंगली.
**वर्षगाँठ**-स्त्री. वाढदिवस.
**वर्षा**–स्त्री. १ पावसाळा. २ पाअूस; वृष्टि. [२ वर्तुळ; मंडल.
**वलय**–पु. १ कांकण; बांगडी.
**वलवला**–पु. [अ.] १ कल्लोळ; आरडाओरड. २ आवेश; मनोवेग.
**वली**— पु. [अ.] १ मालक. २ शासन. ३ साधु; फकीर. [परंतु; पण.
**वले, वलेक, वलेकिन**–अव्य [फा.]
**वल्द**–पु. [अ.] औरस पुत्र.
**वल्दियत**—स्त्री. [अ.] बापाचें नांवगांव. [शपथ आहे.
**वल्लाह**—अव्य. [अ.] देवाची
**वश**—पु. १ अिच्छा. २ ताबा; अधिकार. ३ अुपाय. ४ वश.
**वश**–प्रत्य. [फा.] समानतादर्शक

प्रत्यय ( अुदा. परीवश—अप्सरे-सारखा ).

**वसअत**-*स्त्री*. [*अ.*] १ विस्तार; लांबीरुंदी. २ सामर्थ्य. ३ सामावणी; गुंजाअीस.

**वसवास**—*पु.* [*अ.*] १ संदेह; संशय. २ भीति. ३ टाळाटाळ.

**वसवासी**—*पु.* [*अ.*] १ डळमळीत विचार असलेला. २ शंकेखोर.

**वसायल**—*पु.* बहु. [*अ.*] १ मार्ग. २ वशिले. ३ संबंध.

**वसह**—*पु.* बैल; वसु.

**वसा**-*स्त्री.* चरबी; मेद.

**वसीका**—*पु.* [*अ.*] नातलगांना व्याज मिळावें म्हणून सरकारांत ठेव म्हणून ठेवलेली रक्कम.

**वसीयत**—*स्त्री.* [*अ.*] अंतसमयीं अिस्टेटीची केलेली व्यवस्था.

**वसीयतनामा**—*पु.* [*अ.* + *फा.*] वारसापत्र ( कायदेशीर शिक्का-मोर्तब झालेलें ); मृत्युपत्र.

**वसीला**—*पु.* [*अ.*] १ संबंध. २ आश्रय. ३साहाय्य. ४ वशिला.

**वसुंधरा, वसुधा**—*स्त्री.* भूमि; पृथ्वी.

**वसूक**-*पु.* [*अ.*] १ दृढता. २ विश्वास. ३ अध्यवसाय.

**वसूल**-*वि.* [*अ.*] वसूल; प्राप्त, *पु.* वसुली; प्राप्त. ( यौ. ) **वसूलयाबी**—*स्त्री.* वसुली. **वसूली**—*स्त्री.* वसुली.

**वस्त**-*पु.* [*अ.*] मधला भाग; मध्य.

**वस्ती**—*वि.* [*अ.*] मधला.

**वस्फ**—*पु.* [*अ.*] १ प्रशंसा; स्तुति. २ गुणवैशिष्ट्य.

**वस्ल**—*पु.* [*अ.*] १ दोन वस्तूंचा मेळ; अेकीकरण. २ मिलाफ; संयोग; मीलन. ३ मृत्यु.

**वह**—सर्व: तो; ती; तें. [अेकेश्वरवाद.

**वहदत**—*स्त्री.* [*अ.*] अेकत्व;

**वहदानियत**—*स्त्री.* [*अ.*] १ अेकत्व. २ अनुपमता.

**वहन**—*पु.* वाहणें; वेणें; अुचलणें.

**वहब**—*पु.* [*अ.*] अुदारता.

**वहबी**—*वि.* [*अ.*] १ दिलेला. २ भाग्यानें दिलेला.

**वहम**—*पु.* [*अ.*] १ वहीम; संशय; अंदेशा. २ गैरसमजूत. ३ बुचकळा. ४ शंका. **वहीम**—*वि.* १ वहिमी; संशयित. २ शंकेखोर; संशयी.

**वहशत**—*स्त्री.* [*अ.*] १ असभ्यता. २ अुद्धटपणा. ३वेडेपणा. ४ अधीरता; चंचलता. **वहशत अंगेज़**—*वि.* भयानक; भीषण **वहशतज़दा**—*वि.* १ भयमीत २ वेडा. **वहशत नाक**—*वि.* भीषण.

**वहशियाना**—*वि.* [ अ. ] जंगली; रानटी.
**वहशी**—*वि.* [अ.] १ जंगली; रानटी. २ पाळीव नसलेला. ३ असभ्य.
**वहाँ**—अव्य. त्या ठिकाणीं; तेथें.
**वहाबी**—*पु.* [ अ. ] १ अेक मुसलमानी संप्रदाय. ( अब्दुल वहाब नजदी हा याचा संस्थापक होता म्हणून 'वहाबी' असें नांव पडलें.) २ या संप्रदायाचा अनुयायी.
**वाहित्र**—*पु.* आगबोट; जहाज.
**वहीं**—अव्य. तेथेंच.
**वही**—सर्व. १ तोच. २ निर्दिष्ट व्यक्ति. ३ तेंच; तींच.
**वहीद**—*वि.* निरुपम; अप्रतिम.
**वह्नि**—*पु.* आग; अग्नि.
**वाँ**—अव्य. पाहा 'वहाँ'
**वाँछनीय**—*वि.* अिष्ट; अिच्छा करण्यास योग्य.
**वांछा**—*स्त्री.* अिच्छा; अभिलाषा.
**वांछित**—*वि.* अिच्छित; अिच्छिलेलें; अभीष्ट
**वा***—सर्व. तो ( ब्रजभाषा ).
**वाअिज़**—*पु.* [ अ. ] १ धर्मोपदेशक. २ शिकवण देणारा.
**वाक्** *पु.* १ वाचा; वाणी. २ जीभ. ३ सरस्वती; शारदा.
**वाक़अी**—*वि.* [अ.] वास्तविक; खरोखर. अव्य. खरोखरीच.
**वाक़फ़ीयत**—*स्त्री.* [अ.] १ माहिती; ज्ञान. २ ओळखपाळख.
**वाक़या**—*पु.* [अ.] १ घटना; घडलेली गोष्ट. २ वृत्तान्त; ३ समाचार. ४ बातमी. **वाक़यात**—बहु. घटना; गोष्टी.
**वाक़ा**—*वि.* [अ.] १ स्थित; अुभा असलेला. २ होणारा; घडणारा.
**वाक़िफ़**—*वि.* [अ.] १ जाणणारा; माहिती असलेला. २ अनुभवी. ३ परिचित.
**वाक़िफ़कार**—*वि.* [ अ. + फा. ] वाकबगार; माहितगार; अनुभवी
**वाकुची**—*स्त्री.* अेक औषधी.
**वाक्य**—*पु.* वाक्य; वचन.
**वागुरा**-*स्त्री.* हरिण पकडण्याचें जाळें.
**वागुरिक**—*पु.* पारधी.
**वागुलि**—*पु.* विड्याचा डबा.
**वाग्दत्त**—*वि.* वाणीनें दिलेला; देण्याची बोली केलेला; ठरलेला.
**वाग्मी**—*पु.* १ वाचाळ; बडबड्या. २ अुत्तम वक्ता; पंडित.
**वाज़**—*पु.* [अ.] १ अुपदेश. २ कथा. ३ धार्मिक अुपदेश.
**वाज़ह-वाज़ा**—*वि.* [ अ.] १ प्रकट; जाहिर. २ स्पष्ट ३ विस्तृत; सविस्तर.

**वाजिब** पु. [ अ. ] १ दुसऱ्यावर अवलंबून न राहणारा. २ मासिक किंवा नित्य वृत्ति. **वाजिब–बी**–*वि.* अुचित; योग्य; ठीक.
**वाणिज्य**–*पु.* व्यापार. [ सरस्वती.
**वाणी**–*स्त्री.* १ वाचा, वाणी; २
**वात**–पु.१ वारा;हवा. २ वात(रोग).
**वातायन**–*पु.* खिडकी; झरोका.
**वात्याचक्र**–*पु.* वावटळ.
**वाद**–*पु.* १ वादविवाद; चर्चा. २ झगडा; भांडण.
**वादा**–*पु.* [अ.] वायदा; करार. (मु.) **वादा करना**– वायदा करणें. **वादा खिलाफी करना**–वायदा मोडणें; दिलेला शब्द मोडणें.
**वादित्र** — *पु.* बाजा ( वाद्य ).
**वादी** – *स्त्री.* [ अ. ] १ घाट (डोंगरांतील). २ डोंगराजवळील अुतरती जमीन. ३ वन; जंगल. ४ दरी.
**वानर**–*पु.* वानर.
**वापस–सी**—*वि.* [ फा. ] १ परत आलेला. २परत झालेला. **वापसी**–*स्त्री.* परतणी. **वापसीन**—*वि.* अखेरचा; शेवटचा.
**वाबिस्ता**–*वि.* [ फा. ] संबद्ध. पु नातलग.
**वाम**––*पु.* [ फा. ] कर्ज.
**वाम**–*वि.* १ डावा. २ विरुद्ध. ३ वाअीट; कुटिल.
**वामा**—*स्त्री.* १ स्त्री. २ दुर्गा.
**वामिक़**—*पु.* [ अ. ] १ मित्र. २ प्रेमी.
**वायुमंडल**—*पु.* १ वातावरण. २ आकाश.
**वायुयान**—*पु.* विमान.
**वार**—*पु.* दिवस. २ पाळी. ३ द्वार. ४ अुशीर.
**वारद**—*पु.* मेघ.
**वारदात**–*स्त्री.* [अ.] १ अपघात. २ मारामारी; दंगा. ३ भीषण घटना.
**वारना**–*क्रि. स.* १ स्वतःस ओवाळून टाकणें; कुरवंडी करणें. २ त्याग करणें पु. त्याग. ( मु. ) **वारने, वारी जाना**–स्वतःस ओवाळून टाकणें.
**वार–पार**–*पु.* १ आरपार. २ ( नदी वगैरेचीं ) दोन्ही टोकें. या तीरापासून त्या तीरापर्यंत; या टोकापासून त्या टोकापर्यंत.
**वार-फेर**–*पु.* ओवाळून टाकलेली वस्तु; बळी. **वार-फेरी**—*स्त्री.*
**वाराणसी**–*स्त्री.* काशी; बनारस.
**वारा न्यारा**–*पु.* १ निकाल; निर्णय. २ शेवट ( तंटयाबखेड्याचा ).
**वारिद्**—*पु.* पाहा ' वारद '.

**वारिद्**–*वि.* [*अ.*] येणारा; आलेला. *पु.* १ अतिथि; पाहुणा. २ पत्रवाहक; दूत.

**वारिधि**–*पु.* समुद्र; सागर.

**वारियाँ**–*स्त्री.* १ बळी. २ त्याग.

**वारिस**––*पु.* [*अ.*] वारस; परंपरागत हक्कदार.

**वारुणी**–*स्त्री.* मद्य; दारू.

**वार्ता, वार्त्ता**-*स्त्री.* १ गप्पा; बातचीत. २ बातमी. ३ अफवा. ४ हकीगत. ( यौ. ) **वार्तालाप**––गप्पागोष्टी.

**वार्द्धक्य**–*पु.* म्हातारपण; वृद्धत्व.

**वालंटियर**–*पु.* [ अिं. ] स्वयंसेवक.

**वाला**—प्रत्य. [ फा. ] संबंधसूचक प्रत्यय. ( अुदा. मकान-वाला ).

**वालिद्**–*पु.* [ *अ.* ] पिता; वडील. (यौ.)**वालिदे माजिद्**-पूज्य पिता.

**वालिदा**—*स्त्री.* [ *अ.* ] आअी.

**वालैकुम सलाम**––*स्त्री.* [ *अ.* ] नमस्कार; नमस्ते.

**वावैला**—*पु.* [*अ.*] १ विलाप. २ शोक. ३ आरडाओरड; कोलाहल.

**वा-शुद**—*स्त्री.* [ फा. ] प्रफुल्लता.

**वास**—*पु.* १ निवास राहाणें. २ स्थान; घर. ३ सुगंध.

**वासा** – *स्त्री.* अडुळसा.

**वासिक**–*वि.* [ *अ.* ] पक्का; दृढ.

**वासिल**—*वि.* [ *अ* ] १ वसूल झालेला. २ मिळालेला. ३ पोहोंचलेला. (यौ.) **वासिलबाकी**-वसूल; बाकी रक्कम. [ कोट; जाकीट.

**वास्कट**—*पु.* [ अिं. ] बंडी; वेस्ट-

**वास्तव**–*वि.* वास्तविक; यथार्थ.

**वास्ता** — *पु.* [ *अ.* ] संबंध.

**वास्ते** — अव्य. [ फा. ] १ करितां; साठीं २ सबब; हेतु.

**वाह**—अव्य. [ फा. ] वाहवा.

**वाहवाही**—*स्त्री.* स्तुति; प्रशंसा; तारीफ [ ३ अेकवचन.

**वाहिद्** -*वि.*[*अ.*]१ अेक. २ अेकटा.

**वाहिब** —*वि.* [*अ.*]क्षमा करणारा.

**वाहियात**—*वि.* [ *अ.* + फा. ] १ वाह्यात; व्यर्थ. २ फाजील. ३ वाअीट.

**वाही**—*वि.* [ *अ.* ] १ आळशी; सुस्त. २ कुचकामाचा. ३ मूर्ख. ४ अुडाणटप्पू.

**वाही-तबाही**–*वि.* [ *अ.* + फा.] १ मूर्ख; बेअकली. २ अुडाणटप्पू. ३ असंबद्ध; भलतेंसलतें.

**वाहीतबाही**—*स्त्री.* [ *अ.*+फा. ] वाह्यांत गोष्टी; फाजील गोष्टी.

**विंध***—*पु.* विंध्याचल.

**विकच** —*वि.* अुमललेलें; फुललेलें.

**विकरार**—*वि.* विकाळ; अक्राळ-विक्राळ; भयानक.
**विकसना**-*क्रि. अ.* अुमलणें; फुलणें.
**विकल**—*वि.* १ व्याकुळ; बेचैन. २ अपूर्ण. ३ खंडित. ४ कलाहीन.
**विकास**-*पु.* वाढ; अुमलणें; अुन्नति.
**विक्रय**—*पु.* विक्री. विक्रा.
**विक्षोभ**—*पु.* क्षोभ; अुद्विग्नता; चांचल्य.
**विख***—*पु.* विष.
**विखान***—शिंग; विषाण.
**विगत**—*वि.* गेलेला; मागील.
**विग्यान**—*पु.* विज्ञान; शास्त्र.
**विघ्न**—*पु.* संकट; अडचण.
**विचच्छन***—*वि.* १ अतिशय बुद्धिवान. २ चतुर.
**विचरना**—*क्रि.अ.* फिरणें; भ्रमण करणें. **विचरण***-*पु.* भ्रमण.
**विचलाना**-*क्रि.स.* विचलित करणें.
**विचार**—*पु.* १ विचार. २ न्याय.
**विचारक**-*पु.* १ विचारी; विचार करणारा. २ न्याय देणारा.
**विचारना**-*क्रि.अ.* १ विचार करणें. २ विचारणें. ३ पत्ता लावणें.
**विचित्र**—*वि.* १ रंगीबेरंगी. २ विलक्षण.
**विच्छेद**—*पु.* १ वियोग. २ नाश.
**विछोह**—*पु.* वियोग; विरह.
**विजन**-*वि.* निर्जन; अेकांत. *पु.* पंखा.
**विजेता**—*पु.* १ शूर; पराक्रमी. २ जेता; विजयी. [कमजोर.
**विजोर**—*वि.* [सं. + फा.] दुर्बळ;
**विज्जुलता**—*स्त्री.* वीज.
**विज्ञप्ति**-*स्त्री.* १ जाहिरात. २ताकीद; पूर्वसूचना. [**वेत्ता**-*पु.* शास्त्रज्ञ.
**विज्ञान**—*पु.* शास्त्र. (यौ.) **विज्ञान**
**विज्ञापन**—*पु.* जाहिरात.
**विज्ञापनबाजी**-*स्त्री.* [सं. + फा.] जाहिरातबाजी.
**विट**—*पु.* १ लंपट; कामुक. २ धूर्त; स्वार्थी. ३ वैश्य.
**विटप**—*पु.* १ नवी फांदी. २ झाड.
**विडंबना**-*स्त्री.* १ विडंबन. २ दुर्दशा.
**विडरना, विडारना**—*क्रि. अ.* १ फळणें; विखुरणें. २ पळून जाणें.
**विडराना, विडारना**—*क्रि. स.* १ विखुरणें; पसरणें २ पळविणें. ३ पाठलाग करणें.
**विडाल**—*पु.* बोका; मांजर.
**वितंडा**—*स्त्री.* वितंडवाद; झगडा.
**वितरण**—*पु.* १ वांटप. २ दान.
**वितस्ता**—*स्त्री.* झेलम नदी.
**वितािडत**—*वि.* ताडन करण्यांत आलेला; बडविण्यांत आलेला.
**वितान**-*पु.* १ मंडप. २ विस्तार.
**वित्त**—*पु.* पैसा; संपत्ति.

**विथकना***—*क्रि. अ.* १ थकणें; गळून जाणें. २ आश्चर्यानें थक्क होणें. **विथकित**—*वि.* थकला भागलेला.

**विथा***-*स्त्री.* १ व्यथा. २ दुःख. ३ रोग.

**विदग्ध**—*पु.* चतुर; रसिक; विद्वान्. *वि.* १ सुंदर. २ शिजविलेलें.

**विदरना***—*क्रि. अ.* १ फाटणें. २ विदीर्ण होणें.

**विदलना**—*क्रि. स.* नाश करणें.

**विदा**—*स्त्री.* १ रवानगी. २ प्रस्थान. ३ निरोप (जातांना घेतात ती अनुमति). **विदाई**—*स्त्री.* १ प्रस्थान. २ जाण्याची परवानगी; निरोप. ३ बिदागी (धन).

**विदारना**—*क्रि. स.* फाडणें.

**विदित**—*वि.* ज्ञात; माहित.

**विदेश**—*पु.* परदेश. **विदेशी, विदेशीय**—*वि.* परदेशी.

**विद्ध**—*वि.* घायाळ; जखमी.

**विद्यार्थि-र्थी**-*पु.* विद्यार्थी; शिकणारा.

**विद्रोह**—*पु.* बंड.

**विधना**—*पु.* १ विधाता. २ ब्रह्मदेव.

**विधना**—*स्त्री.* भवितव्यता.

**विधना**—*क्रि. स.* मिळविणें.

**विधान**—*पु.* १ योजना; कार्यक्रम. २ व्यवस्था. ३ प्रणाली. ४ राज्यघटना. ५ रचना; निर्मिति. ६ उपाय; युक्ति. ७ आज्ञा करणें.

**विधान-परिषद्**—*स्त्री.* कायदेमंडळ.

**विधान-लेखक**—*पु.* घटना पंडित

**विधि**—*स्त्री.* १ विधि; कार्यपद्धति. २ कायदा. *पु.* ब्रह्मा; विधाता. (यौ.) **गतिविधि**—*स्त्री.* हालचाल; कार्य; वागणूक.

**विधेयक**—*पु.* कायद्याचा मसुदा; बिल.

**विध्वंस**—*पु.* विनाश.

**विनष्ट**—*वि.* नष्ट; उध्वस्त.

**विनती**—*स्त्री.* विनंती; प्रार्थना.

**विनसना**—*क्रि. अ.* नष्ट होणें; नाश पावणें.

**विना**—*अव्य.* खेरीज; शिवाय.

**विनिमय**—*पु.* अदलाबदल; देवाणघेवाण.

**विनु**—*अव्य.* विना; खेरीज.

**विनूठा**—*वि.* [दे.] अपूर्व; सुंदर.

**विनोद**—*पु.* १ विनोद; मनोरंजन. २ क्रीडा; कौतुक.

**विन्यास**—*पु.* १ स्थापना. २ ठेवणें. ३ रीतसर मांडणें.

**विपंची**—*स्त्री.* वीणा.

**विपक्ष-विपक्षी**—*पु.* १ विरोधी पक्ष. २ शत्रु.

**विपत्ति**—*स्त्री.* आपत्ति; संकट.

**विपिन**—*पु.* अरण्य; वन.

**विपुल**—*वि.* पुष्कळ; मोठा.

**विप्लव**—*पु.* १ दंगल; गडबड. २ बंड;

विद्रोह. ३ अव्यवस्था. ४ फेरफार; अदलाबदल. ५ नदीचा पूर.
**विबुध**–*पु.* १ देव. २ चंद्र. ३ पंडित.
**विभव**–*पु.* १ वैभव; संपत्ति. २ प्रताप.
**विभा**–*स्त्री.* १ किरण; प्रकाश. २ शोभा.
**विभाजन**—*पु.* १ फाळणी. २ विभागणी. ३ वांटणी.
**विभिन्न**–*वि.* १ वेगळा; पृथक्. २ अनेकविध.
**विभीति**–*स्त्री.* १ भय. २ शंका.
**विभीाति**-*वि.* नानाविध; अनेक प्रकारें.
**विभीषण**—*पु.* रावणाचा धाकटा भाऊ; बिभीषण.
**विभु**–*वि.* समर्थ; महान्. *पु.* ओीश्वर.
**विभूति** *स्त्री.* १ अैश्वर्य. २ महापुरुष.
**विभेटन**–*पु.* भेट; गळ्याला मिठी मारणें
**विमल**–*वि.* निर्मल; स्वच्छ.
**विमाता**–*स्त्री.* सावत्र आओी.
**विमान**–*पु.* १ विमान. २ तिरडी. ३ अनादर.
**विमुक्त**—*वि.* १ मुक्त झालेला. मोक्षास गेलेला. २ सुटलेला.
**विमुख**–*वि.* १ तोंड फिरवलेला; विन्मुख; बेपर्वा. २ अप्रसन्न.
**विमुद**—*वि.* अुदास; खिन्न.
**विमूढ**-*वि.* १ अत्यंत मोहित झालेला. २ बुचकळ्यांत पडलेला. ३ शुद्धीवर नसलेला. ४ मूर्ख.
**विमूढ-गर्भ**–*पु.* पोटांतच मेलेलें मूल.
**विमोह**–*पु.* १ मोह. २ बेशुद्धि. ३ आसक्ति.
**विमौट**–*पु.* वाळवीनें केलेलें घर.
**विय**–*वि.* १ जोडी. २ दुसरा.
**वियोग**—*पु.* विरह; विच्छेद.
**विरंचि**–*पु.* ब्रह्मदेव.
**विरचना**–*क्रि. स.* [फा.] १ रचणें. २ बनविणें. ३ सजविणें. [विमुख.
**विरत**–*वि.* १ अनुरक्त नसलेला. २
**विरद**–*पु.* कीर्ति; ख्याति; यश. २ सुंदर नांव. [३ कीर्तिमान्.
**विरदैत***–*वि.* १ प्रख्यात २ यशस्वी.
**विरमना***–*क्रि. अ.* १ रमणें; मन लागणें. २ थांबणें. ३ मोहून जाणें. ४ वेग थांबणें. [निर्जन. ३ दुर्लभ.
**विरल**–*वि.* १ विरळ; पातळ. २
**विरला**–*वि.* विरळा; दुर्लभ.
**विरस**–नीरस; फिक्का.
**विरह**—विरह; वियोग.
**विराजना**–*क्रि. अ.* १ शोभणें. २ हजर असणें. ३ बसणें.
**विराजमान**—*वि.* चमकणारें; १ सुशोभित. २ बसलेलें. [राधिकार.
**विरासत**–*स्त्री.* [अ.] वारसा; अुत्त-
**विरासतनामा**—*पु.* [अ. + फा.] वारसापत्र.

**विरेचक**–*वि.* जुलाब करणारें रेचक.

**विरेचन**–*पु.* १ जुलाब. २ रेचक (औषध).

**विरोधना***–*क्रि.स.* १ विरोध करणें. २ वैर करणें. ३ शत्रुत्व धरणें.

**विलखना**–*क्रि. अ.* १ विलाप करणें. २ वैर करणें, शत्रुत्व धरणें.

**विलगाना**–*क्रि. अ.* अलग होणें; वेगळे होणें. *क्रि. स.* वेगळें करणें.

**विलपना***–*क्रि.अ.* विलाप करणें; शोक करणें.

**विलम***–*क्रि. पु.* विलंब; अुशीर.

**विलमना**–*क्रि. अ.* अुशीर लावणें; थांबणें.

**विलसना**–*क्रि. अ.* १ शोभणें. २ विराजणें. ३ आनंदी होणें. ४ क्रीडा, विलास करणें.

**विलायत**–*पु. स्त्री.* [ *अ.* ] १ परका देश; दुसरा देश. २ दूरचा देश.

**विलास**–*पु.* चैन; विलास.

**विलीक***–*वि.पु.* अनुचित; अयोग्य.

**विलीन**–*वि.* मिसळलेला; लीन; गुप्त; अदृश्य.

**विलोकना**–*क्रि. स.* पाहाणें.

**विलोकित**–*वि.* पाहिलेला.

**विलोचन**–*पु.* डोळा.

**विलोप**–*पु.* लोप; नाश.

**विलोडना**–*क्रि. स.* घुसळणें.

**विलोम**–*वि.* अुलट; विपरीत; प्रतिकूल; विरुद्ध.

**विलोल**–*वि.* चंचल; चपल; सुंदर.

**विवक्षित**–*वि.* अपेक्षित; ज्याला कांहीं सांगावयाची अिच्छा किंवा आवश्यकता आहे असा. [ करणें.

**विवदना***–*क्रि. अ.* वादविवाद

**विवर**–*पु.* बीळ; भोंक; छिद्र; छेद.

**विवश**–*वि.* १ लाचार; असहाय. २ पराधीन.

**विवाद**–*पु.* १ वादविवाद. २ भांडण-तंटा. ३ मुकदमेबाजी. **विवादी**–*पु.* १ वादविवाद करणारा. २ खट-ल्यांतील अेक पक्ष. [ स्पष्ट; व्यक्त.

**विशद**–*वि.* १ निर्मळ; स्वच्छ; २

**विशाल**–*वि.* १ विस्तृत; मोठा. २ सुंदर. ३ प्रसिद्ध.

**विशिख**–*पु.* बाण.

**विशुद्ध**–*वि.* १ शुद्ध. २ खरें; सत्य. **विशुद्धी**–*स्त्री.* शुद्धता.

**विशृंखल**–*वि.* विस्कळित; स्वछंद; स्वतंत्र. [ प्रकट करणारें.

**विशेषण**–*पु.* विशेषण; वस्तूचे गुण

**विश्लेषण**–*पु.* पृथक्करण.

**विषण्ण**–*वि.* दुःखी; अुदास.

**विषम**–*वि.* १ असमान; असमतुल्य. २ बाअीट.

**विषाद**–*पु.* दुःख; खेद; शोक

**विषुवरेखा**–*स्त्री.* विषुववृत्त; भूमध्यरेखा.
**विषैला**–*वि.* विषारी. [२ मृत्यु.
**विसाल**–*पु.* [अ.] १ संयोग; मेळ.
**विसासी**—*वि.* विश्वासघातकी; धोकेबाज; दगलबाज.
**विस्फोट**—*पु.* १ स्फोट. २ फोड.
**विस्फोटक**—*पु.* स्फोटक द्रव्य.
**विस्मय**—*पु.* आश्चर्य
**विस्मित**–*वि.* आश्चर्यचकित.
**विहंग, विहंगम, विहग**—*पु.* १ पक्षी. २ विमान. ३ सूर्य; चंद्र.
**विहार**—*पु.* १ भ्रमण. २ बौद्धांचें निवासस्थान. [लागू झालेला कायदा.
**विहित कानून**–*पु.* [सं. + फा.]
**विह्वल** —*वि.* घाबरलेला.
**वीचि–ची**—*स्त्री.* तरंग; लाट.
**वीणा**—*स्त्री.* वीणा.
**वीरांगना**—*स्त्री.* शूर स्त्री.
**वीरान**–*वि.* [फा.] १ ओसाड; उजाड; वैराण. २ निस्तेज. ३ तथ्य नसलेला.
**वीराना**–*वि.* [फा.] १ उध्वस्त; वैराण. २ उजाड. ३ जंगल.
**वीरानी**–*स्त्री.* [फा.] वैराणपणा.
**वीर्य–वीर्य्य**—*पु.* १ धातु; रेत; शुक्र. २ पराक्रम.
**वृंत**–*पु.* १ देंठ. २ स्तनाग्रभाग.
**वे**—सर्व. ते; त्या; तीं.
**वेगि**–*क्रि. वि.* लौकर; शीघ्र.
**वेतन**–*पु.* पगार.
**वेतन-भोगी**–*पु.* पगारी नोकर.
**वेदमंत्र**–*पु.* वेदांतील मंत्र.
**वेधना**–*क्रि. स.* पाहा 'बेधना'.
**वेला**—*स्त्री.* १ वेळ. २ समुद्राचा किनारा; समुद्राची लाट.
**वेश**–*पु.* वेष; पोशाख.
**वै**—अव्य. निश्चय सूचक शब्द. सर्व. पाहा 'वे'.
**वैकल्पिक** — *वि.* १ ऐच्छिक. २ संदिग्ध. ३ अेकांगी. ४ संशयित.
**वैखरी**—*स्त्री.* वाणी; वाग्देवी.
**वैज्ञानिक**—*पु.* शास्त्रज्ञ.
**वैतनिक**—*पु.* पगारी नोकर.
**वैतालिक**—*पु.* स्तुतिपाठक; भाट; चारण.
**वैद**—*पु.* वैद्य.
**वैदेशिक**—*वि.* परराष्ट्रीय.
**वैध**–*वि.* सनदशीर.
**वैधानिक कानून**–*पु.* [सं.+फा.] घटनाविषयक कायदा.
**वैधानिकता**—*स्त्री.* सनदशीरपणा.
**वैधानिक संकट**—*पु.* घटनात्मक पेंचप्रसंग.
**वैभव**—*पु.* ऐश्वर्य; संपत्ति.
**वैमनस्य**—*पु.* शत्रुत्व; वैर; कटुता.

**वैयाकरण**–पु. व्याकरण जाणणारा.
**वैर**—पु. वैर; शत्रुत्व.
**वैविध्य**—पु. विविधता; वेगळेपणा.
**वैशाख**—पु. वैशाख महिना.
**वैसा**—सर्व. तसा.
**वोट**—पु. [ अिं. ] मत.
**वोटर**—पु. [ अिं. ] मत देणारा.
**व्यंग-व्यंग्य**—पु. १ अुपहास; अुपरोध. २ गूढार्थ.
**व्यंजन**–पु. १ स्पष्टीकरण. २ कालवण; तोंडी लावणें अि. ( जेवण ). ३ स्वयंपाक. ४ अवयव. ५ व्याकरणांतील व्यंजन.
**व्यंजना**–स्त्री. १ स्पष्टीकरण २ श्लेष.
**व्यक्ति**—पु. व्यक्ति; मनुष्य.
**व्यग्र**—वि. व्याकुळ; अुद्विग्न.
**व्यजन**—पु. पंखा.
**व्यतिरेक**–पु. १ अभाव. २ अंतर. फरक; भेद. ३ अतिरेक; अतिक्रम.
**व्यतीत**—वि. झालेला; गेलेला.
**व्यथा**–स्त्री. १ दुःख; क्लेश. २ वेदना.
**व्यथित**—वि. दुःखी.
**व्यभिचार**–पु. बदचलनी; स्त्री-पुरुषांचा अनैतिक संबंध.
**व्यभिचारिणी**—स्त्री. छिनाल; कुलटा स्त्री.
**व्यभिचारी**–परस्त्रागामी; बदचाल.
**व्यय**–पु. १ खर्च. २ विनाश. ३ खप.
**व्यर्थ**—वि. निरर्थक; निष्कारण.
**व्यवच्छेद**–पु. पार्थक्य; वेगळेपणा.
**व्यवधान**—पु. १ भाग; खंड. २ विच्छेद. ३ अडगळ; अडथळा करणारी वस्तु. ४ अडचण.
**व्यवसाय**—पु. अुद्योग; व्यापार; कामधंदा.
**व्यवसायी**–पु. व्यापारी; अुद्योगी.
**व्यवस्था**—स्त्री. १ व्यवस्था. २ धर्मनिर्णय.
**व्यवस्थापक मंडळ, व्यवस्थापिका सभा**—पु. विधिमंडळ.
**व्यवस्थित**–वि. व्यवस्थित. पद्धतशीर. [ २ व्यवहार; व्यापार.
**व्यवहार**–पु. १ आचरण; वागणूक.
**व्यवहृत**—वि. प्रयुक्त; वापरलेला.
**व्यष्टि**-स्त्री. समाजांतील अेक व्यक्ति.
**व्यसन**—पु. १ व्यसन. २ आपत्ति; संकट.
**व्यस्त**–वि. १ घाबरलेला. २ अस्वस्थ. ३ कामांत गर्क; मग्न. ४ व्याप्त.
**व्याख्या**-स्त्री.-टीका; विवेचन; स्पष्टार्थ.
**व्याघात**–पु. १ विघ्न. २ आघात. [ ३ विघ्न.
**व्याघ्र**—पु. वाघ.
**व्याज**—पु. १ व्याज. २ बहाणा.
**व्याधि**–स्त्री. १ रोग. २ अुपाधि; त्रास.
**व्याधू***—पु. दुष्ट; त्रास देणारा.

**व्यापक**—*वि.* विस्तृत; आच्छादक; व्यापणारा.

**व्याल्**—*पु.* रात्रीचा फराळ.

**व्योम**—*पु.* १ आकाश. २ ढग.

**व्रज**—*पु.* १ गमन. २ मथुरेच्या आसपासचा प्रदेश. *स्त्री.* या प्रदेशातील भाषा.

**व्रण**—*पु.* १ फोड. २ घाव.

**व्रीडा**—*स्त्री.* लज्जा.

**व्रीहि**—*पु.* भात; साळी.

# श

**शंकना**—*क्रि. अ.* १ शंका घेणें; संशय घेणें. २ भिणें. [भीति; चिंता.

**शंका**—*स्त्री.* १ संदेह; शंका. २

**शंख**—*पु.* शंख; शिंपला. [हिंगूळ.

**शंजरफ-शिंजरफ**—*पु.* [फा.]

**शंड**—*पु.* १ नपुंसक; षंढ; हिजडा. २ निपुत्रिक. ३ पोळ.

**शअूर**—*पु.* [अ.] १ कार्यकुशलता. २ बुद्धि; अक्कल. ३ ढंग; पद्धत.

**शअूरदार**—*वि.* [अ.+फा.] १ वाकबगार. २ बुद्धिमान्.

**शक**—[अ.] शंका; संशय.

**शकर**—*स्त्री.* साखर.

**शकरकंद**—*पु.* [फा.+सं. ]ताळें.

**शकरपारा**—*पु.* [फा.] १ शंकरपाळें. २ अेक फळ.

**शकल**—*स्त्री.* [अ.] चेहरा; रूप. २ चेहऱ्यावरील भाव. ३ बनावट; रचना. ४ स्वरूप; आकृति. ५ अुपाय; युक्ति.

**शकील**—*वि.* [अ.] सुंदर.

**शक्कर**—*स्त्री.* साखर.

**शक्की**—*वि.* [अ.] संशयी; शंकेखोर.

**शख्स**—*पु.* [अ.] व्यक्ति.

**शख्सियत**—*स्त्री.* [अ.] व्यक्तित्व; व्यक्तिमत्व.

**शगल**—*पु.* [फा.] १ व्यापार; धंदा. २ मनोरंजन; मनोविनोद.

**शगुन**—*पु.* १ शकुन. २ साखरपुडा; विवाहनिश्चिति.

**शगुनिया**—*पु* कुडमुड्या ज्योतिषी.

**शगुफ्ता**—*वि.* [फा.] १ अुमललेला; विकसित. २ प्रसन्न; प्रफुल्लित. **शगुफ्तगी**—*स्त्री.* प्रसन्नता.

**शगून**—*पु.* [फा.] शकुन किंवा अपशकुन; शुभाशुभ लक्षणें. (मु.) **शगून लेना**—शुभाशुभाचा विचार करणें.

**शगूफा, शिगूफा**—*पु.* [फा.] १ कळी. २ फूल; पुष्प. ३ अेखादी नवी विलक्षण गोष्ट.

**शजरा**—*पु.* [अ.] १ वंशावळ. २

पाटलाने तयार केलेला शेताचा नकाशा.

**शठ**—*वि.* १ धूर्त. २ बदमाश; लुच्चा.

**शठता**—*स्त्री.* १ धूर्तपणा. २ बदमाशी. ३ लुच्चेगिरी.

**शतरंज**—*स्त्री.* [ अ. ] बुद्धिबळ.

**शतरंजी**—*स्त्री.* [ फा. ] १ सतरंजी. २बुद्धिबळाचा पट. ३ बुद्धिबळपटु.

**शताब्द-शताब्दी**—*स्त्री.* शंभर वर्षांचा काळ; शतक.

**शदीद**—*वि.* [अ.]१ पुष्कळ मोठा. २ जड; भारी.

**शनाख्त, शिनाख्त**—*स्त्री.* [फा.] १ ओळख पटण्याकरितां खूण; पारख. २ परिचय; ओळख.

**शनास**—*वि.* [फा.] ओळखणारा.

**शनैः शनैः**—अव्य. हळूहळू; धीरेधीरे.

**शफ़क़**—*स्त्री.* [अ.] प्रातःकाळीं किंवा सायंकाळीं दिसणारा आकाशाचा लालिमा.

**शफ़क़त**—*स्त्री.* [ अ. ] कृपा; मेहेरबानी.

**शाफ़**—*स्त्री.* [ अ. ] आरोग्य.

**शफाअत**—*स्त्री.* [अ.] १ कामना; अिच्छा. २ शिफारस.

**शफाखाना**—*पु.* [ अ. + फा ] दवाखाना; रुग्णालय. [ फळ.

**शफ्तालू**—*पु.* [ फा. ] सताळु; अेक

**शफ्फ़ाफ़**—*वि.* [ अ. ] स्वस्छ.

**शब**—*स्त्री.* [ फा. ] रात्र.

**शबद**—*पु.* शब्द; ध्वनि.

**शबनम**—*स्त्री.* [ फा. ] १ दंव. २ अेक पातळ झिरझिरीत कापड.

**शबनमी**—*स्त्री.* [फा.] मच्छरदाणी.

**शब-बरात**—*स्त्री.* [ फा. ] मुसलमानांचा अेक सण.

**शबाब**—*पु.* [ अ. ] १ तारुण्य. २ सौंदर्य. ३ आरंभ; सुरवात;

**शबाहत**—*स्त्री.* [अ.] १ आकृति. २ रूप-रंग.

**शबिस्ताँ**—*पु.* [फा.] १ रात्रीं राहाण्याचें स्थान. २ शयनागार.

**शबीना**—*वि.* १ रात्रीचा. २शिळा.

**शबीह**—*स्त्री.* [अ.] १ चित्र; छबी. २ तसबीर. [ संतवाणी; पद.

**शब्द**—*पु.* १ शब्द; आवाज. २

**शब्दानुशासन**—*पु.* व्याकरण.

**शब्बीर**—*वि.* [फा.] १ प्रामाणिक; विश्वासू. २ सुंदर. [ तलवार.

**शमशेर**—*स्त्री.* [ फा. ] समशेर;

**शमा**—*स्त्री.* [अ.] १ मेण. २ मेणबत्ती. [ दान; मेणबत्तीचें घर.

**शमादान**—*पु.* [ अ. + फा. ] शाम-

**शमीम**—*स्त्री.* [अ.] सुगंध.

**शम्बा**—*पु.* [फा.] शनिवार. [ 'शमा'

**शम्मा**—*पु.* [अ.] १ सौम्य सुगंध. २ पाहा

**शम्स**–*पु.* [*अ.*] सूर्य.

**शम्सी**–*वि.* [*अ.*] सौर.

**शर**–*पु.* १ बाण. २ भाल्याचें पातें. ३ साय.

**शरअ**–*स्त्री.* [*अ.*] १ कुराणाची आज्ञा. २ वचन. ३ धर्म. ४ पद्धत; मुसलमानी धर्मशास्त्र.

**शरन–शरण**–*स्त्री.* शरण; आश्रय.

**शरबत**–*पु.* [*अ.*] सरबत.

**शरम**–*स्त्री.* [फा.] १ लाज; शरम. २ संकोच; भीड. ३ अब्रू; प्रतिष्ठा. **शरमिंदगी**–*स्त्री.* १ लाजाळूपणा; २ शरम; लाज. (मु.) **शरमके मारे मरना, शरमसे गडना, शरमसे पानीपानी होना**— अत्यंत लज्जित होणें; शरमेनें मेल्यासारखे होणें. (यौ.) **शरमसार**-*वि.* १ लाजाळू. २ शरमिंदा.

**शरमाना**–*क्रि. अ.* [फा.] लाजणें. *क्रि. स.* लाजविणें.

**शरमिंदा**–*वि.* [फा.] लाजलेला. लज्जित; ओशाळलेला. [लाजाळू.

**शरमीला**–*वि.* [फा.] लज्जाशील;

**शरर**—*पु.* [*अ.*] आगीची ठिणगी.

**शरह**—*स्त्री.* [*अ.*] १ टीका; भाष्य. २ दर; भाव.

**शराकत**–*स्त्री.* [फा.] १ सहभागीपणा; सहकार्य. २ भागीदारी.

**शराफत**--*स्त्री.* [*अ.*] १ माणुसकी; भलेपणा. २ सौजन्य.

**शराब**–*स्त्री.* [*अ.*] दारू; मदिरा.

**शराबखाना**—*पु.* [*अ.* + फा.] दारूचा गुत्ता.

**शराबखोर–ख्वार**—*वि.* [*अ.* + फा.] दारुड्या. **शराबखोरी**–*स्त्री.* दारूचें व्यसन.

**शराबी**–*पु.* [*अ.*]दारुबाज; दारुड्या.

**शराबोर**-*वि.* [फा.] १ ओलाचिंब; ओथंबलेला. २ चिबचिबीत; आर्द्र.

**शरारत**–*स्त्री.* [*अ.*] १ दुष्टपणा. २ दांडगाओी. ३ खट्याळपणा.

**शरीअत**–*स्त्री.* [*अ.*] मुसलमानी धर्मशास्त्र.

**शरीक**–*वि.* [*अ.*] सम्मिलित; *पु.* १ पातीदार. २ साहाय्यक; मदतनीस. ३ सहकारी; मित्र.

**शरीफ**–*पु.* [*अ.*] कुलीन, सभ्य मनुष्य. *वि.* सभ्य. [फळाचें झाड.

**शरीफा**–*पु.* १ सिताफळ; २ सिता-

**शरीर**–*पु.*शरीर; अंग.

**शरीर**–*वि.* [*अ.*] १ खट्याळ. २ बदमाष. [दिशा.

**शर्क**–*पु.* [*अ.*] १ सूर्योदय. २ पूर्व

**शर्की**–*वि.* [*अ.*]पौर्वात्य; पौरस्त्य.

**शर्त्त**–*स्त्री.* [*अ.*] १ डावपेंच. २ अट; शर्त.

**शार्त्तिया**—*क्रि. वि.* [*अ.*] खात्रीपूर्वक. *वि.* खात्रीचा; निश्चित.

**शर्म–शर्म्म**—*पु.* १ सुख; आनंद. २ घर.

**शर्म**—*स्त्री.* पाहा 'शरम'.

**शर्मसार**—*वि.* [फा.] १ लज्जाशील. २ लज्जित. [ नवलकोल.

**शलगम, शलजम**—*पु.* [ फा. ]

**शलवार**—*पु.* [फा.] १ विजारीच्या आंतून नेसण्याचा जंघिया. २ अेक तऱ्हेचा पेशावरी पायजमा.

**शलूका**—*पु.* [फा.] अर्ध्या बाह्यांची बंडी ( बायकांची ). [ कुडता.

**शलूका**—*पु.* [फा.] अर्ध्या बाह्यांचा

**शल्ल**—*वि.* [*अ.*] शिथिल व सुन्न.

**शव**—*पु.* प्रेत; मढें.

**शश**—*वि.* [ फा.] सहा.

**शशदर**—*वि.* [फा.] चकित; थक्क.

**शशमाही**—*वि.* [फा.] सहामाही.

**शश व पंज**—*पु.* [फा.] १ घोटाळा. २ जुगार.

**शशि–शशी**—*पु.* चंद्र.

**शसा**—*पु.* ससा.

**शसि–सी***—*पु.* [*अ.*] शशि; चंद्र.

**शह**—*पु.* [फा.] १बादशहा. २ नवरा मुलगा. *स्त्री.* बुद्धिबळांतील शह. *वि.* श्रेष्ठ; मोठा. (मु.) **शह देना, शह लगाना**—शह देणें; दाब आणणें. [ बळकट.

**शहजोर**—*वि.* [ फा. ] बलवान्;

**शहतीर**—*पु.* [ फा. ] लांकडाचा मोठा लांब ओंडका. [किंवा झाड.

**शहतूत**—*पु.* [फा.] तुतीचें पान, फळ

**शहद**—*पु.* [ *अ.* ] मध.

**शहना**—*पु.* [ *अ.* ] सिटी पोलीस अिन्स्पेक्टर. [ वाद्य; वाजंत्री.

**शहनाअी**—*स्त्री.* [ फा. ] सनअी;

**शहबाला**—*पु.* [ फा. ] लग्नांत नवऱ्यामुलाबरोबर असणारा लहान मुलगा; टोकणा. [ तील मात.

**शहमात**—*स्त्री.* [ फा. ] बुद्धिबळां-

**शहर**—*पु.* [ फा. ] नगर; शहर.

**शहर–पनाह**—*स्त्री.* [फा.] शहराभोंवतालचा कोट.

**शहरयार**—*पु.* [फा.] १ आपल्या काळचा मोठा बादशहा. २ नागरिकाचा संरक्षक व साहाय्यक.

**शहरियत**—*स्त्री.* [फा.] नागरिकत्व.

**शहवत**—*स्त्री.* [ *अ.* ] कामवासना.

**शहादत**—*स्त्री.* [ *अ.* ] १ साक्ष. २ पुरावा ३ हौतात्म्य; बलिदान.

**शहाब**—*पु.* [फा.] लाल भडक रंग.

**शहीद**—*पु.* [ *अ.* ] हुतात्मा.

**शाअिस्तगी**—*स्त्री.* [ फा. ] १ शिष्टाचार; सभ्यता. २ माणुसकी.

**शाअिस्ता**–*वि.* [फा.] १ शिष्ट; सभ्य. २ नम्र.
**शाक**–*पु.* भाजी; पालेभाजी.
**शाक**–*वि.*[*अ.*]१ कठिण. २ असह्य. ३ दुःख देणारा. ४ अप्रिय.
**शाकाहारी**–*वि.* मांस–मासे न खाणारा.
**शाकिर**–*वि.* [*अ.*] आभार मानणारा; अभिनंदन करणारा.
**शाख्**–*स्त्री.* [फा.] शाखा; फांदी.
**शागिर्द**–*पु.* [फा.] १ सेवक; नोकर. २ शिष्य; चेला.
**शाज़**––*वि.* [*अ.*] १ अेकटा. २ अनुपम. ३ विलक्षण.
**शाज़ व नादिर**—*क्रि. वि.* [*अ.*] कधींकधीं.
**शाद्**–*वि.*[फा.] १ प्रसन्न;आनंदित. २ परिपूर्ण. (यौ.) **शाद्बाश**— अव्य. १ प्रसन्न राहा. २ शाबाश. **शाद्मान**–*वि.* प्रसन्न; आनंदित.
**शादाब**––*वि.* [फा.] हिरवागार.
**शादियाना**–*पु.*[फा.]१ मंगल वाद्य; शहाजणें. २ अभिनंदन.
**शादी**–*स्त्री.* [फा.] १ लग्न; विवाह. २ आनंद; खुशी. ३ अुत्सव.
**शान**–*स्त्री.*[*अ.*] १ थाटमाट; सजावट. २ तोरा; अैट. ३ भव्यपणा. ४ सामर्थ्य. ५ अब्रू; प्रतिष्ठा.
**शानशौकत**–*स्त्री.* [*अ.*] थाटमाट,
**शाप**–*पु.* शाप; स्राप.
**शाब**–*पु.* [*अ.*] तरुण पुरुष.
**शाबान**–*पु.*[*अ.*]'रजब' नंतर येणारा मुसलमानी महिना.
**शाबाश**–अव्य. [फा.] शाबास; वाहवा. **शाबाशी**–*स्त्री.* वाहवा.
**शाम**–*स्त्री.* [फा.] संध्याकाळ.
**शामत**–*स्त्री.*[*अ.*]१ दुर्दैव. २ विपत्ति. ३ दुर्दशा. (मु.) **शामत सवार होना** अथवा **सिरपर खेलना**– १ अवदसा आठवणें. २ दुर्दशा येणें.
**शामियाना**–*पु.* [फा.] मोठा तंबू.
**शामिल**–*वि.* [फा.] सम्मिलित; सामील; अेकत्रित.
**शामे गरीबाँ–बी**— *स्त्री.* [फा.] प्रवासांतील सायंकाळ; निर्जन स्थानींचा निवास.
**शायक**–*वि.* [*अ.*] १ शोकी; चैनी. २ अिच्छिणारा; जिज्ञासु. [बहुतेक.
**शायद्**–अव्य. [फा.] कदाचित्;
**शायर**–*पु.* [*अ.*] शाहीर; कवि.
**शायरा**–*स्त्री.* [*अ.*] कवयित्री.
**शाया**––*वि.* [*अ.*] १ प्रकट; जाहीर. २ प्रकाशित; प्रसिद्ध.
**शायरी**–*स्त्री.* [*अ.*] काव्यरचना
**शारअ**–*पु.* [*अ.*] राजमार्ग; मोठा रस्ता

**शारह**–*पु.* [*अ.*] टीकाकार.
**शाल**–*स्त्री.* [फा.] शाल; लोकरींची चादर; दुशाला.
**शाला**–*स्त्री.* १ शाळा. २ घर.
**शालीन**–*वि.* १नम्र.२चतुर.३सुंदर.
**शावक**–*पु.* १ बच्चा. २ पिलूं.
**शासन**–*पु.* १ अंमल; राजवट. २ दंड; शिक्षा.
**शास्त्र**–१ शास्त्र; धर्मग्रंथ. २ ज्ञान.
**शाहंशाह**–*पु.* [फा.] सम्राट्.
**शाह**–*पु.*[फा.]१ बादशहा. २ मुसलमानी फकिराची पदवी.*वि.*महान्; मोठा.
**शाहज़ादा**–*पु.* [फा.] राजकुमार. **शाहज़ादी**–*स्त्री.* राजकुमारी.
**शाहाना**–*वि.* [फा.] १ बादशाही; सरकारी. २ बादशाही थाटाचा. ३ अुत्तम. *पु.* लग्नप्रसंगीं वराचा पोशाख.
**शाहिद्**–*पु.* [*अ.*] साक्षीदार.
**शाही**– *वि.* [ फा. ] १ राजाचा; बादशहाचा; सरकारी.
**शिंगरफ**–*पु.* [फा.] हिंगूळ. **शिंगरफी**–*वि.* लालभडक.
**शिकंजा**–*पु.*[फा.] १ पिळून काढण्याचें यंत्र. २ खोडा. ३ कागद कापण्याचें यंत्र. (मु.) **शिकंजेमें खिंचवाना**-छळणें;हालहाल करणें.
**शिकन**–*स्त्री.* [फा.] सुरकुती.
**शिकम**–*पु.* [फा.] पोट.
**शिकमी काश्तकार**–*पु.* [ फा. ] पोट खंडकरी.
**शिकम-परवर**–*वि* [ फा. ]स्वार्थी.
**शिकरा**–*पु.* [फा.] ससाणा; बहिरी ससाणा.
**शिकवा**–*पु.* [फा.] तक्रार.
**शिकस्त**–*स्त्री.* [फा.] पराजय.
**शिकस्तगी**–*स्त्री.* [फा.] तोडमोड.
**शिकस्ता**–*वि.* [ फा. ] मोडकातोडका. (यौ.) **शिकस्ताहाल**–*वि.* दुर्दशाग्रस्त.
**शिकायत**—*स्त्री.* [*अ.*] १ तक्रार; गाऱ्हाणें. २ चुगली. ३ रोग.
**शिकार**–*पु.* १ शिकार; मृगया. २ शिकार केलेलें जनावर. ३ मांस. ४ भक्ष्य. ५ जाळयांत (पेचांत) अडकलेला माणूस.
**शिकारगाह**–*स्त्री.* [ फा. ] शिकारीची जागा.
**शिकारी**–*पु.*[फा.]शिकार करणारा.
**शिक्षक**–*पु.* शिक्षक; मास्तर.
**शिक्षा**—*स्त्री.* १ शिकवण. २ शिक्षण; विद्याभ्यास. ३ अुपदेश. ४ धाक. ५ शिक्षा; दंड. ६ अद्दल.
**शिखरन**–*स्त्री.* शिखरण.
**शिगाफ**–*पु.* [फा.] १ ऑपरेशन.

२ चीर; भेग. ३ भोंक; छिद्र.

**शिगूफा**–*पु.* [फा.] १ कळी (फुलाची). २ फूल. ३ नवी गोष्ट; अद्‌भुत गोष्ट.

**शिताब**–*क्रि. वि.* [फा.] लवकर; घाओीनें. [ शिताफी.

**शिताबी**—*स्त्री.* [फा.] घाओी;

**शिद्दत**–*स्त्री.* [अ.] १ अधिकता; विपुलता. २ अुग्रपणा.

**शिनाख्त**–*स्त्री.* [फा.] १ ओळख. २ खाणाखुणा.

**शिरकत**–*स्त्री.* [अ.] १ पाती; हिस्सा; भाग. २ सहभागी होणें.

**शिरस्त्राण**–*पु.* (युद्धामध्यें) डोक्याचें संरक्षण करणारी पोलादी टोपी.

**शिरोमणि**–*पु.* १ श्रेष्ठ व्यक्ति. २ शिखांचा अेक पंथ.

**शिलीमुख**–*पु.* १ भुंगा; भ्रमर. २ बाण; तीर. ३ युद्ध; रण. ४ मूर्ख.

**शिल्पी**–*पु.* १ शिल्पकार. २ गवंडी. ३ कलावंत; साहित्यिक.

**शिवाला**–*पु.* १ शिवालय. २ देअूळ.

**शिविर**–*पु.* शिबीर; छावणी.

**शिष***–*पु.* शिष्य. [ शिकवण.

**शिष**–*स्त्री.* [फा.] १ अुपदेश. २

**शिस्त**—*स्त्री.* [फा.] १ आंगठा. २ मासे धरण्याचा गळ. ३ लक्ष्य; निशाण.

**शीतला**—*स्त्री.* देवी (रोग).

**शीर***–*पु.* दूध. [ पाण्याचा झरा.

**शीरा**–*पु.* [फा.] १ रक्तवाहिनी. २

**शीरा**—*पु.* [फा.] पाक (साखर वगैरेचा). [ २ प्रिय.

**शीरीं-शीरीन**–*वि.* १ गोड; मधुर.

**शीरीनी**–*स्त्री.* [फा.] १ माधुर्य; गोडी. २ मिठाओी.

**शीश**–*पु.* मस्तक; शिर.

**शीशम***–*पु.* [फा.] शिसवीचें लांकूड किंवा झाड.

**शीशमहल**–*पु.* [फा.] आरसेमहाल.

**शीशा**–*पु.* [फा.] १ कांच. २ आरसा. ३ कांचेचें सामान.

**शीशी**–*स्त्री.* [फा.] बाटली. (मु.) **शीशी सुँघाना**–भूल देणें.

**शुकराना**–*पु.* [फा.] १ आभार. २ अुपकृत होण्याबद्दल दिलेलें धन, वस्तु अि.

**शीस**–*पु.* शिर; मस्तक.

**शुंड**–*पु.* हत्तीची सोंड.

**शुंडा**–*स्त्री.* सोंड. **शुंडी**–*पु.* हत्ती.

**शुक**–*पु.* पोपट.

**शुक्ति**–*स्त्री.* शिंप; शिंपला.

**शुक्र**–*पु.* १ शुक्राचार्य. २ शुक्र ग्रह ३ वीर्य. [ अभिनंदन

**शुक्र**–*पु.* [फा.] १ कृतज्ञता. २

**शुक्रगुज़ार**—*वि.* [*अ.* + फा.] आभारी; कृतज्ञ.
**शुक्रिया**–*पु.* [फा.] आभार.
**शुजाअ**–*वि.* [*अ.*] वीर; बहादुर.
**शुजाअत**-*स्त्री.*[*अ.*]वीरता; बहादुरी.
**शुतुर**–*पु.*[फा.] अुंट.
**शुतुरमुर्ग**–*पु.* [फा.] शहामृग.
**शुद्**–*वि.*[फा.] व्यतीत; झालेला. *पु.* कार्यारंभ. (यौ.) **शुद्-बुद्**– अेखाद्या विषयाचें अत्यंत सामान्य अथवा अल्प ज्ञान.
**शुदनी**–*स्त्री.* [फा.] भवितव्य.
**शुफा**–*पु.* [*अ.*] शेजारी.
**शुबहा**–*पु.*[*अ.*]शंका; संशय; वहीम.
**शुभनाम**–*पु.* नांव (आदरार्थी).
**शुभा**–*पु.* पाहा 'शुबहा'.
**शुमार**–*पु.*[फा.] १ गणना;संख्या. २ हिशेब.
**शुमाल**–*स्त्री.पु.*[*अ.*] अुत्तर दिशा.
**शुरू**–*पु.* [*अ.*] १ आरंभ; सुरुवात. २ आरंभीची जागा.
**शुर्ब**–*पु.*[*अ.*] पान करणें; पिणें.
**शुल्क**–*पु.* १ फी. २ नदीच्या किनाऱ्यावर घेतला जाणारा कर. ३ पैज. ४ भाडें. ५ किंमत. ६ हुंडा, करणी (लग्नांतील).
**शुस्त-व-शू**–*स्त्री.* [फा.] १ आंघोळ; स्नान. २ धुअून पुसून स्वच्छ करणें.
**शुस्ता**–*वि.* [फा.] १ धुतलेला. २ स्वच्छ. [दुर्दैवी. ३ कंजुष.
**शूम**–*वि.* [*अ.*] १ अुदासीन. २
**शूल**–*पु.* १ त्रिशूळ. २ भाला. ३ सूळ. ४ दुःख; कळ
**शूली**–*पु.* महादेव. *स्त्री.* सूळ.
**शृंगार**–*पु.* शृंगार; सजावट
**शेख**–*पु.* [*अ.*] १ महंमदाच्या वंशजांना मिळालेली पदवी. २मुसलमानी धर्माचा आचार्य.
**शेखचिल्ली**–*पु.* [*अ.* + फा.] १ अेक काल्पनिक मूर्ख व्यक्ति; शेख महमंद. २ मनोराज्यें करणारा.
**शेखी**–*स्त्री.* [*अ.*] १ मिजास; गर्व; घमेंड. २ अैट; तोरा; रुबाब. (मु.) **शेखी बघारना, हाँकना,** अथवा **मारना**–बाता मारणें. [घमेंडखोर.
**शेखीबाज़**—*वि.* [*अ.* + फा.]
**शेर**–*पु.* [फा.] १ वाघ. २ सिंह. ३ वीर किंवा साहसी पुरुष. [चरण.
**शेर**–*पु.* [*अ.*] अुर्दू कवितेचे दोन
**शेरखानी**–*स्त्री.* [*अ.*+फा.] काव्यगायन.
**शेरदहाँ**—*वि.* [फा.] १ मोठ्या जबड्याचा. २ व्याघ्रमुखी. *पु.* पुढें रुंद व मागल्या बाजूस निमुळतें होत जाणारें घर.
**शेर-पंजा**–*पु.* [फा] वाघनख.

**शेर-बबर**—पु॰ [फा.] सिंह.
**शेरवानी**—स्त्री॰ [दे.] लांब पायघोळ अंगरखा अथवा कोट.
**शै**—स्त्री॰ [अ.] १ वस्तु; पदार्थ. २ भूतखेत.
**शैतान**—पु॰ [अ.] १ सैतान. २ भूत-प्रेत. ३ दुष्ट. **शैतानकी आँत**—लांबच लांब वस्तु. **शैतानी**—स्त्री॰ दुष्टता. वि॰ दुष्ट.
**शैथिल्य**—पु॰ शिथिलपणा; ढिलेपणा.
**शैदा**—वि॰ [फा.] आसक्त झालेला; आषुक.
**शैल**—पु॰ पर्वत; डोंगर. [ बहु. कवी.
**शोअरा**—पु॰ बहु. [अ.] 'शायर' चें
**शोक**—पु॰ दुःख; विलाप.
**शोख**—वि॰ [फा.] १ धीट; साहसी. २ चंचल; चपल; खट्याळ. ३ गर्द व चमकदार (रंग).
**शोखी**—स्त्री॰ १ धृष्टता. २ नटवेपणा; नखरेलपणा. ३ खट्याळपणा.
**शोच**—पु॰ १ दुःख. २ चिंता.
**शोचनीय**—वि॰ १ दुःखकारक. २ चिंताजनक. ३ अत्यंत वाईट.
**शोण**—पु॰ १ रक्त. २ लाली.
**शोणित**—वि॰ लाल. पु॰ रक्त.
**शोध**—पु॰ १ सफाई; शुद्ध करण्याची क्रिया. २ शोध; तपास. ३ सुधारणा; दुरुस्ती. ४ फेड.
**शोधक**—पु॰ १ शोध करणारा. २ सुधारक. ३ तपास करणारा.
**शोधना**—क्रि॰ स॰ १ सुधारणें; दुरुस्ती करणें. २ तपास करणें; शोध करणें.
**शोबा**—पु॰ [अ.] १ समूह; झुंड. २ शाखा; विभाग. ३ कालवा.
**शोभन***—वि॰ शोभिवंत; सुंदर. स्त्री॰ शोभा.
**शोर**—पु॰ [फा.] १ दंगा; गडबड. २ कोलाहल. ३ धामधूम. ४ क्षार; मीठ.
**शोरबा**—पु॰ [फा.] मांसाचा रस्सा.
**शोरा**—पु॰ [फा.] सोडा.
**शोरिश**—स्त्री॰ [फा.] १ गडबड; गोंधळ. २ हुल्लड. ३ खळबळ.
**शोला**—पु॰ [अ.] ज्वाला; आगीचा झोत.
**शोशा**—पु॰ [फा.] १ बाहेर आलेलें टोंक. २ आश्चर्यजनक गोष्ट.
**शोषण**—पु॰ १ शोषून घेणें. २ नाश.
**शोहदा**—पु॰ [फा.] १ व्यभिचारी. २ गुंड; बदमाश.
**शोहरत**—स्त्री॰ [अ.] १ प्रसिद्धि; ख्याति. २ गाजावाजा.
**शोहरा**—वि॰ [अ.] प्रसिद्ध; विख्यात.
**शौक**—पु॰ [अ.] १ षोक; चैन. २

आवड; लालसा. ३ व्यसन. ४ प्रवृत्ति. **शौकीन**–पु., वि. षोकीन; चैनी. **शौकीनी**–स्त्री. चैनबाजी; शौकीपणा.

**शौकत**–स्त्री. [अ.] १ थाटमाट. २ भव्यपणा. ३ करामत; सामर्थ्य ४ प्रतिष्ठा.

**शौहर**–पु. [फा.] नवरा; पति.

**श्यामटीका**–पु. तीट; गालबोट.

**श्रमजीवी**–पु. १ मेहनत करणारा. २ मजूर.

**श्रवण**–पु. २ कान. २ ऐकणें.

**श्रवना***–क्रि. अ. गळणें; श्रमित होणें. क्रि. स. १ गाळणें; २ वाहविणें. [कीर्ति. ३ शोभा.

**श्री**–स्त्री. १ लक्ष्मी; संपत्ति. २

**श्रीखंड**–पु. १ गंध. २ चंदन.

**श्रीयुत, श्रीयुक्त**–वि. श्रीयुत.

**श्रेयस्कर**–वि. शुभदायक.

**श्रौन***–पु. श्रवण.

**श्लथ**–वि. १ सैल; ढिला. २ मंद; धिम्मा. ३ दुबळा; अशक्त.

**श्लाघा**–स्त्री. प्रशंसा; स्तुति; तारीफ.

**श्लाघ्य**–वि. प्रशंसनीय.

**श्लेष्मा**–पु. कफ.

**श्वपच**–पु. कुत्र्याचें मांस खाणारा; डोंब; चांडाल; मांग.

**श्वशुर**–पु. सासरा.

**श्वान**–पु. कुत्रा.

**श्वापद**–पु. जंगली जनावर. (सिंह, वाघ वगैरे).

**श्वास**–पु. १ श्वासोच्छ्वास. २ दमा.

**श्वेत**–वि. पांढरा.

## ष

**षट्रिपु**–पु. आत्म्याचे सहा शत्रु: काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर.

**षष्ठ**–वि. सहावा.

**षड्यंत्र**–पु. कट.

**षाडव**–पु. ज्यामध्यें फक्त सहा स्वर आहेत असा राग.

**षोडश**–वि. सोळा; सोळावा.

**षोडशी**–वि. स्त्री. सोळा वर्षांची.

## स

**संकट**–पु. १ विपत्ति; संकट. २ घाटांतील लहान रस्ता. वि. संकुचित; लहान. [२ भिणें.

**संकना***–क्रि. अ. १ शंका घेणें.

**संकर**–पु. १ मिश्रण; भेसळ. २ शंकर.

**सँकरा**–वि. संकुचित; तंग; अरुंद. पु. दुःख; आपत्ति.

**संकलित**–वि. १ निवडलेला. २

संग्रहित; अेकत्रित केलेला.

**संकीर्ण**–*वि.* १ संकुचित. २ तुच्छ; क्षुद्र. ३ मिसळलेला; मिश्रित.

**सँकुचना**–*क्रि.अ.* १ संकोच करणें. २ संकोच पावणें; मिटणें (फूल).

**सँकुचाना**–*क्रि. अ.* १ लाजणें. २ आकसणें. [जनता; समूह. २ युद्ध.

**संकुल**–*वि.* परिपूर्ण; दाट. *पु.* १

**संकेत**–*पु.* १ अिशारा; खूण. २ चिह्न. ३ प्रेमी व प्रेमिका यांची भेटण्याची जागा.

**संकोचना**–*क्रि. स.* १ संकोच करणें; २ लाजणें. २ संकुचित करणें; आकसणें; आवळणें.

**संक्रामक**–*वि.* सांसर्गिक(रोग वगैरे.)

**संक्षेप**–*पु.* थोडक्यांत सांगणें; कमी करणें.

**संखिया**-*पु.* सोमल ( विष ).

**संग**–*पु.* [फा.] १ दगड. २ वजन; भार. *वि.* दगडासारखें निष्ठुर.

**संग**–*पु.* १ सहवास. २ मीलन; भेट. ३ वासना; आसक्ति. ४ विषया-बद्दलचें प्रेम. *क्रि. वि.* सह; बरोबर.

**संगजराहत**–*पु.* [फा + *अ.*] संगजिरें. [*वि.* संघटित.

**संगठन**––*पु.* संघटन. **संगठित**–

**संगत**–*स्त्री.* सहवास;सोबत; संगत.

**संगतरा**–*पु.* [पोर्तु.] संत्रें; नारिंग.

**संग–तराश**––*पु.* पाथरवट.

**संगतिबा**––*पु.* [ दे. ] साथीदार. ( विशेषतः गाण्या-बजावण्यांत ).

**संगदिल**–*वि.* कठोर हृदयाचा; निर्दय.

**संगमर्मर**–*पु.* [फा.] संगमरवर.

**संग–मूसा**-*पु.* [ फा.+*अ.* ] काळा दगड ( संगमरवरासारखा ).

**संग–यशब**––*पु.* [ फा. ] अेक प्रकारचें हिरवें रत्न; पाचू.

**संगरा**-*पु.* [ दे. ] दगड अुचल-ण्याचा बांबू.

**संगलाख़**––*पु.* [ फा. ] खडकाळ स्थान. *वि.* कठिण; कठोर.

**संगसार**–*पु.* [फा.] अिस्लामी धर्म-शास्त्रानुसार व्यभिचारी व्यक्तीला जमिनींत कमरेपर्यंत पुरून व तिच्या डोकीवर दगडांचा वर्षाव करून तिला ठार मारण्याची दिली जाणारी शिक्षा.

**संगाती**–*पु.* मित्र; सहचर. [सखी.

**संगिनी**–*स्त्री.* मैत्रीण; जोडीदारीण;

**सगीन**–*पु.* [फा.] बंदुकीच्या शेवटीं जोडतात तें तीक्ष्ण शस्त्र;बायोनेट. *वि.* १ दगडी. २ जाड. ३ टिकाअू; मजबूत. ४ बिकट; कठिण.

**संगृहीत, संग्रहीत**–*वि.* अेकलित; संग्रह केलेला; संकलित.

**संग्राम**–पु· युद्ध; संघर्ष. [समिति.
**संघ**–पु· १ समूह; समुदाय. २सभा;
**संघट***–पु· १ संघटन. ५ युद्ध. ३ समूह; ढीग; रास.
**संघटन**—पु· १ संयोग, मिलाफ. २ रचना. ३ बनावट. ४ संघटन.
**संघरना**–क्रि· अ· १ संहार करणें; नाश करणें. २ ठार मारणें.
**संघात**—पु· १ समूह. २ आघात. ३ वध; हत्या. ४ संघर्ष.
**संघाती**—पु· साथी; मित्र; सखा.
**संघारना**—क्रि· स· संहार किंवा नाश करणें. [मठ; विहार.
**संघाराम**—पु· बौद्ध भिक्षूंचा
**संचय**–पु· १ सांठा. संग्रह २ समुदाय; समूह.
**संचार**—पु· चालणें; गमन; प्रवेश.
**संचारना**—क्रि· स· संचार करविणें; पसरविणें.
**संचारी**—पु· हवा; वारा. वि· १ साहित्यांत मुख्य भावनांची पुष्टि करणारे (भाव). २ गतिमान्.
**संचालन**—पु· चालविणें.
**संजाफ**–स्त्री· [फा.] १ झालर; किनार. २ गोठ; कांठ (वस्त्राचा).
**संजाफ—फी**–पु· [फा.] अर्धा हिरवा व अर्धा तांबड्या रंगाचा घोडा.
**संजाब**—पु· [फा.] लाल पांढरा घोडा.
**संजीदा**—वि· [फा.] १ गंभीर; शांत. २ समजदार; बुद्धिवान्.
**संजीदगी**—स्त्री· गंभीरपणा.
**संजोग**–पु· संयोग. [चेतना; शुद्धि.
**संज्ञा**—स्त्री· १ नाम. २ नांव. ३
**संझा***—स्त्री· संध्याकाळ.
**संड–मुसंड**–वि· [सं· + अनु.] धट्टाकट्टा; गलेलठ्ठ.
**सँडसा**—पु· सांडशी; चिमटा.
**संडा**— वि· धष्टपुष्ट.
**संतरा**—वि· [पोर्तु.] संत्रें.
**संतरी**–पु· [अं] पहारेकरी; सेंट्री.
**संतान**—पु· स्त्री· मुलेंबाळें; संतति.
**संताप**—१ दाह; ताप. २ दुःख; कष्ट. ३ मानसिक ताप. **संतापी**–पु· दुःख देणारा.
**संतापना**–* क्रि· स· दुःख देणें.
**संति**–स्त्री· १ दान. २ शेवट.
**संती**–अव्य. ऐवजीं.
**संतुलन**—पु· समतोल; तोल.
**संतुलित**—वि· समतोल.
**संतोख*** - पु· संतोष.
**संतोषना**—क्रि· स· संतोष देणें; संतुष्ट करणें. क्रि· अ· संतुष्ट होणें; समाधान मानणें.
**संत्रस्त**—वि· त्रासलेला.

**संदल**—पु· [ फा. ] चंदन.
**संदली**—वि· [ फा. ] १ चंदनी रंगाचा. २ चंदनाचा. पु· १ चंदना. सारखा पिवळा रंग. १ हत्तीविशेष. ३ घोड्याचा प्रकार. [ शंकायुक्त.
**संदिग्ध**—वि· अनिश्चित; संदेहयुक्त;
**संदूक**—पु· [अ·] पेटी. **संदूकचा**—पु· लहान पेटी. **संदूकची**—स्त्री·
**संदेश**—पु· १ बातमी; वार्ता. २ अेक प्रकारची बंगाली मिठाअी. **सँदेसा**—पु· निरोप; वार्ता. **संदेसी**...पु· वार्ताहर; बातमी पोहोंचविणारा.
**संदेह**—पु· संशय; शंका. [ शोध.
**संधान**—पु· १ निशाण; लक्ष्य. २
**संधाना**—पु· लोणचें.
**संधि**—स्त्री· १ संयोग; संबंध. २ तहनामा. ३ तडजोड. ४ सांधा; जोड. ५ भिंतीला पाडलेलें भोंक. ६ संधि; वेळ. ७ रिकामी जागा; अवकाश. [संपत्ति.
**संपदा**—स्त्री· १ अैश्वर्य; वैभव. २ धन.
**संपर्क**—पु· १ संबंध; संसर्ग. २ मिश्रण.
**संपा**—स्त्री· वीज.
**संपात**—पु· १ संयोग; संगम. २ अेकाअेकीं वरून खालीं पडणें.
**संपुट**—पु· १ भांड्याच्या आकाराची अेखादी वस्तु. २ द्रोण. ३ ओंजळ.
**संपूर्ण**—वि· १ सर्वच्या सर्व; पूर्ण. २ समाप्त. [ प्रकारें; पूर्णपणें.
**संपूर्णतः, संपूर्णतया**—क्रि· वि· सर्व
**सँपेरा**—पु· गारुडी.
**सँपोला**—पु· सापाचें पिलूं.
**संप्रदाय**—पु· धर्म-मत; पंथ; प्रणाली.
**संबंध**—पु· १ संबंध; संपर्क; संसर्ग. २ नातें.
**संबंधी**—पु· १ नातलग. २ व्याही.
**संबल**—पु· शिदोरी; फराळाचें सामान ( प्रवासांतील ). [ भानावर येणें.
**सँभलना**—क्रि· अ· १ सांवरणें २
**संभवतः**— अव्य. बहुतेक.
**संभार**—पु· १ संचय. २ तयारी. ३ संपत्ति. ४ पालपोषण.
**सँभाल**—पु· १ संभाळ; रक्षण. २ पालनपोषण; देखरेख.
**सँभालना**—क्रि· स· १ संभाळणें; रक्षण करणें. २ पालनपोषण करणें. ३ देखरेख करणें. ४ अडकवून ठेवणें. ५ धरून ठेवणें. ६ निर्वाह करणें. ७ संयम करणें. ८ नीट पाहून घेणें ( वस्तु ).
**संभावना**—स्त्री· १ शक्यता. २ अनुमान. प्रतिष्ठा.
**संभावित**—वि· १ कल्पित. २ अेकत्र केलेला. ३ संभाव्य. [ ष्ठित.
**संभ्रांत**—वि· १ घाबरलेला. २ प्रति-

**संयोग**–*पु*. १ मिश्रण. २ योगायोग. ३ समागम. ४ संबंध.
**संयोजक**–*वि*. निमंत्रण देणारा; जोडणारा. [ मिसळण्याची क्रिया.
**संयोजन**—*पु*. जोडण्याची किंवा
**संरक्षण**–*पु*. १ रक्षण. २ देखरेख.
**संलग्न**–*वि*.संबद्ध; जोडलेला;सामील.
**संवत्**–*पु*. वर्ष; सन; विक्रमादित्य राजाच्या काळापासून चालत आलेली वर्षगणना.
**सँवरना**–*क्रि.अ*. १ सुधारणा होणें. २ सजावट होणें.
**सँवरना***—*क्रि. स*. स्मरण करणें.
**संवाद**–*पु*. १ संभाषण. २ बातमी; खबर. ३ प्रसंग.
**संवाद-दाता**–*पु*. बातमीदार.
**सँवारना**–*क्रि.स*. १ सजविणें. २ सुधारणें.३ व्यवस्थित लावणें किंवा ठेवणें.
**संविधान**–*पु*. राज्यघटना.
**संवेदना**–*पु*. संवेदन; सहानुभूति.
**संशोधक**–*पु*. १ शोधक.२ दुरुस्ती करणारा.
**संशोधन**–*पु*.१ अुपसूचना; दुरुस्ती. २ फेड ( अृण ). ३ शुद्धीकरण.
**संशोधित**–*वि*. सुधारलेला; शुद्ध किंवा दुरुस्त केलेला.
**संश्लिष्ट**–*वि*. मिश्रित; संमिलित.
**संसद्**–*स्त्री*. पार्लमेंट ( लोकसभा व राज्यसभा मिळून ). [ संसार.
**संसार**–*पु*. १ जग; सृष्टि. २ गृहस्थी;
**संसृति**–*स्त्री*. जन्ममरणाची परंपरा; आवागमन.
**संस्करण**–आवृत्ति.
**सआदत**–*स्त्री*. [ *अ*. ] १ भलाअी; सचोटी. २ सुदैव.
**सआदतमंद**–*वि*. [ *अ*.+फा. ] १ भाग्यवान. २ सुयोग्य. ३ आज्ञाधारक ( विशेषतः मुलांकरितां ).
**सअि***—सह; सहित.
**सअी**–*स्त्री*. [ *अ*. ] १ धांवपळ. २ परिश्रम; मेहनत. [ भाग्यवान्.
**सअीद**—*वि*. [ *अ*. ] १ शुभ. २
**सकता**–*पु*. [ *अ*. ] १ मूर्च्छा; फिट. २ धक्का; थक्क होणें. ३ यतिभंग.
**सकना**–*क्रि.अ*.शक्य असणें; शकणें.
**सकपकाना**–*क्रि. अ*. [ अनु. ] १ आश्चर्यचकित होणें. २ लाजणें. ३ कांकूं करणें; घुटमळणें.
**सकर**–*पु*. [ *अ*. ] नरक.
**सकरना**–*क्रि. अ*. १ मंजूर होणें. २ कबूल होणें. [ भेट; नजराणा.
**सकलात**–*पु*. [ ? ] १ रजअी. २
**सकसकाना, सकसाना***—*क्रि. अ*. [ अनु. ] थरथर कांपणें; भयभीत होणें.

**सकारना**–*क्रि. अ.* १ स्वीकारणें. २ मुदत संपण्याच्या अेक दिवस पूर्वी हुंडीवर सही करून पैसे देणें.
**सकालत**–*स्त्री.* [*अ.*] बोजा; वजन.
**सकिलना**–*क्रि. अ.* [ दे. ] १ सरकणें; आक्रसणें. २ पूर्ण होणें.
**सकीम**–*वि.* [ *अ.* ] १ आजारी; रोगी. २ दूषित. [ जड. २ वजनी.
**सकील**–*वि.* [*अ.*] १ पचावयाला
**सकुचना**–*क्रि. अ.* १ लाजणें. २ बंद होणें; मिटणें. ( फूल. )
**सकुचाना**–*क्रि. अ.* संकोच करणें. *क्रि. स.* १ लाजविणें. २ मिटविणें; बंद करणें.
**सकुन***–*पु.* शकुन.
**सकूत**–*पु.* [ *अ.* ] स्तब्धता; मौन.
**सकून**–*पु.* [ *अ.* ] मनाची शांति.
**सकूनत**–*स्त्री.* [*अ.*] निवासस्थान.
**सकोरा**–*पु.* परळ; मातीचें पसरट भांडें.
**सक्का**–*पु.* [ *अ.* ] भिश्ती.
**सखरा**–*पु.* (कच्ची रसोअी) शिजविलेलें अन्न–भात; भाजी अि.
**सखरी**–*स्त्री.* [*वि.* दानी; अुदार.
**सखावत**–[*अ.*] अुदारता. **सखी**–
**सखुआ**–*पु.* शालवृक्ष.
**सखुन**–*पु.* [ फा. ] १ संभाषण; २ काव्य. ३ अुद्धरण; वचन. ४ कथन; अुक्ति. [ खोर.
**सखुन–चीन**–*वि.* [ फा. ] चुगल.
**सखुन–तकिया**–*पु.* [फा.] बोलतांना संवयीमुळें तोंडीं बसलेला निरर्थक शब्द (अुदा.-जेहेत्ते; ज्याचें नांव तें; आपलें काय म्हणतात–वगैरे.)
**सखुन–दाँ**–*वि.* [ फा. ] १ काव्य-मर्मज्ञ. २ कवि. [ मर्मज्ञ.
**सखुन–फहम**–*वि.* [ फा ] चतुर;
**सख्त**–*वि.* [ फा. ] १ कठिण; टणक. २ बिकट. ३ कठोर; निर्दय. *क्रि. वि.* अत्यंत; अगदीं.
**सख्ती**–*स्त्री.* [ फा. ] जुल्म; क्रूरता; कठोरता.
**सग**–*पु.* [ फा. ] कुत्रा.
**सगबग**–*वि.* [ अनु. ] १ ओथंबलेला; भिजलेला. २ परिपूर्ण. *क्रि. वि.* झटपट.
**सगबगाना**–*क्रि. अ.* [ अनु. ] १ ओलेंचिंब होणें. २ संशयी होणें.
**सगर**–*पु.* अेक सूर्यवंशीय राजा.
**सगा**–*वि.* १ सहोदर; सख्खा. २ गोत्रज. **सगापन**–*पु.* सख्खेपणा. **सगाअी**–*स्त्री.* १ वाङ्‌निश्चय. २ पाट लावणें; मोहतूर. ३ नातें.
**सगीर**–*वि.* [*अ.*] छोटा.
**सगुनाना**–*क्रि. स.* शकुन सांगणें किंवा पाहणें. **सगुनिया**–*पु.* शकुन

पाहणारा किंवा विचारणारा. **सगु-नौती**–पु. शकुन विचारणें.

**सगोती**–पु. १ गोत्रज. २ भाअूबंद.

**सघन**–वि. १ निबिड;दाट. २भरीव.

**सच**––वि. सत्य; खरें; यथार्थ.

**सचमुच**–अव्य. [अनु.] १ खरो-खरींच; वास्तविक. २ अवश्य.

**सचाअी**––स्त्री. १ सत्यता. २ यथार्थता; वास्तविकपणा.

**सचिंत**–वि. काळजीयुक्त.

**सचेत, सचेतन**–वि. १ चैतन्य-युक्त. २ सावध; जागृत. ३ चतुर.

**सचेतक**––पु. कायदेमंडळांतील सभासदांना जागृत ठेवणारा; प्रतोद; Whip.

**सचेष्ट**–वि. प्रयत्नशील.

**सच्चा**–वि. १ खरा; वास्तविक. २ सत्यवादी. ३ शुद्ध; निर्मळ. ४ योग्य; ठीक. **सच्चाअी**––स्त्री. सत्यता. **सच्चापन**–पु. खरेपणा.

**सजग**–वि. सावध.

**सजदा**–पु. पाहा ‘ सिजदा ’

**सजदार**–वि. [ सं. + फा. ] सुंदर; नटलेला. [ थाटमाट; डामडौल.

**सजधज**––स्त्री. [ सं. + अनु. ]

**सजन**–पु. १ पति. २ प्रियकर. ३ सज्जन माणूस.

**सजना**–क्रि. अ. शृंगारलें जाणें. क्रि. स. शृंगार करणें. **सजवाअी**–स्त्री. सजावट किंवा सजविण्याची मजुरी.

**सजबल**–पु. तयारी.

**सजवाना**––क्रि. स. दुसऱ्याकडून सजविणें; सजवून घेणें.

**सज़ा**–स्त्री. [फा.] शिक्षा; दंड.

**सज़ा**––पु. [ अ. ] पक्ष्यांचा मधुर कलरव. [ व्यवस्थित ठेवणें.

**सजाना**–क्रि. स. १ सजविणें. २

**सज़ायाफ्ता**––वि. [ फा. ] शिक्षा झालेला; शिक्षा भोगलेला.

**सज़ायाब**–वि. १ शिक्षेस पात्र. २ शिक्षा भोगलेला [ शृंगारणें.

**सजावट**–स्त्री. आरास; मांडणी;

**सज़ावार**–वि. [ फा. ] १ अुचित; अुपयुक्त. २ शुभ फल देणारा.

**सजावुल**––पु. [ तु. ] १ सरकारी कर वसूल करणारा. २ शिपाअी.

**सजीला**––वि. १ नखरेबाज. २ मनोहर; सुंदर.

**सजीव**–वि. जीवंत; प्राणवान्.

**सज्जा**–स्त्री. १ सजावट. २ वेषभूषा.

**सज्जादा**–पु. [अ.] १ ज्या कापडा-वर बसून नमाज पढतात तें. २ पीराची किंवा फकीराची गादी.

**सज्जादा-नशीन**–पु.[अ.+फा.] पीर

अथवा फकीर याच्यागादीवर बसणारा.

**सज्जित**—*वि.* तयार.

**सज्जी**—*स्त्री.* सज्जीखार. कपडे धुण्याची खारी माती.

**सटक**–*स्त्री.* [ अनु. ] १ निसटणें. २ हुक्क्याचा नेचा. ३ छडी.

**सटकना**–*क्रि. अ.* [अनु.] सटकणें; निसटणें.

**सटकाना**–*क्रि. स.* १ सडकावणें; मारणें. २ निसटूं देणें; पळवून लावणें.

**सटकारना**—*क्रि. स.* [ अनु. ] सटासट मारणें; सडकावणें. **सटकारी**–*स्त्री.* छडी; चमोटी.

**सटकारा**–*वि.* [ अनु. ] लांब व गुळगुळीत बांबू वगैरे.

**सटना**—*क्रि. अ.* १ भिडणें. २ जुळणें. ३ मारामारी होणें.

**सटपट**–*स्त्री.* [ अनु. ] १ चुटपुट. २ संकोच; मर्यादा. ३ गोंधळ; घोटाळा.

**सटपटाना**–*क्रि. अ.* [ अनु. ] १ संकोच करणें. २ किंकर्तव्यमूढ होणें. ३ फिक्कें पडणें. ४ जळफळणें.

**सटरफटर**—*वि.* [ अनु. ] किरकोळ; सटरफटर. *स्त्री.* तुच्छ काम.

**सटाना**—*क्रि. स.* १ भिडविणें; जोडणें. २ चिकटविणें. ३ सडकावणें; मारणें.

**सटीक**—*वि.* बिलकुल ठीक.

**सटीक**—*वि.* टीकेसहित.

**सट्टा**—*पु.* [ दे. ] १ करारनामा. २ सट्टा; जुगार.

**सट्टाबट्टा**—*पु.* [ सं. + अनु. ] १ मिलाफ; घसट. २ कावेबाजपणा.

**सट्टी**—*स्त्री.* अेकाच प्रकारच्या वस्तूंचा बाजार.

**सठ**–*पु.* १ शठ; धूर्त; लुच्चा. २ मूर्ख. **सठता**—*स्त्री.* १ धूर्तता. २ मूर्खता. ३ दुष्टता.

**सठियाना**—*क्रि. अ.* १ साठींत येणें ( वय ). २ म्हातारपण येणें. ३ साठीं बुद्धि नाठी होणें.

**सडना**–*क्रि. अ.* १ सडणें; नासणें. २ अंबणें. ३ दुर्दशाग्रस्त होणें.

**सडाना**–*क्रि. स.* सडविणें; नासविणें.

**सडाअंध, सडायँध, सडाँध**–*स्त्री.* कुजलेल्या वस्तूची घाण; दुर्गंध.

**सडियल**–*वि.* १ सडलेला; सडका. २ रद्दी; खराब. ३ तुच्छ; नीच.

**सत**–*पु.* १ सत्त्व. २ जीवनशक्ति; ताकद.

**सतकारना***–*क्रि. स.* सत्कार करणें.

**सतजुग, सतयुग**—*पु.* सत्ययुग.

**सतनजा**–*पु.* सप्तधान्यें.

**सतपुतिया**—स्त्री. अेक प्रकारचें घोसाळें.

**सतफेरा**–पु.सप्तपदी (विवाहांतील).

**सतमासा**—पु. सातोळा मुलगा.

**सतर**–स्त्री. [अ.] १ रेघ; रेषा. २ ओळ; रांग. वि. वक्र; तिरपा.

**सतरह**—वि. सत्रा (१७).

**सतराना**—क्रि. अ. १ रागावणें. २ चिडणें. **सतरौहाँ**–वि. रागावलेला.

**सतर्क**—वि. १ तर्कयुक्त. २ सावध.

**सतर्पना**—क्रि. स. संतुष्ट करणें.

**सतवंती**—स्त्री. पतिव्रता.

**सतसअी**—स्त्री. सातशें पदांचा संग्रह; सप्तशती.

**सतह**—स्त्री. [अ.] सपाटी.

**सतहत्तर**–वि. सत्याहत्तर (७७).

**सताअिश**—स्त्री. [फा.] प्रशंसा; तारीफ.

**सताना**—क्रि. स. १ सतावणें; त्रास देणें. २ हैराण करणें.

**सताळू**—पु. शांताळू; सताळू.

**सतावर**—स्त्री. शतावरी.

**सतुआ**—पु. सातूचें पीठ.

**सतुआसंक्रांति**—स्त्री. मेषसंक्रांत.

**सतून**–पु. [फा.] स्तंभ; खांब.

**सत्त**—पु. १ सत्त्व. २ तत्त्व. ३ सत्य. ४ पातिव्रत्य.

**सत्ता**—स्त्री. १ स्थिति; आस्तित्व. २ अधिकार; अंमल; प्रभुत्व.

**सत्ताअीस**–वि. सत्तावीस. (२७).

**सत्तानबे**–वि. सत्याण्णव (९७).

**सत्तावन**–वि. सत्तावन. (५७).

**सत्तासी**–वि. सत्याअैंशी. (८७).

**सत्तू**—पु. सातूचें पीठ.

**सत्य**—पु. खरें; खरोखर.

**सत्याग्रह** — पु. न्यायप्राप्तीसाठीं करावयाचा शांततापूर्ण लढा.

**सत्यानास**—पु. संपूर्ण नाश.

**सत्रुघन-सत्रुहन**–पु.शत्रुघ्न; रामाचा लहान भाअू. [ शस्त्रक्रिया करणारा.

**सथिया**—पु. १ स्वास्तिक चिन्ह. २

**सद**—स्त्री. [अ.] १ परदा; आडपडदा. २ भिंत. (मु) **सदेराह होना**–अेखाद्याच्या मार्गांतील धोंड बनणें.

**सद**–वि. [फा.] शंभर. (यौ.) **सद आफरीन** किंवा **सद रहमत**—खूप खूप शाबासकी; धन्य धन्य.

**सदका**—पु. [अ.] दान; खैरात. २ समर्पण. [ मोत्याची शिंप.

**सदफ**–स्त्री. [अ.] मोत्यांचा शिंपला;

**सदमा**—पु. [अ.] १ खेद; दुःख. २ जखम; आघात; धक्का.

**सदर**—वि. [अ.] प्रधान; मुख्य. पु. १ अध्यक्ष. २ छाती. ३ छावणी.

**सद्र-आला**--पु. [अ.] दुय्यम न्यायधीश.
**सद्री**-स्त्री. [अ.] कोपरी; गंजी.
**सद्स्य**-पु. १ सभासद; घटक. २ यज्ञ करणारा.
**सद्हा**-वि. [फा.] शेंकडों; अनेक.
**सदा**—अव्य. १ सर्वदा; नेहमी. २ सारखें. [२ आवाज.
**सदा**-स्त्री. [अ.] १ प्रतिध्वनि.
**सदाकत**-स्त्री. [अ.] १ सच्चेपणा. २ साक्ष.
**सदाबहार**--वि. [सं.+फा.] १ सदाफुली. २ सदैव फुलणारा.
**सदारत**-स्त्री. [अ.] अध्यक्षता.
**सदाशय**-पु. सज्जन; अुदार.
**सदा-सुहागिन**—स्त्री. अखंड सौभाग्यवती (वेश्या).
**सदिया**-स्त्री. [फा] लाल पक्ष्याची मादी. [२ शंभर वर्षें.
**सदी**—स्त्री. [अ.] १ शतक.
**सद्म**—पु. १ घर; निवास. २ युद्ध.
**सद्य**—अव्य. आतांच; ताबडतोब.
**सधना**—क्रि. अ. १ स्वार्थ साधणें. २ संवय होणें.
**सधाना**-क्रि. स. साधणें; अभ्यासणें.
**सन**—पु. अंबाडी; ताग.
**सन**—पु. [अ.] १ वर्ष; साल. २ संवत; शक.
**सनक**—स्त्री. १ चीड. २ विक्षिप्तपणा. ३ लहर. (मु.) **सनक सवार होना**—छंद लागणें.
**सनकना**—क्रि. अ. १ चिडणें. २ वेडें होणें. ३ रागावणें.
**सनकाना**-क्रि. स. [दे.] अुत्तेजित करणें; चिडवणें.
**सनद**—स्त्री. [अ.] १ प्रमाण; पुरावा. २ दाखला; सनद.
**सनद्याफ्ता**-वि. [अ.+फा.] सनद मिळविलेला; सनदी.
**सनना**-क्रि. अ. १ मिसळणें; अेकजीव होणें. २ विलीन होणें.
**सनम**-पु. [अ.] १ प्रियकर. २ मूर्ति.
**समकदा-सनमख़ाना**-पु. [अ.+फा.] १ मंदिर. २ प्रियतमेचें निवासस्थान.
**सनमान**-पु. सन्मान.
**सनमानना***-क्रि.स. सन्मान करणें.
**सनमुख**-अव्य. समोर.
**सनसनाटी**-स्त्री. [अनु.] खळबळ.
**सनसनाना**-क्रि. अ. [अनु.] सळसळणें; खवळणें. [घोंघाट.
**सनसनाहट**-स्त्री. [अनु.] खळबळ;
**सनसनी**-स्त्री. [अनु.] १ खळबळ. २ निःस्तब्धता. ३ आश्चर्य (भयामुळें). ४ घाबरेपणा.

**सनसनीदार**–*वि.* [अनु.] खळबळ अुडविणारें. [(मुसलमानी).
**सनहकी**–*स्त्री.* [अ.] मातीचें भांडें
**सना**–*स्त्री.* [अ.] १ प्रशंसा. २ स्तुति.
**सनाअत**–*स्त्री.* [अ.] कारागिरी.
**सनाय**–*स्त्री.* [अ.] सोनामुखी.
**सनाह, सन्नाह**–*पु.* कवच.
**सनीचर**–*पु.* १ शनिवार. २ शनि ग्रह. **सनीचरी**–*स्त्री.* साडेसाती.
**सनेहिया, सनेही**-*वि.* प्रेम करणारा; स्नेही.
**सनोबर**–*पु.* [अ.] देवदाराचें झाड.
**सन्दल**–*पु.* [अ.] चन्दन.
**सन्दूक**–*पु.* [अ.] मोठी पेटी; पेटारा.
**सन्दूकचा**—*पु.* **सन्दूकची**–*स्त्री.* [अ.] लहानपेटी. [आश्चर्यचकित.
**सन्न**–*वि.* १ स्तब्ध. २ चूप. ३
**सन्नाटा**–*पु.* १ निःस्तब्धता; सामसूम. २ अेकांतता. ३ शांतता. ४ औदासीन्य. (मु.) **सन्नाटा छाना**–निःस्तब्धता पसरणें. *वि.* १ स्तब्ध. २ निर्जन. **सन्नाटे में आना**–आश्चर्यचकित होणें.
**सन्नाटा**-*पु.* [अनु.] जोरानें हवा वाहूं लागली असतां होणारा आवाज.
**सन्निपात**–*पु.* १ अेकदम पडणें. २ अेकत्र येणें. ३ वात-पित्त-कफ हीं तीन्ही अेकाच वेळीं बिघडणें. ४ मेंदूचा विकार; चित्तभ्रम.
**सपदि***–*क्रि. वि.* शीघ्र; लवकर.
**सपना**–*पु.* स्वप्न.
**सपरदाअी**–*पु.* कलावंतिणीबरोबर वाद्य वाजविणारे साथीदार.
**सपरना**—*क्रि. अ.* काम संपणें; पूर्ण होणें. [अिनकौन्सिल.
**सपरिषद्–गव्हर्नर**—*पु.* गव्हर्नर
**सपाट**–*वि.* १ समतल; सपाट. २ गुळगुळीत.
**सपाटा**–*पु.* वेग; गति. (यौ.) **सैर सपाटा**–सहल.
**सपुर्द**–*स्त्री.* [फा.] अनामत; ठेव. *वि.* सोंपविलेला; अेखाद्याच्या हवालीं केलेला.
**सपूत**—*पु.* सुपुत्र. **सपूती**—*स्त्री.* सत्पुत्राला जन्म देणारी माता.
**सपेद, सफेद**–*वि.* [फा.] १ श्वेत; पांढरा. २ गौरवर्णाचा. ३ कोरा.
**सपेरा**–*पु.* गारुडी.
**सप्ताह**पु.*पु.* १ आठवडा. २ सप्ता (अुत्सव, कथा अि. चा).
**सफ़**–*स्त्री.* [अ.] १ ओळ; रांग. २ मोठी चटअी.
**सफ़र**–*पु.* [अ.] प्रवास. **सफ़री**–*वि.* प्रवासांत अुपयोगी पडणारा. *पु.* १ प्रवासखर्च. २ पेरू; जांब.

**सफ़रनामा**—पु. [अ.+फा.] प्रवास-वर्णन.

**सफल**—वि. १ फळ लागलेलें (झाड). २ यशस्वी; कृतकार्य.

**सफलता**—स्त्री. १ यशस्विता. २ पूर्णता. [ २ विस्तार; फैलाव.

**सफहा**—पु. [अ.] १ पृष्ठ; पान.

**सफा**—वि. [अ.] १ साफ; स्वच्छ. २ पवित्र; शुद्ध. ३ गुळगुळीत.

**सफाअी**—स्त्री. १ स्वच्छता. २ स्पष्टता. ३ निष्कपटता. ४ निर्दोषपणा. ५ निर्णय. ६ बचाव; कैफियत.

**सफाचट**—वि. [अ.+अनु.] १ गुळगुळीत. २ स्वच्छ; साफसूफ.

**सफाया**—पु. [अ.] १ फडशा. २ पूर्ण नाश.

**सफीना**—पु. [अ.] १ समन्स; बोलावणें. २ होडी; नाव.

**सफीर**—पु. [अ.] १ राजदूत. २ परराष्ट्रीय वकील. स्त्री. पक्ष्यांचें किलबिलणें.

**सफ़ेद**—वि. [फा.] १ पांढरा; शुभ्र. २ कोरा. (मु.) **सफ़ेद झूट**—साफ खोटें; धडधडीत असत्य.

**सफेद-पोश**—पु. [फा.] १ स्वच्छ. कपडे वापरणारा; पांढरपेशा. २ सज्जन; शिष्ट.

**सफ़ेदा**—पु. [फा.] १ जस्त फूल. २ आंब्याचा प्रकार. ३ खरबुजाचा प्रकार.

**सफेदी**—स्त्री. [फा.] १ शुभ्रपणा. २ चुना देणें; रंग देणें. (मु.) **सफेदी आना**—म्हातारपण येणें.

**सब**—वि. सर्व; सगळे. २ अेकंदर.

**सबक़**—पु. [अ.] धडा; पाठ.

**सबज़; सब्ज़**—वि. [फा.] १ कच्चा; ताजा. २ हिरवें (फळ, फूल). ३ शुभ. (मु.) **सब्ज़ बाग दिखलाना**-काम करून घेण्यासाठीं आमिष दाखविणें.

**सबद्**—पु. शब्द.

**सबनाना**-क्रि.स. [अ.] साबू लावणें.

**सबब**—पु. [अ.] १ कारण; सबब. २ साधन.

**सबर, सब्र**—पु. [अ.] १ संतोष. २ धैर्य. ३ सहनशीलता. (मु.) **किसी का सब्र पडना**—केलेल्या कष्टाचें फळ मिळणें.

**सबा**—वि. [अ.] सात. स्त्री. सकाळीं पूर्वेकडून येणारा वारा.

**सबील**—स्त्री. [अ.] १ मार्ग; सडक. २ अुपाय; युक्ति. ३ पाणपोअी.

**सबूत**—पु. [अ.] पुरावा; प्रमाण.

**सबूस**—स्त्री. [फा.] कोंडा.

**सबेरा**—पु. सकाळ.

**सब्ज़**—पु. १ कच्चा व ताजा. २ हिरवा. ३ शुभ.

**सब्ज़कदम**—पु. [ फा. + अ. ] पांढऱ्या पायाचा; अपशकुनी. (यौ.) **सब्ज बाग दिखलाना**-आपला स्वार्थ साधण्यासाठीं मोठमोठ्या आशा किंवा लोभ दाखविणें.

**सब्जपोश**—वि. [फा.] हिरव्या रंगाचे कपडे वापरणारा.

**सब्ज़ा**—पु. [ फा. ] १ हिरवळ. २ भांग. ३ अेक रत्न. ४ करड्या रंगाचा घोडा.

**सब्जी**—स्त्री. [फा.] १भाजी. २ भांग. ३ हिरवा पाला, वनस्पति अि.

**सब्जीमंडी**—स्त्री. [ फा. + सं. ] मंडअी; भाजीबाजार.

**सभा**—स्त्री. १ सभा २ संस्था.

**सभापति**—पु. अध्यक्ष. [ माणूस.

**सभ्य**—पु. १ सदस्य; सभासद २ भला

**सभ्यता**—पु. १ संस्कृति. २ सभ्यपणा ३ सुशिक्षितपणा. ४ भलेपणा; माणुसकी.

**समंजस**—वि. १ अुचित; योग्य. २ अभ्यास केलेला; माहितगार.

**समंद**—पु. [ फा. ] घोडा.

**समंदर**—पु. समुद्र; सागर.

**सम**-वि. तुल्य बरोबर; समान. पु. [अ.] विष; गरळ. स्त्री. संगीतांतील सम.

**समझ**—स्त्री. १ समजूत. २ बुद्धि; अक्कल. [ समजूतदार

**समझदार**—वि. [ सं. + फा. ]

**समझना**—क्रि. अ. समजून घेणें.

**समझाना**—क्रि. स. समजाविणें; समजूत घालणें.

**समझौता**—पु. तडजोड.

**समतल**—वि. सपाट.

**समथल**—वि. सपाट.

**समदन**—पु. लढाअी. [ विहीण.

**समधी**—पु. व्याही. स्त्री. **समधिन**—

**समन**—पु. [अि.] समन्स; सरकारी बोलावणें.

**समय**—पु. वेळ.

**समर**—पु. लढाअी; युद्ध.

**समर—समरा**—पु. [अ.] १ फळ. २ लाभ. ३ धन; संपत्ति. ४ संतान.

**समरत्थ—समरथ**—वि. समर्थ; बलवान्.

**समर्थन**—पु. पाठिंबा; पाटपुरावा.

**समर्पक**—समर्पण करणारा. [केलेला.

**समर्पित**—वि. दिलेला; समर्पण

**समवाय**—पु. १ समधर्मी. २ समूह; ३ अनुबन्ध.

**समवेदना**—स्त्री. सहानुभूति. [दृश्य.

**समसाम**—स्त्री. [अ.] नंगी तलवार.

**समस्या**—स्त्री. १ बिकट प्रश्न. २ मिश्रण. ३ संघटन.

**समाँ***–पु. १ समय; वेळ. २ सुंदर
२ प्रकरण; परिच्छेद. [ समोर.

**समा**–पु. [अ.] आकाश.

**समाअत**–स्त्री. [अ.] सुनावणी.

**समाअी**–वि. [अ.] अैकीव; दुसऱ्यांनीं सांगितलेला.

**समाचार**–पु. बातमी; वार्ता.

**समाचारपत्र**–पु. वर्तमानपत्र.

**समाना**–क्रि. अ. सामावणें; राहणें. क्रि. स. भरणें; ठेवणें.

**समानार्थक**–वि. समान किंवा सारखा अर्थ असलेला.

**समारोह**–पु.१ समारंभ. २ धामधूम.

**समालोचक**–पु. टीकाकार.

**समालोचन**–पु. परीक्षण; गुणदोषविवेचन. **समालोचना**— स्त्री. टीका; परीक्षण.

**समिति**–स्त्री. संस्था; सभा; समाज.

**समीचीन**–वि. यथार्थ; योग्य.

**समीक्षा**–स्त्री. १ परीक्षण. २ टीका. ३ बुद्धि. ४ प्रयत्न. [ प्राणवायु.

**समीर–समीरण**––पु. वारा; [ हवातसा.

**समुंदर**–पु. समुद्र.

**समुचित**–वि. १ अुचित. योग्य.

**समुझाना**–क्रि. स. समजावणें.

**समुद**–पु. समुद्र. [२ मोठेपणा.

**समुन्नति**–स्त्री. १ अुन्नति; विकास.

**समुल्लास**–पु. १ अुल्हास; आनंद

**समुहा**–वि. समोरील. क्रि. वि.

**समुहाना**–क्रि. अ. समोर येणें.

**समूचा**–वि. संपूर्ण.

**समूर**–पु. सांबर.

**समेटना** क्रि.स. १ गोळा करणें; अेकत्र करणें. २ आपल्यावर ओढून घेणें.

**समेत**–वि. समवेत; सह.

**समै, समैया**–पु. समय; वेळ.

**समौरिया**–वि. समवयस्क. २ ज्यांची लग्नें अेकाच वेळीं झालीं आहेत असे.

**सम्बुल**–पु. [ अ. ] अेक प्रकारची सुगंधित वनस्पति. ( याची उपमा केसांना देण्यांत येते ).

**सम्म**–पु. [ अ. ] विष.

**सम्मत** वि. सहमत; अनुकूल.

**सम्मति**–स्त्री. १ अभिप्राय. २ सल्ला ३ अनुमति; आज्ञा.

**सम्मान**–पु. [ अ. ] समन्स.

**सम्मान**–पु. सन्मान; आदर.[एकत्र.

**सम्मिलित**–वि. मिश्रित; मिसळलेला;

**सम्मुख**–अव्य. समोर; समक्ष.

**सम्मेलन**–पु. सभा; समाज; परिषद.

**सम्यक्**–वि. पूर्ण; सर्व. क्रि. वि. १ सर्व प्रकारें. २ योग्य प्रकारें.

**सम्हार**–पु. पाहा ‘ सँभार ’

**सम्हालना**–क्रि.स. पाहा ‘सँभालना’

**सयानपन**–पु. हुषारी; चतुरंता.

**सयाना**–पु. १ वयस्क; अनुभविक. वयांत आलेला. २ तरतरीत; हुषार. ३ चलाख. ४ शहाणा.

**सर**–पु. [फा.] १ डोकें. २ सरदार; नेता. ३ शक्ति; बळ. ४ आरंभ. *वि.* जिंकलेला; विजित. ५ (मु.) पाहा ' सिर '.

**सर-अंजाम**–पु. [फा.] १ सामग्री. २ व्यवस्था. ३ कार्याची समाप्ति.

**सरकंडा**–पु. बोरू. [लज्जत; खुमारी.

**सरक**–स्त्री. १ सरकणें २ मदिरेची

**सरकना**–क्रि. अ. १ सरकणें. २ टळणें. ३ निभणें.

**सरकश**–वि. [फा.] १ बंडखोर. २ अुद्धट. स्त्री. **सरकशी**–१ अुद्धटपणा. २ बंडखोरी.

**सरका**–पु. [अ.] चोरी.

**सरकार**–स्त्री. [फा.] १ मालक; प्रभु. २ राज्यसंस्था; शासनसंस्था. ३ संस्थान.

**सरखत**–पु. [फा.] १ भाडेचिठ्ठी २ पट्टीची पावती. ३ आज्ञापत्र; परवाना. ४ कर्जखत.

**सरग**–पु. स्वर्ग.

**सरगना**–पु. [फा.] सरदार; अग्रणी.

**सर-गम**–पु. संगीताचे सप्तस्वर.

**सर-गर्म**–वि. [फा.] तत्पर; तयार.

**सरगुजश्त**–स्त्री. [फा.] १ येअून झेपलेला प्रसंग. २ वर्णन; हकीकत ३ जीवनचरित्र

**सरगोशी**–स्त्री. [फा.] १ कान भरणें; चुगली. २ निंदा.

**सरचश्मा**–पु. [फा.] नदी वगैरेचा अुगम. २ जलस्रोत; झरा.

**सरज़द**–वि. [फा.] प्रकट; जाहीर.

**सरजना**—क्रि. स. १ रचणें. २ सृष्टि करणें.

**सर-ज़मीं–सर ज़मीन**-स्त्री. [फा.] १ देश; मुलूख. २ भूमि; जमीन.

**सरजा**–पु. [फा.] १ श्रेष्ठ व्यक्ति. २ सिंह.

**सरजू-सरयू**–स्त्री. शरयू (नदी).

**सरजोर**–वि. [फा.] १ शिरजोर; जबरदस्त. २ दुष्ट. ३ विरोधी.

**सरदर**–क्रि.वि. १ सरासरी. २ अेका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत.

**सरदा**-पु. [फा.] अेक प्रकारचें खरबूज.

**सरदार**–पु. [फा.] १ पुढारी; नायक. २ शासक. ३ अमीर; श्रीमंत.

**सरदारसभा**–स्त्री. [फा. + सं.] हाअुस ऑफ लॉर्ड्स्.

**सरदी**—पाहा ' सर्दी '.

**सर-धर**–पु. बाणांचा भाता; तूणीर.

**सरन***–स्त्री. शरण.

**सरनद्वीप**–पु. सिंहलद्वीप.

**सरना**–क्रि.अ. १ सरकणें. २ हालणें;

डोलणें. ३ गरज भागणें. ४ संपणें; काम होणें.

**सरनागत**–*वि.* शरण आलेला.

**सरनाम**–*वि.* [फा.] प्रसिद्ध; महशूर.

**सरनामा**–*पु.* [फा.] १ शीर्षक. २ पत्रावर लिहिला जाणारा पत्ता. ३ पत्राचा आरंभ किंवा शेवट; मायना.

**सर-पंच**—*पु.* [फा. + हि.] मुख्य पंच.

**सरपट**–*क्रि. वि.* घोड्याची अेक चाल (भरधांव); जोरांत.

**सरपत**–*पु.* छपराचें गवत; घायपात.

**सरपरस्त**–*पु.* [फा.] संरक्षक.

**सरपोश**–*पु.* [फा.] झांकण.

**सरफराज**–*वि.* [फा.] १ प्रतिष्ठित. २ जिच्याशीं प्रथमच समागम झालेला आहे अशी वेश्या.

**सरफरोश**—*वि.* [फा.] स्वतःचें बलिदान करणारा.

**सर-बराह, सरबराहकार**—*पु.* [फा.] १ व्यवस्थापक. २ मजुरांचा पुढारी.

**सरबराही**–*स्त्री.* [फा.] व्यवस्था.

**सरमस्त**–*वि.* [फा.] मस्त; अुन्मत्त.

**सरमा**–*पु.* [फा.] हिंवाळा.

**सरमाअी**–*स्त्री.* [फा.] हिंवाळ्यांत वापरावयाचे कपडे. *वि.* हिंवाळ्या-संबंधी.

**सरमाया**–*पु.* [फा.] १ मांडवल; मूलधन. २ संपत्ति. ३ कारण. (यौ.) **सरमायादार**–भांडवलदार. **सर-मायादारी**–*स्त्री.* भांडवलशाही.

**सरल**–*वि.* सरळ; सोपा.

**सरवत**–*स्त्री.* [अ.] वैभव.

**सरसअी***–*स्त्री.* सरस्वती.

**सरसना**–*क्रि. अ.* १ टवटवीत होणें. २ शोभणें. [टवटवीत.

**सरसब्ज**–*वि.* [फा.] १ हिरवेंगार;

**सरसरना**–*क्रि. अ.* [अनु.] १ हवा खेळणें. २ सरपटणें. **सरसराहट**–*स्त्री.* १ सरपटणें. २ वायु वाहणें. ३ कंड; खाज.

**सरसरी**–*क्रि. वि.* [फा.] १ घाअीनें; वरवर. २ स्थूल मानानें; सरासरीनें.

**सरसाअी***–*स्त्री.* १ शोभा; सौंदर्य. २ अधिकता. ३ सरसपणा.

**सरसाम**–*पु.* [फा.] सन्निपात; त्रिदोष (रोग). [नशेंत चूर.

**सरसार**–*वि.* [फा.] १ मग्न. २

**सरसिज**–*पु.* कमळ.

**सरसुती**–*स्त्री.* सरस्वती; शारदा.

**सरसेटना**–*क्रि. स.* [अनु.] फट-कारणें.

**सरहज**—*स्त्री.* मेहुण्याची बायको (पत्नीच्या भावाची बायको).

**सरहद**–*स्त्री.* [फा.] १ सरहद्द;

सीमा. २ सीमेची खूण. **सरहद्दी**–सरहद्दीसंबंधीं.

**सरा***—*स्त्री*. चिता.

**सरापा**–*क्रि. वि.* [ फा. ] नखशिखांत; आदीपासून अंतापर्यंत. *पु.* नखशिखांत वर्णन असलेलीकविता.

**सराफ**–*पु.* [*अ.*] १ सोन्या-चांदीचा व्यापारी. २ पैशाच्या मोडीचा धंदा करणारा. [ २ सराफकट्टा.

**सराफा**–*पु.* [*अ.*] १ सराफी काम.

**सराब**–*पु.* [ *अ.* ] १ मृगतृष्णा. २ कपट. *स्त्री*. [दे.] शराब; दारू.

**सराबोर**-*वि.* ओलेंचिंब; चपचपीत.

**सराय**—*स्त्री*. [ *अ.* ] १ घर. २ धर्मशाळा.

**सराव***–*पु.* मद्याचा पेला; शराब.

**सरासर**–अव्य. [ फा. ] १ अेका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत. २ अगदीं; बिलकुल. ३ प्रत्यक्ष.

**सरासरी**–*स्त्री*. [फा.] १ शीघ्रता; घाओ. २ सुगमता. ३ स्थूल अंदाज. *क्रि. वि.* १ स्थूल मानानें. २ घाओनें; गडबडीनें.

**सराह**—*स्त्री*. प्रशंसा.

**सराहना**—*क्रि. स.* प्रशंसा करणें.

**सराहनीय**—*वि.* १ प्रशंसनीय. २ सुंदर; चांगला.

**सरि***—*स्त्री*. नदी.

**सरि***–*स्त्री*. समता; बरोबरी.

**सरित, सरिता**–*स्त्री*. नदी; प्रवाह.

**सरिश्त**—*स्त्री*. [ फा. ] १ स्वभाव; प्रकृति. २ गुण. *वि.* मिसळलेला.

**सरिश्ता**—*पु.* [ फा. ] १ दोरी. २ कचेरी. ३ कार्यालयाचा विभाग. ४ नोकरचाकर. ५ संबंध. ६ मिलाफ.

**सरिश्तेदार**–*पु.* [फा.] शिरस्तेदार.

**सरिस**–*वि.* सदृश; तुल्य; समान.

**सरिहन**–*क्रि. वि.* समक्ष; समोर.

**सरीकता***—*स्त्री*. [ *अ.* + *सं.* ] हिस्सा; वांटा.

**सरीखा**—*वि.* समान; तुल्य.

**सरीहन्**–*क्रि. वि.* [ *अ.* ] स्पष्ट; साफ; जाहीर.

**सरूर**—*पु.* [ फा. ] १ खुशी, प्रसन्नता. २ मामुली नशा.

**सरे-आम**—*क्रि. वि.* [ फा. ] अुघड अुघड; जाहीरपणें.

**सरेदस्त**– *वि.* [ फा. ] १ या वेळीं. २ तावडतोब.

**सरे नौ**–*क्रि. वि.* [ फा.] नव्यानें; पुनः पहिल्यापासून. [जाहीररीत्या.

**सरेबाज़ार**—*क्रि. वि.* [ फा. ]

**सरो**—*पु.* [ फा. ] सुरूचें झाड.

**सरेश-सरेस**–*पु.* [ फा. ] सरस ( चिकटविण्याचा पदार्थ ).

**सरोकार**-पु. [ फा. ] १ परस्पर-संबंध. २ संबंध.
**सरोज, सरोरुह**—पु. कमळ.
**सरोद**—पु. [ फा. ] १ गीत. २ राग. ३ अेक वाद्य.
**सरोसामान**—पु. [फा. ] सामग्री.
**सरौता**—पु. आडकित्ता.
**सर्कस**-स्त्री. [ अिं. ] सर्कस; जनावरांचा खेळ.
**सर्जन**-पु. रचना; निर्मिति; अुत्पात्ति.
**सर्द**—वि. [ फा. ] १ थंड; गार. २ आळशी; सुस्त. ३ मंद; धीमा. ४ नपुंसक. [ सीन. २ निष्ठुर.
**सर्दमिज़ाज**-वि. [ फा. ] १ अुदा-
**सर्दी**—स्त्री. [ फा. ] १ थंडी. २ शीतलता. ३ पडसें.
**सर्फ**-पु. [ अ. ] १ खर्च; व्यय. २ अपव्यय. ३ व्याकरण. **सर्फ**—पु. १ वृद्धि; अधिकता. २ मितव्यय.
**सर्बस**—पु. सर्वस्व; सर्व कांहीं.
**सर्राफ**-पु. पाहा ' सराफ '.
**सर्वथा**-अव्य. १ बिलकुल; अगदीं. २ सर्व तऱ्हेनें; सर्व प्रकारें.
**सर्वदा**-अव्य. सदैव; सदा; हमेशा.
**सर्वनाम**—पु. सर्वनाम.
**सर्वस्व**—पु. सर्व कांहीं; संपूर्ण.
**सर्वाधिकारी**—पु. १ हुकूमशहा. २ न्यायाधीश; जज्ज.
**सर्वोपरि**-अव्य. सर्वश्रेष्ठ; सर्वोत्कृष्ट.
**सलगम**—पु. [ फा. ] नवलकोल.
**सलतनत**—स्त्री. [ अ. ] १ राज्य. २ साम्राज्य. ३ व्यवस्था. ४ आराम.
**सलना**—क्रि.अ. १ सलणें; खुपणें. २ ओंवळें जाणें. [ पावलेला.
**सलब**—वि. [ अ. ] नष्ट; नाश-
**सलमा**—पु. [ अ. ] कलाबूत.
**सलवट**—स्त्री. [ दे. ] सुरकुती.
**सलहज**—स्त्री. [ दे. ] मेहुण्याची ( शालक ) बायको.
**सलाअी**-स्त्री. १ काडी. २ आगकाडी.
**सलाख**-स्त्री. [ फा. ] छड; सळअी; शलाका. [ सलाम; नमस्कार.
**सलाम-अलैकुम** — स्त्री. [ अ. ]
**सलामत**—वि. [अ.] १ संकटांतून निसटलेला; सुरक्षित बाहेर पडलेला. २ निकोप; धडधाकट. क्रि. वि. सकुशल; सुरक्षितपणें. **सलामती**-स्त्री. १ रक्षण; बचाव. २ कुशल; क्षेम. ३ अस्तित्व.
**सलामी**—स्त्री. [ अ. ] १ सैनिकी वंदना; सलामी. २ प्रणाम. (मु.) **सलामी अुतारना-दागना**—स्वागताकरितां तोफांची सलामी देणें.
**सलाह**—स्त्री. [ अ. ] १ सल्ला; मत. २ विचारविनिमय. ३ भले-

पणा. ४ नैतिक आचरण. (यौ.)
**सलाह माश्विरा**–*पु.* सल्लामसलत.

**सलाहकार**—*पु.* [*अ.* + फा.] १ सल्ला देणारा. २ नीतिपूर्वक आचरण करणारा.

**सलाहियत**–*स्त्री.*[*अ.*] १ भलाओी; चांगुलपणा. २ समाचार. ३ समजूतदारपणा. ४ कोमलता.

**सलीका**–*पु.* [*अ.*] १ काम करण्याची लायकी. २ वर्तणूक. ३ ढंग; चांगली पद्धत.

**सलीकामंद**–*वि.* [*अ.* + फा.] १ वाकबगार; तज्ज्ञ. २ सभ्य. ३ हुन्नरी.

**सलीब**–*स्त्री.* [*अ.*] १ शूळ; सूळ. २ येशू ख्रिस्ताचा क्रूस.

**सलीम**—*वि.* [*अ.*] १ ठीक; बरोबर. २ शुद्ध अंतःकरणाचा. ३ निकोप प्रकृतीचा. ४ गंभीर; शांत. ५ सहनशील.

**सलीस**–*वि.* [*अ.*] १ सहज; सुगम. २ अलंकारिक व सोपी (भाषा).

**सलूक**—*पु.* [अ.] १ व्यवहार; वागणूक. २ मिलाफ. ३ अुपकार.

**सलोतर, सालोतर**–*पु.* शालिहोत्र; पशुचिकित्साशास्त्र (विशेषतः अश्व). **सलोतरी-सलोत्तरी**–*पु.* शालिहोत्री; पशुचिकित्सक (विशेषतः अश्व).

**सलोना**—*वि.* १ तिखटामिठाचा; खमंग; स्वादिष्ट. २ सुंदर. **सलोनापन**–*पु.* खुसखुशीतपणा. [पूर्णिमा.

**सलोनो***—*पु.* रक्षाबंधन; राखी-

**सल्तनत**-*स्त्री.* पाहा 'सलतनत'.

**सल्लम**—*स्त्री.* [दे.] जाडें भरडें कापड.

**सवन**—*पु.* प्रसव.

**सवा**–*वि.* सव्वा.

**सवानह**—*पु.* [*अ.*] घटना ('सानहा' चें बहु).

**सवानह-अुमरी**–*स्त्री.*[*अ.*] जीवनचरित्र; आत्मचरित्र.

**सवाब**–*पु.* [*अ.*] १ सत्यता; खरेपणा. २ पुण्य. ३ भलेपणा. *वि.* ठीक; बरोबर.

**सवार**–*पु.* [फा.] घोडेस्वार. *वि.* वर चढलेला अगर बसलेला.

**सवारी**–*स्त्री.* [फा.] १ वाहन. २ स्वारी. ३ आरोहण.

**सवाल**–*पु.* [*अ.*] १ प्रश्न. २ पृच्छा; विचारणा. ३ अर्ज; विनंती. ४ मागणी. **सवाल-जवाब**–*पु.* १ प्रश्नोत्तरें. २ वादविवाद. ३ हुज्जत; झगडा.

**सस, ससि***–*पु.* शशि; चंद्र.

**ससुर**–*पु.* सासरा. **ससुराल**–*स्त्री.* सासर; सासुरवाडी.

**ससुरा**–*पु.* सासरा ( शिवी ).

**सस्ता**–*वि.* स्वस्त; कमी किंमतीचा. ( मु. ) **सस्ते छूटना**–थोडक्या परिश्रमांत अेखादें काम होणें; स्वस्तांत मिळणें. **सस्ताअी, सस्ती**—*स्त्री.* १ स्वस्ताअी; सवंगाअी. २ सर्व वस्तु स्वस्त मिळतील अशी वेळ.

**सस्त्रीक**–*वि.* सपत्नीक.

**सह**–अव्य. सहि; संगें.

**सह**–*वि.* १ हजर; अुपस्थित. २ सहनशील. ३ समर्थ; योग्य.

**सहकार**–*पु.* सहकार्य; सहयोग. **सहकारता—रिता** *स्त्री.* साहाता. **सहकारी**–*पु.* १ सहयोगी. २ मदतनीस; साहाय्यक. [ दोस्त.

**सहचर**–*पु.* १ सेवक. २ मित्र;

**सहचारी**–*पु.* १ साथी; सहकारी. २ सेवक.

**सहज**–*पु.* १ सख्खा भाअू. २ स्वभाव. *वि.* १ स्वाभाविक. २ साधारण. ३ सहज. ४ जुळा.

**सहजन**–*पु.* शेवगा ( झाड व शेंगा).

**सहजिया**–*पु.* १ अेका धर्मातून दुसऱ्या धर्मात विनाकारण जाणारा; अकारण धर्म बदलणारा. २ वैष्णव संप्रदायाचा.

**सहतरा**–*पु.* [फा.] पित्तपापडा.

**सहतूत**–*पु.* [ फा. ] तुती ( झाड व फळ ).

**सहदेअी**–*स्त्री.* चिकणीचें झाड.

**सहधर्मिणी**–*स्त्री.* पत्नी; बायको.

**सहन**-*पु.* [अ.] १ अंगण; घरापुढील मोकळा भाग. २ मूल्यवान् रेशमी कपडा.

**सहन**–*पु.* १ सहनशक्ति. २ क्षमा.

**सहना**–*क्रि. स.* १ सहन करणें. २ फळ भोगणें. ३ जबाबदारी पत्करणें.

**सहनाअी**–*स्त्री.* [ फा. ] सनअी.

**सहपाठी**–*पु.* सहाध्यायी; बरोबर शिकणारा.

**सहभोज**–*पु.* सहभोजन.

**सहम**–*पु.* १ भय. भीति. २ संकोच; मर्यादा. [ होणें.

**सहमना**–*क्रि. अ.* [ फा. ] भयभीत

**सहमाना**–*क्रि. स.* [फा.] भिवविणें.

**सहयोग**–*पु.* सहकार्य. **सहयोगी**–*पु.* १ सहकारी. २ समकालीन.

**सहर**–*पु.* [अ.] पहांट; प्रातःकाल. ( यौ. ) **सहरनुमा**–*वि.* पहांटेचें दर्शन घडविणारा.

**सहर**–*पु.* [अ.] जादुटोणा.

**सहरा**–*पु.* [अ.] १ मोकळें मैदान. २ जंगल; अरण्य.

**सहल**–*वि.* [ अ. ] सोपें; सरळ.

**सहलाना**–*क्रि. स.*[अनु.] १ गोंजारणें; हात फिरविणें. २ चोळणें; रगडणें. ३ गुदगुल्या करणें. *क्रि. अ.* गुदगुल्या होणें.

**सहस**–*वि.* सहस्र.

**सहसा**–अव्य. अेकाअेकीं.

**सहाअि–अी***–*स्त्री.* साहाय्य; मदत. *पु.* साहाय्यक.

**सहानुभूति**–*स्त्री.* कळवळा; आत्मीयता.

**सहाबा**–*पु.* [अ.] १ मित्र. २ महंमदाचा मित्र. **सहाबी**–*पु.* महंदाचे वंशज.

**सहाय**–*पु.* १ सहाय्य; मदत. २ आश्रय. ३ साहाय्यक; मदतगार.

**सहायक-सहायी**–*पु.* १ साहाय्यक; मदतनीस. २ साहाय्यता; मदत.

**सहायता**–*स्त्री.* पाहा ' सहाय '.

**सहार**–*पु.* सहनशीलता.

**सहारना**–*क्रि. अ.* १ सहन करणें. २ जबाबदारी पतकरणें.

**सहारा**–*पु.* १ आश्रय; आधार. २ सहाय्य; मदत. ३ विश्वास.

**सहालग**–*पु.* लग्नसराअी; विवाहाचे मुहूर्त ज्या महिन्यांत असतात तो काल.

**सहिजन**–*पु.* शेवग्याची शेंग किंवा झाड.

**सहिदान***–*पु.* खूण; ओळख. **सहिदानी**–*स्त्री.* १ चिह्न. २ अुपमा.

**सही**–*वि.* [ अ. ] १ सत्य. २ यथार्थ. ३ बरोबर; ठीक. ( मु. ) **सही भरना**–मानणें; अैकणें.

**सही**–*स्त्री.* [ अ. ] सही; हस्ताक्षर.

**सहीसलामत**–*वि.*[अ.] १ निकोप; स्वस्थ. २ निर्दोष; अुणीव नसलेला.

**सहूर**–*पु.* पाहा ' शअूर '.

**सहूलत**–*स्त्री.* [अ.] सोय; सुगमता.

**सहूलियत**-*स्त्री.* [अ.] १ सुगमता; सोय. २ मर्यादा; शिष्टपणा.

**सहृदय**–*वि.* रसिक; सहृदय; दयाळु.

**सहेजना**–*क्रि. स.* [?] १ सांभाळणें; राखण करणें. २ नीट पाहून देणें; सोंपविणें.

**सहेजवाना**–*क्रि. स.* [अ.] सोंपविणें.

**सहेली**–*स्त्री.* १ सखी. २ दासी.

**सहैया***–*पु.* सहाय्यक.

**सहैया**–*वि.* सहनशील.

**सहोदर**–*पु.* भाअू. *वि.* आपला; खास.

**साँअी, साअियाँ, साअिं***–*पु.* १ मालक; स्वामी. २ परमेश्वर. ३ पति. ४ मुसलमान फकिरांची अेक पदवी.

**साँकडा**–*पु.* १ पायांत घालावयाचा दागिना; सांखळ्या. २ साखळदंड.

**साँकर***–*स्त्री.* साखळदंड; साखळी.

**साँकर**––*पु.* संकट; कष्ट; *वि.* १ कष्टमय; दुःखमय. २ संकीर्ण; संकुचित.

**साँग—साँग**—*स्त्री.* १ शक्ति. २ फेंकून मारण्याची बरछी; भाला.

**साँच***—*वि.*, *पु.* सत्य; खरें.

**साँचला**—*वि.* सत्यवादी.

**साँचा**—*पु.* १ सांचा; नमुना (अुपकरण या अर्थी). २ सांचा; नमुना (बनविलेल्या पदार्थासाठीं); वेलबुट्टी काढण्याचा छाप; ठसा. (मु.) **साँचेमें ढला होना**-अतिशय सुंदर असणें; जणूं काय सांच्यांतून काढल्यासारखें असणें.

**साँची**—*पु.* [दे.] १ सांची. २ अेक प्रकारचें विड्याचें पान.

**साँझ—साँझा**—*स्त्री.* संध्याकाळ.

**साँट**—*स्त्री.* [अनु.] १ छडी; चमोटी. २ चाबूक; कोरडा. ३ शरिरावर पडलेला चाबूक अित्यादीचा वळ.

**साँटा**—*पु.* चाबूक. [दवंडी देणारा.

**साँटिया**—*पु.* ढोलके पिटणारा;

**साँटी**—*स्त्री.* १ तडजोड; मिलाफ. २ सूड; प्रतिकार; बदला.

**साँठ**—*पु.* [दे.] १ पाहा 'साँकडा'. २ अूंस. ३ सरकांडें. (यौ.) **साँठ-गाँठ**—अनुचित गुप्त संबंध; सामील होणें.

**साँठी**—*स्त्री.* [दे.] भांडवल; संपत्ति.

**साँड**—*पु.* वळू; पोळ. *वि.* १ बलवान्. २ अुडाणटप्पू.

**साँडनी**—*स्त्री.* सांडणी; अुंटीण.

**सांत्वना**—*स्त्री.* सांत्वन; धीर; आश्वासन.

**साँध**—*पु.* लक्ष्य; वेध.

**साँधना**—*क्रि. स.* सांधणें; अेकत्र करणें; जुळविणें.

**साँधना**—*क्रि. स.* संधि साधणें.

**साँधना**—*क्रि. स.* नेम मारणें; वेध धरणें.

**साँप**—*पु.* साप. (मु.) **कलेजे पर साँप लोटना**—अत्यंत दुःखी होणें; चडफडणें (अीर्ष्या अित्यादी-मुळें). **साँप छछूँदरकी गति (दशा)**—गोंधळलेली स्थिति; कांहीं न सुचणें. **साँप सूँघ जाना**—निर्जीव होणें; मरणें. **आस्तीनका साँप**—अस्तनींतील निखारा. **साँपिन**—*स्त्री.* सर्पीण.

**सांप्रदायिक**—*वि.* १ संप्रदाय किंवा धर्मासंबंधीं. २ धार्मिक; जातीय.

**साँभर**—*पु.* १ राजपुतान्यांतील सांभर नामक तळें. २ सांभर मीठ. ३ सांबर.

**साँभर**—*पु.* प्रवासांतील फराळ.

**साँवरा—रो, साँवला**—*वि.* सांवळा; काळसर. *पु.* १ श्रीकृष्ण. २ पति किंवा प्रेमी यांचें सूचक नांव (पद्यांत).

**साँवलिया**—पु॰ श्रीकृष्ण.
**साँवाँ**—पु॰ वऱ्या.
**साँस**—स्त्री॰ १ श्वास. २ अवकाश. फुरसत. ३ गुंजाअिस; सामावणी. ४ श्वास; दमा (रोग). ५ चीर; फट. ६ दम (थकल्यानंतरचा). ७ भरलेला वारा. (मु.) **साँस अुखडना** अथवा **टूटना**—१ दम अुखडणें. २ श्वास लागणें(मरतांना). **साँस चढना**—दम लागणें. **साँस तक न लेना**—मौन धारण करणें; कांहींहि न बोलणें. **साँस लेना**—विसांवा घेणें. **साँस भरना**—अुत्साहित करणें;जिवंतपणा आणणें.
**साँसा**—पु॰ श्वास; जिवन; प्राण.
**साँसा**—पु॰ १ संशय. २ भय.
**साँसा**—पु॰ [दे.] १ क्लेश त्रास. २ चिंता.
**साँसत**—स्त्री॰ १ श्वास कोंडणें. २ अत्यंत कष्ट. ३ झगडा; बखेडा. (यौ.) **साँसतघर**-पु॰अंधारकोठडी; अगदीं लहान, अंधार असलेली खोली.
**साँसना***—क्रि॰ स॰ १ शिक्षा करणें; दंड करणें. २ दटावणें. ३ कष्ट देणें; त्रास देणें.
**सा**—अव्य. सारखें, तुल्य; समान.
**साअिका**—स्त्री॰ [अ.] वीज.
**साअिकिल**—स्त्री॰ [अिं.] सायकल; दुचाकी.
**साअित, सायत**—स्त्री॰ [अ.] १ मुहूर्त; शुभ वेळ. २ पळ. ३ अेक तास;अडीच घटका. अव्य. [फा.] पाहा ' शायद ".
**साअिद**—पु॰ स्त्री॰ [अ.] १ दंड; बाहू. २ मनगट. [परमेश्वर.
**साअियाँ, साअीं**—पु॰ स्वामी;
**साअी**—पु॰ [अ.] अुद्योगी; प्रयत्न करणारा. स्त्री॰ विसार; बयाणा.
**साअीस**—पु॰ [अनु.] मोतद्दार; घोड्याची सेवा व देखरेख करणारा नोकर. **साअीसी**—स्त्री. मोतद्दाराचें काम.
**साक**—स्त्री. [अ.] पोटरी.
**साका**—पु॰ १ प्रसिद्धि; ख्याति. २ अभिलाषा. ३ संधि ४ धाक.(मु.) **साका चलाना बाँधना**—दरारा बसविणें.
**साकिन**—वि॰ [अ.] १ रहिवासी. अेका स्थानावर स्थिर झालेला; गतिरहित. ३ हलन्त (अक्षर).
**साकी**—पु॰ [अ.] १ दुसऱ्यांना मद्य पाजणारा. २ प्रियकर,प्रेमिका यांच्याकरितां अुपयोगिला जाणारा शब्द.
**साकेत, साकेतन**—पु॰ अयोध्या नगरी. **साकेतक**-पु॰अयोध्यावासी.

**साक्षात्**–अव्य समोर; सन्मुख. *वि*.साकार;मूर्तिमान्.*पु*. भेट; दर्शन.

**साक्षी**–*पु*. १ पाहाणारा २ साक्ष देणारा; साक्षीदार. [३पत;क्रेडिट.

**साख**–*पु*. १ दबाव; वजन २ मर्यादा.

**साख**–*पु*. १ साक्ष. २साक्षीदार.

**साखी***–*पु*. साक्षीदार. *स्त्री*. १ साक्ष. २ ज्ञानासंबंधीं पद किंवा कविता. (मु.) **साखी पुकारना**–साक्ष देणें.

**साख्त**–*स्त्री*. [फा.] १ कपोलकल्पित गोष्ट. २ बनविणें; घडणें; घडण.

**साग**–*पु*. १ भाजी. २ शिजविलेली भाजी. (यौ.) **सागपात**–चटणी-भाकर ( साधें व कोरडें भोजन ).

**सागर**—*पु*. समुद्र.

**साग़र**—*पु*. [ अ. ] १ पेला. २ दारू पिण्याचा पेला; ग्लास.

**सागू**—*पु*. [ अिं. ] साबूदाण्याचें झाड. **सागूदाना**–*पु*. साबुदाणा.

**सागौन**—*पु*. सागाचें झाड.

**साज़**–*पु*. [ फा. ] १ सजावट; थोट-माट. २ सजावटीची सामग्री. ३ वाद्य. ४ लढाअींतील हत्यार. ५ मेळ; मिलाफ. *वि*. तयार करणारा; बनविणारा ( अुदा. घडीसाज ). ( मु. ) **साज़ सजाना**—शृंगार करणें; सजावट करणें.

**साज़गार**–*वि*. [ फा. ] १ दुरुस्त; ठीक. २ शुभ.

**साजन**–*पु*. १पति;स्वामी. २अीश्वर. ३ प्रेमी; वल्लभ. ४ सज्जन.

**साज़बाज़**—*पु*. [ फा. + अनु. ] १ तयारी. २ मेळ; स्नेह.

**साज़सामान**–*पु*. [फा.] १ सामग्री. २ थाटमाट.

**साज़िश**–*स्त्री*.[फा.]१मेळ; मिलाफ. २ षड्यंत्र; अेखाद्याच्या विरुद्ध गुप्त कट करण्याची कारवाअी.

**साझा**–*पु*. १ भागीदारी. २ वांटा; हिस्सा. **साझी**–*पु*. भागीदार.

**साझेदार**–*पु*. [स.+फा.] भागीदार.

**साटक**—*पु*. [ ? ] १ कोंडा; भुसा. २ टाकाअू वस्तु. ३ अेक प्रकारचा छंद. [ रेशमी कापड; साटीन.

**साटन**—*पु*. [ अिं. ] अेक प्रकारचें

**साठ**–*वि*. साठ ( ६० )

**साठ–नाट**—*वि*. १ दरिद्री ;गरीब. २ नीरस, रुक्ष. ३ अस्ताव्यस्त; विखुरलेलें.

**साठा**—*पु*. [ दे. ] अूस.

**साठा**—*वि*. साठ वर्षें वयाचा.

**साडी**—*स्त्री*. लुगडें; साडी.

**साढसाती, साढेसाती**—*स्त्री*. शनीची साडेसाती. [जाणारें धान्य.

**साढी**–*स्त्री*. आषाढ महिन्यांत पेरलें

**साढी**—*स्त्री.* मलअी.
**साढू**—*पु.* साढू; मेहुणीचा नवरा.
**सात**–*वि.* सात. (मु.) **सातपाँच**–चलाखी; लुच्चेगिरी. **सात समुद्र पार**–खूप दूर. (म्हण) **सात पाँचकी लाठी अेक जनेका बोझ**–दसकी लकडी अेकका बोजा.
**सातफेरी**–*स्त्री.* लग्नांतील सप्तपदी.
**सात्विक**—*वि.* सत्त्वगुण असलेला; चांगला.
**साथ**—*पु.* १ संगत; सहवास; साहचर्य. २ साथीदार; सहचर. ३ घनिष्ठता; दाट परिचय. *अव्य.* सहित; सह. (मु.) **अेक साथ**-अेकदम; अेकाच क्रमांत. **साथ ही साथ**–बरोबर; एकत्र. **साथ ही**–शिवाय; अतिरिक्त.
**साथिन**–*स्त्री.* मैत्रीण; सहकारिणी.
**साथी**—*पु.* १ मित्र; दोस्त. २ बरोबर राहणारा; सहचर.
**साथरा**—*पु.* **साथरी**–*स्त्री.* [दे.] १ बिछाना. २ चटअी.
**सादगी**—*स्त्री.* [फा.] १ निष्कपटता; सरळपणा. २ साधेपणा. **सादा**–*वि.* १ साधा; सोपा. २ निर्भेळ; शुद्ध. ३ सरळ; निष्कपटी. ४ मूर्ख. **सादापन**–*पु.* साधेपणा.
**सादा-रू**—*वि.* [फा.] दाढीमिशा नसलेला. [खरा. २ अुपयुक्त.
**सादिक**–*वि.* [अ.] १ सत्यनिष्ठ;
**साध***—*पु.* १ साधु, महात्मा. २ सज्जन.
**साध**—*स्त्री.* कामना, अिच्छा.
**साध**—*वि.* अुत्तम; चांगला.
**साधक**–*पु.* साधना किंवा अुपासना करणारा. [अुपासना.
**साधन**—*पु.* १ अुपाय; मार्ग. २
**साधना**–*क्रि.स.* १ साधणें. २ लक्ष साधणें; नेम धरणें. ३ मापणें. ४ संवय लावणें. ५ ठरविणें; निश्चित करणें. ६ वश करणें. ७ गोळा करणें, जमविणें. *स्त्री.* १ सिद्धि. २ अुपासना. ३ साधन. [आशिर्वाद.
**साधुवाद**—*पु.* आभार; वाहवा;
**साध्य**—*वि.* सिद्ध करण्यास योग्य; सोपें; सहन. *पु.* १ अुद्दिष्ट. २ शक्ति. ३ देव.
**सान**–*पु.* १ धारेचा दगड. २ धार. (मु.) **सान देना** अथवा **धरना**-धार लावणें.
**सानना**–*क्रि.स.* १ मिसळणें; मिश्रण करणें. २ चूण अित्यादि द्रव पदार्थांत मिसळून अेकत्र करणें.
**सानिहा**—*पु.* [अ.] दुर्घटना.
**सानी**—*वि.* [अ.] २ दुसरा. २ बरोबरीचा; जोडीचा.

**सानी**—*स्त्री.* १ वैरण. २ अनेक वस्तूंचें किंवा पदार्थांचें मिश्रण; खिचडी (अुपहास). ३ गाडीच्या चाकाखालीं टेकण लावावयाचा दगड.

**साप-सापा**—*पु.* शाप.

**सापत्न्य**—*पु.* सावत्रपणा; शत्रुत्व.

**सापना**—*क्रि. स.* शाप देणें.

**साफ**—*वि.* [अ.] १ स्वच्छ; निर्मळ. २ शुद्ध. ३ निर्दोष. ४ स्पष्ट. ५ अुज्ज्वल. ६ चमकदार. ७ निष्कपट.

**साफा**—*पु.* [अ.] पागोटें; फेटा; पगडी.

**साफी**—*स्त्री.* [अ.] १ रुमाल. २ तंबाखू किंवा गांजा पितांना चिलमीस गुंडाळावयाचें फडकें. ३ भांग छानावयाचें वस्त्र.

**साबिक**—*वि.* [अ.] पूर्वीचा. (यौ.) **साबिक दस्तूर**—पूर्वीसारखेंच; पहिल्याप्रमाणेंच.

**साबिका**-*पु.* [अ.] १ मुलाखत; भेट. २ संबंध.

**साबिका**—*वि.* [अ.] पूर्वीचा.

**साबित**—*वि.* [अ.] १ शाबूत; अभंग. २ दुरुस्त; ठीक. ३ दृढ; मजबूत. ४ प्रमाणभूत; सिद्ध झालेला. ५ स्थिर; अेकाच ठिकाणीं राहणारा.

**साबिर**—*वि.* [अ.] सबूर करणारा; धीर करणारा.

**साबुत**—*वि.* [फा.] १ शाबूत. २ ठीक. ३ स्थिर.

**साबुन**—*पु.* [अ.] साबण.

**साबूदाना**—*पु.* [दे.] शाबुदाणा.

**सामंजस्य**—*पु.* १ समन्वय. २ औचित्य; संगति.

**सामंत**—*पु.* १ वीर; योद्धा. २ सरदार; मांडलिक. (यौ.) **सामंतशाही**—*स्त्री.* सरदारशाही; मध्ययुगीन व्यवस्था.

**सामग्री**—*स्त्री.* १ सामान. २ जरूरीच्या वस्तु. ३ साधन.

**सामना**—*पु.* १ भेट; मुलाखत. २ विरोध. ३ स्पर्धा. ४ दृष्टादृष्ट. ५ वस्तूचा दर्शनी भाग.

**सामने**—*क्रि. वि.* १ सन्मुख; समोर. २ हजर असतांना. ३ तुलनेंत. ४ विरुद्ध.

**सामयिक**—*वि.* १ समयानुकूल. २ वर्तमानकालीन. (यौ.) **सामयिक पत्र**—वर्तमानपत्र.

**सामरिक**-*वि.* युद्धसंबंधीं; लढाअीचें.

**सामर्थ्य**—*स्त्री.* शक्ति; बळ; पौरुष; पराक्रम.

**सामान**—*पु.* [फा.] १ सामान; अुपकरण; सामग्री. २ व्यवस्था.

**सामान्य**—*वि.* सर्वसाधारण; मामुली.

**सामिष**—*वि.* मांससहित; मांसाहारी.
**साम्य**—*पु.* समानता; बरोबरी. (यौ.)
**साम्यवाद**—*पु.* कम्यूनिझम; समाजसत्तावाद; समाजवाद. [साम्राज्य.
**साम्राज्य**—*पु.* सार्वभौम राज्य;
**सायक**—*पु.* बाण. [छप्पर.
**सायबान**—*पु.* [फा.] घराचें पुढील
**सायर***—*पु.* १ समुद्र. २वरचा भाग.
**सायर**—*वि.* [अ.] अेकंदर; संपूर्ण. २ अुरलेला; अवशिष्ट. *पु.* १ मजा मारणारा. २अुडाणटप्पू. ३ जकात
**सायल**—*पु.* [अ.] १ प्रश्न करणारा; पृच्छक. २ मागणारा. ३ भिकारी. ४ प्रार्थना करणारा. ५ अुमेदवार.
**साया**—*पु.*[फा.]१छाया; सावली. २ प्रतिबिंब. ३ भूत, प्रेत अि. (मु.) **सायेमें रहना**- अेखाद्याच्या आश्रयाला राहणें. [पेहराव.
**साया**—*पु.*[अ.]लेहंग्यासारखा बायकी
**सायादार**—*वि.* [फा.] छायादार; दाट सावली असलेलें.
**सारंग**—*पु.* १ कोकिळा. २ हंस. ३ मोर. ४ बहिरी ससाणा. ५ हरिण. ६ सूर्य. ७ चंद्र. ८ विष्णु. ९ मेघ. १० अेक राग (संगीत).
**सारंगपाणि**—*पु.* विष्णु.
**सार**—*पु.* १ सत्त्व; तत्त्व; सारांश. २ अर्क. ३ पालन-पोषण. (यौ.)
**सार सँभार**—*पु.* पालन-पोषण.
**सारस**—*पु.* १ अेक पक्षी. २ हंस. ३ कमल. ४ चंद्र.
**सारांश**—*पु.* तात्पर्य.
**सारा**—*वि.* सगळा.
**सारिका**—*स्त्री.* मैना.
**सारूप्य**—*पु.* चार प्रकारच्या मुक्तींपैकीं अेक. (याविेळीं अुपासक आपल्या अिष्ट देवतेशीं अेकरूप होअून जातो.)
**सार्थ**—*वि.* अर्थासह.
**सार्थक**—*वि.* सफळ; अुपकारी; अुपयोगी; सार्थक.
**सार्दूल**—*पु.* सिंह.
**सार्वकालिक**—*वि.* सर्वकाळांचा; नेहमींचा.
**सार्वजनिक-सार्वजनीन**—*वि.* सार्वजनिक; सर्वांचा.
**सार्वदेशिक**—*वि.* सर्व देशाचा.
**साल**—*पु.* [फा.] वर्ष.
**साल**—*स्त्री.* १ छेद. २ घाव. जखम. ३ दुःख; पीडा. ४ बाजेच्या खुरांचीं भोकें.
**सालक**—*वि.* दुःख देणारा.
**साल खुर्दा**—*वि.* [फा.] १ जुना; पुष्कळ दिवसांचा. २वृद्ध; म्हातारा.
**साल-गिरह**—*स्त्री.* [फा.] वाढदिवस.

**सालन**—पु. मसालेदार भाजी.
**सालना**—क्रि. अ. १ सलणें; दुःख होणें. २ बोंचणें; टोंचणें. क्रि. स. १ दुःख देणें. २ बोंचविणें.
**सालहा साल**—क्रि. वि. [फा.] पुष्कळ वर्षेंपर्यंत; वर्षानुवर्षें. **साला**-वि. अेक वर्षाचा. **सालाना, सालियाना**-वि.वार्षिक; सालिना.
**साला**—पु. १ मेहुणा (बायकोचा भाअू). २ अेक शिवी. **साली**-स्त्री. मेहुणी.
**सालार**—पु. [फा.] नेता; पुढारी.
**सालारजंग**-पु. [फा.] १ सेनापति. २ मेहुणा (थट्टा).
**सालिक**-पु. [अ.] १ प्रवासी. २ धार्मिक व नीतिमान्. [२ निरोगी.
**सालिम**-वि. [अ.] १ संपूर्ण; सर्व.
**सालिस**--वि. [अ.] १ तिसरा; तृतीय. पु. मध्यस्थ; पंच.
**सालिसनामा**-पु. [अ. + फा.] पंचनामा. [मास असलेलें वर्ष.
**साले कबीसा**—पु. [फा] अधिक
**साले-पैवस्ता**-पु. [फा.] मागील वर्ष.
**साले-रवाँ**-पु. [फा.] चालू वर्ष.
**सालेह**-वि. [अ.] १ प्रामाणिक. २ सदाचारी. ३ भाग्यवान्.
**सालेहाल**-पु. [फा+अ.] चालू वर्ष.
**सालोक्य**—पु. चार प्रकारच्या मुक्तींपैकीं अेक. (यावेळीं मुक्त जीव परमात्म्याबरोबर त्याच्या लोकीं निवास करतो.)
**सावँर-रा**-वि. पाहा 'साँवला'.
**सावकाश**-पु.१ सवड; फुरसत; सुट्टी. २ संधि; अवसर.
**सावचेत**--वि. सावधान; सचेत.
**सावज**-पु. सावज; शिकारी जनावर.
**सावत**—पु. १ सवतींमधील मत्सर. २ अीर्ष्या; द्वेष.
**सावधान**—वि. सावध; जागरूक. **सावधानता**—स्त्री. सावधगिरी; खबरदारी. **सावधानी** — स्त्री. सावधपणा; खबरदारी.
**सावन**—पु. १ श्रावण महिना. २ श्रावण महिन्यांत गाअिलें जाणारें गीत (कजरी).
**सावनी**—स्त्री. १ श्रावणपाटी. २ श्रावणी. ३ श्रावणी पौर्णिमा.
**सावाँ**—पु. वरी (धान्य).
**साष्टांग**—वि. आठ हि अंगें जमिनीस टेकतील असा; आठ अंगांसहित. (मु.) **साष्टांग प्रणाम (दंडवत) करना**-दूरून नमस्कार करणें; दूर राहणें.
**सास**-स्त्री. सासू.
**सासत**--स्त्री. कष्ट; त्रास.

**सासन**—स्त्री· १ शासन; सजा. २ राज्यकारभार. [सावकार; शेट.
**साह**—पु· १ सज्जन. २ व्यापारी. ३
**साहनी**—स्त्री· [ ? ] १ सैन्य; फौज. २ सहचर. ३ परिषद.
**साहब**—पु· [अ·] १ मित्र; दोस्त. २ मालक. ३ परमेश्वर. ४ आदर-सूचक शब्द; महाशय. ५ साहेब; युरोपियन; गोरा माणूस. **साहबा**-स्त्री· 'साहब' शब्दाचें स्त्रीलिंगी रूप. **साहबाना**-वि· साहेबासारखें **साहबी**-स्त्री· १ प्रभुता. २ मोठे-पणा. वि· साहेबी.
**साहब-जादा**—पु· [अ· + फा·] १ प्रतिष्ठित व्यक्तीचा मुलगा. २ पुत्र; मुलगा.
**साहब सलामत**—स्त्री· [अ·] परस्पर अभिवादन; नमस्कार.
**साहस**—पु· १ हिम्मत; धैर्य; धाडस. २ जबर्दस्ती; जुलूम.
**साहसिक**—पु· १ साहस करणारा; पराक्रमी. २ निर्भय. ३ डाकू; चोर. [नदीचा किनारा.
**साहिल**—पु· [अ·] समुद्राचा किंवा
**साहु-हू**—पु· १ सज्जन. २ सावकार.
**साहूकार**-पु· सावकार. **साहूकारा**-पु· १ रुपयांची देवघेव. २ साव-कारांचा व्यवहार चालतो ती पेठ.
**साहूकारी**—स्त्री· सावकारी.
**साहेब**—पु· पाहा 'साहिब'.
**साहैं***—स्त्री· भुजा; बाहु.
**सिकना**—क्रि· अ· शेकलें जाणें.
**सिंगा**—पु· शिंग ( वाद्य ); रणशिंग.
**सिंगार**-पु· शृंगार; सजावट. २ शोभा. ३ शृंगाररस.
**सिंगारना**-क्रि·स· सजविणें; शृंगारणें.
**सिंगारदान**—पु· [ सं· + फा· ] वेणीफणीची पेटी.
**सिंगारहाट**—स्त्री· वेश्यांचा बाजार.
**सिंगारी**—वि· पु· शृंगार करणारा.
**सिंगाल**—पु· पहाडी बकरा.
**सिंगाला**—वि· शिंगें असलेला.
**सिंगी**—पु· १ शिंग ( वाद्य ). २ घोड्याचें वाअीट लक्षण. स्त्री· १ पावसाळ्यांत अुत्पन्न झालेली मासळी. २ रक्त शोषण्याचें शिंग.
**सिंगौटी**—स्त्री· १ बैलाच्या शिंगाचें आभूषण. २ शिंग.
**सिंगौटी**—स्त्री· वेणीफणीची पेटी.
**सिंघाडा**-पु· शिंगाडा. **सिंघाडी**-स्त्री· शिंगाड्याचें तळें.
**सिंघासन**-पु· सिंहासन.
**सिंचना**—क्रि· अ· शिंपडलें जाणें.
**सिंचाअी**—स्त्री· शिंपडण्याचें काम किंवा मजुरी.

**सिंचाना**–*क्रि. स.* शिंपडण्याचें काम दुसऱ्याकडून करविणें.
**सिंजाफ**–*पु.* [फा.] १ कपड्याची किनार; गोठ. २ काळसर पांढरा घोडा.
**सिंदूर**–*पु.* शेंदूर. **सिंदूरतिलका**–*स्त्री.* सौभाग्यवती स्त्री.
**सिंदूरदान-सिंदूरबंदन**–*पु.* विवाह-प्रसंगीं वधूच्या भांगांत शेंदूर भरण्याचा संस्कार.
**सिंदोरा, सिंधोरा**–*पु.* शेंदूर ठेवण्याची डबी.
**सिंह**–*पु.* १ सिंह. २ सिंह राशि.
**सिंहद्वार**–*पु.* मुख्य दरवाजा; मोठा दरवाजा.
**सिंहनाद**–*पु.* सिंहाची गर्जना.
**सिंहनी**–*स्त्री.* सिंहीण.
**सिंहपौर**–*पु.* सिंहद्वार; मोठें फाटक
**सिंहल**–*पु.* लंका; सिलोन.
**सिंहावलोकन**–*पु.* सिंहाप्रमाणें मागें वळून पाहणें.
**सिंहासन**– राजाचें किंवा देवाचें आसन; गादी.
**सिंहिनी-सिंही**—*स्त्री.* सिंहीण.
**सिआना**–*क्रि. स.* पाहा 'सिलाना'
**सिआर, सियार**–*पु.* कोल्हा.
**सिकंजबीन**–*स्त्री.* [फा.] आसव.
**सिकंदरा**–*पु.* [फा.] रेल्वे सिग्नल.
**सिकटा**–*पु.* [दे.] खापराचा तुकडा.
**सिकडी**—*स्त्री.* १ दाराची कडी. २ करगोटा. ३ साखळी.
**सिकत्तर***–*पु.* [इं.] सेक्रेटरी; मंत्री.
**सिकली**–*स्त्री.* [अ.] हत्याराला धार लावण्याचें काम. **सिकलीगर**–*पु.* हत्याराला धार लावणारा.
**सिकहर**–*पु.* शिंकें.
**सिका**–*पु.* [अ.] विश्वासू व्यक्ति.
**सिकुडन**–*स्त्री.* १ आकुंचन; संकोच. २ सुरकुती.
**सिकुडना**–*क्रि. अ.* १ आकसणें; संकोचणें. २ सुरकुती पडणें. ३ तंग होणें.
**सिकोडना**—*क्रि. स.* १ संकुचित करणें. २ गोळा करणें.
**सिक्कड-सिक्कर**-*पु.* १ पाण्याचा यंत्र. २ घाम. *स्त्री.* शृंखला; बेडी.
**सिक्का**–*पु.* [अ.] १ शिक्का; मोहर. २ छाप; ठसा (नाण्यावरील). ३ नाणें (विशेषतः रुपया) ४ पदक. (मु.) **सिक्का बैठना** अथवा **जमना**-१ सत्ता स्थापित होणें. २ छाप बसणें.
**सिक्ख, सिख**–*पु.* १ शिष्य; अनुयायी. २ नानकपंथी; शीख.
**सिख**–*स्त्री.* शिकवण.
**सिख***– १ शिखर. २ शेंडी.
**सिखरन**—*स्त्री.* १ शिकरण. २ कोशिंबीर.

**सिखलाना, सिखाना, सिखावना***—*क्रि. स.* १ शिकविणें. २ अुपदेश देणें.

**सिखाअी**—*स्त्री.* शिक्षण अुपदेश.

**सिखापन**—*पु.* १ शिकवण; अुपदेश. २ शिकविण्याचें काम. **सिखावन**—*पु.* अुपदेश; शिकवण.

**सिगर**—*पु.* [*अ.*] बालपण. (यौ.) **सिगरसिन**-अल्पवयी.

**सिगरा, सिगरो***—*वि.* संपूर्ण;सर्व.

**सिजदा**—*पु.* [*अ.*] नमस्कार; प्रणाम.

**सिजदार**—*पु.* [दे] तंबू, राहुटी अित्यादींचें दोरखंड.

**सिझना**-*क्रि. अ.* शिजणें.

**सिझाना**—*क्रि. सं.* १ शिजविणें. २ अुकळणें. ३ तपस्या करणें; शरीर झिजविणें. ४ चिखल तुडविणें (कुंभार). [खिटी; बोलट.

**सिटकिनी**—*स्त्री.* [अनु.] दाराची

**सिटपिटाना**—*क्रि. अ.* [अनु.] १ फिकें पडणें; वजन न पडणें, २ कितर्तव्यमूढ होणें. ३ मनांतल्या मनांत जिरणें.

**सिट्टी**—*स्त्री.* वाक्पटुता; बडबड. (मु.) **सिट्टी (सिट्टी-पट्टी) भूल जाना**-गडबडून जाणें.

**सिठनी**—*स्त्री.* विवाहप्रसंगीं गाअिलें जाणारें शिव्यायुक्त गाणें, अुखाणे अि. (अुत्तर हिंदुस्तान).

**सिठाअी**—*स्त्री.* १ नीरसता; फीकेपणा. २ मंदपणा.

**सिड**—*स्त्री.* १ अुन्माद. २ नाद; वेड. **सिडी**—*वि.* १ बावचळलेला; वेडा. २ छांदिष्ट. ३ ध्येयवेडा.

**सितंबर**—*पु.* [अिं.] सप्टेंबर महिना.

**सित**—*वि.* १ पांढरा; श्वेत. २ चमकदार. *पु.* १ शुक्लपक्ष. २ चांदी. ३ साखर.

**सितम**—*पु.* [फा.] १ जुलूम; अत्याचार. २ अनर्थ; गहजब.

**सितमगर**—*पु. वि.* अन्यायी; जुलुमी.

**सितमज़दा**—*वि.* [फा.] ज्याच्यावर जुलूम झालेला आहे असा; अत्याचार पीडित.

**सितमज़रीफ़**—*वि.* [फा. + *अ.*] हंसत-हंसत जुलूम अत्याचार करणारा. [२ दारू.

**सिता**—*स्त्री.* १ साखर; खडीसाखर.

**सितार**—*पु.* [फा. व *सं.*] सतार (वाद्य.) **सितारिया**-*पु.* सतार वाजविणारा. **सितारी**—*स्त्री.* तुणतुणी.

**सितारा**—*पु.* [फा.] १ तारा; नक्षत्र. २ नशीब; दैव. ३ चांदीची किंवा सोन्याची टिकली. (मु.) **सितारा चमकना** अथवा **बलंद होना**—भाग्य चमकणें किंवा अुदयास येणें.

**सितारा-शनास**—पु. [फा.] ज्योतिषी.

**सितारे-हिन्द**—पु.[फा.]'स्टार ऑफ अिंडिया'चा किताब. (अिंग्रज सरकारकडून हा किताब दिला जात असे.)

**सितुअी**—स्त्री. शिंप. [थकलेला.

**सिथिल**—वि.१ शिथिल; ढिला. २

**सिदि‍क-सिद्‌क**—पु. सत्यता; खरे-पणा. [ताबतोब; तात्काल.

**सिदौसी**—क्रि.वि.[दे.] लौकर;शीघ्र;

**सिद्दीक**—वि. अत्यंत सच्चा; परम सत्यनिष्ठ.

**सिद्ध**—वि. १ सफल; कृतार्थ. २ शाबित. पु. ज्ञानी; महात्मा.

**सिद्धहस्त**—वि. निपुण.

**सिद्धान्त**—पु. निश्चित मत; अुद्देश.

**सिद्धार्थ**—वि. ज्याच्या वासना पूर्ण झाल्या आहेत असा; पूर्णकाम. पु. गौतम बुद्ध.

**सिधाअी**—स्त्री. सरळपणा.

**सिधारना**—क्रि. अ. १ जाणें; प्रस्थान करणें. २ स्वर्गवास होणें.

**सिधि***—स्त्री. सिद्धि.

**सिन**—पु. [अनु.] वय.

**सिनक**—स्त्री. शेंबुड.

**सिनकना**—क्रि. अ. नाक शिंकरणें.

**सिनेमा**—पु. [अिं.] बोलपट; चित्रपट.

**सिपर**—स्त्री. [फा.] १ ढाल; रक्षण करणारी वस्तु.

**सिपह**—स्त्री. [फा.] सेना; सैन्य. **सिपहगिरी, सिपाहगिरी**—स्त्री. शिपाअीपेशा. **सिपाहियाना**—वि. शिपायासारखा. [पति.

**सिपहसालार**—पु. [फा.] सेना-

**सिपास**—स्त्री. [फा.] १अभिनंदन. २ कृतज्ञता; आभार. **सिपास-नामा**—पु. निरोप; रवानगी.

**सिपाही**—पु. [फा.] १ सैनिक; शिपाअी. २ पट्टेवाला; चपराशी.

**सिपुर्द**—पु. [फा.] हवालीं करणें.

**सिप्पा**—पु. [दे.] १ लक्ष्य. २ कार्यारंभ. ३ शिफारस. ४ दरारा. ५ अुपाय; युक्ति. [मु.] **सिप्पा जमाना**—अनुकूल परिस्थिति अुत्पन्न करणें.

**सिफ़त**—स्त्री. [अ.] १ गुण; विशे-षता. २ लक्षण. ३ स्वभाव.

**सिफ़र**—पु. [अ.] शून्य; बिंदु.

**सिफ़ला**—वि. [अ.] नीच; हलकट.

**सिफ़ारत**—स्त्री. [फा.] १ परराष्ट्रीय वकील अथवा राजदूत याचें कार्य, पद वगैरे. २ परराष्ट्रीय वकील किंवा राजदूत.

**सिफ़ारतखाना**—पु. [फा.] परराष्ट्रीय वकिलाची कचेरी.

**सिफारिश**–*स्त्री*· [फा.] शिफारस. **सिफारिशी**–*वि*· १ शिफारस केलेला. २ शिफारस असलेला.
**सिब्त**–*पु*· [अ.] वंशज; संतान.
**सिमअी**–*स्त्री*· शेवया.
**सिमटना, सिमिटना**–*क्रि· अ*· १ संकुचित होणें; आकसणें; २ सुरकुत्या पडणें ३ अेकत्र होणें. ४ क्रमवार लागणें. ५ पूर्ण होणें; संपणें. ६ संकोच करणें.
**सिय*,सिया**–*स्त्री*· जानकी; सीता.
**सियह**–*वि*· [फा ] काळा. २ अशुभ,
**सियरा**–*वि*· १ थंड; शीतल.२कच्चा.
**सियादत**–*स्त्री*· [अ.] १ नेतृत्व; पुढारीपण. २ अधिकार; हुकुमत. ३ फातमा बीबीचे वंशज.
**सियापा**–*पु*· [फा.] मृतासाठीं स्त्रियांनीं अेकत्र बसून शोक करण्याची पद्धत.
**सियार, सियाल**–*पु*· कोल्हा.
**सियारा**—*पु*· कुळव; नांगरलेली जमीन सारखी करण्याचें अवजार.
**सियाला**–*पु*· हिंवाळा.
**सियावडी**–*स्त्री*· [दे.] १ कापणीनंतर धर्मादायासाठीं काढून ठेवलेलें धान्य, २ पक्ष्यांना भिवविण्यासाठीं शेतांत अुंच अुभी केलेली हंडी.
**सियासत**–*स्त्री*· [अ.] १ राष्ट्रसंरक्षण व शासन. २ शासनव्यवस्था; राजकारण. ३ ताकीद; तंबी. ४ गडबड; धिंगाणा. **सियासत दाँ**–*वि*· राजकारणी; राजनीतिज्ञ. **सियासती**–*वि*· राजकीय.
**सियासी** *वि*.[अ.]राजकीय.[काळा.
**सियाह**–*वि*· [फा ] १ अशुभ. २
**सियाहगोश**–*पु*· [फा.] रानमांजर.
**सियाहत**–*स्त्री*·[अ.] प्रवास; सफर.
**सियाह पोश**–*वि*· [फा.] मृत्युशोक किंवा सुतक म्हणून ज्यानें काळे किंवा निळे कपडे परिधान केले आहेत असा. [करंटा.
**सियाहबख्त**–*वि*· [फा.] दुर्दैवी;
**सियाहबातिन**–*वि*· [फा.] कलुषित अंतःकरणाचा; कुटिल.
**सियाहा**–*पु*· [फा.] १ जमाखर्चाची वही.२सरकारी वसुलाची नोंदवही.
**सियाही**–*स्त्री*· [फा.] १ शाई. २ अंधार; काळोख.३कलंक;बदनामी.
**सिर**–*पु*· १ डोकें; शिर. २ कवटी. (मु.) **सिर आँखोंपर बैठाना (लेना)**–अत्यंत आदरसत्कार किंवा प्रेम करणें; डोकीवर घेणें. **सिर अुठाना**–१ विरोध करणें. २ दंगामस्ती करणें. **सिर करना**–केंस सावरणें; केंस विंचरणें (स्त्रियांचें).

**सिर खाना**–डोकें अुठविणें; त्रास देणें. **सिर खपाना**–कामात व्यग्र होणें; खूप विचार करणें. **सिर घूमना**–डोकें दुखणें; चक्कर येणें. **सिर चकराना**–चक्कर येणें; डोकें भणभणणें. **सिर चढाना**–खूप आदरसत्कार किंवा प्रेम करणें; लाड करणें. **सिर झुकाना**–मस्तक नमविणें; नमस्कार करणें. **सिर धुनना**–शोकानें किंवा पश्चात्तापानें डोकें बडवून घेणें. **सिर नीचा करना**–लज्जेनें मान खालीं घालणें. **सिर पटकना**—पाहा 'सिर धुनना'. **सिर पर आ पडना**–डोकीवर येअून कोसळणें; जबाबदारी येणें. **सिर पर चढना**–अंगांत भूत संचारणें. **सिर पड़ना**–अंगावर पडणें (जबाबदारी). **सिर फिरना**–वेड लागणें. **सिर मारना**—खूप विचार करणें. **सिर मुँडाते ही ओले पडना**–कार्य सुरू होतांच त्यांत विघ्न येणें. **सिर से कफन बाँधना**—मरण्यास तयार होणें; जिवावर अुदार होणें. **सिर से पैर तक**–१ डोक्यापासून पायापर्यंत. २ सुरवातीपासून अखेरपर्यंत. **सिर होना**–गळ्यांत पडणें; मागें लागणें.

**सिरकटा**—*वि.* १ ज्याचें शिर कापलें आहे असा. २ अपशकुनी.

**सिरका**—*पु.* [फा.] आसव.

**सिरजक***—*पु.* सृजन करणारा; निर्माता; सृष्टिकर्ता.

**सिरजनहार-रा**–*पु.* निर्माण करणारा; सृष्टिकर्ता परमेश्वर. [रचणें.

**सिरजना**–*क्रि. स.* अुत्पन्न करणें.

**सिरताज**–*पु.* [सं.+फा.] १ मुकुट. २ शिरोमणी; श्रेष्ठ व्यक्ति. ३ नेता; सरदार.

**सिरनामा**–*पु.* १ मथळा; शीर्षक. २ पाकिटावर लिहिलेला पत्ता. ३ मायना (पत्राच्या सुरवातीचा).

**सिरनेत**–*पु.* पगडी; साफा.

**सिरपेंच**–*पु.* १ शिरपेंच. २ पगडीवर बांधण्याचा तुरा. [पगडी अि.

**सिरपोश**–*पु.* [सं.+फा.] टोपी,

**सिर फुटौवल-सिर फोडौवल**–*स्त्री.* [यौ.] भांडण; मारामारी; डोकेफोड. [२ पागोटें.

**सिरफेंटा**–*पु.* [फा.] १ साफा; कोषा.

**सिरबंद**–*पु.* [सं.+फा.] १ साफा; कोषा. २ पागोटें.

**सिरमौर**–*पु.* १ मुगुट. २ श्रेष्ठ व्यक्ति.

**सिरवा**–*पु.* धान्य अुफणतांना वारा घालावयास वापरतात तें वस्त्र. **सिरवा मारना**–वस्त्रानें वारा घालणें (अुफणतांना).

**सिरस-सिरसि**–*पु.* शिरीष ( झाड व फूल). [डोक्याकडील भाग;उसें.
**सिरहना-सिरहाना**–*पु.* बाजेचा
**सिरँचा**–*पु.* [ दे. ] वेत.
**सिरा**–*पु.* १ टोंक; अखेरचा भाग. २ वरचा भाग. ३ अणकुची. ४ आरंभींचा भाग (मु.) **सिरेका**–सर्व प्रथम; पहिल्या दर्जाचा. **परले या पल्ले सिरेका**–कमालीचा; अत्यंत.
**सिरा**–*स्त्री.* शीर; नाडी.
**सिराज**–*पु.* [*अ.*] १ सूर्य. २ दिवा.
**सिरावना**–*क्रि. स.* १ थंड करणें. २ समाप्त करणें. ३ कंठणें; घालविणें. **सिराना**–*क्रि. अ.* १ थंड होणें. २ मंद होणें. ३ संपणें. ४ सवड मिळणें.
**सिरिश्क**–*पु.* [फा.] अश्रू.
**सिरिश्ता**–*पु.* [फा.] विभाग; खातें. **सिरिश्तेदार**–*पु.* शिरस्तेदार.
**सिरोपाव**–*पु.* पोशाख (राजाकडून मिळणारा ).
**सिर्फ**–*क्रि. वि.* [*अ.*] केवळ; मात्र. *वि.* १ एकमात्र; एकटा. २ शुद्ध; निर्भेळ.
**सिल**–*स्त्री.* [ *अ.* ] क्षयरोग.
**सिल**–*स्त्री.* १ दगड; शिळा. २ पाटा ( चटणी वगैरे वाटण्यासाठीं ). ३ दगडाची चीप.
**सिलखडी**–*स्त्री.* १ संगजिऱ्याचा दगड. २ खडू. [३ नाश झालेला.
**सिलपट**–*वि.* १ सपाट. २ झिजलेला
**सिलबट्टा**–*पु.* पाटा-वरवंटा.
**सिलवट**–*स्त्री.* [ दे. ] सुरकुती.
**सिलवाना**–*क्रि. स.* शिववून घेणें; शिवण्याचें काम दुसऱ्याकडन करवून घेणें.
**सिलसिला**–*पु.*[*अ.*]१ क्रम; परंपरा. २ श्रेणी; पंक्ति. ३ लोखंडाची सांखळी; शृंखला. ४ व्यवस्था. *वि.* १ ओला. २ घसरडें; निसरडें. ३ गुळगुळीत. **सिलसिलेवार**–*वि.* क्रमानुसार;क्रमवार. [क्रमबद्धपणा.
**सिलसिलाबंदी**–*स्त्री.* [*अ.* + फा.]
**सिलह, सिलाह**–*पु.* [*अ.*] हत्यार.
**सिलहखाना, सिलाहखाना**–*पु.* [*अ.* + फा.] शस्त्रागार.
**सिलहपोश, सिलाहबंद**–*पु.* [*अ.* + फा. ] शस्त्रधारी.
**सिलहारा, सिलाहर**–*पु.* शेतांतील उरलेंसुरलें धान्य वेंचणारा.
**सिलहिला**—*वि.* निसरडा.
**सिला**–*पु.* १ शिळा; दगड. २ शेतांत उरलेंसुरलें धान्य.
**सिला**—*स्त्री.* शिळा; दगड.
**सिला**–*पु.* [*अ.*] १ अिनाम; पारितोषिक. २ प्रभाव.

**सिलाअी**—*स्त्री*. १ शिलाअी; शिवणकाम. २ शिवण्याची मजुरी; शिलाअी. ३ टांका; शिवण.
**सिलाना**-*क्रि. स.* पाहा 'सिलवाना'.
**सिलावट**—*पु.* पाथरवट.
**सिलाही**—*पु.* [ *अ.* ] सैनिक.
**सिलौट, सिलौटा**—*पु.* १ पाटा. २ पाटा व वरवंटा. **सिलौटी**—*स्त्री.* लहान पाटा.
**सील्क**-*पु.* [अिं.] रेशीम.
**सिल्क**-*पु.* [*अ.*] १ मोत्याची लड. २ हार माळ अि. चा दोरा. ३ क्रम.
**सिल्ला**—*पु.* शेतांत पडलेले दाणे, [ कणसें अि.
**सिल्ली**—*स्त्री.* १ धारेचा दगड. २ शिला; दगडी चीप.
**सिवअीं**—*स्त्री.* शेवया.
**सिवा**—अव्य. [ *अ.* ] शिवाय; वांचून; व्यतिरिक्त. *वि.* अधिक; जादा.
**सिवान**—*पु.* सरहद्द; सीमा [ (प्रदेशाची).
**सिवाय**-*क्रि. वि.* शिवाय; खेरीज.
**सिवार**-*स्त्री.* शेवाळ. **सिवाल**-*पु.* शेवाळ.
**सिवाला**—*पु.* १ शंकराचें मंदिर. २ मंदिर; देअूळ ( क्वचित् ).
**सिष**—*पु.* शिष्य; चेला.
**सिसकना**—*क्रि. अ.* [ अनु. ] १ स्फुंदणें; रडणें. २ छाती धडधडणें. ३ मरणाचे वेळीं अुचकी लागणें. ४ तळमळणें; व्याकुळ होणें ( अेखाद्या वस्तूकरितां ).
**सिसकारना**—*क्रि. अ.* [ अनु. ] तोंडानें शीळ वाजविणें.
**सिसकारी,सिसकी**—*स्त्री.* हुंदका.
**सिसिर***—*पु.* शिशिर ऋतु.
**सिसु***—*पु.* शिशु; बालक.
**सिहरना**—*क्रि. अ.* १ कांकडणें. थंडीनें कांपणें. २ अंगावर शहारे येणें. ३ भयभीत होणें. **सिहरी**—*स्त्री.* १ गारठ्यामुळें कांपणें; हुडहुडी. २ थंडीताप. ३ रोमांच अुभे राहणें; शहारे येणें. ४ भय; भीति.
**सिहरा**—*पु.* [ दे ] मुंडावळ.
**सिहाना**-*क्रि. अ.* १ अीर्ष्या करणें; द्वेष करणें. २ स्पर्धा करणें. ३ हांव सुटणें. ४ मुग्ध होणें.
**सिहारना***—*क्रि. स.* [दे.] शोध करणें. [ २ नाकांतील लवंग.
**सींक**—*स्त्री.* १ गवताची काडी.
**सींका**—*पु.* १ डहाळी. २ शिंकें.
**सींकिया**-*पु.* [ दे. ] रेघांचें रंगीत कापड. *वि.* बारीक; हडकुळा. (यौ.) **सींकिया पहलवान**—काडीपैलवान.

**सींग**—पु· १ शिंग (जनावराचें). २ शिंग (वाद्य). (मु.) (**किसीके सिरपर**) **सींग होना**—कांहीं तरी विचित्रपणा असणें; वैशिष्ट्य असणें (अुपरोधात्मक). **सींग काटकर बछडोंमें मिलना**—पाय (शिंग) मोडून वासरांत शिरणें.

**सींगना**—क्रि· स· शिंगावरून चोरीचीं जनावरें ओळखणें.

**सींगी**—स्त्री· शिंग (वाद्य).

**सींच**—स्त्री· शिंपण.

**सींचना**—क्रि· स· १ पाणी शिंपडणें. २ भिजविणें.

**सींवँ***—पु· सीमा; हद्द; मर्यादा. (मु.) **सींवँ चरना** अथवा **काँडना**—अधिकार गाजविणें.

**सी**—वि· स्त्री· समान; तुल्य. [घाम.

**सीकर**—पु· १ पाण्याचा थेंब. २

**सीकर***—स्त्री· हातकडी; शृंखला.

**सीकल**—पु· [दे.] झाडावर पिकलेला आंबा.

**सीकल**—स्त्री· [अ·] हत्यारावर चढलेला गंज काढणें; साफ करणें.

**सीका***—पु·मुकुट. [लहान शिंकें.

**सीका**—पु· शिंकें. **सीकी**—स्त्री·

**सीकाकाओ**—स्त्री· शिकेकअी.

**सीकी**—पु·[दे.] भोंक; छिद्र.

**सीकुर**—पु· धान्याच्या कणसावरील फुलोरा. [२ सल्ला. ३ शिक्षण.

**सीख**—स्त्री· १ शिकवण; अुपदेश.

**सीख**—स्त्री· [फा.] १ लोखंडी छड. २ मांस भाजण्याची लोखंडी सळअी.

**सीखचा**—पु· लोखंडी गज.

**सीखना**—क्रि· अ· १ शिकणें; ज्ञान संपादन करणें. २ (अेखादी गोष्ट) समजावून घेणें.

**सीगा**—पु· [अ·] १ सांचा. २ व्यापार; पेशा. ३ विभाग.

**सीझना**—क्रि· अ· १ अुष्णतेमुळें वितळणें किंवा मअू पडणें. २ कातडें मअू होणें. ३ कष्ट सहन करणें. ४ थंडीमुळें काकडणें; गारठणें. ५ कर्जाची फेड होणें.

**सीटना**—क्रि· स· [अनु.] बढाअी मारणें; शेखी मिरविणें. **सीटपटाँग**—स्त्री· दर्पोक्ति.

**सीटी**—स्त्री· १ शीळ. २ शिटी (आवाज). ३ शिटी (वाजविण्याचें साधन).

**सीठना**—पु· विवाहप्रसंगीं स्त्रिया गातात तें अश्लील गीत (अुत्तर हिंदुस्तान). **सीठनी**—स्त्री·

**सीठा**—वि· नीरस; फिक्का; बेचव. **सीठी**—स्त्री· १ चौथा. २ निःसत्त्व

पदार्थ. ३ बेचव पदार्थ.

**सीड**—स्त्री· ओल. [पायरी.

**सीढी**—स्त्री· १ शिडी. २ जिना;

**सीत**--पु· थंडी; हिंवाळा.

**सीतपकड**–पु· हत्तीला गारठ्यामुळें होणारा रोग.

**सीतलपाटी**–स्त्री· १ अेक प्रकारची अुत्तम चटअी. २ धारीदार कापड.

**सीतला**–स्त्री· १ देवी. ( रोग ) २ कांजण्या. [ कोहळा. ३ भोपळा.

**सीताफल**--पु· १ सीताफळ. २

**सीत्कार**—पु· दुःखोद्गार.

**सीथ**—पु· शीत ( भाताचें ).

**सीदना**--क्रि· अ· दुःख होणें.

**सीध**--स्त्री· १ लक्ष्य; निशाण. २ समोरची जागा. ( मु. ) **सीध बाँधना**–१ रस्ता तयार करण्यासाठीं प्रथम रेघ ओढणें. २ लक्ष्य निश्चित करणें.

**सीधा**—वि· १ सरळ; कोठें वांकडेपणा नसलेला. २ सरळ स्वभावाचा. ३ शांत; सुशील. ४ सुबोध. ५ अुजवा. ( मु ) **सीधा करना**–वटणीवर आणणें. ( यौ. ) **सीधा-सादा**–भोळा; निष्कपटी. **सीधी तरह**–सरळपणानें; सहज.

**सीधा**—पु· शिदा.

**सीधा**--क्रि· वि· समोर; सरळ.

**सीधापन**--पु· सरळपणा.

**सीधे**–क्रि·वि· १ सरळ; समोर. २ थेट; सरळ. ३ सभ्यपणानें; तक्रार न करतां. ४ शांतपणानें.

**सीन**--पु· [ अिं. ] १ नाटकांतील दृश्य. २ देखावा; सीन.

**सीना**-क्रि·स· १ शिवणें;जोडणें. २टांके मारणें. ( मु. ) **सीना पिरोना**–कशिदा काढणें; शिवणें-टिपणें.

**सीना**–पु· कसर; लोंकरीच्या कपड्याला लागणारी कीड.

**सीना**–पु·[फा.]१ छाती; वक्षःस्थळ. २ स्तन. (मु.) **सीने से लगाना**-छातीला लावणें. (यौ.) **सीना-कावी**–खूप परिश्रम. **सीना-कोबी**–स्त्री·छाती बडवून मृताबद्दल शोक करणें. **सीना-जोर**–वि· अत्याचारी. **सीनाबंद**–पु· चोळी.

**सीनाबाँह**–पु· [ फा. + सं· ] अेक. प्रकारचा व्यायाम.

**सीनी**—स्त्री· [ फ़ा. ] तबक.

**सीप**–पु· शिंप. **सीपिज**–पु· मोत्यें.

**सीपारा**–पु· [फा.] कुराणाच्या तीस विभागांपैकीं किंवा अध्यायांपैकीं अेखादा विभाग किंवा अध्याय.

**सीपी**—स्त्री· शिंप.

**सीमंत**–पु· १ स्त्रियांच्या केसांचा भांग. २ हाडांचा सांधा.

